कर्नाटक विश्वविद्यालय आणि पुणें विद्यापीठ
संयुक्त प्रकाशन क्र. १



श्रीनिजगुणशिवयोगीकृत

# विवेकचिंतामणि

संपादक
प्रा. पण्डित आवळीकर
प्रमुख, मराठी विभाग, कर्नाटक आर्टस् कॉलेज, धारवाड.



१९६३

कर्नाटक विश्वविद्यालय आणि पुणें विद्यापीठ
संयुक्त प्रकाशन क्र. १



श्रीनिजगुणशिवयोगीकृत

# विवेकचिंतामणि

संपादक
प्रा. पण्डित आवळीकर
प्रमुख, मराठी विभाग, कर्नाटक आर्टस् कॉलेज, धारवाड.



१९६३

मुद्रक : रं. श्री. सरदेशपांडे
उपकार्यवाह, पुणें विद्यापीठ, पुणें ७.

प्रकाशक : एस्. एस्. वोडेयर, एम्. ए., एल्एल्. बी.
कार्यवाह, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड.

आणि

व. ह. गोळे, एम्. ए.
कार्यवाह, पुणें विद्यापीठ, पुणें ७,

मुद्रणस्थल : पुणें विद्यापीठ मुद्रणालय, पुणें ७.



किंमत : रुपये सहा नवे पैसे पंच्याहत्तर.

प्रती : १०००.

प्रकाशन-काल : जून १९६३.

# FOREWORD

The late Lokamanya Tilak always used to say that the culture of Maharashtra and Karnatak was one. There has been a great impact of Karnatak culture on Maharashtra ard vice versa during the last 1000 years or so.

The present book was written by a great Veerashiva saint Shri Nijaguna Shivayogi, who hailed from a place near Mysore. There is a legend that he was a king and like Lord Buddha he renounced his kingdom and became an ascetic. He took his residence on a hill near Mysore known as 'Shambhuligana Betta'. This work is believed to have been written by him on that hill. The work is a sort of encyclopædia dealing with various topics of Indian philosophy, music, etc. The second chapter is exclusively devoted to Veerashaiva philosophy. There is a controversy about the exact period in which Nijaguna Shivayogi lived, but, on the basis of the Marathi translation of the original Kannada work, it can be definitely said that he lived before 1604 A. D. for, this Marathi translation was produced at that time.

The Marathi translation was brought about by Shantalinga Shivayogi of Shikhar Shinganapur. Similarly this original Kannada work was translated into Tamil by Shivaprakasha Swami and into Sanskrit by Nirvana Mantri and Lingaraja.

The mauscript of the Marathi translation was procured for the University from Shri D. R. Bendre and Shri Krishna Sharma Betgeri.

I am happy that Prof. Awalikar has edited this work with a critical introduction and useful notes. In his introduction—which is purely of a research type, he has thrown much light on so many unknown facts.

When he approached the Karnatak University for its publication I thought that it would be more appropriate if this work could be published under the joint auspices of the Karnatak and Poona Universities. Apart from these two Universites being neighbouring universities, there have been many contacts and this

is one more link in the chain which unites the two Universities. When this proposal was made to the then Vice-Chancellor of the Poona University, Prof. D. G. Karve readily agreed and I am happy that we have been able to bring about this edition under the joint auspices of the Poona and Karnatak Universities. I hope that the Marathi Readers will find it useful and instructive.

**D. C. Pavate,**
**Vice-Chancellor,**
**Karnatak University, Dharwar,**

# पुरस्कार

शान्तेश्वर किंवा शान्तलिंग–विरचित विवेक–चिंतामणि नामक मराठी ओवीबद्ध अनुवाद-ग्रंथाचे प्रस्तुतचें प्रकाशन हें **पुणें विद्यापीठ आणि कर्नाटक विद्यापीठ यांच्या सहयोगाचें** पहिलें गोड फळ म्हणून विद्वज्जनांस सादर करण्यास मला परमानंद वाटत आहे.

दोन शेजारच्या विद्यापीठांमधील हा सहकार जसा अत्यंत रुचिर आहे त्याचप्रमाणें विवेक-चिंतामणी या मूळ निजगुणशिवयोगी विरचित कानडी ग्रंथाचा शान्तलिंगकृत मराठी अनुवाद हाहि मराठीच्या सर्व उपासकांस तितकाच रुचिर आणि स्वागतार्ह वाटेल याबद्दल मला शंका नाहीं.

कर्नाटक विद्यापीठांतील मराठीचे प्राध्यापक पंडित आवळीकर यांनी या ग्रंथाचें संपादन केलें आहे. अलीकडील कित्येक वर्षांत पंडित आवळीकर यांनी प्राचीन मराठी साहित्यांत शोधाचीं नवीं दालनें उघडलीं आहेत आणि पुष्कळ मोलाची भर ते टाकीत आहेत. विजापूरचे श्री. ना. ब. जोशी यांनीहि अलीकडे अशा विषयांत बरेंच शोधप्रधान लिखाण केलें आहे. श्री निजगुणशिवयोगी–विरचित ‘ परमानुभवबोध–निर्गुणयोग ’ श्री. जोशी यांनी संपादन केलेला श्री. मल्लिकार्जुन स्वामी शिवानंद मठ यांनी प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथांतच त्यांचा ‘ निजगुण-शिवयोगी–काळ आणि कार्य ’ हा निबंध प्रसिद्ध झाला आहे.

या जोशी–आवळीकर यांच्या संशोधनानें जशी पुष्कळ माहिती आपणांस मिळत आहे त्याप्रमाणें जुन्या मराठी साहित्याच्या अभ्यासकां-समोर नवीन कोडींहि उभीं रहात आहेत. कानडी आणि मराठी या दोन्ही भाषांचा अभ्यास मराठी आणि कानडी वाङ्मयांच्या अभ्यासकांनी करणें किती आवश्यक आहे याचा प्रत्यय या लेखकांच्या प्रयत्नानें येत आहे. विजापूरसारख्या कर्नाटकांतील प्रसिद्ध नगरांत ज्ञानेश्वरकालीन मराठी

शिलालेख मिळालेला पूर्वींच छापलेला आहे. दुर्गादेवीच्या दीर्घकालीन दुष्काळ–पर्वांत महाराष्ट्र ओस पडला आणि महाराष्ट्रांतील पुष्कळ घराणीं कर्नाटकांत स्थायिक झालीं, या घटनेंचे परिणाम बारकाईनें शोधले पाहिजेत. आमचे कर्नाटकी संशोधक मित्र कै. नारायणराव राजपुरोहित यांनी शिलालेखांच्या आधारें अशा घराण्यांतील आडनावांचें साद्दश्य कांहीं लेखांतून दाखविलें होतें. कर्नाटक आणि महाराष्ट्र यांच्यांतील द्दढ संबंधाचे अतूट धागे बहुत शतकें तग धरून आहेत आणि अलीकडील प्राचीन साहित्य संशोधन बळावत जाईल तसे तसे ते अधिक स्पष्ट होतील. या द्दष्टीनें आवळीकर–जोशी प्रभृतींच्या संशोधनाला सर्वांनी मनःपूर्वक साहाय्य केलें पाहिजे.

जयरामस्वामी वडगांवकर हे दासपंचायतनांतील एक प्रमुख सत्पुरुष असून त्यांची समाधि सातारा जिल्ह्यांत पुसेसावळीजवळ त्यांच्याच नांवानें प्रसिद्ध असलेल्या वडगांवीं आहे. त्यांच्या मठांतील समाधीवरील लेखांतील श्लोक अद्यापहि नीट लावले गेले नाहींत. जयरामस्वामींच्या गुरुपरंपरेंत शान्तलिंग येतात आणि याच शान्तलिंगांनी केलेला विवेक-चिंतामणि–अनुवाद आज प्रसिद्ध होत आहे.

कानडी, मराठी, लिंगायत, वैदिक, गुरव, ब्राह्मण वगैरे अनेक प्रश्नांचा खल करतांना या विवेक-चिंतामणिसारख्या ग्रंथांचा फार उपयोग होईल.

प्रस्तुत मराठी अनुवादाचे दहा परिच्छेद आहेत. त्यासाठीं छापील ३४१ पृष्ठें खर्ची पडलीं आहेत. आणि श्री. आवळीकर यांनी या ग्रंथाच्या अनुषंगानें उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांच्या विवरणासाठीं ९८ छापील पानांची विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. विस्तृत विषयानुक्रमणिकाहि जोडली आहे. पृष्ठ ३४२ ते ३७१ पर्यंत पाठभेदांचें परिशिष्ट जोडलें आहे. त्यानंतर टीपांचे एक परिशिष्ट जोडले आहे तें ३७५ ते ४३४ पर्यंत आहे आणि ४३५, ४३६ पानांवर कांहीं प्रक्षेप-विक्षेपाचा विचार आहे. हा प्रक्षेप-विक्षेपाचा विचार फारच त्रोटक झाला आहे.

विवेक-चिंतामणिकर्ता मोठा बहुश्रुत विद्वान् आहे यांत शंका नाहीं. शेकडों ग्रंथांचा त्यानें उल्लेख केला आहे. ग्रंथाच्या प्रारंभीं

'वागर्थाविव संपृक्तौ' हा कालिदासाचा प्रसिद्ध श्लोक कां घातला कळत नाहीं. वेद, आगम, ब्राह्मण यांच्याविषयीं उत्तम श्रद्धा विवेकचिंतामणिकारानें व्यक्त केली आहे. असंख्य मतमतांतरांचा उल्लेख ग्रंथाच्या प्रारंभीं केला आहे. त्यांत वैदिक अवैदिक सर्व आले आहेत. 'मिमांशीक' अशा प्रकारचीं अशुद्ध रूपें पुष्कळ या पोथींत आलीं आहेत. संपादकांनी जोडलेल्या टीपांमध्यें याविषयीं कांहीं दिग्दर्शन मिळेल. प्रथम परिच्छेद २३२ सईश्वरवादी म्हणजे सेश्वरवादी अशी भर घालावयाची व टीपांत सर्वच उल्लेख करावयाचे तर फार विस्तार झाला असता. निरनिराळ्या उल्लेखांची मूळ स्थळें दाखवावयाचीं तर तो एक अभ्यासाचा स्वतंत्र विषय आहे. जसें, प्रथम परिच्छेद ओव्या २९८, २९९ आठ प्रकारचे गुरु–बोधक, वेधक, निषिद्ध, काम्य, सूचक, वाचक, कारक, विहित. ओवी ३९२ मध्यें सत्ता म्हणावयाच्या ऐवजी संत लिहिलें आहे. विवेक चिंतामणींत 'वेदान्तसकळशास्त्रनिर्णय' असल्याचें ग्रंथकार दर्शवित आहेत. (प्रथम परिच्छेद आंणि दशम परिच्छेद, शेवट पहा)

मराठीमध्यें आजवर अनेक जुने ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. पण विवेक-चिंतामणि हा एका दृष्टीनें फार आगळा वाटेल. पंडित आवळीकर यांनी हा ग्रंथ प्रसिद्धीला आणून सामाजिक, आर्थिक व धार्मिक सर्व शाखांच्या संशोधनाला एक नवें उत्कृष्ट खाद्य पुरविलें आहे. याबद्दल सर्व विद्याभिलाषी मंडळी त्यांचे, तसेंच कर्नाटक विद्यापीठाचें, विशेषतः कर्नाटक विद्यापीठाचे कुलगुरु माझे मित्र डॉ. दा. चिं. पावटे यांचे सानंद कौतुक करतील याविषयीं मला शंका नाही.

कुलगुरु निवास,<br>
गणेशखिंड,<br>
पुणें विद्यापीठ, पुणें ७.<br>
सौर ज्येष्ठ १०/१८८५

दत्तो वामन पोतदार

# अनुक्रमणिका



---

# प्रस्तावना

## १. ' विवेकचिंतामणी 'चा कर्ता

' विवेकचिंतामणि ' हा कन्नड वाङ्मयांतील एक ज्ञानकोशासारखा गद्य-ग्रंथ आहे. प्रस्तुत मराठी ग्रंथ हा त्याचा सुमारें साडेतीनशें वर्षांपूर्वी झालेला अनुवाद आहे. मूळ ग्रंथाच्या कर्त्याचें नांव निजगुणशिवयोगी असें असून त्यांच्यासंबंधीं फारच थोडी चरित्रपर माहिती मिळते.

निजगुणशिवयोगी हे राजे होते. सुमारें नऊशें वर्षांपूर्वी ते होऊन गेले. मैसूर प्रांतांत ' शंभुलिंगन बेट्ट ' म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रदेशावर त्यांचें स्वामित्व होतें. निजगुणाराध्य हें त्यांचें नांव. परंतु पुढें वैराग्य उत्पन्न होऊन त्यांनीं शिवयोगांत प्रगति करून घेतली. म्हणून त्यांना निजगुणशिवयोगी या नांवानेंच सर्वजण ओळखूं लागले. ' विवेकचिंतामणी 'प्रमाणेंच आणखी सहा ग्रंथ त्यांच्या नांवावर मोडतात. बसवेश्वरांनीं आपल्या वचनांत निजगुणशिवयोगींची प्रशंसा केली आहे. त्यावरून ते बसवेश्वरांच्या आधीं होऊन गेले हें स्पष्ट होतें;[१] अशी माहिती मल्लिकार्जुनशास्त्री देतात.

ही माहिती विवाद्य आहे. कारण निजगुणशिवयोगी हे राजकुलांतील होते असें मानण्यास सबळ आधार नाहीं. त्यांच्या कालाबाबतहि एकमत नाहीं. त्यामुळें ते बसवेश्वर-पूर्वकालीन असल्याचें मल्लिकार्जुनशास्त्र्यांचें मत निर्णायक मानतां येणार नाहीं.

निजगुणांच्या वास्तव्यस्थानाबद्दलची कथा खरी वाटते. ' शंभुलिंगन बेट्ट ' ( =शंभुलिंगाचा डोंगर ) हें ठिकाण मैसूर जिल्ह्याच्या कोळ्ळेगल तालुक्यांत कावेरी नदीच्या काठीं आहे. (पूर्वी तो भाग कोईमतूर जिल्ह्यांत होता). तेथें त्यांनीं बारा वर्षें तपश्चर्या केली असें सांगितलें जातें. या ठिकाणीं निजगुणांशीं निगडित असणाऱ्या कांहीं गोष्टी अजून पाहावयास मिळतात.

तेथें शंभुलिंगाचें देऊळ आहे. शंभुलिंग हें निजगुणांचें आराध्य दैवत होय. त्याचा उल्लेख आपल्या ग्रंथांत ते वरचेवर करतात. निजगुणांच्या नांवाची एक गुहाहि तेथें आहे. दुसरी गुहा त्यांचे समकालीन मुप्पिन षडक्षरी यांची आहे असें मानलें जातें.

---

१. विवेकचिंतामणि ( पूर्वभाग ), प्रस्तावना, पृ. १ ( तळटीप ).

# प्रस्तावना

## १. 'विवेकचिंतामणी 'चा कर्ता

'विवेकचिंतामणि' हा कन्नड वाङ्मयांतील एक ज्ञानकोशासारखा गद्य-ग्रंथ आहे. प्रस्तुत मराठी ग्रंथ हा त्याचा सुमारें साडेतीनशें वर्षांपूर्वी झालेला अनुवाद आहे. मूळ ग्रंथाच्या कर्त्याचें नांव निजगुणशिवयोगी असें असून त्यांच्यासंबंधीं फारच थोडी चरित्रपर माहिती मिळते.

निजगुणशिवयोगी हे राजे होते. सुमारें नऊशें वर्षांपूर्वी ते होऊन गेले. मैसूर प्रांतांत 'शंभुलिंगन बेट्ट' म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रदेशावर त्यांचें स्वामित्व होतें. निजगुणाराध्य हें त्यांचें नांव. परंतु पुढें वैराग्य उत्पन्न होऊन त्यांनीं शिवयोगांत प्रगति करून घेतली. म्हणून त्यांना निजगुणशिवयोगी या नांवानेंच सर्वजण ओळखूं लागले. 'विवेकचिंतामणी 'प्रमाणेंच आणखी सहा ग्रंथ त्यांच्या नांवावर मोडतात. बसवेश्वरांनीं आपल्या वचनांत निजगुणशिवयोगींची प्रशंसा केली आहे. त्यावरून ते बसवेश्वरांच्या आधीं होऊन गेले हें स्पष्ट होतें;[१] अशी माहिती मल्लिकार्जुनशास्त्री देतात.

ही माहिती विवाद्य आहे. कारण निजगुणशिवयोगी हे राजकुलांतील होते असें मानण्यास सबळ आधार नाहीं. त्यांच्या कालाबाबतहि एकमत नाहीं. त्यामुळें ते बसवेश्वर-पूर्वकालीन असल्याचें मल्लिकार्जुनशास्त्र्यांचें मत निर्णायक मानतां येणार नाहीं.

निजगुणांच्या वास्तव्यस्थानाबद्दलची कथा खरी वाटते. 'शंभुलिंगन बेट्ट' (=शंभुलिंगाचा डोंगर) हें ठिकाण मैसूर जिल्ह्याच्या कोळ्ळेगल तालुक्यांत कावेरी नदीच्या काठीं आहे. (पूर्वी तो भाग कोईमतूर जिल्ह्यांत होता). तेथें त्यांनीं बारा वर्षें तपश्चर्या केली असें सांगितलें जातें. या ठिकाणीं निजगुणांशीं निगडित असणाऱ्या कांहीं गोष्टी अजून पाहावयास मिळतात.

तेथें शंभुलिंगाचें देऊळ आहे. शंभुलिंग हें निजगुणांचें आराध्य दैवत होय. त्याचा उल्लेख आपल्या ग्रंथांत ते वरचेवर करतात. निजगुणांच्या नांवाची एक गुहाहि तेथें आहे. दुसरी गुहा त्यांचे समकालीन मुप्पिन षडक्षरी यांची आहे असें मानलें जातें.

---

१. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), प्रस्तावना, पृ. १ (तळटीप).

निजगुणांचे गुरु कोण हाहि प्रश्न अजून सुटलेला नाहीं. " त्यांनीं आपल्या कोणत्याहि ग्रंथांत गुरूंचा सुद्धां नामनिर्देश केला नसून लेखनकालहि दिला नाहीं ;[२] " असें एके ठिकाणीं ना. ब. जोशी म्हणतात. तर तेच पुढें असें सांगतात : " श्री निजगुण हे त्यांच्या प्रत्येक ग्रंथाच्या व त्यांतील बहुतेक सर्व प्रकरणांच्या सुरुवातीस शंभुलिंगाशिवाय कोणासहि वंदन करीत नाहींत. यावरून असा विचार मनांत येतो कीं शंभुलिंग देवासच त्यांनीं आपला गुरु मानिलें असावें. हेंहि संभवतें कीं त्याच्या गुरूंचें नांवहि शंभुलिंगच असावें. ते आपल्या ' नरजदिंद '...या पदांत शेवटीं म्हणतात ' गुरु शंभुलिंगादिं परदैवयुंटे ! ' त्याचप्रमाणें कैवल्यपद्धतींतील अनेक पदांतून ते ' गुरु शंभुलिंग ' असाच उच्चार करितात. ( पहा कैवल्यपद्धति, पदें ३, ४, ६, ८, ९ वगैरे ). ' परमानुभवबोधे'च्या १ ल्या प्रकरणाच्या पहिल्याच सूत्रांत ' श्रीगुरु शंभुलिंगद पादपंकज। विगेन्न मतिगे मंगलवनु ' असें निजगुण म्हणतात. या व आणखी अनेक उल्लेखांवरून शंभुलिंगच त्यांचे गुरुस्थानीं असावे असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.[३] " निजगुणांच्या गुरुविषयीं श्री. जोशी यांनीं केलेलें अनुमान निश्चित विचारार्ह आहे. निजगुण कोणा ' निराभारी देशिकोत्तमा'चा उल्लेख ' विवेकचिंतामणीं'त करतात. " He also refers to Nirabhari Desikottama, who may have been his preceptor ";[४] असें प्रा. माळवाडांना त्यामुळेंच म्हणावेसें वाटलें. परंतु केवळ या नामोल्लेखाच्या आधारें तसें निश्चयानें म्हणणें अवघड जाईल. हाहि एक तर्कच मानावा लागेल.

चन्नसदाशिव हे निजगुणांचे गुरु असावेत असाहि कांहींचा तर्क आहे. निजगुणांनीं आपला ' परमार्थप्रकाशिका ' हा ग्रंथ चन्नसदाशिवांच्या ' शिवयोग प्रदीपिका ' या संस्कृत ग्रंथाच्या आधारें लिहिला एवढीच गोष्ट या तर्काच्या मुळाशीं आहे. एखाद्या ग्रंथकाराचा कोणी आधार घेतला म्हणजे तो ग्रंथकार आधार घेणाऱ्याचा गुरु ठरेल असें वाटत नाहीं.

भुजलिंग हे निजगुणांचे गुरु असावेत असाहि एक तर्क आहे. त्याला आधार म्हणजे भुजलिंगांचे शिष्य मुप्पिन षडक्षरी व निजगुण एकाच ठिकाणीं व एकाच वेळीं तपश्चर्या करीत होते या गोष्टीचा. परंतु दोघांनीं अशी एके जागीं तपश्चर्या केली असें मानलें ( वास्तविक हीहि दंतकथाच आहे ) तरीहि त्यामुळें त्या दोघांचे गुरु एकच होते असें म्हणणें बरोबर ठरणार नाहीं. तसें असूं शकेल, पण आहेच असें म्हणतां येणार नाहीं.

---

२. श्री निजगुणशिवयोगी : काल व कार्य, पृ. ४.

३. श्री निजगुणशिवयोगी : काल व कार्य, पृ. २०.

४. Studies in Education and Culture, in honour of Shri. D. C. Pavate, P. 369.

चन्नसदाशिव अथवा भुजलिंग यांचा गुरु म्हणून निजगुणांनीं कोठेंहि उल्लेख केलेला नाहीं. त्यामुळें 'शंभुलिंग' हें त्यांच्या गुरूचें नांव असावें हा श्री. जोशी यांचा तर्क सत्याला अधिक जवळचा वाटतो. गुरु आणि लिंग (किंवा दैवत) यांच्यांत वीरशैव भेद मानीत नाहींत. त्यामुळें 'शंभुलिंग' हें त्यांच्या देहधारी गुरूचें नांव असणें अधिक संभाव्य आहे.

निजगुणांच्या कालाबाबत अनेक मतें पुढें आलीं आहेत. १२ व्या शतकापासून ते १७ व्या शतकापर्यंत त्यांचा काल मानण्याची प्रवृत्ति संशोधकांत दिसते. ते बसवेश्वर-पूर्वकालीन आहेत हें जें मल्लिकार्जुनशास्त्र्यांचें म्हणणें त्याला कांहीं गोष्टींचा आधार दिला जातो. मुख्य म्हणजे निजगुण बसवेश्वरांचा उल्लेख करीत नाहींत. 'अरवत्तमूवर त्रिपदि' या आपल्या ग्रंथांत ६३ पुरातनांचीं (शैवसंतांचीं) चरित्रें देतांना निजगुण बसवेश्वरांचा उल्लेख करीत नाहींत. याच्या उलट बसवेश्वरांच्या वचनांत निजगुणांची प्रशंसा आढळते.

परंतु वरील गोष्टींचा अधिक विचार करतां हें ध्यानांत येतें कीं, निजगुण कोणाचाच उल्लेख करीत नाहींत. त्यामुळें बसवेश्वरांचा नामोल्लेख नाहीं ही गोष्ट कालनिर्णयास साहाय्यक नाहीं. ६३ पुरातन हे तमिळ संत असल्यानें त्यांचीं चरित्रें सांगतांना बसवेश्वरांचा उल्लेख करणें आवश्यक नव्हतें. बसवेश्वरांनीं ज्या निजगुणशिवयोगींची प्रशंसा आपल्या वचनांत केलेली आहे, ते निजगुण प्रस्तुत निजगुणांहून वेगळे असण्याची शक्यता डोळ्यांआड करून चालणार नाहीं. निजगुण या नांवाच्या एकाहून अधिक व्यक्ति झाल्या असणें शक्य आहे. तसेंच निजगुणांच्या भाषेचा विचार करून सुप्रसिद्ध कन्नड संशोधक आर्. नरसिंहाचार्य यांनीं ही भाषा १२ व्या शतकांतील नसल्याचें मत दिलें आहे. अमलानंदाच्या 'कल्पतरू'चा निर्देश 'विवेकचिंतामणी'त असल्यानें अमलानंदानंतर म्हणजे खि. स. १२५० नंतर निजगुण झाले असावेत असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु कांहीं प्रतींत 'कल्पतरू'चा निर्देश नाहीं. ('विवेकचिंतामणी'च्या मराठी अनुवादांतहि तो नाहीं.) त्यामुळें व १२ व्या शतकांतील नेमिचंद्र, नागचंद्र व अग्गळ या कवींचीं नांवें निजगुण देतात, यामुळें निजगुण हे १३ व्या शतकांत झाले असावेत असें बी. शिवमूर्तिशास्त्री यांचें मत आहे. प्रा. द. रा. बेंद्रे यांना 'विवेकचिंतामणी'वरून कवीनें विद्यारण्यांच्या 'जीवन्मुक्तिविवेक' व 'पंचदशी' या ग्रंथांचें अध्ययन केलें असावें असें वाटतें. विद्यारण्यांचा काळ १४ वें शतक हा आहे. डॉ. मुगळींनीं आपल्या 'कन्नड साहित्यचरिते'मध्यें त्यांचा काल १३–१४ व्या व १७ व्या शतकामध्यें असा दिलेला आहे. १७ व्या शतकांतला षडक्षरी त्यांचा उल्लेख करीत असल्यानें त्यांना १७ व्या शतकापुढें नेतां येणार नाहीं. श्री. गोविंद पै यांनाहि कालनिश्चिति करणें अवघड वाटल्यानें ते त्यांचा काल स्थूलमानानें स. १२५० ते १६५४ असा देतात.

आर्. नरसिंहाचार्योंनीं मात्र निजगुणांचा काल स. १५०० चा सुमार असा दिलेला आहे. तोच अधिक बरोबर वाटतो. निजगुणांची कालनिश्चिति करणारा महत्त्वाचा पुरावा म्हणजे प्रस्तुत 'विवेकचिंतामणी'चा मराठी अनुवाद. हा अनुवाद श. १५२६ (म्हणजे स. १६०४) मध्यें झाला. या कालापुढें त्यांना नेतां येणार नाहीं. कन्नडमधून मराठींत या ग्रंथाचें भाषांतर होण्याइतकी लोकप्रियता मूळ ग्रंथास मिळण्यास निदान १०० वर्षांचा तरी काळ लागला असावा. श. १४२६ पूर्वीं ते होऊन गेले असावेत असें मला वाटतें.

निजगुणांनीं 'विवेकचिंतामणी'खेरीज अरवत्तमूवर त्रिपदि, परमार्थ प्रकाशिके, परमार्थगीता, परमानुभवबोधे, अनुभवसार, व कैवल्यपद्धति असे सहा ग्रंथ कन्नडमध्यें लिहिले आहेत.[५] यांखेरीज दोन संस्कृत ग्रंथ त्यांनीं लिहिले असावेत असा तर्क आहे. या ग्रंथांचीं नांवें 'दर्शनसार' व 'आत्मतर्कचिंतामणि' अशीं श्री. जोशी देतात. तर मल्लिकार्जुनशास्त्री एकाच ग्रंथाचें 'शिवतर्कचिंतामणि' असें नांव देतात.

निजगुणांनीं आपल्या ग्रंथांत शिवानुभवावर व शिवयोगावर भर दिलेला आहे. ते महान् ज्ञानी व थोर शिवयोगी होते. त्यांच्या ज्ञानाला सागराचीच उपमा द्यावी लागेल. त्यांचा अनेक शास्त्रांचा अभ्यास व त्यांना आलेला श्रेष्ठ शिवानुभव त्यांच्या प्रत्येक कृतींतून व्यक्त होतो. त्यांचे हे अनुभवाचे बोल त्यांची आध्यात्मिक उंची दाखवितात. हे अनुभव सांगणारीं त्यांचीं पदें संगीताचा साज लेवून आजहि कर्नाटकांत खेडोंपाडीं अनेक हृदयांवर राज्य करीत आहेत.

निजगुण हे कोणत्या जातींत जन्मले होते हाहि कांहीं काळ विवाद्य ठरलेला प्रश्न आहे. ते क्षत्रिय होते असें कांहींचें म्हणणें. तर ते वीरशैव होते असें अनेक विद्वानांचें मत आहे. आणि तेंच बरोबर आहे. सर्व प्राण्यांत वीरशैव हाच श्रेष्ठ होय असें निजगुण सांगत असतांना त्यांच्या जातीबद्दल कां वाद उपस्थित व्हावा हें कळत नाहीं. त्यांचें लेखन जात्यतीत भूमिकेवरून झालेलें असल्यानें असें झालें असावें. "श्रीनिजगुण पंथीय अथवा जातीय दुरभिमानापासून पूर्णपणें अलिप्त होते. त्यांची जात कोणती असावी याचें संशोधन करावयास लागावें हें कशाचें गमक आहे?" हा श्री. जोशी यांचा प्रश्न मार्मिक आहे. निजगुण वीरशैव असले तरी कोणत्याहि धर्माच्या वा पंथाच्या

---

५. 'अरवत्तमूवर त्रिविधि' किंवा 'पुरातनत्रिविधि' असेंहि या ग्रंथाचें नांव दिलें गेलेलें आढळतें. या सर्व कन्नड ग्रंथांचा परिचय श्री. जोशी यांनीं आपल्या पुस्तकांत व प्रा. माळवाड यांनीं आपल्या 'Studies in Education and Culture' या ग्रंथांतील आपल्या लेखांत करून दिलेला आहे. तो भाग जिज्ञासूंनीं पाहावा. श्री. निजगुणशिवयोगी : काल व कार्य, पृ. २६.

मनुष्यास ते आपलेच व आदरणीय वाटावेत अशी त्यांची थोरवी आहे. वीरशैव धर्मांची बैठकच अशी व्यापक व मानवतावादी आहे. अशा थोर कवीच्या एका श्रेष्ठ ग्रंथाचा हा मराठी अनुवाद म्हणूनच सर्वांना प्रिय होईल.

## २. 'विवेकचिंतामणी'चे अनुवाद

'विवेकचिंतामणि' या ग्रंथाचें महत्त्व व लोकप्रियता त्याचे जे अनेक भाषांत अनुवाद करण्याचे प्रयत्न झाले त्यावरूनहि ध्यानांत येऊं शकेल. तमिळ, संस्कृत, मराठी या भाषांत हा ग्रंथ अनुवादित करण्याची मनीषा अनेकांनीं धरली.

तमिळमध्यें शिवप्रकाशस्वामी नांवाच्या ग्रंथकारांनीं १७ व्या शतकांत 'विवेकचिंतामणी'चा दुसरा परिच्छेद अनुवादिला व त्याला 'वेदांतचूळामणि' असें नांव दिलें. चामरसांच्या 'प्रभुलिंगलीले'चेंहि भाषांतर त्यांनींच तमिळमध्यें केलें. "And Shivaprakashswami of the 17th Century has written metrical translations of the Kannada works, the Prabhulingalile of Chamarasa and the Vivekachintamani (only the Vedanta Paricheda) of Nijagunashivayogi. The latter version is styled as Vedantachulamani";[६] अशी माहिती आर्. नरसिंहाचार्यांनीं दिली आहे. डॉ. नंदीमठांनींहि 'विवेकचिंतामणी'बद्दल लिहितांना "It has been translated into Tamil"[७] असा या अनुवादाचा निर्देश केलेला आहे.

संस्कृतमध्यें दोघांनीं अनुवाद करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. लिंगराज व निर्वाणमंत्री हे ते दोन अनुवादक होत. निर्वाणमंत्री यानें केलेल्या अनुवादाचा उल्लेख आर्. नरसिंहाचार्यांनीं पुढीलप्रमाणें केलेला आढळतो :— "Nirvana Mantri (c. 1725), the minister of Keladi cheif, Somashekhara Nayaka (1714–39), translated into Sanskrit portions of Nijaguna-Shivayogi's Vivekachintamani".[८]

म्हणजे निर्वाणमंत्रीनें संपूर्ण ग्रंथाचें भाषांतर केलेलें नव्हतें तर कांहीं भागच हाताळला होता असें दिसतें. केळदि राजघराण्यांत दोन सोमशेखर नायक होऊन गेले. पहिल्याचा काळ १६६४–१६७१ व दुसऱ्याचा १७१५–१७३९ असा प्रा. हालप्पांनीं दिलेला आहे.[९] आर्. नरसिंहाचार्यांनीं दिलेल्या काळाशीं दुसऱ्या सोमशेखर नायकाचा काळ जुळतो.

---

६. History of Kannada Literature, p. 29.
७. A Hand-book of Virashaivism, p. 46.
८. History of Kannada Literature, p. 29.
९. Journal of the Karnatak University, Vol. II, No. 2 (Genealogical table of kelady Dynasty given by Prof. Halappa).

निर्वाणमंत्री हा सोमशेखर नायकाचा मंत्री असल्याची माहिती नरसिंहाचार्यांनीं पुरविलीच आहे. तसेंच तो सोमशेखराचा सासरा होता. त्याच्या वीरम्माजी व नीलम्माजी या दोन मुलींशीं सोमशेखरानें लग्न केलें होतें असें प्रा. हालप्पांनीं दिलेल्या वंशावळीवरून कळतें. या वंशावळींत ' निर्वाणय्या ' असें नांव दिलेलें आहे. हा ' निर्वाणय्या ' म्हणजेच ' निर्वाणमंत्री ' याबद्दल शंका येण्याचें कारण नाहीं.

केळदि-राजांच्या कारकीर्दींत वाङ्मयाची भरभराट कशी झाली याचें विवेचन करतांना निर्वाणमंत्रीचें विस्मरण प्रा. हालप्पा यांच्याप्रमाणेंच आणखी एका अभ्यासकाला कसें झालें याचें आश्चर्य वाटतें. डॉ. के. कृष्णमूर्तीनीं ' The contribution of Karnatak to Sanskrit Literature ' या आपल्या लेखांत[१०] केळदि-राजांच्या काळांतील वाङ्मयासंबंधीं लिहितांना निर्वाणमंत्रीचा नामनिर्देशहि केलेला नाहीं. ( त्यांनीं आपल्या लेखांत ' विवेकचिंतामणी 'च्या संस्कृत अनुवादासंबंधीं–लिंगराजाच्याहि–कांहींच म्हटलेलें नाहीं. ) हें जसें विस्मरणानें होऊं शकेल तसेंच तो ग्रंथ उपलब्ध न झाल्यानें अगर महत्त्वाचा न वाटल्यानेंहि होऊं शकेल. निर्वाणमंत्रीचा अनुवाद उपलब्ध नसल्यानें याहून अधिक कांहीं लिहिणें मलाहि शक्य नाहीं.

लिंगराजानें केलेल्या अनुवादाचा फक्त पहिला परिच्छेद छापला गेला आहे. " कोडग ( कुर्ग ) प्रांताच्या श्रीमल्लिंगराजानें केल्यामुळें, ज्यास ' लिंगराजीय ' हें नांव पडलें आहे तें प्रथम प्रकरणाचें संस्कृत भाषांतर मिळाल्यामुळें तेवढेंच देऊन खालीं त्याचेंच शान्तेश्वरकृत ओवीबद्ध भाषांतर जोडिलें आहे ;"[११] असें मल्लिकार्जुनशास्त्री म्हणतात. त्यावरून बाकीच्या परिच्छेदांचें लिंगराजकृत भाषांतर मल्लिकार्जुनशास्त्री यांना मिळालें नव्हतें हें स्पष्ट होतें.

लिंगराजानें ' विवेकचिंतामणी 'चें संपूर्ण भाषांतर संस्कृतमध्यें केलें होतें कीं नाहीं याविषयीं निश्चित कांहीं सांगणें शक्य नाहीं. परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाचा असलेला द्वितीय परिच्छेद सोडून फक्त पहिल्याच परिच्छेदाचें भाषांतर कोणी करून स्वस्थ राहील हें बुद्धीस पटत नाहीं. त्यानें केलेल्या भाषांतराचा एवढाच भाग उपलब्ध आहे हें खरें. पण त्यानें उर्वरित भाग अनुवादिला नसेलच असें म्हणवत नाहीं. आर्. नरसिंहाचार्य त्याचा नामनिर्देश करीत नाहींत हीहि गोष्ट चिंत्य आहे. लिंगराज हा कोण व केव्हां होऊन गेला यासंबंधींहि–मल्लिकार्जुनशास्त्रींच्या ओझरत्या उल्लेखाखेरीज–माहिती मिळत नाहीं.

---

१०. Studies in Education and Culture, in honour of Shri. D. C. Pavate, p. 402.

११. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), प्रस्तावना, पृ. २.

लिंगराजासंबंधींची ही माहिती मिळविण्याचें साधन म्हणजे त्याच्या 'लिंगराजीय' या अनुवादांतील कांहीं उल्लेख, हेंच होय. तो कोडग किंवा कूर्ग देशाचा राजा होता ही मिळणारी माहितीहि ऐतिहासिक पुराव्याच्या आधारें तपासून पाहिली पाहिजे.

'लिंगराजीयां'तील पुढील श्लोक अभ्यसनीय आहेत :—

(१) .....श्रीकर्णाटकभाषय निजगुण श्रीयोगिना निर्मित-
—स्तं गीर्वाणवचोमुखेन विवृतं कुर्वे प्रणम्यांबिकाम् ॥ १ ॥
रसातलं शासति पन्नगेश्वरे वाताशनाः कुंडलिनो दिवस्पतौ ।
शक्रे बुधाः सत्रभुजो भवन्ति श्रीलिंगराजेऽवति गां रसाशनाः ॥ २ ॥
श्रीलिंगराजे ददति प्रकाशं सुवर्णराशीन् विदुषां गणेभ्यः ।
स्वर्णाद्रिमादाया विधाय कुक्षौ हिरण्यगर्भत्वमवाप धाता ॥ ३ ॥
श्री लिंगराज कमनीय कटाक्षधारा कंदर्पदा कनकदाऽभयदा च भीदा ।
योषाजनस्य विदुषां सुहृदाश्रितानां प्रत्यर्थिदुष्टनिकरस्य बभूव चित्रम् ॥ ४ ॥
विवेकचिंतामणिरब्जजन्मना चिंतामणिः प्राक् तुलितः सकौतुकम् ।
पूर्वो गुरुलिंगनृपं समागमद्गीर्वाणहेतोरपरो लघुर्हरिम् ॥ ५ ॥
श्रीलिंगराजीयमुमाधवस्य मुदावहं पंडितभावनीयम् ।
विवेकचिंतामणितंत्रसारं नृसिंहसूरिग्रथितं लिखामि ॥ ६ ॥
समस्तशास्त्राध्ययनं विनाऽपि श्रीलिंगराजीयमिदं सकृद्यः ।
पठत्यसौ सर्वकलाधरत्वं वक्तृत्वमाप्नोति सभासु नूनम् ॥ ७ ॥
विवेकचिंतामणिनामकस्य कर्णाटभाषारचितस्य दीप्तिः ।
गीर्वाणवाणीकषणेन जाता श्रीलिंगराजीयसतां मतेन ॥ ८ ॥
समस्तशास्त्राभरणान्वितः सन् श्रीलिंगराजीय किरीटधारी ।
चेद्राजसंसदि शिवागमसर्ववेत्ता कलाधरः पूर्ण इवोडुमध्ये ॥ ९ ॥
ग्रंथाश्च बहवः संति सर्वार्थप्रतिपादकाः ।
श्री[१२]लिंगराजीयसमं नास्ति नेह भविष्यति ॥ १० ॥

(२) इति श्रीमत्पदवाक्यप्रमाणपारावारीण श्रीहरपुरनञ्जराजगर्भपयःपारावारसुधाकरेण चामांबागर्भशुक्तिमुक्ताफलेन श्रीमदुमारमणचरणसरोरुहभृंगायमान निजचित्तेन शरणागतभरणायतकरुणायुतनिजवीक्षणेन श्रीलिंगराजेन विरचिते विवेकचिंतामणिविवरणे श्रीलिंगराजीये सकलविद्वज्जनकिरीटायमाने वेदादि-सर्वार्थप्रकाशकः प्रथम परिच्छेदः ॥[१३]

'लिंगराज' हें नांव इतिहासांत कोठें कोठें आढळतें हें पाहणें आवश्यक आहे. मैसूरच्या इतिहासांत श्री. हयवदनरावांनीं अनेक लिंगराजांची माहिती दिलेली

१२. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), पृ. १–३.
१३. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), पृ. १३५.

आहे. गुरिकार लिंगराजय्या[१४] हा चिक्कदेवराजाचा कोइमतूर येथील प्रतिनिधि होता. येळंदूर येथील लिंगराजय्या[१५] चिक्कदेवराजाचा सासरा होता. त्याची देवाजम्मा नांवाची मुलगी चिक्कदेवराजास दिलेली होती. कोट्टागाल येथेंहि एक लिंगराजय्या[१६] होऊन गेला. हुर येथील माधवनायकाचा मुलगा दळवै लिंगराजय्या[१७] हा होय. कंठीरव नरसराज वोडेयरबद्दल लिहितांना हयवदनराव म्हणतात : "In his boyhood he was, we learn, brought up along with Nanjarajaiya (Nanjendra) and Lingarajaiya (Lingendra) sons of his maternal uncle, Kemparajaiya of Hura".[१८]

आर्. नरसिंहाचार्यांनीं अळिय लिंगराजाविषयीं कांहीं माहिती दिली आहे.[१९] यानें ४७ ग्रंथ लिहिले. हा तिसऱ्या कृष्णराजाचा जांवई होता. त्याची आई केंपुदेवांबिके, वडील लिंगराज व गुरु चन्नवीरदेशिक. तो श. १७९६ मध्यें वारला.

परंतु यांपैकीं कोणा लिंगराजाचा संबंध 'विवेकचिंतामणी' च्या संस्कृत अनुवादाशीं जोडतां येईल असें वाटत नाहीं. त्यामुळें मल्लिकार्जुनशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें कूर्गदेशाच्या राजघराण्यांतच त्याचा शोध घेणें योग्य वाटतें.

कूर्गच्या राजांची वंशावळ बी. एल्. राइसनीं पुढीलप्रमाणें दिलेली आहे[२०] :–




१४. History of Mysore, Vol. I, p. 309.
१५. History of Mysore, Vol. I, p. 496.
१६. History of Mysore, Vol. I, p. 89.
१७. History of Mysore, Vol. I, p. 144.
१८. History of Mysore, Vol. I, p. 114.
१९. कर्नाटक कविचरित्रे, भाग ३ रा, पृ. १९८.
२०. Epigraphia Carnatica, Vol. I, p. 24.

म्हणजे कूर्गच्या राजांत दोन लिंगराज आहेत. पहिल्याचा काळ १७७५–८० व दुसऱ्याचा १८११–२० असा दिलेला आहे. पहिल्या लिंगराजाच्या मृत्यूचा काळ १७८० असा महादेवपुर येथील ताम्रपटाच्या आधारें राइसनीं दिला आहे. "भारद्वाज गोत्रद आश्वलायन सूत्रद रुक्षभानुकाध्याय वीरशैव-मतस्तराद अप्पाजेंद्र वडेयरवर पुत्रराद लिंगराजेंद्र वडेयरु". विकारी संवत्सर माघ बहुल १० बुधवार रोजीं "शिवाधीन आदु" असें तो ताम्रपट सांगतो.[२१]

येथें लिंगराजाच्या वडिलांचें नांव अप्पाजी असें दिलेलें आहे. तें वंशावळीशीं विसंगत आहे.

परंतु कूर्गचे राजे वीरशैवमताचे होते ही महत्त्वाची गोष्ट ह्या ताम्रपटावरून कळते. तसेंच हा ताम्रपट 'महादेवपुर' येथील आहे. महादेवपुर म्हणजे मरकारा. 'लिंगराजीया'च्या समाप्ति-निदर्शक भागांत 'हरपुर' असें नांव आलें आहे. महादेवपुर = हरपुर = मरकारा असें समीकरण मांडणें केवळ कल्पनाविलास ठरेल असें वाटत नाहीं. हरपुर म्हणजेच मरकारा असें मान्य करतां आलें तर लिंगराज हा कूर्गच्या राजघराण्यांतील होता हा समज यथार्थ ठरेल.

परंतु लिंगराजानें आपल्या आई-वडिलांचीं नांवें 'चामांबा' व 'नंजराज' अशीं दिलीं आहेत. 'नंजराज' हें नांव कूर्गच्या वंशावळींत मिळत नाहीं. कूर्गमध्यें नंजरायपट्टण नांवाचें एक गांव आहे. नंजराज हें नांव कर्नाटकाच्या इतिहासांत मिळतें, नाहीं असें नाहीं. "In the eighteenth century too we find sarvadhikari Kalale Nanjaraja of Mysore under Krishnaraja II (1734-60) patronising poets like Nrisimhakavi who wrote the Nanjarayashobhusana (poetics) after the manner of Vidyanath's Prataparudrayashobhusan. Nanjaraja himself is the author of a highly praised work on music, the Sangitagangadhara";[२२] असा एका नंजराजाचा निर्देश डॉ. के. कृष्णमूर्तींनीं केलेला आहे.

या नंजराजाचा संबंध पुन्हां एका 'नृसिंहकवी'शीं येत आहे. 'लिंगराजीया'च्या पीठिकारचनेंत उल्लेखिला गेलेला 'नृसिंहसूरि' कोण हा अजून न सुटलेला प्रश्न आहे. हयवदनरावांनीं एका नृसिंहसूरीची माहिती दिलेली आहे. तो तोण्डनूर-ताम्रपटाचा रचयिता (Composer) असून कौशिकगोत्री श्रीनिवासाचा मुलगा आहे.[२३] परंतु या नृसिंहसूरीनें 'विवेकचिंतामणितंत्रसार' 'ग्रथित' केल्याची माहिती मिळत नाहीं.

---

२१. Epigraphia Carnatica, Vol. I, P. 36.
२२. Studies in Education and Culture, p. 402.
२३. History of Mysore, Vol. I, p.195.

'लिंगराजीय' या संस्कृत अनुवादाचा कर्ता व काळ यासंबंधीं अधिक संशोधन होणें आवश्यक आहे. पीठिकारचनेंतील लिंगराजविषयक तिन्हाईतपणें केलेले स्तुतिपर उल्लेख व नृसिंहसूरीचा निर्देश यामुळें, पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें लिंगराजाच्या नांवानें अन्य कोणीतरी ही रचना केलेली असावी व हा कूर्ग घराण्यांतील लिंगराज असावा असें मानण्याकडे मनाचा कल होतो. म्हणजे या संस्कृत अनुवादाचा काळ १८ व्या शतकाच्या अखेरीचा मानावा लागतो.

'लिंगराजीया' संबंधीं असें कांहीं वादग्रस्त मुद्दे असले तरी त्याच्या श्रेष्ठतेविषयीं दुमत होणार नाहीं. मूळ कन्नडकृतीचें अत्यंत प्रामाणिक (Faithful) रूपांतर असेंच त्याच्याबद्दल म्हणावें लागेल.

'विवेकचिंतामणी'च्या अनुवादांमध्यें (मराठीखेरीज) कालदृष्ट्या असा क्रम मानतां येईल: (१) शिवप्रकाशस्वामी (तमिळ, १७ वें शतक) (२) निर्वाणमंत्री (संस्कृत, स. १७२५) (३) लिंगराज (स. १७७५ ते १८२० च्या दरम्यान). 'विवेकचिंतामणी'च्या अन्य भाषांतील अनुवादांनंतर, त्यांच्याहून जुन्या असलेल्या व संपूर्ण स्वरूपांत उपलब्ध असलेल्या मराठी अनुवादाचा व अनुवादकाचा विचार करणें योग्य ठरेल.

### ३. मराठी अनुवाद व अनुवादक

'विवेकचिंतामणी'चा मराठी अनुवाद ही मराठी वाङ्मयांत पडत असलेली मोलाची भर होय. अनुवादकाचें नांव 'शांतलिंगशिवयोगी' किंवा 'शांतेश्वर'. 'विवेकचिंतामणी'मध्यें स्वतः कवीनें पुढीलप्रमाणें आपला नामनिर्देश केलेला आहे:—

ते विवेकचिंतामणीशास्त्र । प्राकृतभाषा सविस्तार ।
सांगिजेल म्हणे **शांतेश्वर** । जग स्वहीतनिमित्यें ॥ १-२७ ॥
अश्रमविस्फूर्जित । निजानंदस्वानंद शक्त ।
चित्तोपित शांतलिंगशिवयोगीविरचित । विवेकचिंतामणी ॥ १०-१४६ ॥

तसेंच आपण निजगुणशिवयोगींच्या ग्रंथाच्या आधारें लिहीत आहोंत हीहि गोष्ट कवीनें पुढील ओवींत स्पष्ट केलेली आहे:—

निजगुणाचेनि योगेश्वरें । जें साक्षात् शंभूच्या पुत्रें ।
तयाचे चरित्र अपारें । सांगीतले असें ॥ १-१२०२ ॥
तयाचिये युक्तीवरीं । मी प्राकृतभाषा बोलिलों वैखरीं ।
ते प्रीति पावो सर्वेश्वरीं । श्री शंभोनीळकंठीं ॥ १-१२०३ ॥

शांतलिंग हें नांव कांहीं मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना नवीन नाहीं. मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत तें आढळतें. जयरामस्वामी वडगांवकरांसंबंधीं

लिहितांना भाव्यांनीं शांतलिंगस्वामींची ओळख करून दिली आहे :—"या गादीची ( वडगांवच्या गादीची ) मूळ स्थापना शांतलिंगाप्पा ऊर्फ शांतेश्वर महाराज यांनीं केली. हे जंगम होते, आणि म्हणूनच या गादीला 'जंगमाची गादी' म्हणतात. लिंगाईत हे हाडाचे कट्टे शैव, यामुळें शैव व वैष्णव यांचेमध्यें नेहमीं तंटे-भांडणें होत. या दोघांमधील तंटे-भांडणें मिटवून या दोन्ही मतानुयायांची एकी करून देण्याचें काम शांतलिंगाप्पा स्वामींनीं केलें, असें म्हणतात. या शांतलिंगाप्पा स्वामींचा 'कर्णहस्तिकी' या नांवाचा जंगममत प्रतिपादन करणारा असा एक ग्रंथ आहे. यांत शेवटीं,

चनबसवेश्वरोक्ति । वरि मी बोलिलि अनुभूति ।
प्रीति पावो विद्यापारंगति । म्हणे शांत नीळकंठ ॥

अशी एक ओवी आहे. शांतलिंगाप्पांचे गुरु कदाचित् नीळकंठ नांवाचे साधु-पुरुष असावे, असें दिसतें. शांतलिंगाप्पांनीं शके १५४५ मध्यें माघ शु. पौर्णिमेस समाधि घेतली." [२४]

'शांतलिंग' व 'शांतेश्वर' हीं दोन्हींहि नांवें भाव्यांनीं दिलीं आहेत. आणि 'लिंगाप्पा' नांवाच्या दुसऱ्या एका कवीचाहि निर्देश त्यांनीं जातां जातां केला आहे. शांतलिंग कवीनें स्वतःस 'लिंगाप्पा' असें म्हटलेलें नाहीं, हें भाव्यांचें म्हणणें बरोबर आहे. तेव्हां 'लिंगाप्पा' हें नांव या कवीच्या संदर्भात पुढें आणण्याचें कांहींच कारण नाहीं. त्यामुळें 'मुळु मदनाचा' इ० अभंग हे शांतलिंगस्वामींचे आहेत, असें म्हणतां येणार नाहीं.

'शांतेश्वर' हेंहि नांव प्रचारांत आहे. 'आद्यशांतेश्वर प्रसिद्ध सकळां' या चरणांत तें आढळतें. 'विवेकचिंतामणी'चे फक्त पहिले दोन परिच्छेद ज्यांनीं प्रसिद्ध केले आहेत, त्या मणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्रींनीं देखील 'शांतेश्वर' असेंच नांव वापरलें आहे.[२५]

तिसरें नांव 'शांतनीळकंठ' असें आढळतें. भाव्यांनीं 'कर्णहस्तकीं'तील जी ओवी उद्धृत केलेली आहे, तिच्या शेवटीं हेंच नांव येतें. खरशीकर-संपादित 'कर्णहंस' मध्यें त्या ओवींत 'सांता नीळकंठु' असा नामोल्लेख आहे.[२६] तंजावर येथील सरस्वती महालानें प्रसिद्ध केलेल्या मराठी हस्तलिखितांच्या सूचींत 'कर्णहस्तकी'ला 'शांतनीलकंठकृत' असें म्हटलें आहे.[२७] कवीनें 'शांत'

---

२४. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ४३४-३५.

२५. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), प्रस्तावना, पृ. २.

२६. कर्णहंस, ओवी ३७७, पृ. ३१.

२७. A Descriptive Catalogue of the Marathi Manuscripts and Books in the T. M. S. S. M. Library, Tanjore; Vol. I, p. 28.

किंवा ‘ सांत ’ असेंहि आपलें नांव ‘ कर्णहस्तकी ’च्या १४ व्या ओवींत दिलेलें दिसतें. ‘ श्रीशांते ’ असें एका ठिकाणीं राजाराम प्रासादींनीं म्हटलें असलें तरी अन्यत्र ते ‘ शांतलिंग ’ हेंच नांव वापरतात.[२८] संतमालिकां ’तहि जयरामसुत[२९] व रंगनाथ[३०] ‘ शांतलिंग ’ असेंच नांव देतात.

‘ नीलकंठ ’ हें शांतलिंगांच्या गुरूंचें नांव. ‘ एकाजनार्दना ’ प्रमाणेंच ‘ शांतनीळकंठ ’ हें गुरुविषयीं दृढभक्ति व्यक्त करणारें नांव आहे. गुरुशीं आपलें नांव जोडण्याची मराठी कवींची परंपरा या ठिकाणींहि दिसते. ‘ विवेकचिंतामणी ’च्या या मराठी अनुवादकाचीं नांवें अशीं वेगवेगळ्या प्रकारें लिहिलेलीं आढळलीं तरी ‘ शांतलिंग ’ हेंच नांव अधिक योग्य मानलें पाहिजे. शांतलिंगस्वामींचे गुरु जे नीलकंठ, ते कोण व कोठें होऊन गेले याचा शोध घेण्यापूर्वी शांतलिंग-स्वामींची चरित्रविषयक माहिती कितीशी मिळते हें पाहणें जरुरीचें आहे.

‘ कर्णहंस ’च्या प्रस्तावनेंत कै. ना. रा. बामणगांवकरांनीं आणि ‘ संपादकाचें हृद्गत ’ व ‘ श्रीशांतलिंगप्पा महाराज यांचें चरित्र ’ या भागांत कै. खरशीकर-शास्त्र्यांनीं शांतलिंगस्वामींची चरित्रपर माहिती दिली आहे. या माहितीस परंपरेचा व ‘ भक्तमंजरी (माले)’च्या १२ व्या अध्यायाचा आधार आहे.

“ श्रीशांतलिंग महाराज यांच्या जन्माचा पत्ता लागत नाहीं. तरीपण ल्हानपणापासून समाधिपर्यंतचें त्यांचें आयुष्य लिंगायतजंगम जातींत गेलें आहे. तेव्हां ते लिंगायतच म्हणावे लागतात. श्री नामदेव महाराज अयोनिसंभव होते. पण दामाशेटी या शिंप्याचे घरीं त्यांचा काल गेल्यामुळें त्यांना नामदेव शिंपीच म्हणतात, तसाच हा प्रकार आहे ”;[३१] असें खरशीकर आपल्या ‘ हृद्गतां ’त म्हणतात. एखाद्याला अयोनिसंभव मानणें आजच्या चिकित्सेच्या काळांत जड जाईल असें वाटून ‘ खरी गोष्ट ही दिसते ’ असें म्हणून ते ‘ चरित्रां ’त लिहितात: “ सिंगणापूरचा एक लिंगायत सुखवस्तु श्रीमंत होता. तो पुत्रहीन असल्यामुळें त्यानें अनेक व्रतें, तीर्थें, नवससायास, श्रीशंभुमहादेवाचें आराधन इ. केल्यावर श्रीशंभुमहादेवांनीं त्याला दृष्टांत दिला व तुला यात्रेंत पुत्र सांपडेल, असा वर दिला. त्याप्रमाणें हा श्रीमंत काशीयात्रा करीत असतां कांहीं थोड्या दिवसांपूर्वी जन्मास आलेलें मूल त्याला गंगातीरीं दिसलें. मूल सतेज होतें. त्याचें रक्षण कसें होत होतें हें समजण्यास मार्ग नव्हता. मूल सुंदर आहे असें पाहून त्यानें उचलून घेतलें व श्रीमंताच्या पत्नीनें त्यास मांडीवर घेतांच प्रेमपान्हा सुटला व तिनें नंतर त्यास स्तनपान दिलें व त्या मुलास शिंगणापुरास आणलें. तो

२८. भक्तमंजरीमाला, अ. १२, श्लोक ५६ आणि २८, ३२, ३८, ४५.
२९. शांतलिंग श्रीकृष्णयोगिया.
३०. नीलकंठ शांतलिंग । जयराम श्रीकृष्ण अभंग.
३१. कर्णहंस, संपादकाचें हृद्गत, पृ. ५.

आजानुबाहु होता. या लिंगायतानें व त्याच्या पत्नीनें या बालकाचें पालनपोषण केलें. हें बालक बिलकूल रडत नसे, कशाचाही हट्ट करीत नसे. त्याची ही माता दूध पाजील तेव्हां प्यावें नाहींतर स्वस्थ पडून राहावें. ही त्याची शांतस्थिति पाहून त्याचें नांव शांता ठेविलें. या जंगम लिंगायतानें त्याचा प्रतिपाळ केला म्हणूनच शांतप्पास जंगमलिंगायत म्हणावयाचें. एरव्ही ते जातिनिरपेक्ष होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं."[३२] खरी गोष्ट काय आहे, हें निश्चित माहीत नसल्यानें, खरशीकरांना जी गोष्ट खरी दिसते, ती तशी असेलहि याहून अधिक काय म्हणतां येईल ?

कै. खरशीकरांपेक्षां कै. बामणगांवकर अधिक चिकित्सक वृत्तीचे वाटतात. त्यांचा दंतकथांवर विश्वास नाहीं. "शांतलिंग हे शिंगणापूर जंगम मठांतील 'पट्टदेवरू' अर्थात् पट्टाधिकारी असे आजन्म ब्रह्मचारी जंगम दिसतात. अशा मठांचे कारभारी गृहस्थ जंगम असले तरी त्यांना आईबापांपेक्षां गुरुपरंपरेच्या नांवावर दीक्षाविधीमुळें मठाधिपतींचा मान लाभतो. त्यामुळेंच शांतलिंगस्वामींचे आईबापांचा कोठें उल्लेख नाहीं. पुढें ते महान् तपस्वी असल्याचा प्रत्यय आल्यामुळें तलावाकाठीं एका शिंपल्यांत तेथील जंगमास सांपडले अशी आख्यायिका बसविली गेली असावी";[३३] हें बामणगांवकरांचें विवेचन कोणासहि मान्य होण्यासारखें आहे. शांतलिंगांच्या आईवडिलांचीं नांवें मिळत नाहींत याचें कारण ते अयोनिसंभव होते किंवा त्यांचें पालनपोषण दुसऱ्याच कोणीं केलें असें मानण्याहून वरील कारणपरंपरा जास्त तर्कशुद्ध व सत्याला जवळची ठरते.

शांतलिंगस्वामींच्या जीवनकथेचें गूढ अजून उलगडलें नसलें तरी त्यांच्या वास्तव्यस्थलाबद्दल व कालाबद्दल निश्चित असें कांहीं सांगणें शक्य आहे. शांतलिंगस्वामींचें वास्तव्य शिंगणापूर येथें होतें.

शिंगणापूर हें सातारा जिल्ह्यांतील एक प्रसिद्ध क्षेत्र आहे. एका लहानशा डोंगरावर तें वसलें असून त्याला 'शिखरशिंगणापूर' असें म्हणतात. तेथें शंभूमहादेवाचें देऊळ आहे. छत्रपति शिवाजी महाराजांचें हें कुलदैवत होय. येथील देवळांत एकाच पिंडीवर दोन लिंगें आहेत. त्यांपैकीं एकावर बेल व दुसऱ्यावर तुळस वाहतात. हरिहर, रामलिंग, यांसारख्या देवाप्रमाणें शिव-विष्णूच्या ऐक्याचें प्रतीक असा हा शंभूमहादेव आहे. या क्षेत्राचा जीर्णोद्धार सिंघण यादवानें केला म्हणून त्याला 'सिंगणापूर' असें नांव पडलें.

शिवाजी महाराजांचे आजोबा मालोजीराजे यांनीं शिंगणापूर येथील तळें बांधवून काढलें. मालोजीराजांच्या पत्नी दीपाबाई ह्या फलटणच्या निंबाळकर घराण्यांतील होत्या. फलटणपासून शिंगणापूर जवळच आहे. शिवाय मालोजी-

---

३२. कर्णहंस, श्रीशांतलिंगप्पा महाराज यांचें चरित्र, पृ. ६.
३३. कर्णहंस, प्रस्तावना, पृ. १५.

राजांचें शंभूमहादेव हें कुलदैवत असल्यानें त्यांनीं या क्षेत्राला भेट देणें, त्याचा जीर्णोद्धार करणें स्वाभाविक होतें. हे दोघे देवास आले असतांना त्यांची व शांतलिंगस्वामींची भेट झाली होती ही कथा विश्वसनीय मानावयास हरकत नाहीं. परंतु तिला ऐतिहासिक सत्याचें स्वरूप देऊं शकेल असा पुरावा आजतरी उपलब्ध नाहीं.

' विवेकचिंतामणि ' हा ग्रंथ ' श्रीशंभूमहादेवीं ' समाप्त झाल्याचा निर्देश महत्त्वाचा आहे. वडगांवची गादी स्थापन केली तरी शांतलिंगांनीं शिंगणापूर सोडलें नव्हतें. आजहि त्यांच्या मठाची जागा तेथें दाखविली जाते आणि त्यांची समाधीहि पाहावयास मिळते. ही समाधि उघड्यावर नसून घरासारख्या बांधलेल्या ठिकाणीं सुस्थितींत आहे.

स्वामींच्या कालाचा विचार करतांना एक गोष्ट प्रथमच कबूल केली पाहिजे कीं त्यांचा जन्मशक आपणांस माहीत नाहीं. " श्रीशांतलिंगांचा जन्म, निधनतिथि व शक मिळत नाहीं " हें खरशीकरांचें म्हणणें अर्धसत्य आहे. आपणांस जन्मशक माहीत नसला तरी त्यांचा मृत्युशक अगदीं तिथीसकट उपलब्ध आहे. श. १५४५ माघ शु. पौर्णिमा हा त्यांचा निधनकाल होय.[३४] हाच काल कृष्णाप्पांच्या समाधीचा म्हणूनहि भाव्यांनीं दिलेला आहे. " असें म्हणतात कीं, कृष्णस्वामींनीं ज्ञानेश्वरीचा नववा अध्याय पुढें ठेवून तो वाचीत असतां शके १५४५ रुधिरोद्गारी संवत्सरीं माघ शु. पौर्णिमेस जित समाधि घेतली ;"[३५] असें म्हणत असतांना भाव्यांनीं फारसा विचार केलेला दिसत नाहीं. एकाच दिवशीं शांतलिंग व कृष्णाप्पा या गुरु-शिष्यांनीं समाधि घेतली असें मानणें बुद्धीला पटत नाहीं.

राजाराम प्रासादीनें केलेल्या समाधिवर्णनांतील कांहीं भाग या प्रश्नावर प्रकाश टाकणारा आहे. शांतलिंगांच्या समाधिसोहाळ्याचें वर्णन करतांना तो लिहितो[३६] :—

असो समस्त शिष्य महादेवी । समाधि रचिली अपूर्व बरवी ।
श्रीकृष्णस्वामी महानुभवी । तारिति भवीं सर्वांतें ॥
समाधिपूजन करावया । श्रीकृष्ण राहिले तया ठायां ।
नवविध भजनीं रंगली काया । सद्गुरुपायीं नत सदा ॥
जे जे प्राणि शरण येति । कृपेनें तया उद्धरति ।
अनधिकारी भलते ज्ञाति । पावन होति दर्शनें ॥
कांही दिवसांनंतर स्वामी । येते झाले बहु ग्रामी ।
वास्तव्य करुनि स्वआश्रमीं । भजनप्रेमी निमग्न ॥

---

३४. आद्यशांतेश्वर प्रसिद्ध सकळां । तो प्रेमजिव्हाळा कृष्णदास ॥
शके पंधराशे पंचेचाळीसांसी । माघ पौर्णिमेसी । समाधिस्त ॥

३५. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ४३५-३६.

३६. भक्तमंजरी, अ. १२ श्लो. ५९-६२.

राजाराम प्रासादीच्या वर्णनावरून 'महादेवी' म्हणजे 'शंभुमहादेवी'—शिखरशिंगणापूर येथें—सर्व शिष्यांनीं समाधि रचली. शांतलिंगांनीं सांगितलें: "सर्वांना कृष्णाप्पा तारतील." नंतर समाधीच्या पूजेसाठीं कृष्णाप्पा शिंगणापूर येथें कांहीं दिवस राहिले आणि पुढें वडगांवीं आले.

या वृत्तांतावरून भावे मानतात त्याप्रमाणें गुरुशिष्यांनीं एकाच दिवशीं समाधि घेतली हें म्हणणें खरें ठरत नाहीं. राजाराम प्रासादी चरित्रकथनांत सत्य व कल्पित, इतिहास व चमत्कार यांचें मिश्रण करतो, नाहीं असें नाहीं. "मात्र समजून उमजून मनास मानेल ती खोटी माहिती राजारामबुवांनीं आपल्या ग्रंथांत दिली नाहीं. माहिती त्यांनीं आपल्या समजुतीप्रमाणें चौकसपणानें दिली आहे. राजारामबुवांचा ग्रंथ अनेक कारणांनीं हल्लीं उपलब्ध अशा चरित्र-ग्रंथांत वरच्या दर्जाचा आहे";[३७] असें भाव्यांनीं राजाराम प्रासादीला 'सर्टिफिकेट' दिलेलेंच आहे. लोक काय म्हणतात याऐवजीं कृष्णाप्पांच्या समाधीबद्दल राजारामबुवा काय म्हणतात इकडे भाव्यांनीं थोडें लक्ष दिलें असतें तर एकाच दिवशीं समाधिस्थ होण्याचा प्रसंग दोघांवर आला नसता.

तेव्हां श. १५४५ हा शांतलिंगांचा निधनशक ठरला. 'विवेकचिंतामणी'चें लेखन केव्हां संपलें याचा निर्देश ग्रंथाच्या अखेरीस आहे. तो असा:—"क्रोधीनाम संवत्सरे अश्वीन वद्य १३ त्रयोदशी गुरुवारीं विवेकचिंतामणी ग्रंथसमाप्ति". मूळ हस्तलिखितांत पुढील मजकूर अधिक आहे: "शके १७६६ क्रोधी नामसंवत्सरीं श्रीशंभूमहादेवी ग्रंथसमाप्ति ॥ हें पुस्तक नऱ्होजी बिन चणगवंडा पाटील राजमाने मौजे निपाणी याचे पुस्तक असे ॥"

यावरून या हस्तलिखिताच्या मालकाचें नांव व गांव कळतें. पण त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे ग्रंथलेखनाचा काल ठरवितां येतो. ग्रंथसमाप्तीचे दोन कालोल्लेख येथें दिले आहेत. त्यांपैकीं श. १७६६ हा प्रत केल्याचा काल आहे. 'श्रीशंभूमहादेवी' हा शब्द लेखनस्थळाचा निदर्शक आहे. पहिल्या कालोल्लेखांत शक दिलेला नाहीं. परंतु क्रोधीनाम संवत्सर, आश्विन वद्य त्रयोदशी, गुरुवार असा योग श. १५२६ मध्येंच येतो.

तेव्हां श. १५२६ हा 'विवेकचिंतामणी'चा लेखनकाल ठरतो. त्याच्या व श. १५४५ या समाधिशकाच्या आधारें शांतलिंगांचा जन्म श. १५०० पूर्वीं—निदान १५-२० वर्षें आधीं—झाला असें मानतां येईल. "शांतलिंगप्पा हा लिंगायत कवीहि नाथांचा समकालीन असावा असें वाटतें";[३८] हें डॉ. तुळपुळ्यांचें मत ग्राह्य आहे. एकनाथांचा श. १४५५ ते श. १५२१ हा

३७. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ६३५.

३८. महाराष्ट्र-सारस्वत, पुरवणी, पृ. ९३७.

काळ डॉ. तुळपुळयांना मान्य आहे. "श्री एकनाथमहाराजांचे गुरु श्री जनार्दनस्वामी यांचे ते समकालीन होते. जनार्दनस्वामींचा काल शके १४२६-१४९७ हा आहे. तेव्हां श्रीशांताप्पा महाराजांचाहि हा काल मानण्यास हरकत नाहीं"; [३९] असें खरशीकर म्हणतात. एवढेंच नव्हे तर जनार्दनस्वामींच्या व शांतलिंगांच्या भेटी झाल्या होत्या. जनार्दनस्वामी शिंगणापुरास स्वामींच्या मठांत येऊन राहिले होते अशी हकीकतहि पुढें खरशीकरांनीं दिलेली आहे.

जनार्दनस्वामींच्या व शांतलिंगांच्या भेटीला ऐकीव माहितीखेरीज दुसरा कोणता आधार दिसत नाहीं. ही माहिती खरी असेल तर शांतलिंगांचा जन्म श. १४५० च्या सुमाराचा मानावा लागेल. कारण सत्पुरुष म्हणून त्यांची ख्याति होऊन, जनार्दनस्वामींनाहि त्यांच्याविषयीं आदर वाटण्याच्या वेळीं ते बरेच वयस्क असले पाहिजेत.

परंतु श. १४५० चा सुमार हा त्यांचा जन्मकाल मानला तर 'विवेकचिंतामणी'चें लेखन त्यांनीं सत्तरी उलटल्यावर केलें हें मान्य करावें लागेल. आणि एवढा प्रचंड ग्रंथ अशा उतारवयांत त्यांनीं लिहिला असेल हें बुद्धीस पटत नाहीं. पन्नाशीच्या आसपासच हें प्रचंड काम त्यांनीं पुरें केलें असावें असें वाटतें. म्हणजे श. १४७५ च्या सुमारास त्यांचा जन्म झाला असावा.

वडगांवच्या गादीच्या स्थापनेचा काळ श. १५०४ हा आहे. श. १५०४ पूर्वी त्यांनीं कृष्णाप्पाबरोबर तीर्थयात्रा केली होती. यात्रेहून परत आल्यावर कृष्णाप्पांना त्यांनीं लोकोद्धार करण्याची आज्ञा केली. "त्याप्रमाणें कृष्णाप्पानें वडगांव जि. सातारा येथें श. १५०४ मध्यें मठाची स्थापना करून भक्तिमार्गाचा प्रसार करून अनेक लोकांना सत्पंथास लाविलें."[४०] "शके १५०४ मध्यें वटग्राम ऊर्फ वडगांव येथें येऊन यांनीं (कृष्णाप्पांनीं) तेथें मठाची स्थापना केली;"[४१] असें भावेहि सांगतात. यावेळीं स्वामींचें वय ३० हून कमी नसावें.

## ४. शांतलिंगस्वामींची 'शांतपरंपरा'

शांतलिंगांची परंपराहि अभ्यासण्यासारखी आहे. स्वतः वीरशैव व शिष्य-प्रशिष्य मात्र ब्राह्मण. स्वतः मांडलें वीरशैवपंथाचें तत्त्वज्ञान. परंतु शिष्यांनीं त्याच तत्त्वज्ञानाचा प्रसार वा प्रचार पुढें केला असें नाहीं. यामुळें त्यांची एक विशिष्ट परंपरा निर्माण झाली. तिलाच मी 'शांतपरंपरा' असें म्हणतों. हेंच नांव जयरामस्वामींनींहि 'शांतिपंचीकरण' ग्रंथांत दिलें आहे. त्यांतील अध्याय पस्तीसमध्यें शांतपरंपरेंतील कांहीं नांवें मिळतात.

---

३९. कर्णहंस, संपादकाचें हृद्गत, पृ. ५.
४०. कर्णहंस, श्रीशांतलिंगप्पा महाराज यांचें चरित्र, पृ. १७.
४१. महाराष्ट्र-सारस्वत, पुरवणी, पृ. ४३५.

प्रभुपंचमहासिद्धेश्वर । सांगूं तयाचा विस्तार ।
सदाशिव ईश्वर महेश्वर । महारुद्र चार मठीं ॥ १४ ॥
घंटाकारण[४२] शंखाकारण । काळांतक सर्वानुग्रह[४३] अलजण[४४] ।
महाकर्तृमूर्ति अनुग्रहेश्वर दोन । सर्वसाक्षी सर्वाचार्य पूर्ण हे बारा ॥ १५ ॥
रेवणसिद्ध मराळसिद्ध[४५] । येकोराम पंडिताराध्य ।
षोडश झाले पुढे भेद । ज्ञानी सावध परिसावें ॥ १६ ॥
धर्मइंद्र रुद्रमुनींद्र । मुक्तमुनी समाधिसोमेश्वर ।
विंशति झाले विस्तार । ऐक सादर सच्छिष्या ॥ १७ ॥
बनसदाशिव एकविसावा । चतुर्दशविद्यापारंगत बाविसावा ।
रेवणाचार्य मल्लिकार्जुन गणावा । चतुर्विंशतिपर्यंत ॥ १८ ॥
षडगदशीव[४६] बसवेश्वर भाळलोचन । धातुर्वादी अठ्ठावीस जाण ।
बदरीकांत चनमल्लिकार्जुन । गंगाधर एकतीस ॥ १९ ॥
सिंगळसिद्ध निराहारसिद्ध । समाधिसिक्‌[४७] शांतसोमेश्वर प्रसिद्ध ।
हुल्लिकांती चन्नवीर चलूरशांत वंद्य । विद्यापारंगत अडतीस हे ॥ २० ॥
शांतबोध शांतेश्वर । सुखबोध पूर्णबोध निर्धार ।
बसवलिंग शांतलिंग सधर[४८] । दशरथशांत पन्नास हे ॥ २१ ॥

गुरु-शिष्यसंवादाच्या रूपानें ही परंपरा येथें सांगितली गेली आहे.

...शांतमठांचा निर्णय । समन्वय निवडुनी सांगा ॥ १ ॥

—असें शिष्यानें म्हटल्यावर गुरूनेंहि,

...हे शांतमठाची वित्पत्ती । सांगितली तुजप्रती ॥ १० ॥
आतां शांतपरंपरा गांठी । देऊं शेवटीं अवधारा ॥ १३ ॥
हें शांतपरंपरा वर्णन । समूळ कथिलें तुजलागून ॥ २२ ॥

असें म्हणून ' संशयग्रंथी छेदावया ' हा निवेदनाचा प्रपंच केला आहे.

ही परंपरा सर्वेश्वरांनीं शांतलिंगास सांगितली असाहि समज दिसतो. " माझें नांव नीलकंठ असून, (आदिनाथापासून) मी एकूणपन्नासावा व तूं

४२. घंटाकर्ण.
४३. सर्वानुग्रहक.
४४. अठजण, असें असावें.
४५. मरळसिद्ध; मरुळसिद्ध.
४६. षडगदगी.
४७. सिद्ध.
४८. श्रेष्ठ.

पन्नासावा आहेस;" असें सर्वेश्वरांनीं शांतलिंगांस सांगितलें, अशी माहिती श्री. खरशीकरशास्त्री देतात.[४९]

'शिवगुरुदर्शन' असें या प्रसंगाला श्री. जोशी यांनीं नांव दिलें आहे. नीलकंठ हे शांतलिंगांचे गुरु. त्यांनींच दर्शन देऊन परंपरा सांगितली असें एक वेळ गृहीत धरलें तरी परंपरेंत नीलकंठ व शांतलिंग एकूणपन्नासावे आणि पन्नासावे येत नाहींत. तर ते अनुक्रमें एकुणचाळीसावे व चाळीसावे येतात.

जयरामस्वामींच्या म्हणून दिलेल्या ( खरशीकरांच्याच पुस्तकांतून घेतलेल्या ) 'शांतिपंचीकरणां'तील उतान्यांत विसाव्या ओवींत 'विद्यापारंगत अडतीस हे' असा उल्लेख आहे. पुढें एकविसाव्या ओवींत 'शांतबोध, शांतेश्वर, सुखबोध पूर्णबोध, बसवलिंग, शांतलिंग व दशरथ' अशीं सात नांवें दिलीं आहेत. आणि मधलीं पांच नांवें गाळलीं गेलीं आहेत.[५०]

हीं पांच नांवें कोणतीं? पांच महत्त्वाचीं नांवेंच येथें गाळलीं गेलीं आहेत, इकडे कोणाचेंच लक्ष गेलें नाहीं. नीलकंठ, शांतलिंग, कृष्णाप्पा व जयरामस्वामी, हीं आपणांस माहीत असलेलीं चार नांवें नाहींत. स्वतःचें नांव जयरामस्वामी देणार नाहींत, असें मानलें तरी स्वतःच्या गुरूचें, गुरूच्या गुरूचें ( म्हणजे शांतलिंगांचें ) नांव द्यावयाचें ते विसरले असतील हें अशक्य आहे. त्याचप्रमाणें एकविसाव्या ओवींतील सात नांवें हीं जयरामस्वामींच्या नंतर झालेल्या पुरुषांचीं आहेत. जयरामस्वामी तीं नांवें कशीं देतात? विद्यापारंगतअखेर अडतीस, मधलीं न दिलेलीं चार आणि शेवटलीं सात अशीं मिळून एकूणपन्नासच नांवें होतात. आणखी एक नांव कोणतें?

शांतपरंपरेंतील सर्व पुरुषांचीं नांवें देणारें एक अप्रसिद्ध प्रकरण पाहावयास मिळालें.[५१] त्यामध्यें विद्यापारंगत ते शांतबोध यांच्यामधील सर्व नांवें दिलीं आहेत. शांतबोध ते दशरथशांतपर्यंतचीं नांवें सारखींच आहेत. 'शांतिपंचीकरणां'त नसलेलीं पांच नांवें सुखबोध देतो तीं अशीं :—

विद्यापारांगत शांत श्रेष्ठ। तयांचा शिष्य अतिवरिष्ट।
प्रकटे काशीपति नीलकंठ। जो ब्रह्मनिष्ठ अवतारी ॥ ३२ ॥
प्रभुनीलकंठ काशीपति। तयांचा शिष्य शांतमूर्ति।[५२]
जो कां शांत अगाधस्थिती। भोगी पुरती अखंड ॥ ३३ ॥

---

४९. कर्णहंस, पृ. १०-१२.
५०. विसाव्या ओवींत अडतीस आणि एकविसाव्या ओवींत सात अशीं पंचेचाळीसच नांवें येथें आहेत.
५१. सुखबोधकृत 'परंपरापुरुषआराधन.' हें हस्तलिखित अभ्यासासाठीं दिल्याबद्दल प्रा. पां. ना. कुलकर्णी यांचा मी अत्यंत आभारी आहे.
५२. शांतलिंग ('विवेकचिंतामणि' व 'करणहसुगे' यांचा कर्ता).

तयांचे कृपादृष्टी आपण। प्रगटे कृष्ण क्लेशहरण।[५३]
क्लेशहरणाची कृपा पूर्ण। प्रगटे संपूर्ण जयरामस्वामी॥ ३४॥
जयरामस्वामीचे दयेन। प्रभु प्रगटे निरंजन।
जया नावडे जैभान। म्हणोनि विजन सेवित॥ ३५॥
निरंजनस्वामींचा अवतार। प्रगटे शांतबोधेश्वर॥ ३६॥

यावरून आपणांस माहीत नसलेलें 'निरंजन' हें एक नांव कळतें.

शांतपरंपरेचें स्वरूप आणि वेगळेंपण ध्यानीं घेण्याच्या दृष्टीनें 'शांत' हें नांव तपासण्यासारखे आहे. 'शांत' नांवामध्येंच हरिहरैक्याचा झरा अंतर्भागीं झुळझुळत आहे.[५४] हरिहर, रामेश्वर, रामलिंग, या जोडनांवांतली कल्पना 'शांत' या एकेरी नांवांतहि आहे.

शांतपरंपरेंतील पहिले बाराजण पौराणिक काळांतील आहेत. कृत, त्रेता व द्वापर या युगांत ते होऊन गेले असें मानलें जातें. शिवाच्या नांवाखेरीज दुसरें कांहीं ऐकूं येऊं नये म्हणून कानाला घंटा बांधणाऱ्या घंटाकर्णाची कथा सुप्रसिद्ध आहे.[५५]

ऐतिहासिक वाटणाऱ्या नांवांचा प्रारंभ मात्र रेवणसिद्ध, मराळसिद्ध, येकोराम आणि पंडिताराध्य यांच्यापासून होतो. वीरशैवांच्या पंचाचार्यांतील हे चौघे. विश्वाराध्य हें पांचवें नांव मात्र या परंपरेंत दिसत नाहीं. 'विवेकचिंतामणीं'त हींच चार नांवें आहेत.[५६] 'आचार्यादि चतुष्क' असा चौघांचाच निर्देश आढळतो.[५७]

या चौघांचे मठ अनुक्रमें कोलिपाकी, उज्जनी, केदार व श्रीशैल येथें आहेत. विश्वाराध्यांचा मठ वाराणसींत. येथील उज्जनी म्हणजे उत्तरेंतील उज्जैनी नव्हे. बेळ्ळारी जिल्ह्यांत कोट्टुरजवळ तीन मैलांवर ही वटक्षेत्र उज्जनी असून तिला

---

५३. कृष्णाप्पा.

५४. 'शांत' हें नांव विष्णु आणि शंकर या दोघांचेंहि आहे:—
संन्यासकृच्छमः **शान्तो** निष्ठाशान्तिः परायणः।
शुभाङ्गः शान्तिदः स्रष्टा कुमुदः कुवलेशयः॥ (विष्णुसहस्रनाम).
महेशः परमं ब्रह्म **शान्तः** सूक्ष्मः परात्परः।
सर्वान्तरः सर्वसाक्षी चिन्मयस्तमसः परः॥ (शिवसहस्रनाम).

५५. शिवरामकृत 'शिवकथामृत', १६-११.

५६. रेवणसिद्ध मराळसिद्ध। येकोराम पंडिताराध्य।
आचार्य संप्रदाय शुद्ध। तयालागून॥ २-७३०॥

५७. विवेकचिंतामणि, २-७४०.

आज ' उजनी ' म्हणूनच ओळखतात. याच मठाच्या परंपरेंतील शांतलिंग; असा समज आहे. असे ' चार मठ ' असले तरी ' एक संप्रदाय ' असल्याची जाणीव दिसते.[५८]

रेवणसिद्ध व मराळसिद्ध हीं नांवें मराठींतील संतमालिकांतहि येतात. ' रेवाणसिद्धेश्वर ' असें नांव जयरामसुत देतो. मराळसिद्धाचें नांव ' मैराळसिद्ध '[५९], मरळसिद्ध[६०], असें दिलेलें आढळतें. यावरून महाराष्ट्राला हीं नांवें परिचित होतीं, असें वाटतें.

मरळसिद्ध हा मुक्तेश्वराचा (?) शिष्य असून त्याचा ' निरंजनभेदु ' नांवाचा दशदेहाचें विवरण करणारा ओवीबद्ध ग्रंथ असल्याची माहिती मिळते. परंतु शांतपरंपरेंतील हीं दोन नांवें आचार्यद्वयांचींच आहेत. संतमालिकांतील नांवांशीं त्यांचा नांवांपलीकडे संबंध दिसत नाहीं.

पुढेंहि धर्मइंद्रापासून विद्यापारंगतापर्यंतचे सर्व पुरुष हे कर्नाटकांतील आहेत. ते नांवावरून तरी मला वीरशैवच वाटतात. समाधिसोमेश्वर आणि शांतसोमेश्वर या नांवांचा विचार करतां कन्नडमध्यें ' सोमेश्वर-शतक ' लिहिणारा कवि सोमेश्वर डोळयांपुढें येतो. वीर सोमेश्वर (स. १२३४ ते १२५४) हें नांव कर्नाटकाच्या इतिहासांत मिळालें तरी येथें निरुपयोगी आहे.

वनसदाशिवऐवजीं चनसदाशिव अधिक अन्वर्थक वाटतें. चन्न म्हणजे सुंदर. पुढेंहि मल्लिकार्जुन, चनमल्लिकार्जुन अशीं नांवें येतात. मल्लिकार्जुन म्हटल्यावर श्रीशैलाचें व अक्कमहादेवीचें स्मरण होतें. शांतपरंपरेंतील पहिल्या मल्लिकार्जुनाला ' बोळ ' असें म्हटलेलें आढळलें. बोळ म्हणजे मुंडन केलेला. (केशहीन मस्तकाचा). मल्लिकार्जुन नांवाचा एक कन्नड ग्रंथकार होऊन गेला (स. १२४५). ' शब्दमणिदर्पण 'कार काशीराजाचा हा पिता. त्यानें ' काव्यसार ' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.[६१] मल्लिकार्जुन हें नांव सिद्धचैतन्यकृत संतमालिकेंतहि आढळतें;[६२] पण यावरून विशेष बोध होत नाहीं.

---

५८. शांतिपंचीकरण ३५-२३.

५९. एकलिंग मैराळसिद्ध ... ॥ ५१ ॥ (उद्धवचिद्घन).
नरहरी एकनाथ मैराळ... ॥ ३९ ॥ (रंगनाथ निगडीकर).
मुक्तेश्वर मैराळसिद्ध... ॥ १७ ॥ (सिद्धचैतन्य).

६०. जयरामसुत.

६१. मध्ययुगीन चरित्रकोश, पृ. ६०६.

६२. मल्लकार्जुन ब्रह्मचारी । प्रत्यक्ष वेद जैसे चारी ।
काये सांगू त्याचि थोरी । जन्मवरी गुरुसेवा ॥ १८ ॥

षडगदशीव हाहि अशुद्ध अब्द आहे. षडगदगीस्थापनाचार्य असें नांव तेथें हवें. गदगी म्हणजे गादी किंवा पीठ. सहा पीठांची स्थापना करणारा म्हणूनहि कोणी प्रसिद्ध नाहीं. यानंतर आढळणारें बसवेश्वर हें नांव 'षट्स्थल'कार बसवेश्वरांचें नव्हे. कारण त्यांचा गुरु कूडलसंगमेश आहे. कोणी षडगदगीस्थापनाचार्य नाहीं.

बदरीकांत आणि हुल्लिकांती चन्नवीर हीं नांवें मजेशीर आहेत. येथें कांतऐवजीं कंति ( म्हणजे कंथा ) असा शब्द हवा. बदरी ( बोर ), बगरी ( भोंवरा ) किंवा पगडी[६३] ( सोंगटें ) यांच्या म्हणजे लिंगाच्या आकृति असलेली ( सचित्र ) कंथा पांघरणारा असा पहिल्या नांवाचा अर्थ. हुल्लिकंति[६४] शब्दहि असाच. गंगाधर हें नांवहि विचार करण्यासारखें आहे. यालाच 'चरंती' गंगाधर म्हटलें आहे. चरंती म्हणजे फिरणारा, जंगम. हुबळीला मूरसाविरमठ आहे. तेथील गादीला 'जगद्गुरु गंगाधरपीठ' असें म्हणतात. त्या पीठाचे चौदा पुरुष झाले[६५] शांतपरंपरेशीं त्या गंगाधराचा कांहीं संबंध असावा. दुसरा कोणी गंगाधर प्रसिद्ध नाहीं.

चलूरशांत[६६] या नांवांतील 'चलूर' हा शब्द ग्रामवाचकहि असूं शकेल. किंवा 'चन्न' प्रमाणेंच 'चलुव' म्हणजे सुंदर अशा अर्थीं वापरला गेला असेल. ज्ञानेश्वरांचा म्हणून इकडल्या भागांत एक कन्नड अभंग म्हणतात. त्यांत प्रारंभींच अशा अर्थीं शब्दप्रयोग आहे. 'चलुवने चलुवने पंढरिराया.' तेव्हां 'चलूर'च्या ठिकाणीं 'चलुव' असेंहि असूं शकेल. विद्यापारंगत, चतुर्दश-विद्यापारंगत हीं नांवें नुसतीं विशेषणें आहेत. त्या मानानें धातुर्वादी, सिंगळसिद्ध व निराहारसिद्ध[६७] या नांवांचा मागोवा घेणें श्रेयस्कर ठरेल. पहिल्या अडतीस पुरुषांची ही कथा.

शांतलिंगांचे गुरु नीलकंठ यांचा उल्लेख 'काशीपति' असा आढळला तरी त्यावरून फारसा बोध होण्यासारखा नाहीं. श्री. ना. रा. बामणगांवकर म्हणतात, "ब्रह्मसूत्रावर क्रियासारनामक भाष्य नीळकंठ शिवाचार्य यांनीं लिहिलेलें प्रसिद्ध

---

६३. 'पदडीकांति' असेंहि नांव आढळतें. 'पदडी'ला अर्थ नाहीं. म्हणून शब्द 'पगडी' असा असावा.

६४. हुल्लि = व्याघ्र; हुल्लू = तृणविशेष; हुल्ले = हरीण, मृग. व्याघ्रांवर, मृगाजिन इ. कंथा म्हणून पांघरणारा, असा अर्थ.

६५. पहिलीं चार नांवें गुरुसिद्ध, सिद्धलिंग, गुरुसिद्ध व गंगाधर अशीं आढळ-तात. पुढें गुरुसिद्ध व गंगाधर हींच दोन नांवें आलटून पालटून येतात.

६६. चल्लूर शांतेश्वर.

६७. निराहारि.

आहे. ह्यांचे गुरु व वडील यांचें नांव मल्लयदेव असून आईचें नांव चन्नमांबा असें ग्रंथकारांनीं प्रारंभींच निवेदन केलें आहे. पण गांव कोणतें व शतक कोणतें एवढा बोध होत नाहीं."[६८]

नीळकंठ हे शांतलिंगांचे गुरु असल्यानें आणि शांतलिंगांचा काल आपणांस माहीत असल्यानें शतकाचा बोध होणें आतां अवघड नाहीं.[६९] 'क्रियासार'कर्ते हे शांतलिंगाचे गुरु असावेत असें मानावयास सबळ पुरावा नाहीं. तें एक अनुमान आहे.

शांतलिंग, कृष्णाप्पा व जयरामस्वामी हे प्रसिद्धच आहेत. संतमालिकांतहि त्यांना स्थान मिळालेलें दिसतें.[७०] नीलकंठांचें नांवहि एका ठिकाणीं आलें आहे.[७१] निरंजन हें नांव मात्र, जयरामस्वामींचे शिष्य म्हणून, अन्यत्र आढळत नाहीं.

त्याचप्रमाणें शांतबोध[७२] हे कोठें होऊन गेले, ही माहितीहि उपलब्ध नाहीं. शांतेश्वर हे 'ढपळापुरी'[७३] व सुखबोध हे 'सांवगावीं' होऊन गेले असा उल्लेख आढळतो.[७४] त्याचप्रमाणें सुखबोध, पूर्णबोध व बसवलिंग हे तिघे गुरुबंधु होते; अशीहि माहिती मिळते.

यांपैकीं बसवलिंगाचा कवि म्हणून 'महाराष्ट्र सारस्वतां'त भाव्यांनीं उल्लेख केला आहे. (पृ. ५३६--३७). त्याच्या नांवावर भामाविलास, उमामहेश-संवाद, व गजगौरीव्रत आख्यान हीं प्रकरणें आहेत. त्यांपैकीं शेवटचें राघव व बसवलिंग यांनीं मिळून लिहिलें आहे. त्याचा काल, भावे, श. १६०० चा सुमार असा देतात. उद्धवचिद्घनानें त्याचें नांव संतमालिकेंत घातलें आहे. याचा अर्थ तो उद्धवचिद्घनापूर्वीं होऊन गेला किंवा समकालीन होता. उद्धव-चिद्घन श. १६११ नंतर केव्हांतरी झाला असें मानलें जातें. माझ्या समजुती-प्रमाणें त्याचा आणि म्हणून बसवलिंगाचा काळ श. १७०० चा सुमार मानावा.

---

६८. कर्णहंस, पृ. १४.

६९. आर्. नरसिंहाचार्य या नीलकंठांचा काळ स. १४०० चा सुमार असा मानतात.

७०. शांतलिंग श्रीकृष्णयोगिया कृष्णदास जयराम (जयरामसुत).

७१. नीलकंठ शांतलिंग । जयराम श्रीकृष्णअभंग ।
गोपाळस्वामी निःसंग । गुरुभक्त साम्य सर्वस्वें ॥ ४४ ॥ (रंगनाथ).

७२. शांतबोधेश्वर.

७३. डफळापूर.

७४. सुखबोधकृत 'परंपरापुरुषआराधन'.

जयरामस्वामींचा निर्वाणशक १५९७. त्यानंतर निरंजन, शांतबोध व शांतेश्वर होऊन गेले. सुखबोध व पूर्णबोध हे बसवलिंगाचे गुरुबंधु होते असें गृहीत धरलें तरी वरील तिघे होऊन जाण्यास १७ व्या शतकाचा अर्ध तरी उलटला असावा.

या बसवलिंगाच्या शिष्याचें नांव पुन्हां शांतलिंग. 'हा संकेश्वरीं' होता. आणि जातीनें सारस्वत ब्राह्मण होता. याचा मुलगा दशरथशांत; शांतपरंपरेंतील पन्नासावा पुरुष. याचा पुत्र दत्तात्रयशांत. याच्याच सुखबोध नांवाच्या शिष्यानें शांतपरंपरा सांगणारें प्रकरण लिहिलें आहे. आजहि संकेश्वरला 'शांत' आडनांवाचें घराणें आहे.

शांतलिंगांपूर्वी दोन 'शांत' होऊन गेले असले तरी त्यांच्या आधींच्या पुरुषांनीं मराठींत रचना केलेली नाहीं. म्हणून मराठी कवींतली शांतपरंपरा शांतलिंगांपासूनच सुरू होते. 'आद्यशांतेश्वर प्रसिद्ध सकळां' असें त्याचें वर्णन यामुळेंच करण्यांत आलें असावें.

'शांत' हें नांव शांतपरंपरेला व शांतलिंगांना कां अन्वर्थक ठरतें, तें पुढील उल्लेखांवरून कळेल. शांतलिंगांचें वर्णन सुखबोध असें करतो,

प्रभु नीलकंठ काशीपति। तयांचा शिष्य शांतमूर्ति।
जो कां शांत अगाधस्थिती। भोगी पुरती अखंड ॥ ३३ ॥

'शांत' या नांवांत या स्थितीची किंवा अवस्थेची कल्पना आहे. शांतलिंगांनीं या 'शांती'वर दिलेला भर पाहण्यासारखा आहे[७५] :—

ऐकल्या पढत्या जना। स्वयं होय प्राज्ञा।
विघ्न निरसोनिया मना। शांति हातावसे ॥ ३७६ ॥

शांतपरंपरेचें तत्त्वज्ञान खास वेगळें असें नाहीं. शांतलिंगांपर्यंत केवळ 'वीरशैव संप्रदाय' एवढेंच तिचें स्वरूप दिसतें. सिद्ध, अवधूत या पंथांच्या छटाहि आधींच्या नांवांत दिसतात.

शांतलिंगांनीं वीरशैव तत्त्वज्ञान सांगितलें. पण आपला पंथच तेवढा श्रेष्ठ अशी त्यांची संकुचित दृष्टि नव्हती. त्यामुळें त्यांच्या परंपरेंत ब्राह्मणांचा, शैवेतरांचाहि अंतर्भाव होऊं शकला. हें समन्वयाचें तत्त्वज्ञान शांतपरंपरेनें आचरलें असें आढळतें.

शांतलिंगांनीं कृष्णाप्पासारख्या ब्राह्मणाला व कृष्णभक्ताला शिष्य केलें. शांतलिंग व कृष्णाप्पा यांनीं तीर्थयात्रा केली तेव्हां ते मथुरेलाहि गेले होते.

---

७५. कर्णहंस, पृ. ३१.

वृंदावनांत त्यांनीं त्याला गुप्तपणें चाललेली रासक्रीडा दाखविली; असें म्हणतात. भक्तीला माणसांप्रमाणेंच हरि-हरांतहि भेद करतां येत नाहीं; असें शांतपरंपरेनें सिद्ध केलें. भागवतपंथी 'येकनाथा' बद्दलहि त्यांनीं आत्मीयतेचा उद्गार काढला आहे.[७६] (यावरून ते एकनाथांनंतर कांहीं काळ हयात होते यालाहि दुजोरा मिळतो.) त्यामुळें शांतलिंगांच्या शांतपरंपरेला 'अविभक्तं विभक्तेषु' या स्वरूपाची तत्त्वज्ञानात्मक बैठक लाभणें स्वाभाविक होतें.

शांतलिंगांना 'प्रेमजिव्हाळा' असें म्हटलें आहे. ते आपल्या गुरूला 'प्रेमपददायकु' असें संबोधितात. शांतपरंपरेंतील भक्तीचाच हा निर्देश आहे. ही भक्ति गुरूबद्दल, म्हणजेच परमेश्वराबद्दल आहे. गुरु हाच परमेश्वर. तोच 'अज्ञान-तम फेडिता दिनकरू', 'भवाग्नी निववीता जलधरू' 'तत्त्वभ्रमविध्वंसकु' असा आहे.[७७] आणि त्याच्यामुळें 'ज्ञाने ज्ञानपणा मुकोनि शांति' मिळते. मनाची अशी 'शांत' अवस्था हेंच या परंपरेचें उद्दिष्ट दिसतें. 'जिवाशिवाची जडली समाधी' ही स्थिति म्हणजेच शांतस्थिति. निजगुणशिवयोगींचें नांव शांत-परंपरेंत आलें नाहीं तरी त्यांनीं 'शांत' व 'शांतिमत' या शब्दांचा वापर केला आहे यावरून त्यांना शांतपरंपरा माहीत होती असें दिसतें. 'बेडुवेन भवा' या पदांत[७८] त्यांनीं "धरेयोळ् अत्यधिकवेनिप शांतिमतवनु" (पृथ्वीवरील-शांतिमत हें उत्तम मत) आणि ".शांतरु वसेदु अहुदेंदु बण्णिसुव वर्तनेयनु" (शांत लोक प्रसन्न होऊन 'भले शाबास' म्हणून वर्णन करतील असें वर्तन) यांची इच्छा केली आहे.

शांतलिंगांचे दोन ग्रंथ ('करणहसुगे' व 'विवेकचिंतामणि') आतां उपलब्ध झाले आहेत. अजूनहि कांहीं सांपडणें शक्य आहे. कृष्णाप्पांचीं पदें असल्याचा उल्लेख आहे. परंतु त्यांचें संकलन झालेलें नाहीं. जयरामस्वामींच्या ग्रंथांबाबत आपणांस बरीच माहिती आहे. परंतु 'शांतिपंचीकरणा' सारख्या प्रकरणांबाबत शंका आहे.

शांतपरंपरा देणाऱ्या ओव्यांवरून मला असें वाटतें कीं, त्या ओव्यांपैकीं वीस आणि एकवीस मधली एक ओवी निश्चितपणें गळली आहे. आणि 'शांति-

---

७६. कृतार्थ जाहलासि ऐसे वदोन। सांगितलें पुढील कारण।
येकनाथ पुन्हां जन्मले जाण। उपदेश करणें तयासी॥ १२-५५॥
— भक्तमंजरीमाला.

७७. तूं भवाग्नी निववीता जलधरू। कीं अज्ञान-तम फेडिता दिनकरू।
संसारसमुद्रीं तारिता ईश्वरू। ब्रह्मांडनायका॥ २॥
तूं विद्याऽविद्यात्रासकु। तत्त्वभ्रमविध्वंसकु।
प्रेमपददायकु। ऐसीं ब्रीदें तुझीं॥ ३॥ — कर्णहंस.

७८. भावगीत, सं. बेटगेरी कृष्णशर्मा, पृ. १३३.

'पंचीकरण' हें जयरामस्वामींचेंच मानावयाचें झालें तर, एकविसावी ओवी ही कोणीतरी नंतर घुसडली आहे.

'शांतिपंचीकरणा'चा कर्ता दुसराच कोणी तरी असावा आणि तो दशरथशांतानंतरचा असावा. हें प्रकरण भाव्यांनीं जयरामस्वामींचें म्हणून दिलें असलें तरी डॉ. तुळपुळे त्याचा उल्लेख करीत नाहींत.[७९] हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

निरंजनापासून पुढील सर्वांची माहिती व वाङ्मय यांचा शोध घेणें आवश्यक आहे. शांतलिंगांच्या शांतपरंपरेचा विचार संशोधनाला चालना देणारा आहे. या संशोधनांतून आणखी कांहीं कवींची, ग्रंथांची भर मराठी वाङ्मयांत पडण्याचा संभव आहे. या परंपरेंत वीरशैव पंथाचा प्रवाह वाहात असल्यानें त्याचें मराठींतील स्वरूप अधिक स्पष्ट करणारें कांहींतरी हातीं येण्याची शक्यता आहे.

## ५ 'विवेकचिंतामणीं'तील तत्त्वज्ञान

'विवेकचिंतामणी'च्या प्रथमपरिच्छेदांत 'वेदांतसकळशास्त्र निर्णय' आहे. परंतु द्वितीय परिच्छेदांत 'शिवसिद्धांत' आहे. वीरशैव तत्त्वज्ञानाचा महत्त्वाचा भाग त्यांत येत असल्यामुळें व या तत्त्वज्ञानाचा परिचय होण्यास तो उपयुक्त ठरत असल्यामुळें त्याचें विवेचन करणें अत्यावश्यक आहे. प्रथम परिच्छेदांतील तत्त्वज्ञान परिचित असून त्याचें स्वरूप संकलनात्मक आहे. द्वितीय परिच्छेदाची गोष्ट तशी नाहीं. वीरशैव तत्त्वज्ञानाची ओळख करून देणारा हा भाग एका अधिकारी शिवयोग्यांकडून लिहिला गेला आहे. म्हणून त्याच्यावर लक्ष केंद्रित होतें.

परिच्छेदाच्या प्रारंभींचा भाग हा उपोद्घाताचा आहे. या परिच्छेदांत निजगुणांना 'शिवसिद्धांतपद्धती'चें निरूपण करावयाचें आहे. हा सिद्धांत म्हणजे एक प्रत्यक्ष फळ सांगणारें शास्त्र आहे.

प्रथम गारुड, दक्षिण, वाम आणि भूत हीं चार तंत्रें व त्यांतील तत्पुरुष, अघोर, वामदेव आणि सद्योजात यांची उपासना यांचा निर्देश करून ते आगमभेद सांगतात. हा (शिव) सिद्धांत कसा प्रसिद्ध झाला या प्रश्नाचें उत्तर म्हणून आगमभेदांचें विवरण केलें आहे. २८ आगमांचीं नांवें, त्यांचीं उत्पत्तिस्थानें व त्यांतील पहिले १० शिवभेद व उरलेले १८ रुद्रभेद; इतकी माहिती सुरुवातीस येते. त्यानंतर आगमावतरण व आगमांचे विशेष विभाग सांगितले आहेत. दोन शंख एक पद्म एक अर्बुद एकोणीस कोटी अडतीस लक्ष चवेचाळीस हजार

---

७९. महाराष्ट्र-सारस्वत, पुरवणी, पृ. ९७१.

अशी एकूण २८ मुख्य आगमांची संख्या दिली गेली आहे. आगमांचे आणखी १९८ भेद आहेत. (ओ. ४९ मध्यें 'येकशेशाण्णव' असा हा आंकडा दिलेला आहे. तसेंच मूळ कन्नड कृतींतील एकेका आगमांत सात पद्म एक महाखर्व सात खर्व आठ न्यर्बुद पांच अर्बुद सातशेपन्नास कोटी एकोणसत्तर लक्ष तेवीस हजार संख्या असल्याचा निर्देश मराठी अनुवादांत गळला आहे.)

याहून महत्त्वाचा भाग म्हणजे 'आगमसार.' हा भाग मराठी अनुवादांत आलेला नाहीं. तेथें हे आगम म्हणजे सदाशिवाचीं पंचमुखेंच आहेत. 'ईशानः सर्व विद्यानाम्' या श्रुतींत म्हटल्याप्रमाणें १८ महाविद्या, १८ उपनिषद्विद्या, ६४ विद्याकला, ६४ तंत्रें व ६४ उपतंत्रें आणि सकल, मत, कुल, कर्म, धर्म, कर्म, शिल्प, व्यापार, रहस्य हे सर्व ग्रंथ शिवागमांपासूनच उत्पन्न झाले आहेत असें म्हटलें आहे.

'आगमप्रतिपाद्य' या भागांत क्रिया, चर्या, योग व ज्ञान या आगमांतील चार पादांचा व त्यांतील प्रतिपाद्य असलेल्या षट्पदार्थांचा निर्देश आहे. त्यानंतर हा प्रास्ताविक भाग संपून क्रियापादाला सुरुवात होते.

'क्रियापादा'च्या प्रारंभीं अनादिशैव, आदिशैव, महाशैव, अनुशैव, अवांतरशैव, प्रवरशैव आणि अंतरशैव हे शैवांचे सात प्रकार व त्यांचीं लक्षणें दिलेलीं आहेत. त्यानंतर पुन्हां शैवांचे वाम, दक्षिण, मिश्र व सिद्धांत असे चार भेद सांगितले आहेत व त्यांचीं लक्षणें विस्तारानें स्पष्ट केलीं आहेत. यांपैकीं 'परशिवतत्पर । ते सिद्धांत म्हणविती' अशी सिद्धांतशैवांची माहिती दिली आहे. या सर्व शैवांत चार प्रमुख शैव म्हणजे सामान्यशैव, मिश्रशैव, शुद्धशैव आणि वीरशैव हे होत. सामान्यशैव इष्टलिंगाची किंवा स्थावरलिंगाची पूजा करतात. मिश्रशैव पंचायतनपूजा करतात. शुद्धशैव म्हणजे अनादिशैव अशा सदाशिवाच्या पंचमुखापासून दीक्षा घेतलेल्या कौशिक, कश्यप, भारद्वाज, अत्रि, गौतम वगैरे शैव ऋषींच्या वंशांत जन्मलेले महाशैव. वीरशैवलक्षणें सांगण्यापूर्वी विभूति, रुद्राक्ष, मंत्र, जप, प्राणायाम, ध्यान, पूजा इ. विषय आले आहेत. वर्ण आणि आश्रम यांना अनुसरून विभूतिभेद व विभूतिधारणक्रम दिलेला आहे. विभूतीचें महत्त्वच इतकें आहे कीं, ती सर्व वर्णाश्रमधर्मीयांनीं (सांख्यादि मताभिमान्यांनींहि) धारण करावी. विभूति, रुद्राक्ष आणि मंत्र यांसंबंधींचें विवेचन मुख्यतः 'शुद्धशैवांना अनुलक्षून आहे असें (ओव्या १३६, २०८ व २४३) वाटतें. हा सगळा भाग तांत्रिक आहे. मंत्रामध्यें प्रणव आणि मूलपंचाक्षरी हेच प्रमुख आहेत. त्यांच्या जपाबरोबरच होम सांगितला आहे. पंचाक्षरीविनियोग' (ओ. ३९९–४३६) हा भाग होमासंबंधींचाच आहे. प्राणायाम आणि ध्यान या विभागांत योगप्रक्रिया कांहींशी येते.

'शिवपूजाविषया'च्या सुरुवातीस पुन्हां 'शुद्धशैवासी शिवार्चन मुख्य' (ओ. ५६७) असें म्हटलें आहे. (नंतर शिवलिंगस्वरूप व शिवलिंग भेद स्पष्ट केले आहेत. वेगवेगळ्या देवता वेगवेगळ्या शिवलिंगांची पूजा करतात. कर्मठानें पूजा करावयाचा प्रकार सांगतांना पुन्हां वर्णांचा उल्लेख आहे. स्वयंभुलिंग, बाणलिंग, चरलिंग, संकीर्णलिंग व प्राणलिंग यांचें अर्चन शैवसिद्धांतसंमत आहे. तसेंच निगमागमोक्त पूजा विशेष फलप्रद आहे; असेंहि म्हटलें आहे). हा भाग प्रस्तुत प्रतींत नाहीं. परंतु वारद-प्रतींत आहे.[८०] तांत्रिक व वैदिक असे दोन पूजाभेद दिलेले आहेत.

'शिवपूजायोगपीठा'ची कल्पना अत्यंत भव्य व रूपकात्मक आहे. श्रीबसवेश्वरांनीं प्रभुदेवांसाठीं तयार केलेल्या 'शून्यसिंहासना'चें बहारीचें वर्णन (संस्कृत) 'प्रभुलिंगलीलें'त आढळतें.[८१] त्याच प्रकारचें हें वर्णन आहे. हें मानसपूजेचें पीठ होय. पूजासामग्री व उपचार यांचें तपशीलवार वर्णन केलेलें आहे. 'नवविधाभक्ति' उपचारसंग्रहांत पाहावयास मिळतात. सामान्यांसाठीं बाह्यपूजा व मुमुक्षूंसाठीं—तितका अधिकार असणाऱ्यांसाठीं—मानसपूजा किंवा अंतरंगशिवार्चन अशी विभागणी केलेली आहे. 'अंतरशिवयोगसंग्रह' हा भाग 'शिवपूजायोगपीठा' इतकाच किंवा अधिक काव्यमय आहे.

मानसपूजेनंतर इष्टलिंगाची पूजा करावी. स्थावरलिंगाची पूजा ही परार्थ-पूजा होय. या दोन्हीहि पूजा 'न उबगत' कराव्या. परार्थपूजेंत वृषभ, भास्कर, वीरभद्र, मातृका, स्कंद, क्षेत्रपाल, ब्रह्मा, विष्णु व रुद्र या देवतांना ईश्वराचें आवरण मानलें जातें. त्यांचें ठरविलेलें स्थान जाणून त्यांची पूजा करावी. भिन्न रीतीनें स्थापिलेल्या विष्णवादि देवतांचें भजन टाळावें. आपल्या इष्टलिंगाचीच पूजा करावी. तें चोरीस गेल्यास एक लक्ष अघोरमंत्राचा जप करावा. व्रतनियमांचा भंग झाल्यास अष्टोत्तरशत गायत्रीजप करावा. नास्तिकांना व वेदबाह्यांना शिवप्रसाद देणें योग्य नाहीं (ओ. ६७३) हा उल्लेखहि महत्त्वाचा आहे. ज्या शुद्धशैवांसाठीं हें सर्व लिहिलें आहे ते 'वेदबाह्य' नाहींत, अवैदिक नाहींत असें या उल्लेखावरून स्पष्ट होतें.

यानंतर 'वीरशैवलक्षणा'पासून 'क्रियापादा'च्या अखेरपर्यंत वीरशैव व त्यांचें तत्त्वज्ञान ह्याच विषय प्रतिपादिला गेला आहे. आतांपर्यंत जे शैव सांगितले, त्यांतच नव्हे तर सर्व जगांत वीरशैव हा श्रेष्ठ होय. वीरशैव धर्म हा अल्पक्रियेनें अनंतफळ मिळवून देणारा धर्म आहे. वीरशैव सर्वदा लिंगांगसामरस्य अनुभवितो. इष्टलिंगाचें त्रिकाल अर्चन करतो. लिंगलोप झाल्यास प्रायश्चित्तें

---

८०. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), पृ. २११.

८१. प्रभुलिंगलीला, भाग ३ रा, अ. २१, श्लो. १८-३३.

न घेतां प्राणत्याग करतो. गुरुनिंदा, शिवनिंदा, जंगमनिंदा, प्रसादनिंदा, पादोदक-निंदा, भस्मधारणनिंदा इ. निंदा सहन करीत नाहीं. अशी निंदा ऐकल्याबद्दल तो प्रायश्चित्त घेतो व निंदकास शिक्षा करतो. लिंगयुक्त नसलेल्या भवीशीं संबंध ठेवीत नाहीं. तो खोटें बोलणें इ. सहा दोषांपासून मुक्त असतो. तसेंच तो जातिसूतक, जननसूतक, प्रेतसूतक, उच्छिष्टसूतक व रजःसूतक हीं पंचसूतकें मानत नाहीं. लिंगाचार, सदाचार, भृत्याचार, शिवाचार व गणाचार या पंचाचारांवर त्याची निष्ठा असते.

वीरशैवांचीं हीं लक्षणें दिल्यावर सामान्य, विशेष आणि निराभारि हे त्यांचे तीन भेद सांगितले आहेत. त्यानंतर दीक्षाविधीचें विवेचन आहे. क्रियादीक्षेनंतर आज्ञादीक्षा, उपमादीक्षा, स्वस्तिकारोहणदीक्षा, कलशाभिषेकदीक्षा, विभूतिपट्टदीक्षा, लिंगायतदीक्षा व लिंगस्वायत्तदीक्षा या सप्तविधदीक्षांची माहिती दिलेली आहे. त्यानंतर वीरशैवांची पूजा, भस्मधारण, कलान्यास, रुद्राक्षधारण इ. विषय येतात. त्यांत मंत्रा-तंत्रालाच प्राधान्य आहे.

' विशेषवीरशैवषट्स्थलविषया 'पासून वीरशैव तत्त्वज्ञानाचा जो गाभा—' षट्-स्थल विचार—तो हाताला लागतो. प्रथम थोडक्यांत त्याची रूपरेषा दिलेली आहे. भक्ति, कर्मक्षय, निर्मलमति, विचार, दर्पसंक्षय, सम्यग्ज्ञान हीं सहा फळें असलेलीं भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्य हीं षट्स्थलें होत. पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश, आत्मा हीं षडंगें; चित्त, मन, बुद्धि, अहंकार, ज्ञान, भाव हे सहा हस्त; कर्मसादाख्य, कर्तृसादाख्य, मूर्तिसादाख्य, अमूर्तिसादाख्य, शिवसादाख्य, महासादाख्य हे सहा सादाख्य; क्रियाशक्ति, इच्छा-शक्ति, ज्ञानशक्ति, आदिशक्ति, पराशक्ति, चिच्छक्ति या सहा शक्ति; आचार-लिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग, महालिंग हीं सहा लिंगें; निवृत्ति, प्रतिष्ठा, विद्या, शांति, शांत्यतीता, शांत्यतीतोत्तरा या सहा कला; घ्राण, जिव्हा, नेत्र, त्वक्, श्रोत्र, हृदय हीं सहा मुखें; गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द, परिणाम हे सहा पदार्थ; आणि श्रद्धाभक्ति, निष्ठाभक्ति, अवधानभक्ति, अनुभवभक्ति, आनंद-भक्ति, समरसभक्ति या सहा भक्ति होत.

आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग आणि महालिंग या लिंगांचे प्रत्येकीं ३—३ भेद व या लिंगांच्या भक्तांचे प्रत्येकीं ६—६ भेद व त्यांचें स्पष्टीकरण केलेलें आहे. एकूण १०१ स्थळें असून त्यांत ४४ अंगस्थळें व ५७ लिंगस्थळें असल्याचें सांगितलें आहे. ( या एकशेएक स्थळांचा तपशील दिलेला नाहीं ). त्यानंतर निराभारि वीरशैवांचीं लक्षणें सांगून सर्व प्राण्यांत षट्स्थलज्ञानी वीरशैव श्रेष्ठ होय असें स्पष्ट म्हटलें आहे. येथेंच ' क्रियापाद ' संपतो.

' चर्यापादा 'मध्यें ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्र-मांना उचित अशा आचारांची माहिती दिलेली आहे. ही ' आश्रमधर्मपद्धति '

पुराणागमोक्त आहे. गृहस्थानें ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, मनुष्ययज्ञ, पितृयज्ञ व भूतयज्ञ हे पांच यज्ञ केले पाहिजेत. ‘शैवनित्यकर्मविचार’ या भागांत संध्येबरोबरच गायत्रीवर भर दिलेला आहे.

‘नीतिसंग्रहा’च्या भागांत गृहस्थासाठीं जो आचारधर्म सांगितला आहे त्याची बैठक अत्यंत व्यापक आहे. व्यवहार आणि अध्यात्म यांची सांगड घालण्याचा प्रयत्न त्यांत दिसतो. केवळ एकाच धर्माच्या वा पंथाच्या माणसांसाठीं ही आचारसंहिता तयार केलेली नसून तिचा स्वीकार करावा असें कोणासहि वाटेल. वडीलधाऱ्यांस आदर दाखवावा; अतिथींचा सत्कार करावा; ‘विद्याव्यसनी होआवें’; धैर्य सोडूं नये; वैभवांत मन मृदु व आपत्तीच्या वेळीं कठीण ठेवावें; आत्मस्तुति व परनिंदा करूं नये; पंचसूतकें पाळूं नयेत; वैद्य व स्वयंपाकी यांच्यावर रागावूं नये; लोकापवादाचें भय मानावें; यांसारख्या उपदेशांत नम्रता, विद्याव्यासंग, धैर्य, दक्षता इ. गुणांवर भर दिलेला दिसतो. तर ताम्रपात्रांत दूध घालून पिऊं नये; दुधांत मीठ मिसळूं नये; काश्याच्या भांड्यांतील नारळाचें पाणी पिऊं नये; दिवसा निद्रा-मैथुनव्यापार करूं नये; यांसारख्या उपदेशाच्या मुळाशीं वैद्यकशास्त्रीय कारणें आहेत.

वृक्षाऐसें परोपकारी होआवें। सर्वदा देवाधीन म्हणावें।
पुरुष प्रेत्न न संडावें। उद्योग करावा ॥ २-१०६९ ॥

या ओवींत जणूं आचारधर्माचें सार आहे. परोपकारांवर भर दिला आहे. पण त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे दैवाबरोबरच किंबहुना अधिक प्रयत्नाला—उद्योगाला—महत्त्व दिलें आहे. आपण ‘देवाधीन’ आहोंत असें मानून पुरुषार्थ किंवा उद्योग केला पाहिजे; ही शिकवण ‘कायकवे कैलासा’ या तत्त्वामधील कर्मयोगाशीं जुळती आहे.

वानप्रस्थ, संन्यास व अत्याश्रम यांच्यांतील आचार व प्रकार यांची माहिती देऊन शिवयोगाधिकाऱ्यांचे भेद सांगितले आहेत. ज्या वर्णाश्रमांची आतांपर्यंत चर्चा झाली ते ‘शैव’ किंवा ‘शैवधर्मरूप’ असल्याचें स्पष्ट म्हटलें गेलें आहे. या शैव वर्णाश्रमांमध्यें शुद्धवैदिक, तांत्रिकवैदिक, शुद्धतांत्रिक आणि वैदिकतांत्रिक असे चार भेद आहेत. (१) सूतसंहिता, पराशरपुराण, (२) शिवगीता, शिव-राघवसंवाद, वायवीय संहिता; (३) शैव, पाशुपत, सोम, लाकुल आणि (४) भागवत, शिवसिद्धांत; हे ग्रंथ अनुक्रमें वरील चार प्रकारच्या लोकांचे प्रमाणग्रंथ होत. या ‘प्रमाणग्रंथविभागा’बरोबरच ‘चर्यापाद’ संपतो.

‘योगपादा’मधील सुरुवातीचा भाग शिवयोगाला वाहिलेला आहे. प्रथम २८ योगेश्वर, त्यांचे प्रत्येकीं ४–४ शिष्य, अशा ११२ शिवयोग्यांचा निर्देश आढळतो. शिवयोग्यांच्या बाह्यलक्षणांत भसित, त्रिपुंड्र, रुद्राक्षमाळ, योगदंड,

योगपट्ट, एकशिखा, बहुशिखा किंवा पंचशिखा व केशपाशमुंडन यांचा समावेश आहे. ‘ शांततेजोन्मय ’ हें त्यांच्या स्थितीचें वर्णन होय.

‘ शिवयोगलक्षण ’ हा भाग प्रस्तुत प्रतींत नसला ( वारद-प्रतींत तो आहे ) तरी महत्त्वाचा आहे. शिवचैतन्य व जीवचैतन्य यांत फरक करणारा अविद्यापाश तोडण्यासाठीं जो योग आचरावयाचा तो शिवयोग होय. योग म्हणजे काय हें सांगतांना ‘योगश्चित्तवृत्तिनिरोधः’ किंवा ‘योगःकर्मसुकौशलम्’ या वचनांचा अनुवाद केलेला दिसतो.

‘शिवयोगभेदा’मध्यें मंत्र, लय, हठ, राज हे चार योगप्रकार, मंत्रादि योगक्रम, मंत्रविधि, दशनाद, दशलक्षणें, अष्टांगयोगविधि, यमांगदशक आणि नियमांगदशक यांचें विवरण आहे. ८४ योगासनांपैकीं कांहींचा निर्देश करून त्यांतील स्थिर, सुखकर व निश्चल अशा अनुकूल आसनांचा उपयोग करावा असें म्हटलें आहे. ‘योगास घटचक्रादिविवेक’ हा भाग प्राणायाम, निषिद्धद्रव्यें, नाडीकंद, १४ नाड्या, इत्यादींचें वर्णन देतो. ‘योगतंत्रसंग्रहां’त मात्रा, ८ कुंभकप्रकार, बंधत्रय, सप्तप्राणायामलक्षणें, सिद्धिसूचना, चंद्रामृतपान या गोष्टींची माहिती दिलेली आहे. नंतर योगफलें, योगविघ्नें, योग्यांचें तारतम्य, षट्चक्रें इत्यादींच्या उल्लेखाबरोबर ‘योगपाद’ संपला आहे. ‘योगपादा’च्या समाप्तीची वारद-प्रतींतील ओवी उद्धृत करण्यासारखी आहे :—

इत्यादि समस्त । योगवृत्तांत ।
आगमशास्त्र योगपादांत । प्रतिपाद्य जाणावा ॥

‘आगमशास्त्र’ हा एकच शब्द तेथें जादा आहे. तसेंच या ओवीचा अर्थ देतांना “ योगाचे सर्व विषय **शिवसिद्धान्त** आगमशास्त्रामध्यें सविस्तर प्रतिपादिले आहेत ”[८२] असें म्हटलें आहे. तेथील ‘शिवसिद्धांत’ हा शब्द महत्त्वाचा वाटतो.

‘ ज्ञानपाद ’ हा शेवटचा, त्याच्या सुरुवातीस येणाऱ्या वारद-प्रतींतील कांहीं अधिक ओव्या पाहण्यासारख्या आहेत, त्या अशा :—

नंतर प्राण्यांमध्यें सर्वोत्तम जाण । तो शिवसिद्धांती असोन ।
शिवज्ञानानें कृतकृत्य होवोन । शिवसमानता रूप ॥ १ ॥
मुक्ति पावत असोन । शैव सर्व जाण ।
मुख्यत्वें करून । **शिवसिद्धांत** ज्ञानस्वरूप जाणावया ॥ २ ॥
आगमशास्त्र असोन । तें ज्ञानपादांत जाण ।
अबाधित विस्तरण । विचारसंग्रह केला ॥ ३ ॥

---

८२. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), पृ. ३२०.

शिवसिद्धांती हा प्राण्यांत सर्वोत्तम होय. कारण तो शिवज्ञानानें शिवसमानतारूप मुक्ति मिळवितो. सर्व शैवांनीं मुख्यत्वें करून शिवसिद्धांताचें ज्ञान होण्यास आगमशास्त्रांतील 'ज्ञानपादा'चा उपयोग करावा; असें या ओव्यांत म्हटलेलें आहे.

'ज्ञानपादां'त पति, पशु आणि पाश हे प्रतिपाद्य विषय आहेत. शिव म्हणजेच पति. सृष्टि, स्थिति, संहार, तिरोभाव आणि अनुग्रह हीं पतीचीं पांच कार्यें होत. या पांच कार्यांचें वर्णन करून मग पशु व त्यांचे भेद यांचें विवेचन केलेलें आहे. सकल, प्रलयाकल व विज्ञानकेवल हे तीन पशुभेद होत. मल, माया व कर्म हे पाशत्रय असलेला सकल पशु होय. प्रलयाकल पशूला मल व कर्म हे दोन पाश असतात. तर विज्ञानकेवल पशु मलपाशानें बद्ध असतो. सकल पशूंत पुन्हां पक्वत्रिपाश व अपक्वत्रिपाश असे दोन भेद आहेत. प्रलयाकलांत पक्वपाशद्वय व अपक्वपाशद्वय असे दोन प्रकारचे पशु असतात. या पशुभेदांत एकतन्हेचा शिवाद्वैताकडे जाण्याचा क्रम आहे. पशूंतील हे भेद म्हणजे मुक्तिसोपानाच्या पायऱ्या होत.

मलपाश, मायापाश, कर्मपाश, बिंदुपाश व तिरोधानपाश हे पांच पाश होत. मलामुळें माया, मायेमुळें कर्म, कर्मामुळें भोगप्राप्ति अशी कारणपरंपरा पाशांच्या चर्चेतून दाखविली गेली आहे. 'विशिष्ट अधिकारी'जनांना भोगसाधनकार्यें बिंदुपाशामुळें प्राप्त होतात. बिंदुपाशालाच महामाया, कुटिला, कुंडली, क्रियाशक्ति, परनाद, परबिंदु, परिग्रहशक्ति, परविद्या, शब्दतत्त्व, शब्दब्रह्म, शुद्धमाया, शिवतत्त्व, षडध्वबीज, शिवलिंगपीठ, योगपीठ, मंत्रपीठ, व्योम, विद्या, विद्याशक्ति, वागीश्वरी, अनाहता, अघोरवाक्, ब्रह्म हीं दुसरीं नांवें आहेत. बिंदुपाशाच्या विवेचनांत चतुर्विधवाक् व षडध्व यांचा विचार येतो. हे पाशबद्ध पशु पशुपतीच्या भक्तीमुळें शिवज्ञान होऊन शिवसारूप्य पावतात. तेच चरमशरीरी होत. असा हा 'शिवसिद्धांतार्थ' द्वितीय परिच्छेदांत सांगितला गेला आहे. ह्या परिच्छेदाचें नांव 'शिवागमवर्णन' असें दिलें गेलें आहे. तर वारद-प्रतींत तें 'शिवसिद्धांततत्त्वकथन' असें दिलेलें आहे.

'विवेकचिंतामणीं'त आलेलें हें तत्त्वज्ञान पाहिल्यावर त्याचें संमिश्र स्वरूप विचारास चालना देतें. 'क्रियापादा'चा जवळजवळ अर्धा भाग शुद्धशैवांसाठीं व उरलेला अर्धा वीरशैवांसाठीं दिलेला आहे. आदय्या (स. ११००) नांवाच्या वचनकारानें वीरशैव आणि शुद्धशैव यांच्यांतील भेद पुढीलप्रमाणें सांगितला आहे:—

मलमाया मलिनवनु । श्रीगुरु तन्न कृपावलोकनदिंदळिदु ।
निर्मलनाद शिष्यन उत्तमांगदल्लिह । परमचित्कळेयनु ।
हस्तमस्तकसंयोगद बेरेगिनिंद तगेदु । आ महापरमकळेयनु ।
स्थलदल्लि कूडि । महालिंगवेंदुनामकरणमं माडि ।

शिष्यनंगद मेले बिजयंगेयिसि । कर्णद्वारदल्लि प्राणंगे ।
आ महालिंगव जपिसुव । प्रणवपंचाक्षरियन्नु ।
प्रवेशमं माडि । अंगपीठदल्लि इरिसि ।
अभिन्नप्रकाशवाद पूजेय माड हेळिदनु ।
इदीग वीरशैवद लक्षणवेंदरिवुदु ॥
शुद्धशैवंगे गुरु तन्न निरीक्षणमात्रदल्लि ।
अवन शुद्धांगन माडि । आतन कर्णद्वारदल्लि
पंचाक्षरियनुपदेशवं माडि । स्थावरलिंगपूजकनागिरेंदु
लिंगवनु कोट्टु । भूपीठदल्लिरिसि अर्चने पूजनेयं
माडेंदु हेळिदनु । हेळलिक्कागि शुद्धशैवनु
पीठदल्लिरिसि । भिन्नभावियागि अर्चने पूजनेयं
माडुवनु । वीरशैवनु अंगदमेले धरिसि ।
अभिन्नभावदिंद अर्चने पूजनेयं माडुवनु ।
शुद्धशैवंगे नेनहु वीरशैवंगे संगवेंतेंदडे ।
अत्यंत मनोरमणनप्पंतह पुरुषन वल्लमेयल्लिह स्त्रीगे ।
नेनहिन सुखदिंद संगसुखवु अत्यधिक वप्पंते ।
शुद्धशैवद नेनहिंगू वीरशैवदल्लिय संगक्कू इष्टांतर ।
आ लिंगदल्लि शुद्धशैवन नेनहु निष्पत्तियादडे साम्यरूपनहनु ।
आ लिंगदल्लि वीरशैवंगे संगवेंतेंदडे ।
अत्यंत नेनहु निष्पत्तियादडे सायुज्यनहनु ।
अदु कारण । स्थावरलिंगदध्यानक्कू प्राणलिंगदसंगक्कू इष्टांतर ।
स्थावरलिंगद ध्यानदिंद सारूप्यपदवनेय्दिद तेरनेंतेंदडे ।
कीटनु भ्रमरध्यानदिंद आ भ्रमररूपादंते ।
शैवनु शिवध्यानदिंद शिवन सारूप्यपदवनैदि इदिरिट्टु ।
भिन्नपददल्लिरुत्तिहनु । मत्तं वीरशैवनु जंगमार्चनेयं माडि ।
प्राणलिंगसंबंधदिं सायुज्यपदवनेय्दिद तेरनेंतेंदडे । अग्नियं संगव माडिद
कर्पूरनास्तियाद हागे । ई तनु शिवलिंगदल्लि सायुज्यपदवनेय्दि ।
रूपुनास्तियागि शिवने तानहनु । इदु कारण ।
शुद्धशैव वीरशैवद अंतर महांतर । ई प्रकार काणा सौराष्ट्र सोमेश्वर ॥ [८३]

वरील वचनांमध्यें दाखविलेला भेद थोडक्यांत असा:—वीरशैवाला गुरु कृपावलोकनानें शुद्ध करून, त्याच्या मस्तकावर हात ठेवून त्याला अंगावर धारण करण्यास लिंग देतात; कर्णद्वारांत प्रणवपंचाक्षरीचा उपदेश करतात व लिंग अंगपीठावर ठेवून अभिन्नभावानें पूजा करण्यास सांगतात.

---

८३. सोमनाथचरित्र, प्रस्तावना, पृ. xLii-xLiv.

शुद्धशैवाला, गुरु केवळ निरीक्षणानें शुद्धांग करून, त्याच्या कानांत पंचाक्षरीचा उपदेश करून लिंग देतात व स्थावरलिंगपूजक होण्यास व लिंग भूपीठावर ठेवून अर्चन-पूजन करण्यास सांगतात. म्हणून शुद्धशैव (भू)पीठावर भिन्नभावानें (आपण व लिंग भिन्न आहोंत या भावनेनें) अर्चन-पूजन करतो. वीरशैव अंगावर धारण करून अभिन्नभावानें अर्चन-पूजन करतो. शुद्धशैव (लिंगाचें) ध्यान करतो. वीरशैवाला सति-पतीप्रमाणें (लिंग)संग(संबंध) घडतो. ध्यान-सुखाहून संग(संबंध)सुख श्रेष्ठ होय. शुद्धशैवाचें ध्यान व वीरशैवाचा संग यांत एवढें अंतर आहे.

त्या लिंगाच्या ध्यानानें शुद्धशैवाला साम्यरूपाची प्राप्ति होते. लिंग-संगानें वीरशैवाला सायुज्य मिळतें. स्थावरलिंगाचें ध्यान व प्राणलिंगाचा संग यांत एवढें अंतर आहे. स्थावरलिंगाच्या ध्यानानें सारुप्यपद मिळतें. ज्याप्रमाणें कीटाला भ्रमराच्या ध्यानानें भ्रमररूप प्राप्त होतें, त्याप्रमाणें शुद्धशैवाला शिवध्यानानें शिवसारुप्य लाभतें. तो भिन्नपदींच राहतो.

आणि वीरशैव जंगमार्चन करून, प्राणलिंगसंबंधामुळें सायुज्यपद मिळवितो. अग्नीच्या संयोगानें कापूर अग्नींत मिसळून जातो, त्याप्रमाणें हें शरीर शिवलिंगाशीं सायुज्य पावतें. रूप नाहींसें होऊन, तो स्वतःच शिव बनतो. हें शुद्धशैव व वीरशैव यांतील अंतर होय.

डॉ. स. कृ. फडक्यांनीं तिरुमूलर हा शैवपंथाचे शुद्धशैव, अशुद्धशैव, मार्गशैव व कदमशुद्धशैव असे चार वर्ग मानतो असें म्हणून "शुद्धशैव हे वेदान्ती जाणावे. ते पति, पाश, पशु, शुद्ध माया आणि अशुद्ध माया हे भेद मानतात;" असें म्हटलें आहे.[८४]

'वातुलागमां'त शुद्धशैवाचा उल्लेख आहे. मंत्र, यंत्र इ. प्रयोगामुळें व प्रायश्चित्त विधानामुळें शुद्धशैव हा जगांत शुद्ध होतो. आपलें इष्टलिंग हरवलें तर दुसरें लिंग घेऊन अघोरमंत्राचा एक लक्ष जप करावा व पीठिकेवर त्याची स्थापना करून शुद्धि करावी. लिंगलेपादि प्रसंगीं अघोरमंत्राचा जप करणारा शुद्धशैव होय. व्रतभंग झाल्यास त्या मनुष्यानें एकशेआठ गायत्रीचा जप करावा म्हणजे तो शुद्ध होतो.[८५]

'वीरशैवसदाचारसंग्रहांत' शुद्धशैवाचें लक्षण दिलेलें आहे. महादेव हा एकच देव असून बाकीचे देव हे त्याचे भक्त असल्यानें लिंगपूजेच्या वेळीं

---

८४. शिवलिंगोपासना, पृ. ३४.

८५. अनादिवीरशैवसारसंग्रह, भाग १ ला, प्रकरण १, श्लोक २६८-२७१, पृ. ३७-३८.

त्यांची मुख्यत्वानें पूजा न करतां शुद्धशैवानें आवरणत्वानें पूजा करावी किंवा गुरूनें दिलेल्या लिंगाची हस्तपीठावर पूजा करावी. लिंग हरवलें तर अघोरमंत्राचा जप व दुसऱ्या लिंगाचें धारण करून पुन्हां पूजा करावी. व्रतलोप झाल्यास मूलपंचाक्षरीचा जप करावा. हें शुद्धशैवाचें लक्षण होय.[८६]

शुद्धशैवांचीं इतरांनीं दिलेलीं लक्षणें व निजगुणांनीं दिलेलीं लक्षणें यांत थोडाफार फरक आहे. परंतु आदय्यानें दाखविलेला शुद्धशैव व वीरशैव यांतील भेद लक्षांत घेण्यासारखा आहे. शुद्धशैवास सांगितलेल्या व्रतभंगाच्या प्रायश्चित्तांत गायत्रीचा समावेश केला असला तरी हा गायत्रीमंत्र निराळा असण्याची शक्यता आहे. कारण 'वीरशैवसदाचारसंग्रहां'त सामान्य वीरशैवांचें लक्षण सांगतांना, लिंग हरवल्यास अघोरमंत्राचा लक्ष जप करून त्यांनीं पुन्हां दुसरें लिंग धारण करावें व शैवगायत्रीचा एकशेआठ वेळां जप करावा; असें सांगितलें आहे.[८७] 'शैवगायत्री'मंत्र म्हणजे कोणता मंत्र याचा उलगडा येथें झाला नाहीं तरी हा उल्लेख महत्त्वाचा वाटतो.

यानंतर निजगुणांनीं द्वितीय परिच्छेदांत जो 'शिवसिद्धांत' शब्द वापरला आहे, त्याचा अर्थ समजून घेतला पाहिजे. "वातुलागमाचे पूर्वभाग व उत्तरभाग असे दोन भाग आहेत. त्यापैकीं उत्तरभागामध्यें तंत्रोत्तरप्रदीप या नांवाचें शिवसिद्धांतशास्त्र आहे. त्या तंत्रामध्यें महादेवानें पार्वतीला षट्स्थलाचा निर्णय सांगितला आहे. श्रुति, स्मृति, इतिहास, शिवागम वगैरे शास्त्रांनीं सांगितलेलें; शिवाद्वैतरहस्य ज्यांत सांगितलेलें आहे असें; पारमार्थिक शिवागम ह्यांनीं प्रतिपादिलेलें; सर्व उपनिषदें व उत्तरार्ध पुराणें ह्यांत सांगितलेलें; गीतासार व सर्व प्राचीन धर्ममतें यांनीं प्रतिपादन केलेलें असें षट्स्थलात्मक शिवसिद्धांतशास्त्र मी सांगतों;"[८८] असें मायिदेवांनीं 'अनुभवसूत्रां'त म्हटलें आहे. 'शिवसिद्धांत' हा 'षट्स्थलात्मक' आहे; असा मायिदेवांचा अभिप्राय आहे. 'अनादिवीरशैवसारसंग्रहां'त "आतां यापुढें षट्स्थलब्रह्म नांवाच्या उपदेशाचा प्रकार सांगतों. तो बहुतेक शिवसिद्धांततंत्रांतीलच आहे";[८९] असें प्रारंभींच म्हटलें आहे. त्यालाच 'शिवज्ञान महातंत्र' असेंहि नांव दिलें असून वातुलागमांत हें तंत्र फार गुप्त ठेवावें, हें फारच महत्त्वाचें आणि दुर्मिळ आहे; त्यांत सर्व शास्त्रांचा संग्रह आहे; असें म्हटल्याचें पुढें सांगितलें आहे.[९०] यावरून 'शिवसिद्धांत' हा शब्द षट्स्थलसिद्धांतवाचक आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

८६. वीरशैवसदाचारसंग्रह, प्रकरण ७, श्लोक ४१-४६, पृ. ४०.
८७. वीरशैवसदाचारसंग्रह, प्रकरण ८, श्लोक ४०-४१, पृ. ५१-५२.
८८. अनुभवसूत्र, अधिकरण १, श्लोक २६-३१, पृ. ४-५.
८९. अनादिवीरशैवसारसंग्रह, भाग १ ला, प्रकरण १, श्लो. ३१, पृ. ६.
९०. अनादिवीरशैवसारसंग्रह, भाग १ ला, प्रकरण १, श्लो. ३८-३९, पृ. ७.

परंतु निजगुण मात्र 'शिवसिद्धान्त' हा शब्द व्यापक अर्थानें वापरतात. पुष्कळ वेळां त्यांनीं 'शैवसिद्धांत' असाहि शब्दप्रयोग केला आहे. 'पंचलिंगार्चन हें शैवसिद्धांतसंमत आहे' असें जेव्हां ते म्हणतात तेव्हां 'शैवसिद्धांत' नांवाच्या विशिष्ट शैव-पंथाचें स्मरण होतें. 'शैवसिद्धांता'प्रमाणेंच चार पादांत निजगुणांनीं विषयाची वांटणी केली आहे. दोन्हीहि ठिकाणीं कांहीं विषय ( पति, पशु, पाश ) सारखेच आहेत. निजगुण 'शिवसारुप्यसिद्धांत' मांडतात, 'शिवसमानतारूप-मुक्ति' सांगतात. आद्यानें म्हटल्याप्रमाणें शुद्धशैवांचें हें साध्य आहे. तसेंच शैवसिद्धांतांतहि सारूप्य हाच मोक्ष मानला जातो.[९१]

तरीहि 'शिवसिद्धांत' हा शब्द 'शैवसिद्धांत' नांवाच्या विशिष्ट पंथासाठीं ते वापरत आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. 'शिवसिद्धांत' हा शब्द अनेक अर्थांनीं ते वापरत असावेत असें वाटतें. आगमशास्त्रांत किंवा शैवागमांत असलेल्या सर्व शैवमतांसाठीं हा शब्द ते वापरतात. म्हणूनच शिवसिद्धांत सांगतांना अनेक प्रकारच्या शैवांचीं लक्षणें व आचार यांचें वर्णन केलें आहे. 'शिवसिद्धांत' हें वैदिकतांत्रिकांच्या ग्रंथाचें नांव म्हणूनहि एके ठिकाणीं दिलें आहे. वैदिकतांत्रिकांच्या मताच्या अर्थानेंहि हा शब्द उपयोजिला गेला असणें शक्य आहे. आगमशास्त्रांतील 'ज्ञानपादांत' येणारा विषय तो 'शिवसिद्धांत' असेंहि ते म्हणतात. 'सिद्धांतमतविवेक' *सांगतांना हाच अर्थ त्यांच्या मनांत दिसतो. निजगुण म्हणतात, "या सिद्धांतमताला सगुणब्रह्मवाद संमत आहे. त्यांत जीवेश्वर भेद नाहीं. मुक्तींत निरंजन साम्य मात्र आहे. परंतु सायुज्यकैवल्य हें पृथक् अप्रसिद्ध असलें तरी अद्वैतमतवाद्याला अभिमत असलेल्या तुरीयातीत जीवन्मुक्तीप्रमाणें सिद्धांतमतमुक्तींत भेद दिसत नसल्यामुळें तें सायुज्यकैवल्य औपचारिक आहे. पतिपदार्थ अशा शिवाला व पशुपदार्थ अशा विष्णुब्रह्मादि जीवकोटीला पाश, गुण, शक्ति यांच्या तारतम्यभावानें तरतमभाव आहे. पतीला व पाशमुक्त पशूला क्रमशः स्वाधीनपाशकत्व व शांत, विलीन, दग्ध असें पाशकत्व हीं मुक्तींतदेखील भेदसाधकत्वानें आहेत. तथापि पतीशीं स्वरूपवश झालेले पशु मुक्तींत वीतशोक होऊनहि त्यांनीं पतिसेवा करणें हा त्यांचा स्वभावच आहे. म्हणून भेदांमुळें कांहीं हानि नाहीं."[९२]

---

९१. भोजदेव आपल्या 'तत्त्वप्रकाशिका' ग्रंथांत 'मोक्षः शिवसमानतारूपः' असें म्हणतो.

* येथें 'शुद्धशैवसिद्धांत' असा अर्थ घेणें योग्य ठरेल. शैवागमांतील पूर्व-विशेष विभागांसंबंधीं "devoted to the school of Shaivas, called Shuddha Shaivas; असें प्रा. साखरे म्हणतात. (Introduction to Lingadharana Chandrika, p. 677.

९२. विवेकचिंतामणि (पूर्वभाग), पृ. ३२६, ओव्या ६-१२.

निजगुण ' शिवसिद्धांत ' हा शब्द किती अर्थांनीं वापरतात हें आपण पाहिलें. यानंतर ' चर्यापादां 'तील वर्णाश्रमधर्म, यज्ञ, संध्या, गायत्री यांसारख्या आज सर्ववीरशैवसंमत नसलेल्या गोष्टींबाबत थोडासा विचार करावयास हवा. प्रथम हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, या गोष्टी आगमांतील ' चर्यापादां 'त असल्यामुळें व निजगुणांना ' शिवागमवर्णन ' करावयाचें असल्यानें ' विवेकचिंतामणीं 'त त्या येणें अपरिहार्य होतें. त्या त्यांनीं सांगितल्यावरून या गोष्टींना त्यांची मान्यता आहे असें म्हणतां येणार नाहीं. ' चर्यापादा 'वर ब्राह्मण्याची ( Brahmanism ) कांहींशी छाया पडलेली दिसते; इतकेंच म्हणतां येईल. परंतु येथील वर्णाश्रमधर्म हा ' शैव ' किंवा ' शैवधर्मरूप ' आहे असें जें म्हटलें गेलें आहे, तें महत्त्वाचें आहे.[९३] गायत्रीला ' शैवसिद्धांतां 'त उपमंत्राचें स्थान मिळालेलें आहे. वीरशैव पंचाक्षरी ( किंवा षडक्षरी ) मंत्रच मानतात. " It is the only mantra to Shaivas, though some schools, such as the Shaivasiddhanta, accept the Gayatri as a subordinate mantra ";[९४] असें डॉ. नंदीमठ म्हणतात. ' विवेकचिंतामणीं 'तहि ' गायत्री ' आणि ' पंचाक्षरी ' हे दोन्ही मंत्र सांगितले आहेत. ' गायत्री निजस्वरूप ' वर्णन करतांना आलेल्या ओव्या —

> सृष्टिस्थितिलयप्रज्ञारूपजाण । वरदाभयांकुशकपाल असोन ॥
> आणिक गदाशंखचक्रारविंदयुगलजाण । दिव्यायुधांनीं प्रकाश तो ॥ ५ ॥
> मुक्ताविद्रुमहेम जाण । नीलधवल कांतीपरि कांति असोन ।
> प्रज्ञानचंद्रकलालंकृत असोन । शांति किरीट मंडित ॥ ६ ॥

गायत्रीचें ध्यान सांगणाऱ्या पुढील संस्कृत श्लोकाचें स्मरण करून देतात :—

> मुक्ता विद्रुमहेमनीलधवलच्छायैर्मुखैस्त्रीक्षणै — ।
> — र्युक्तामिंदुकलानिबद्धमुकुटां तत्वार्थवर्णात्मिकां ॥
> गायत्रीं वरदाभयांकुशकशां शुभ्रं कपालं गुणं ।
> शंखं चक्रमथारविंदयुगुलं हस्तैर्वहंतीं भजेत् ॥ [९५]

' चर्यापादां 'तील गायत्री म्हणजे ' शैवगायत्री ' असें मला वाटतें. ' गायत्रीजप-विधानां 'तील ' परशिव आपणांसी । अर्थेशीं होय विशेषी । ' ( ओ. ९९४ ) हा निर्देश त्या दृष्टीनें महत्त्वाचा वाटतो.

---

९३. वर्णाश्रमादिधर्माणां व्यवस्था हि द्विधा मता ।
एका शिवेन निर्दिष्टा ब्रह्मणा कथिता परा ॥
असें ' सिद्धांतशिखामणीं 'त सांगितलें आहे.

९४. A Hand-book of Veerashaivism, p. 63.

९५. श्रीगुरुचरित्र, अध्याय ३६, श्लोक ५१.

'द्वितीय परिच्छेदां'तील तत्त्वज्ञानाचें स्वरूप हें असें आहे. "He had before him the traditional Veerashaivism and not the reformed religion of Basaveshwara";[९६] असें निजगुणांसंबंधीं प्रा. माळवाडांनीं म्हटलें आहे. हें विधान किती अन्वर्थक आहे याची कल्पना वरील चर्चेवरून येण्यासारखी आहे.

## ६. 'षट्स्थलसिद्धांत' : थोडेंसें स्पष्टीकरण

वीरशैव तत्त्वज्ञानाला 'षट्स्थलसिद्धांत' असें नांव दिलें जातें. कारण षट्स्थल, अष्टावरण आणि पंचाचार हे वीरशैव तत्त्वज्ञानाचे इतर शैवपंथांहून वेगळेपणा दाखविणारे विशेष आहेत. 'षट्स्थलसिद्धांत' समजून घेतांना कांहीं पारिभाषिक शब्दांचें स्पष्टीकरण करणें आवश्यक आहे.

'वीरशैव' या शब्दाचें निर्वचन अनेक प्रकारें केलेलें आढळतें. 'सिद्धांतशिखामणीं'त "'वी' या शब्दानें शिवजीवैक्यबोधन करणारी विद्या असा अर्थ होतो. अशा विद्येमध्यें जे शैव रत होतात, त्यांना वीरशैव म्हणावें";[९७] असें सांगितलें आहे. तर मायिदेवांनीं "'वी' शब्दाचा अर्थ विकल्प असा असून 'र' शब्दाचा अर्थ रहित असा आहे. एकूण विकल्प ज्यामध्यें नाहीं, त्याला वीरशैव म्हणावें";[९८] असें म्हटलें आहे.

'स्थल' हा विशिष्ट अर्थानें वापरला गेलेला शब्द आहे. सर्व विश्व जेथें स्थिर होतें व लय पावतें त्या ब्रह्मास 'स्थल' अशी संज्ञा आहे.[९९] स्थलाचे मुख्य भेद दोन — लिंगस्थल व अंगस्थल. लिंगस्थल म्हणजे शिव व अंगस्थल म्हणजे जीव. लिंग व अंग यांचें ऐक्य म्हणजे लिंगांगसामरस्य होय. षट्स्थल-सिद्धांतांत लिंगांगसामरस्य हेंच परमध्येय मानलें गेलें आहे. प्रारंभींच्या अवस्थांत लिंग व अंग यांच्यांत भेद किंवा द्वैत असलें तरी अंतिम अवस्थेंत अभेद किंवा अद्वैत असल्यानें या तत्त्वज्ञानास भेदाभेदात्मक किंवा शिवाद्वैतात्मक म्हटलें जातें. शिव हा शक्तिविशिष्ट असल्यानें हें तत्त्वज्ञान 'शक्तिविशिष्टाद्वैत' या नांवानेंहि ओळखलें जातें.

---

९६. Studies in Education and Culture, p. 370.

९७. विशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्य बोधिका ।
तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः ॥ सिद्धांतशिखामणि, ५-१५.

९८. विशब्दोऽत्र विकल्पार्थो रशब्दो रहितार्थकः ।
विकल्परहितं शैवं वीरशैवमिति स्मृतम् ॥– विशेषार्थप्रकाशिका, २-३०.

९९. स्थीयते लीयते यत्र जगदेतच्चराचरम् ।
तद् ब्रह्म स्थलमित्युक्तं स्थलतत्त्वविशारदैः ॥

'लिंग' शब्दांतील निश्चित कल्पना कोणती हा अनेकांनीं चर्चिलेला प्रश्न आहे. लिंग म्हणजे पुरुषाचें जननेंद्रिय ( Phallus ) असें कांहीं विद्वानांचें मत असलें व या शब्दाचा उगम ऋग्वेदांतील 'शिश्न' किंवा 'शिश्नदेव' या शब्दांत शोधण्याचा प्रयत्न झाला असला तरी हा अर्थ मान्य करण्यासारखा नाहीं.

लिंगाची कल्पना बौद्धांच्या स्तूपावरून सुचली असावी असा कांहींचा तर्क आहे. परंतु बौद्धधर्मापूर्वींच्या काळांत लिंगाची कल्पना अस्तित्वांत होती हें आतां सिद्ध झालें असल्यानें हें मतहि स्वीकारतां येत नाहीं. या दोन्ही मतांची विस्तृत चर्चा डॉ. नंदीमठ [१००] व श्री कुमारस्वामी[१०१] यांनीं केलेली आहे.

वीरशैव तत्त्वज्ञानांत लिंग हें ज्योतिःस्वरूप किंवा प्रकाशस्वरूप मानलें आहे. पुराणांतील 'ज्योतिर्लिंगा'ला तें जवळचें आहे.

परं गूढं शरीरस्थं लिंगक्षेत्रमनादिवत् ।
यदाद्यमैश्वरं तेजस्तल्लिंगं पंचसंज्ञिकम् ॥

असें लिंगाचें वर्णन आढळतें.[१०२]

लीयते गम्यते यत्र येन सर्वं चराचरम् ।
तदेव लिंगमित्युक्तं लिंगतत्त्वपरायणैः ॥

असें लिंग शब्दाचें निर्वचन केलेलें आढळतें. लिंग म्हणजे शिवाहून भिन्न कांहीं तरी किंवा शिवाची प्रतिमा असें वीरशैव मानत नाहींत. लिंग म्हणजेच शिव.

वीरशैव तत्त्वज्ञानाची ही परिभाषा समजून घेतल्यानंतर षट्स्थलांचा अर्थ कळणें कठीण जाणार नाहीं. अंगाचें लिंगाशीं ऐक्य होण्याची क्रिया ही सावकाश व पायरीपायरीनें होत असते. लिंगांगसामरस्याच्या वाटेवरील स्थलें म्हणजे मुक्कामाचे टप्पे होत. या वाटचालीला डॉ. नंदीमठांनीं The pilgrim's progress हें मोठें अन्वर्थक नांव दिलें आहे. भक्तस्थलापासून ऐक्यस्थलापर्यंत होणारा अंगाचा हा प्रवास षट्स्थलसिद्धांतांत अद्भुतरीत्या स्पष्ट केलेला आहे. प्रत्येक स्थलामध्यें भक्तांत जो बदल होत जातो त्या बदलाची अचूक व आश्चर्यकारक नोंद षट्स्थलांत आढळते. भक्ताच्या आत्म्यांतील कंपनांची ( Vibrations of soul ) इतकी अचूक व विस्तृत नोंद दुसऱ्या कोणत्या तत्त्वज्ञानांत घेतली गेली असेल असें वाटत नाहीं.[१०३] पुन्हां हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, षट्स्थलसिद्धांत केवळ

---

१००. A Hand-book of Veerashaivism, p. 112–113.

१०१. Mirror of Veerashaivism, p. 34–39.

१०२. वेदांतसारवीरशैवचिंतामणि, पृ. ९१.

१०३. जैन व बौद्ध धर्मांत षट्स्थलांप्रमाणेंच स्थानांची व अवस्थांची कल्पना आली आहे. त्यांची चर्चा डॉ. नंदीमठांनीं केलेलीच आहे. षट्स्थलांची कल्पना त्या धर्मांनीं सुचविली असें एकवेळ मानलें तरी वीरशैवांइतका तपशील जैन-बौद्धांनीं दिलेला दिसत नाहीं.

तत्त्वज्ञानाच्या स्वरूपाचा (Philosophy) नाहीं; तर तो एक आचारधर्म (Practice) आहे. तो निव्वळ बुद्धीवर अधिष्ठित नाहीं; तर अनुभवाधिष्ठित आहे. Philosophy हून त्याचें Mysticism शीं अधिक जवळचें नातें आहे. किंबहुना तत्त्वज्ञान आणि अनुभव यांचा तो सुरेख संगम आहे. कोणत्याहि देशांतील, काळांतील व धर्मांतील मुमुक्षूला हा सिद्धांत मुक्तिसोपान वाटावा अशी त्याची थोरवी आहे. वीरशैव तत्त्वज्ञान कोणत्या अत्युच्च पातळीवर वावरत आहे याची कांहींशी कल्पना षट्स्थलांवरून येण्यासारखी आहे. म्हणूनच हा भाग अधिक स्पष्ट केला पाहिजे.

स्थल हें लिंग व अंग असें द्विविध होतें. तसेंच शक्ति ही कला व भक्ति अशी द्विविध होते. कलाशक्ति लिंगाचा व भक्तिशक्ति अंगाचा आश्रय घेते. कला जीवाला बंधनांत टाकते, तर भक्ति त्याला बंधमुक्त करते. कला ही मायेसारखी असली तरी, मायेप्रमाणें असत्य (Unreal) मानली जात नाहीं.

नंतर (१) भावलिंग, (२) प्राणलिंग, (३) इष्टलिंग असे लिंगस्थलाचे तीन प्रकार होतात. त्यांपैकीं प्रत्येकाचे पुढीलप्रमाणें २–२ भेद होतात: (१) महालिंग, प्रसादलिंग, (२) चरलिंग, शिवलिंग, (३) गुरुलिंग, आचारलिंग. कलाशक्तींतून सहा शक्ति निर्माण होऊन वरील सहा लिंगांशीं त्यांचा पुढील अनुक्रमानें संबंध जोडला जातो:– (१) चिच्छक्ति, (२) पराशक्ति, (३) आदिशक्ति, (४) इच्छाशक्ति, (५) ज्ञानशक्ति, (६) क्रियाशक्ति.

अंगस्थलाचे (१) त्यागांग, (२) भोगांग, व (३) योगांग असे तीन प्रकार होऊन त्यांचे पुन्हां पुढीलप्रमाणें प्रत्येकीं २–२ भेद होतात:—(१) भक्त, महेश, (२) प्रसादी, प्राणलिंगी, (३) शरण, ऐक्य. हींच सहा स्थलें होत. त्यांच्याशीं भक्तिशक्तींतून उद्भवलेल्या सहा शक्तींचा पुढील अनुक्रमानें संबंध येतो:— (१) सद्भक्ति, (२) नैष्ठिकीशक्ति, (३) अवधानशक्ति, (४) अनुभवशक्ति, (५) आनंदशक्ति, (६) समरसशक्ति. आतां १०१ स्थलांचा तपशील पाहावयाचा.

**भक्तस्थल**[१०४]: ज्याची शिवावर भक्ति बसली आहे तो भक्त होय.

१. पिंडस्थल: क्षीणपाप शुद्धात्मा म्हणजे पिंड होय. शिवकारुण्यानें त्याच्यामध्यें भक्ति निर्माण होते.
२. पिंडज्ञानस्थल: शरीराहून आत्मा निराळा आहे व आत्म्याहून ईश्वर वेगळा आहे असें जाणणारा पिंडज्ञानी होय.

---

१०४. भक्तस्थलाचीं २४ उपस्थलें असून पहिलीं १५ अंगस्थलें व नंतरचीं ९ लिंगस्थलें आहेत.

३. संसारहेयस्थल: संसाराचें दुःखोत्पादकत्व त्याच्या ध्यानांत येतें व त्याबद्दल अप्रीति वाटूं लागते. दुःखत्रयामुळें त्याला संसारबंधन तोडावें असें वाटूं लागतें.

४. गुरुकारुण्यस्थल: ऐहिकांतून सुटका होण्याची इच्छा निर्माण होते व तो गुरूचा शोध करूं लागतो, दीक्षा देणाऱ्या गुरूचें कारुण्य त्याला लाभतें.

५. लिंगधारणस्थल: वेध, मंत्र आणि क्रिया यांची तनुत्रयाला दीक्षा देऊन गुरु त्याला भाव, प्राण व इष्ट हीं लिंगें धारण करण्यास देतो.

६. भस्मधारणस्थल
७. रुद्राक्षधारणस्थल
८. पंचाक्षरजपस्थल
} लिंगधारणेनंतर विभूतिलेपन, रुद्राक्षधारण व मंत्रोच्चारण या क्रिया तो करतो.

९. भक्तमार्गक्रियास्थल: त्याला दृढभक्ति प्राप्त होते.

१०. उभयस्थल: गुरु आणि शिव यांच्याबद्दल सारखीच भक्ति दाखविली जाते. गुरु म्हणजे मूर्तिमंत शिव होय. या दोघांत जीव फरक करीत नाहीं.

११. त्रिविधसंपत्तिस्थल: शिव आणि गुरु यांच्याप्रमाणें लिंग ( जंगम व अजंगम ) हेंहि पूजाविषयक बनतें.

१२. प्रसादस्वीकारस्थल: शिवाप्रमाणेंच्र गुरु-जंगमांच्या पादोदकाला व प्रसादाला तो तितकाच आदर दाखवितो.

१३. सोपाधिदानस्थल: पुण्य मिळविण्यासाठीं तो यथाशक्ति दान करतो.

१४. निरुपाधिदानस्थल: पुण्यप्राप्तीचें वैय्यर्थ्य ध्यानांत आलें तरी तो दान देत राहातो.

१५. सहजदानस्थल: नंतर आपण कांहीं सेवा करतो आहोंत याची जाणीव न ठेवतां तो शक्य त्या मार्गानें सत्कृत्यें करतो. म्हणजेच ‘ निष्काम कर्मयोग ’ आचरितो.

१६. दीक्षागुरुस्थल: मुमुक्षू जीवाला गुरु दीक्षा देतो.

१७. शिक्षागुरुस्थल: दीक्षेनंतर गुरु त्याची ज्ञानग्रहणाची तयारी करून घेतो व त्याला पतिज्ञान देतो.

१८. ज्ञानगुरुस्थल: गुरूमुळें त्याला संयोगज्ञानप्राप्ति होते. गुरूच्या बोधदीपानें सर्व तम नाहींसा होतो.

१९. क्रियालिंगस्थल: इष्टलिंगावरच्च परब्रह्माप्रमाणें तो श्रद्धा ठेवतो. दुसऱ्या रूपाचा विचार करीत नाहीं.

२०. भावलिंगस्थल: इष्टलिंगाची पूजा करीत असतांनाच तो अंतरंगाचा शोध घेतो व त्याला भावलिंग सांपडतें. इष्टलिंगाच्या पूजेमुळें त्याची बाह्यशुद्धि होते तर भावलिंगाच्या पूजेमुळें अंतःशुद्धि होते.

२१. ज्ञानलिंगस्थलः या अंतर्बाह्य शुद्धीमुळें त्याला परात्पर ज्ञानाची प्राप्ति होण्यापूर्वीचा परमानंद लाभतो.

२२. स्वस्थलः त्यामुळें त्याची अहंकार व पंचक्लेश यांच्यापासून मुक्तता होते. तो यदृच्छालाभसंतुष्ट बनतो व प्राप्त आनंदांत मग्न राहतो.

२३. चरस्थलः शांत, दांत व समबुद्धि होऊन तो सर्वत्र संचार करूं लागतो.

२४. परस्थलः जगाला तृणवत् मानून तो अनासक्तपणें जगांत इच्छे-प्रमाणें हिंडूं लागतो.

## माहेश्वरस्थल[१०५]:

२५. माहेश्वरप्रशंसास्थलः शिवसर्वोत्तमत्वावर व शिवच मुक्तिदाता, आहे यावर जीव विश्वास ठेवतो व नीतिनियमांचें कांटेकोर पालन करतो. अहंकार व षड्रिपु यांवर त्यानें विजय मिळविलेला असतो. आणि तो ' सर्वप्राणिहितेरतः ' बनलेला असतो. पण तो शिवाची वा शिवभक्तांची निंदा सहन करूं शकत नाहीं.

२६. लिंगनिष्ठास्थलः इष्टलिंग म्हणजे शिवच आहे याची खात्री होऊन प्राणापलीकडे तो त्याला जपतो.

२७. पूर्वाश्रयनिरसनस्थलः शिवसंस्कारामुळें तो जातिभेदांच्या पलीकडे जातो.

२८. सर्वाद्वैतनिरसनस्थलः शिव-जीवांतील स्वामी-भृत्यभावावर तो विश्वास ठेवतो.

२९. आव्हाननिरसनस्थलः हिंदुधर्मांतील आवाहन-विसर्जनाच्या मंत्रावर तो श्रद्धा ठेवीत नाहीं. इष्टलिंग हें नेहमींच जवळ असल्यानें देवाचें आवाहन व विसर्जन यांवर तो विश्वास ठेवीत नाहीं.

३०. अष्टमूर्तिनिरसनस्थलः पृथ्वी, आप, इ० वस्तूंवर शिवाचें असणारें कुलालवत् स्वामित्व तो मानतो. कुलाल म्हणजे कलश नव्हे. तसेंच पृथ्व्यादि अष्टमूर्तींहून शिव वेगळा आहे असें तो मानतो.

३१. सर्वगत्वनिरसनस्थलः देव सर्वगत आहे असें श्रुतीप्रमाणें मानल्यानें सर्व वस्तूंची पूजा करावी लागेल, फक्त लिंगाचीच करून चालणार नाहीं. लिंगच शिव आहे असें समजून तो फक्त इष्टलिंगाची पूजा करतो.

---

१०५. माहेश्वरस्थलाचीं १८ उपस्थलें असून पहिलीं ९ अंगस्थलें व नंतरचीं ९ लिंगस्थलें होत.

३२. शिवजगन्मयस्थल: लिंगांतच शिवाला पाहून तो त्याची पूजा करीत असला तरी फेन किंवा बुडबुडे हें जसें पाण्याचेंच स्वरूप, तसें जग हेंहि शिवाचेंच स्वरूप हें ज्ञान त्याला होतें.

३३. भक्तदेहिकलिंगस्थल: तरी शिव भक्तांच्या हृदयांतच मुख्यतः वास करतो अशी त्याची खात्री पटते.

३४. क्रियागमस्थल: शिव हा सर्वांतर्यामी आहे, पण क्रियेशिवाय त्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं. अरणींतील अग्नि घर्षणाशिवाय प्रकट होत नाहीं. म्हणून शैवागमांत सांगितलेली क्रिया—शिवपूजा—केली पाहिजे.

३५. भावागमस्थल: बाह्यपूजेप्रमाणेंच अंतरंगशिवार्चनहि आवश्यक आहे. ध्यान हें भावकारण होय. भावाशिवाय क्रिया व्यर्थ होय. म्हणून भावयुक्त मनानें पूजा केली पाहिजे.

३६. ज्ञानागमस्थल: भावकर्मयुक्त ज्ञान हेंच मुक्ति. सर्व जग शिवात्मक आहे व मी शिव आहे हेंच उत्तम ज्ञान होय. दिव्याशिवाय घरांतील अंधार नाहींसा होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाशिवाय चित्तांतील मोह जात नाहीं.

३७. सकायस्थल: देवाच्या सेवेसाठीं व ज्ञानप्राप्तीसाठीं देह हा उपयुक्त आहे. याची शिवयोग्याला जाणीव असली पाहिजे. काष्ठाशिवाय अग्नि प्रज्वलित होत नाहीं, तसेंच देहाशिवाय आत्मतत्त्व प्रकाशित होत नाहीं.

३८. अकायस्थल: नंतर परलिंगामुळें मिळणाऱ्या आनंदांत शिवयोग्याचें देहभान हरपतें.

३९. परकायस्थल: नंतर त्याला आपला सर्व देह परब्रह्मव्याप्त आहे हें कळतें.

४०. धर्माचारस्थल: अहिंसा, सत्य इ. च्या आचरणामुळें त्याचें जीवन उदात्त बनतें व उपकारापुरतें ठरतें. तो धर्मसंग्रह करूं लागतो.

४१. भावाचारस्थल: सर्व कर्में तो शिवभावानें करतो. त्यांपासून मिळणारीं फलें तो शिवार्पण करतो.

४२. ज्ञानाचारस्थल: तो कर्में करीत असला तरी शिवज्ञानांत तो मग्न असतो. ज्ञानहीनांना कर्में बद्ध करतात. पण शिवाद्वैतपर ज्ञानानें कर्में दग्ध होतात.

प्रसादीस्थल[१०६] :

४३. प्रसादीस्थल: मनःप्रसादासाठीं व मनोनैर्मल्यासाठीं शिवप्रसाद स्वीकारणारा तो प्रसादी होय. पत्र, पुष्प, फल, तोय कांहींहि शिवाला दिलें व तें परत प्रसाद म्हणून स्वीकारलें कीं पापक्षय होतो.

४४. गुरुमाहात्म्यस्थल: लिंगतत्पर ज्याप्रमाणें शिवप्रसादाचा स्वीकार करतात त्याप्रमाणें गुरूचाहि प्रसाद स्वीकारतात. जो शिव तोच गुरु, व जो गुरु तोच शिव असें प्रसादी मानतो. हातापायांच्या साम्यामुळें तो इतरांसारखाच आहे असें म्हणत नाहीं. आचार्यांच्या अवमानानें श्रेयप्राप्ति होत नाहीं. गुरुभक्तिविहीनाला शिवभक्ति साधत नाहीं. म्हणून जशी शिवावर तशीच गुरूवरसुद्धां भक्ति हवी.

४५. लिंगमाहात्म्यस्थल: गुरूमाहात्म्यामुळें लिंगाचेंहि माहात्म्य ध्यानांत येतें. कारण गुरूच्या दयेविना या ज्योतिर्मय, अनिर्देश्य, योग्यांच्या आत्म्यांत स्थित झालेल्या व पूर्वीं ब्रह्मादिकांनीं पूजिलेल्या लिंगाचें स्वरूप समजूं शकत नाहीं.

४६. जंगममाहात्म्यस्थल: शिवयोगामुळें जंगम जगज्जालांत चिद्रूप पाहतात. ते निर्धूतमल, शिवज्ञानी, जितकाम, जितक्रोध, समलोष्टाश्मकनक, समदर्शी, निःस्पृह, निरहंकारी असतात. म्हणून त्यांना शिवयोगी म्हणतात. शिवज्ञान व शिवचिंतन या दोन्ही गोष्टी दुर्लभ होत. त्या ज्यांच्यांत असतात ते ( जंगम ) शिवात्मक होत. त्यांची पदधूलि जेथें पडते तें स्थान पवित्र होय. त्यांच्या दर्शनानें सर्व सिद्धि, स्पर्शनानें पापशमन व पूजनानें मुक्ति यांचा लाभ होतो.

४७. भक्तमाहात्म्यस्थल: जे 'कर्मणा मनसा वाचा' शिवाला भजतात ते भक्त होत. भक्ति नसेल तर वेद, शास्त्रें, यज्ञ, तप, व्रतें यांना घेऊन काय करावयाचें ? शिवभक्तांना सुकृत–दुष्कृत कांहींच नसतें व त्यांना कर्मपाशनिबंधनहि नसतें. मत्त हत्तींना ज्याप्रमाणें बिसतंतूंची शृंखला बांधूं शकत नाहीं त्याप्रमाणें शिवाश्रित जंतूंना कर्मपाशांचें बंधन पडूं शकत नाहीं. अशा भक्ताबद्दल प्रसादी आदर दाखवितो.

४८. शरणमाहात्म्यस्थल: भोगलालसेपासून मुक्त झालेला, अन्यदेवतांकडे कांहीं न मागणारा व शिवाकडेच मोक्षाची अभ्यर्थना करणारा तो शरण होय. यज्ञांमुळें क्षयी स्वर्गफलाची प्राप्ति होते. पण शरणाला अक्षय फल मिळतें.

---

१०६. प्रसादीस्थलाचीं १६ उपस्थलें असून पहिलीं ७ अंगस्थलें व पुढील ९ लिंगस्थलें आहेत.

४९. प्रसादमाहात्म्यस्थल: महेशाचा प्रसाद दुर्लभ होय. त्यामुळें संसार-संतापाची निवृत्ति होते. अव्यभिचारिणी भक्तीचें प्रसाद हेंच मूळ होय. ज्याला शिवप्रसाद मिळाला नाहीं त्याला भक्तीहि साध्य होत नाहीं. त्रिभुवनांत प्रसादासमान किंवा प्रसादाहून श्रेष्ठ कांहींच नाहीं.

५०. कायानुग्रहस्थल: प्रसादी आपल्या काया-दर्शनानें सर्वांवर अनुग्रह करूं लागतो. ज्याप्रमाणें शिव मूर्त होऊन अनुग्रह करतो, त्याच-प्रमाणें शिवयोगी शरीरधारी होऊन अनुग्रह करतो. तो देही असून निःसंग असतो. जीवन्मुक्त असतो.

५१. इंद्रियानुग्रहस्थल: सर्व इंद्रियें त्याच्या स्वाधीन असलीं तरी बाह्य इंद्रियव्यापारं चालूंच असतात. परंतु इंद्रियें असून नसल्याप्रमाणेंच त्याची स्थिति असते. जेथें मनाची धांव असते तेथेंच इंद्रियेंहि जात असतात. शिवांत मन लीन झाल्यावर कुठला इंद्रिय-विचार!

५२. प्राणानुग्रहस्थल: नंतर त्याचे प्राण जणूं शिवांत लीन होऊन तो शांतमति स्थाणूप्रमाणें भासूं लागतो.

५३. कायार्पणस्थल: देहाभिमानाचा त्याग म्हणजे कायार्पण. शिवयोगी आपली काया शिवार्पण करतो. सर्व इंद्रियविषय व त्यांपासून होणारीं सुखें तो शिवाला वाहतो.

५४. करणार्पणस्थल: इंद्रियांच्या साहाय्यानें होणाऱ्या सुखाबरोबरच आपलीं सर्व इंद्रियें तो शिवाधीन करतो. इंद्रियांतील प्रथम जें मन तेंच शिवानें वश केल्यावर बाकीच्या इंद्रियांची काय कथा! इंद्रियांनींच पापपुण्यांचा उद्भव होतो. तींच शिवार्पण केल्यावर कर्मनिबंधन कुठलें?

५५. भावार्पणस्थल: मनांतील सर्व भाव शिवाला अर्पण करणें म्हणजे भावार्पण होय. भाव हेंच जंतूंच्या बंधमोक्षाचें कारण होय. तेच भाव अर्पिल्यामुळें शिवयोगी जीवन्मुक्त होतो.

५६. शिष्यस्थल: असा शिवयोगी मग एखाद्याला शिष्य करून त्याला मार्गदर्शन करूं शकतो.

५७. शुश्रूषुस्थल: त्याचे शिष्य त्याची भक्तिभावानें सेवा करूं लागतात.

५८. सेव्यस्थल: शिवयोग्याची सेवा करून त्याच्या उपदेशाचे कडक पालन करून हे शिष्य इतरांच्या सेवेस पात्र होतात.

प्राणलिंगीस्थल[१०७] :

५९. प्राणालिंगीस्थल: प्राणापान-संयोगांतून अंतःकरणांत ज्योतीप्रमाणें स्फुरणाऱ्या परब्रह्म-लिंगाला प्राणलिंग म्हणतात. या शिवात्मक-ज्योतीचें ध्यान करणारा, बाह्यवस्तुपराङ्मुख योगी म्हणजेच प्राणलिंगी.

६०. प्राणलिंगार्चनस्थल: मानसपूजेवर योगी भर देतो. तो प्राणलिंगाची भावपुष्पांनीं पूजा करतो. क्षमा हें अभिषेकजल, विवेक हें वस्त्र, सत्य हें आभरण, वैराग्य ही पुष्पमालिका, निरहंकार या अक्षता, श्रद्धा हा धूप, ज्ञान हा दीप, मौन हीच घंटा इ. कल्पना करून तो ही पूजा करतो.

६१. शिवयोगसमाधिस्थल: या प्रकारच्या पूजेमुळें प्राणलिंगी समाधि-अवस्थेपर्यंत जाऊन पोंचतो. शरीरांत आधार, स्वाधिष्ठान, मणिपूरक, अनाहत, विशुद्धि, आणि आज्ञा अशीं ६ चक्रें अनुक्रमें गुद, गुह्य, नाभि, हृदय, कंठ आणि भ्रूमध्य या ठिकाणीं आहेत. या चक्रांवर कमळें असून त्यांना अनुक्रमें ४, ६, १०, १२, १६, व ३२ अशा पाकळ्या आहेत. भ्रूमध्याच्या वरच्या बाजूस एक सहस्रदलकमल आहे. तेथें शुद्ध चंद्रप्रकाशासारखा प्रकाश आहे. त्याच्यावर कैलास नांवाचें स्थान आहे. योगी तेथपर्यंत जाऊन पोंचला कीं त्याची समाधि लागते.

६२. लिंगनिजस्थल: अंतःस्थ शिवलिंगाचा प्रत्यक्षानुभव योग्याला येऊं लागतो.

६३. अंगलिंगस्थल: नंतर अंग व लिंग यांच्या ऐक्याची जाणीव त्याला होऊं लागते. अंगामध्यें लिंग आहे, तसेंच लिंगामध्यें अंग आहे याचा अंगलिंगीला अनुभव येतो.

६४. आत्मस्थल: शिवयोगी अंग व लिंग यांत फरक आहे असें नंतर मानत नाहीं. आत्मा व परब्रह्म यांतील भेदभाव नाहींसा होतो.

६५. अंतरात्मस्थल: देही असून देहसंगविवर्जित झाल्यानें योगी स्वतःला परमात्मा मानूं लागतो. अहंकारामुळें जीवास होणारा मनुष्य-त्वादिकांचा भ्रम नाहींसा होतो व अंतरात्मा शरीरांत राहात असून तो असंग असल्याची जाणीव होते.

६६. परमात्मस्थल: शिवयोग्याला शिवाद्वैत ज्ञानाची प्राप्ति होते.

६७. निर्देहागमस्थल: देहापासून योगी अलिप्त राहतो. 'शिवोऽहं' अशी ज्याची भावना आहे त्याचा देहाशीं कसा संबंध राहणार ?

---

१०७. प्राणलिंगीस्थलाचीं १४ उपस्थलें असून पहिलीं ५ अंगस्थलें व नंतरचीं ९ लिंगस्थलें होत.

६८. निर्भावागमस्थल: नंतर त्याचा भाव इंद्रियव्यापारांपासून मुक्त होतो. तो विकारमुक्त होतो.
६९. नष्टागमस्थल: शिवयोगी वस्तूवस्तूंतील भेद मानेनासा होतो. सर्व वस्तूंत त्याला शिव दिसूं लागतो.
७०. आदिप्रसादस्थल: नंतर त्याला शिवाप्रसादाचा लाभ होतो.
७१. अंत्यप्रसादस्थल: सर्व पदार्थांचा लय म्हणजे अंत्य होय. त्याचा प्रसाद किंवा अनुभव शिवयोग्याला येतो. सुषुप्ताला ज्याप्रमाणें कोणतीच वस्तु दिसत नाहीं, त्याप्रमाणें मुक्ताला कोणतीहि वस्तु दिसत नाहीं. त्याला दृश्य किंवा कर्तव्य कांहींच नसतें. तो निश्चलस्थितींत असतो.
७२. सेव्यप्रसादस्थल: नंतर शिवयोगी शिवाइतक्याच आदराला प्राप्त होतो. तो शिवैक्यज्ञानरूढ बनलेला असतो.

**शरणस्थल :**[१०८]

७३. शरणस्थल: सति-पतिभाव हा या स्थलाचा विशेष होय. एखाद्या पतिव्रतेप्रमाणें शरणाची शिवावर अव्यभिचारी निष्ठा असते. प्रसादीस्थलाच्या अखेरीस अद्वैताचें ज्ञान झालेलें असलें तरी अजून थोडेंसें द्वैत शिल्लक असतेंच. सति-पतींमध्यें शरीरांचें द्वैत व मनाचें अद्वैत आढळतें. तसेंच येथेंहि शरण व शरण्य ( शिव ) यांच्यांत असतें.
७४. तामसनिरसनस्थल: शिवज्ञान-कुठारानें शरणाचा तमोभाव नाहींसा होतो.
७५. निर्देशस्थल: तम नाहींसा झाल्यामुळें ज्ञान प्रकाशरूप बनतें.
७६. शीलसंपादनस्थल: शिवतत्त्वाची जिज्ञासा म्हणजे शील. शिवप्राप्तीची उत्कंठा लागलेला योगी हा शीलवान् होय.
७७. दीक्षापादोदकस्थल: गुरु व शिष्य यांच्यांतील भेद नाहींसा होतो व ते जवळजवळ एक बनतात.
७८. शिक्षापादोदकस्थल: गुरु व शिष्य यांच्यांत समरसता होते.
७९. ज्ञानपादोदकस्थल: या समरसत्वामुळें मिळणाऱ्या आनंदाची जाणीव व्यक्त होऊं लागते.
८०. क्रियानिष्पत्तिस्थल: शिवयोगी कर्म करीत असला तरी कर्मफलांनीं लिप्त होत नाहीं. त्याचीं कर्में दग्धबीजांप्रमाणें झालेलीं असतात.

---

१०८. शरणस्थलाचीं १६ उपस्थलें असून पहिलीं ४ अंगस्थलें व पुढील १२ लिंगस्थलें होत.

८१. भावनिष्पत्तिस्थल: शरण आपला भाव शिवाधिष्ठित करतो. केवळ शिवभाव उरलेला असतो. या भावाशिवाय ज्ञान व शिवज्ञाना-शिवाय हा भाव शक्य नसतो.

८२. ज्ञाननिष्पत्तिस्थल: भोवतींचें जग व योगी यांतील ज्ञेय-ज्ञाता संबंध संपतो. कारण त्याचें चित्त शिवलीन झालें असल्यानें शिवाखेरीज अन्य वस्तूंचें त्याचें भान नाहींसें झालेलें असतें.

८३. पिंडाकाशस्थल: नंतर पिंडस्थित आत्मा हा शिव आहे. शरीर हें शिवागार किंवा शिवपुर आहे असें शिवयोगी जाणतो. घटा-काश व आकाश भिन्न नसतें; तसेंच पिंडस्थ आत्मा व शिव हे भिन्न नसतात.

८४. बिंद्वाकाशस्थल: त्यानंतर सर्व प्राणिमात्रांचे भिन्नभिन्न दिसणारे आत्मे म्हणजे शिव असल्याचें ज्ञान त्याला होतें. एकच वायु जसा सर्व प्राण्यांत असतो, तसाच 'शक्तिभेदेन' शिव सर्वगत असतो.

८५. महाकाशस्थल: आपला आत्मा, इतर प्राण्यांचे आत्मे व शिव (परमात्मा) एक असल्याच्या ज्ञानाचा उदय त्यानंतर होतो. आकाशाहून घटाकाश व मठाकाश वेगळें नसतें, त्याप्रमाणेंच शिवहि आपल्या व इतर आत्म्यांहून भिन्न नाहीं. हें ज्ञान शिवयोग्याला होतें.

८६. क्रियाप्रकाशस्थल: मानसपूजेची क्रिया तो करीत असतो.

८७. भावप्रकाशस्थल: हें आंतर अनुसंधान भावप्रकाशनानें राग, द्वेष, अविद्या यांचा नाश करीत असतें.

८८. ज्ञानप्रकाशस्थल: तर ज्ञानप्रकाशामुळें जीव व शिव यांतील उपाधि नष्ट होते.

ऐक्यस्थल:[१०९]

८९. ऐक्यस्थल: ऐक्याच्या जाणिवेनें योग्याला शिवानंदाचा लाभ होतो. शिवानंदमहासिंधूंत तो मज्जन करूं लागतो. मायाकल्पित असें हें जग त्याला दिसत नाहीं. कारण शिवैक्याच्या वडवानलांत मायासिंधु लयास जातो.

---

१०९. ऐक्यस्थलाचीं १३ उपस्थलें असून पहिलीं ४ अंगस्थलें व नंतरचीं ९ लिंगस्थलें आहेत.

९०. आचारसंपत्तिस्थल: शिवयोग्याचें शरीर उरलेलें असतें. त्याचीं कर्में जाणिवेविना चाललेलीं असतात. त्याची लौकिकयात्रा चालू आहे असें दिसत असतें. जळलेल्या कापडाच्या तुकड्याप्रमाणें त्याची अवस्था असते. अशा जळलेल्या तुकड्याचें मूळचें बहिरंग शिल्लक असतें. पण किंचित् स्पर्शानें त्याचें राखेंत रूपांतर होतें. तशी शिवयोग्याच्या देहाची स्थिति झालेली असते.

९१. एकभाजनस्थल: विश्व हें शिवमय आहे, या भावामुळें प्रसादैक्याची त्याला प्राप्ति होते. शिव, लिंग, जंगम, भक्त इ. च्या प्रसादांत तो भेद मानत नाहीं.

९२. सहभाजनस्थल: शिव, गुरु, शिष्य यांच्यांतील भेद नाहींसा होऊन त्याला स्वस्वरूपाचीच स्मृति उरते. भृत्य-स्वामी, गुरु-शिष्य ही भेदबुद्धि उरत नाहीं. मी शिव, गुरु व विश्व आहे अशी त्याला जाणीव होते.

९३. स्वीकृतप्रसादस्थल: तो चिन्मय बनतो आणि अग्नींतील काष्ठें जशीं अग्नीच दिसतात, तसें सर्व चराचर त्याला शिवच वाटतें.

९४. शिष्टोदनस्थल: ओदनरूप मायेला चिल्लिंगरूप योगी गिळून टाकतो. इंद्रियांनीं भोगले जाणारे विषय, सरिता सागरांत विलीन पावतात, त्याप्रमाणें आत्म्यांत विलीन होतात.

९५. चराचरलयस्थल: चराचराचा लय झाल्याप्रमाणें त्याचें अस्तित्व योग्याला जाणवत नाहीं. स्वप्नांत पाहिलेल्या वस्तु जागृतावस्थेंत अस्तित्वशून्य वाटतात, तसेंच पूर्वीं पाहिलेलें जग आतां अस्तित्वांत नाहीं असा त्याला अनुभव येतो.

९६. भांडस्थल: शतकोटी ब्रह्मांडें उत्पन्न करणें, संरक्षण करणें, आणि लय करणें वगैरेस आधारभूत जो शब्दब्रह्मरूप विचार आहे, त्यास भांडस्थल असें म्हणनात.

९७. भाजनस्थल: विमर्शाशक्तीची प्राप्ति होऊन तो जवळजवळ ब्रह्मरूप बनतो.

९८. अंगालेपस्थल: शिवयोगी चिदानंदस्वरूप होऊन दिक्कालातीत बनतो. तो जगदात्मा होऊन कशानेंच लिप्त होत नाहीं.

९९. स्वप्राज्ञस्थल: स्व-परज्ञानविरहित होऊन तो ब्रह्मांत विलीन होतो. ही द्वंद्वातीत अवस्था होय.

१००. भावाभावलयस्थल: लिंगैक्यांत, जेथें भावहि नाहीं व अभावहि नाहीं अशी जी अवस्था योगी अनुभवितो तेंच भावाभावलयस्थल होय. त्यालाच ‘ शून्यकल्प ’ म्हटलें जातें.

१०१. ज्ञानशून्यस्थल: या शेवटच्या स्थलांत ज्ञान नसतें. ती शून्यावस्था असते. पाण्यांत पाणी किंवा अग्नींत अग्नि मिसळल्याप्रमाणें आत्मा परब्रह्मांत किंवा अंग लिंगांत विलीन होतें.

'षट्स्थलसिद्धांता'चें किंचित् स्पष्टीकरण करण्याचा हा प्रयत्न मुख्यतः 'सिद्धांतशिखामणि' या संस्कृत ग्रंथाधारें केलेला आहे. विस्तारभयास्तव अधिक न लिहितां अष्टावरणांकडे व पंचाचारांकडे वळणें योग्य ठरेल.

गुरु, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, विभूति, आणि मंत्र हीं अष्टावरणें होत. गुरु हा दीक्षा व इष्ट लिंग देऊन आध्यात्मिक मार्गदर्शक बनत असल्यामुळें तो वीरशैव धर्मांत अत्यंत पूज्य मानला जातो. दीक्षागुरु, शिक्षागुरु व मोक्षगुरु हे गुरूंचे तीन प्रकार समजले जातात. गुरूचीं हीं त्रिविध कार्यें होत. एकच गुरु हीं कार्यें करूं शकतो पण ते भिन्न असले तर त्यांना सारखाच आदर दाखविला जातो. लिंग म्हणजे शिवाची प्रतिमा नव्हे, तर शिवच; अशी वीरशैवांची श्रद्धा असते. शिव चैतन्यस्वरूपानें जीवांत वसत असतो. हस्तमस्तकसंयोगानें हें चैतन्यतत्त्वच लिंग म्हणून गुरु शिष्याला देतो. लिंग हें ज्योतिःस्वरूप मानलें जातें व तें तळहातावर ठेवून त्याची पूजा केली जाते. दीक्षेच्या वेळीं दिलेल्या या लिंगाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि रूपांत शिवाची पूजा केली जात नाहीं. लिंगाचा वियोग होऊं नये यावर कटाक्ष ठेवला जातो. गुरु आणि लिंग यांना सारखाच आदर दाखविला जातो. जंगम म्हणजे सर्वत्र संचार करून वीरशैव धर्माची व नीतीची शिकवण देणारा. तो निःसंग, निःसीम, निरुपाधिक, निर्देह व निर्मल असतो. गुरु-लिंग-जंगम यांत वीरशैव भेद करीत नाहींत. पादोदक म्हणजे गुरु किंवा जंगम यांचें पावनतीर्थ. त्यामुळें चित्त व देह यांची शुद्धि होते असें मानलें जातें. प्रसाद म्हणजे गुरूला अर्पण केलेल्या वस्तूचा पुन्हां स्वीकार. विभूति म्हणजे भस्म. भस्माप्रमाणें रुद्राक्षधारण करणें हेंहि आवश्यक समजलें जातें. 'नमः शिवाय' असा पंचाक्षरी किंवा 'ॐ नमःशिवाय' असा षडक्षरी मंत्र वीरशैव मानतात. शिवाचार, लिंगाचार, सदाचार, भृत्याचार व गणाचार हे पंचाचार होत. शिवाचार म्हणजे फक्त शिवावरच निष्ठा ठेवून त्याचीच पूजा करणें. लिंगाचार म्हणजे लिंगालाच शिव समजून त्याची सति-पतिभावानें सेवा करणें. नीति व सद्गुण यांनीं युक्त असें जीवन कंठणें म्हणजे सदाचार होय. शिव व शिवशरण यांना सेवायुक्त आदर दाखविणें हा भृत्याचार होय. गणाचारामध्यें धर्मविषयक व सामाजिक कर्तव्यांचा समावेश होतो. 'षट्स्थलसिद्धांता'ची किंवा 'वीरशैव तत्त्वज्ञाना'ची थोडक्यांत अशी रूपरेषा देतां येईल. त्यांत वचनशास्त्रानें जी भर घातली तिचें 'विवेकचिंतामणीं'त विवेचन केलेलें नसल्यानें तो विषय येथें डोळ्यांपुढें ठेवलेला नाहीं हें स्पष्ट करावेंसें वाटतें.

## ७. 'विवेकचिंतामणि' आणि 'करणहसुगे'

शांतलिंगस्वामींनीं 'विवेकचिंतामणी'खेरीज आणखी एका कन्नड ग्रंथाचा मराठींत अनुवाद केला आहे. तो ग्रंथ म्हणजे श्रीचन्नबसवेश्वरांचा 'करणहसुगे'. 'हसिगे' किंवा 'हसुगे' या शब्दाचा विभजन (Division) असा अर्थ आहे.[११०] 'करणहसुगे' म्हणजे 'इंद्रियविभजन' म्हणजे 'पंचीकरण'.

चन्नबसवेश्वर (स. ११६०) हे श्रीबसवेश्वरांचे भाचे. ते स्वतः मोठे ज्ञानी व अनुभवी होते. प्रभुदेवांच्या नंतर 'शून्यसिंहासना'वर त्यांची स्थापना झाली होती. वीरशैव वाङ्मयाला, तत्त्वज्ञानाला व पंथाला त्यांनीं मोलाचा हातभार लावला. कारवार जिल्ह्यांतील उळवी येथें त्यांची समाधि आहे. त्यांच्या नांवावर षट्स्थलद वचन, करणहसुगे, मिश्रार्पण, पद-मंत्र-गौप्य, मंत्रगौप्य, कालज्ञान, घट-चक्रद वचन, रुद्र-भारत-सृष्टि इ. ग्रंथ आहेत.[१११]

शांतलिंगस्वामींनीं केलेल्या 'करणहसुगे'च्या अनुवादास 'कर्णहंस' असें नांव खरशीकरांनीं दिलें आहे. तें अत्यंत अशुद्ध असून त्यावरून कांहींच अर्थ-बोध होत नाहीं. 'करणहासकी, कर्णहस्तकी, कर्णहास्य' असेंहि या ग्रंथाचें नांव दिलें गेलें आहे. 'कर्णहस्तकी' हेंच नांव भावे व चांदोरकर वापरतात. चांदोरकरांनींच प्रथम या ग्रंथाचा परिचय करून दिला.[११२] या ग्रंथाच्या तंजावर-प्रतींत ३७७ ओव्या व ३५ श्लोक आहेत.[११३] खरशीकर-प्रतींत तीच ओवीसंख्या आढळते. पण श्लोक मात्र ३७ आहेत.

'करणहसुगे' व 'विवेकचिंतामणि' यांच्यांतील साम्यस्थळें पाहण्यासारखीं आहेत. तत्पूर्वी 'करणहसुगे'मधील तत्त्वज्ञानाचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. चन्नबसवेश्वरांनीं सृष्ट्युत्पत्तीचा क्रम असा सांगितला आहे:—

प्रथम निरालंब असें शून्य होतें. हेंच निरालंब-ब्रह्म होय. तेंच नंतर निरंजन-ब्रह्म झालें. त्यांत निरंजन-ॐकार-शक्तीची कल्पना उद्भवल्यावर शून्य-लिंग व्यक्त झालें. तें प्रणवोच्चारस्वरूप होतें. त्यांत महाज्ञानचित्ताची कल्पना अंगांच्या स्वरूपांत उद्भूत झाल्यावर निष्कल-ब्रह्म उत्पन्न झालें. त्यापासून ज्ञानचित्ताच्या सहकार्यानें चिन्नाद, चिद्बिंदु आणि चित्कला निर्माण झाल्या. त्यांपासून महालिंग उत्पन्न झालें. नंतर त्यापासून आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग,

---

११०. A Kannada–English Dictionary, by Kittel, p. 1642, 1643.
१११. A Hand-book of Veerashaivism, p. 33.
११२. भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक, शके १८३७.
११३. तंजावर येथील हस्तलिखितांची सूचि, भाग १, पृ. २८.

जंगमलिंग व प्रसादलिंग हीं पांच लिंगें उत्पन्न झालीं. तसेंच यांपैकीं एकेका लिंगाशी संबंध असलेलीं, अनुक्रमें कर्मसादाख्य, कर्तृसादाख्य, मूर्तिसादाख्य, अमूर्तिसादाख्य व शिवसादाख्य अशीं ५ सादाख्यें ( Lustres ) निर्माण झालीं. पुन्हां त्यांपासून अनुक्रमें, सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान हीं पंचमुखें बनलीं. या पंचमुखांपासून अनुक्रमें न, म, शि, वा आणि य हीं अक्षरें उद्‌भवलीं. पुन्हां या एकेका अक्षरापासून अनुक्रमें निवृत्ति, प्रतिष्ठा, विद्या, शांति आणि शान्त्यतीत कला निर्माण झाल्या. त्यांनाच अनुक्रमें क्रिया, ज्ञान, इच्छा, आदि आणि परा अशा पंचशक्ति म्हटलें जातें. महालिंग सदाशिवमूर्ति बनलें. सदाशिवमूर्तीचीं पंचमुखें, नेत्र आणि मन यांपासून अनुक्रमें पंचमहाभूतें, सूर्य व चंद्र उत्पन्न झाले. सदाशिवमूर्तीच्या गुप्त मुखापासून आत्मा निर्माण झाला. पंचमहाभूतें, सूर्य, चंद्र आणि आत्मा हीं शिवाचींच रूपें होत. त्यांच्यापासूनच नंतर ब्रह्मांड किंवा अजांड निर्माण झालें.

हें ब्रह्मांडाचें वर्णन झालें. 'ब्रह्मांडीं तें पिंडीं' किंवा 'पिंडांड' आणि 'ब्रह्मांड' यांची रचना सारखीच आहे असें पुढें चन्नबसवेश्वरांनीं म्हटलें आहे. शरीर हें ७५ गुणांनीं बनलेलें असतें व त्याखेरीज अधिक २५ तत्त्वें असल्याचें चन्नबसवेश्वर सांगतात.

पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांनीं शरीर बनतें. यांपैकीं प्रत्येक महाभूताचे कांहीं गुण त्यांनीं सांगितले आहेत. त्याचें कोष्टक असें देतां येईल:—

| महाभूत | गुण | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पृथ्वी | शब्द | स्पर्श | रूप | रस | गंध |
| आप | ” | ” | ” | ” | — |
| तेज | ” | ” | ” | — | — |
| वायु | ” | ” | — | — | — |
| आकाश | ” | — | — | — | — |

पुन्हां शरीरांतील तत्त्वांचे पांच वर्ग मानून त्यांचा एकेका महाभूताशीं असलेला संबंध सांगितला आहे. तो असा :—

| महाभूत | तत्त्वें ( पदार्थ ) | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पृथ्वी | अस्थि | मांस | त्वक् | नाडी | रोम |
| आप | लाळ | मूत्र | पित्त | शुक्र | शोणित |
| तेज | क्षुधा | तृषा | निद्रा | आलस्य | संग |
| वायु | धावन | वल्गन | कुंचन | प्रचारण | निरोध |
| आकाश | राग | द्वेष | भय | लज्जा | मोह |

पांच वर्गांत विभागलेल्या या पदार्थांचे अनुक्रमें शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे गुण मानले गेले आहेत. तसेंच आधींच्या कोष्टकांत दिल्याप्रमाणें पृथ्वीमध्यें हे पांचहि गुण असल्यामुळें वरील २५ पदार्थांत पृथ्वीचा अंश आहे. परंतु बाकीच्या महाभूतांचे गुण ४, ३, २, १ असे कमी होत गेल्यानें २० पदार्थांत आपाचा, १५ मध्यें तेजाचा, १० मध्यें वायूचा आणि ५ मध्यें आकाशाचा अंश आहे असें चन्नबसवेश्वर मानतात. २५ + २० + १५ + १० + ५ = ७५ अशी या एकूण तत्त्वांची बेरीज आहे.

चन्नबसवेश्वरांनीं ७५ तत्त्वांखेरीज अधिक २५ तत्त्वें जीं सांगितलीं, तीं पंचमहाभूतांपासूनच निर्माण होतात. कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, पंचतन्मात्रें, प्राणवायु, आणि अंतःकरण यांच्या उत्पत्तीची प्रक्रिया त्यांनीं जी सांगितली आहे ती थोडक्यांत अशीः—

**( १ ) कर्मेंद्रियें :** पृथ्वी + पृथ्वी = पायू,* पृथ्वी + आप = गुह्य,
पृथ्वी + तेज = पाद, पृथ्वी + वायु = पाणि,
पृथ्वी + आकाश = वाक्.

**( २ ) ज्ञानेंद्रियें :** तेज + पृथ्वी = घ्राण, तेज + आप = जिव्हा,
तेज + तेज, = चक्षु तेज + वायु = त्वक्,
तेज + आकाश = श्रोत्र.

(३) पंचतन्मात्रें : आप + पृथ्वी = गंध, आप + आप = रस,
आप + तेज = रूप, आप + वायु = स्पर्श,
आप + आकाश = शब्द.

(४) प्राणवायु : वायु + पृथ्वी = प्राण, वायु + आप = अपान,
वायु + तेज = उदान,* वायु + वायु = व्यान,*
वायु + आकाश = समान.

(५) अंतःकरण : आकाश + पृथ्वी = अहंकार,* आकाश + आप = चित्त,*
आकाश + तेज = बुद्धि,* आकाश + वायु = मन,
आकाश + आकाश = ज्ञातृ.*

शरीरांतील २५ तत्त्वांची चन्नबसवेश्वरांनीं अशी मांडणी केलेली आहे.[११४] 'करणहसुगे'मधील बाकीच्या विवेचनाला स्पर्श न करतां हें तत्त्वज्ञान 'विवेक-चिंतामणि' व 'करणहसुगे' या अनुवादित ग्रंथांत शांतलिंगानीं कसें व कितपत आणलें याचा थोडासा तुलनात्मक विचार येथें करावयाचा आहे. म्हणजेच या दोन ग्रंथांतील साम्यस्थळें पाहावयाचीं आहेत.

'विवेकचिंतामणी'च्या प्रथम परिच्छेदांत 'पंचीकरण' हा विषय आला आहे. 'महदादिसृष्टिक्रम' (ओ. ५५०–५६२), सृष्टिक्रम (ओ. ६१८–६२३) आणि 'युगपत्सृष्टि' या विभागांत 'सृष्टिरचना विस्तार श्रुति सन्मतें' सांगितला आहे. प्रथम परिच्छेदाचें स्वरूप 'वेदांतसकळशास्त्रनिर्णय' असें असल्यामुळें तसें करणें योग्यच होतें. त्यामुळें या विभागांत व 'करणहसुगे'मध्यें कांहीं साम्य नाहीं.

परंतु भूतगुणविकार (ओ. ५९८–६०७) या विभागांत 'करणहसुगे'मधील तत्त्वज्ञान आढळतें.

## विवेकचिंतामणि

आणीक[११५] पृथ्व्यादिपंचभूतां। गुणकर्मअधिदेवता।
कवण म्हणीतले तरि यथा। सांगिजेल॥ ५९८॥

---

११४. A Hand-book of Veerashivism मधील The Universe and the Soul या प्रकरणाच्या आधारें ही माहिती दिलेली आहे.

* अशी खूण केलेल्या ठिकाणीं डॉ. नंदीमठांनीं अनुक्रमें गुद, व्यान, उदान, चित्त, बुद्धि, अहंकार, ज्ञान हे शब्द वापरले आहेत.

११५. आधारभूत श्लोक :—
शब्दादि पंच विषयं भूमि अंशादि वर्तते।
चतुर्गुणापवर्गं तु त्रिगुणत्वं तु वन्हिके॥ १०॥

धारण पिंडीकरण । पंचन व्यूहन ।
अवकाश म्हणऊन । इति कर्म ॥ ५९९ ॥
कठीण द्रव्य दाहक । चंचळ स्वछादिक ।
म्हणोनियां मुख्य । इति धर्म ॥ ६०० ॥
पीत श्वेत हरित । कृष्ण आणी रक्त ।
म्हणिजे पंचभूत । वर्णादिक ॥ ६०१ ॥
शब्द स्पर्श । रूप रस ।
गंध म्हणिजे गुणेश । पंचक इति ॥ ६०२ ॥
ब्रह्मा विष्णु रुद्र ईश्वर । सदाशिव म्हणोनि वर ।
पंचप्रकार । अधिदेवता ॥ ६०३ ॥
अणीक त्या भूतगुणाचे ठाई विशेषी । पृथ्वीसी पंचगुण द्विगुण वायुसी ।
तेजासी[११६] चतुर्गुण आपासी । नभासी येक गुण ॥ ६०४ ॥
नभासी प्रतिध्वनी शब्दगूण । शब्दस्पर्शगुण वायूलागुन ।
शब्दस्पर्शरूप म्हणोन । त्रिगुण तेजासी ॥ ६०५ ॥
शब्द स्पर्श रूप रस ।
म्हणोनी चतुर्गुणास । उदकासी ॥ ६०६ ॥
शब्द स्पर्श रूप रस गंध । म्हणोनियां पंचविध ।
गुण प्रसिद्ध । पृथ्वियेसी ॥ ६०७ ॥

## करणहसुगे

आता पंचमहाभूतांचें । गुण-धर्मवर्ण साचे ।
आदि दैवत तयाचें । सांगिजैल ॥ ४१ ॥
शब्दादि गुणपंचक । कठीणधर्म कर्मधारणादिक ।
पीतवर्णादि देवता पृथक । ब्रह्मा पृथ्वीसी ॥ ४२ ॥

---

वायुश्च द्विगुणं प्रोक्तं आकाशश्चैकमेव च ।
यत्काठिण्य तथा पृथ्वि यद्रवं जळमुच्यते ॥ ११ ॥
यदुष्णां च तथा तेजं वायु संचरति त्वह ।
आकाश महदाकाशं भूतधर्ममिति स्मृतः ॥ १२ ॥
पीत श्वेतं च रक्तं च हरितं कृष्णमेव च ।
पृथ्व्यादि पंचभूतानि वर्णभेद प्रकीर्तितः ॥ १३ ॥
पृथ्वी ब्रह्मा जले विष्णु तथा रुद्र हुताशनं ।
ईश्वरो पवनं देवं आकाशस्व सदाशिवं ॥ १४ ॥

११६. ओवी ६०४ मधील 'तेजासी' पुढील 'त्रिगुण' हा शब्द गळला आहे.

शब्द स्पर्श रूप रस हे गुण। द्रव्यत्व धर्म कर्म पिंडीकरण।
श्वेतवर्ण आदिदेवता कारण। विष्णु जळासी ॥ ४३ ॥
शब्द स्पर्श रूप हे गुणत्व। उष्णत्व धर्म कर्म दहकत्व।
रक्तवर्ण आदिदैवत। रुद्र तेजीं ॥ ४४ ॥
शब्द स्पर्श हे गुण द्वैत। चळणादि धर्म विहरणादि कर्म कृत।
हरितवर्ण आदिदैवत। ईश्वर पवनीं ॥ ४५ ॥
शब्दगुण अवकाश। सच्छिद्रता धर्म कर्म अवकाश।
कृष्णवर्ण आदिदैवत विशेष। सदाशिव गगनी ॥ ४६ ॥

'विवेकचिंतामणी'च्या तृतीय परिच्छेदामध्यें (ओ. २६–४०) पुन्हां एकदां 'पंचीकरणा'चा विषय मांडला गेला आहे. प्रारंभीं ३६ ही तत्त्वांची संख्या देऊन नंतर अंतःकरण, प्राणवायु, ज्ञानेंद्रियें, पंचतन्मात्रें व कर्मेंद्रियें या २५ तत्त्वांचें विवेचन केलेलें आहे. ३६ ही संख्या शैवसिद्धांत व त्रिक यांना मान्य असली तरी 'करणहसुगे'मधील तत्त्वज्ञानाला अनुसरून नाहीं. हें लक्षांत घेऊन पुढील उताऱ्यांतील साम्याचा विचार करावयास हवा:—

## विवेकचिंतामणि

### आकाशाचे पंचीकृत

आकाशाचा द्वितीय भागांश। तो ज्ञातृ म्हणवी विशेष।
वायूच्या द्वितीय भागांतु जालियां समरस। जालियां मन म्हणवी ॥२६॥
अग्नीच्या द्वितीय भागसमंधी। मिळालीया म्हणवी बुद्धि।
जळाचिया द्वितीयादि। भागांतुन मिळालिया चित्त ॥ २७ ॥
पृथ्वीचा द्वितीय गूण। भागांतु मिळालिया अहंकार आपण।
इति पंच अंतकर्ण। आकाशाचे पंचीकृत ॥ २८ ॥

### वायोचे पंचीकृत

वायोचा द्वितीय भाग आपण। तो आपणापें म्हणवी व्यान।
नभाचा द्वितीय भागांत मिळोन। समान म्हणवी ॥ २९ ॥
वन्हाचे द्वितीय स्थान। भागांतु मिळालिया उदान।
जळाच्या द्वयभागांतु मिळोन। अपान म्हणवी ॥ ३० ॥
धरित्रीचिया द्वितीया। भागांतु मिळालियां।
प्राण म्हणवी निःसंशया। इति वायोचे पंचीकृत ॥ ३१ ॥

### अग्नीचे पंचीकृत

अनिळाचा द्वितीय भागांशु । तो आपणापे म्हणवी चक्षु ।
नभाच्या द्वितीय भागांतु समरसु । जालिया श्रोत्र ॥ ३२ ॥
*अनळाचा द्वितीय अंशक । भागांतु मिळालीया त्वक ।
जळाच्या द्वितीय भागांतु सम्यक । जालिया जिव्हा ॥ ३३ ॥
धरणीचा द्वितीय गूण । भागांतु मिळालियां म्हणवी प्राण ।[११७]
इति अग्नीचे ज्ञान । इंद्रियपंचीकृत ॥ ३४ ॥

### अंबूचे पंचीकृत

आपाचा द्वितीय भागांश । तो म्हणवी आपणापे रस ।
व्योमाच्या द्वितीय भागांतु समरस । जालिया शब्द ॥ ३५ ॥
पवनाचा द्वितीय भागांश । मिळालिया स्पर्श ।
अग्नीचा द्वितीय भागांतु समरस । जालियां रूप म्हणवी ॥ ३६ ॥
अवनीचियां । द्वितीय भागांतु मिळालिया ।
गंध इति पंच विषया । अंबूचे पंचीकृत ॥३७॥

### धरणीचे पंचीकृत

पृथ्वीचा द्वितीयू । भाग तो म्हणवी पायू ।
नभाचा द्वितीयु । भाग समंधे ॥ ३८ ॥
वायोचे द्वितीय भागस्थानीं । मिळालियां पाणी ।
अग्नीचिया द्वितीय भागांतु मिळोनी । पाद म्हणवी ॥ ३९ ॥
जळाचा द्वितीय । भागांतु मिळालिया गुह्य ।
इति कर्मेंद्रिय । धरणीचे पंचीकृत ॥ ४० ॥

### करणहसुगे

ज्ञातृ-मन-बुद्धि चित्त अहंकार । गगन जालें विविधाकार ।
अंतःकरणरूपें निरंतर । निजांशें ठेलें ॥ ६६ ॥
आकाश वायुसी मन । तेजीं बुद्धि आपण ।
आपीं चित्त गगन । पृथ्वीसी अहंकारु जाला ॥ ७२ ॥

× × ×

---

*३३ व्या ओवींत 'अनळाचा' ऐवजीं 'अनिळाचा' पाहिजे.
११७. 'प्राण' ऐवजीं 'घ्राण' पाहिजे.

प्राणापान व्यान उदान समान । वायु जाला पंचप्राण ।
व्यानरूपें आपण । निजांशें ठेलें ॥६७॥
वायुगगनेसी समान । तेजी मिळालिया उदान ।
अल्पसंयोगे[११८] आपण । पृथ्वीसी प्राणवायु ॥ ७३ ॥

× × ×

श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । तेज पंचप्रकारें भिन्न ।
चक्षूरूपें आपण । निजांशें ठेलें ॥ ६८ ॥
तेज आकाशयोगे श्रोत्र । वायुसी त्वचा सर्वत्र ।
आपसंयोगे जिव्हा पवित्र । पृथ्वीसी घ्राण जालें ॥ ७४ ॥

× × ×

शब्द स्पर्श रूप रस गंध । आप विषयत्वें पंचविध ।
रसरूपें प्रसिद्ध । निजांशें ठेलें ॥ ६९ ॥
आपआकाशीं शब्दांश । वायुसी जालें स्पर्श ।
तेजसंगें रूपविशेष । पृथ्वीसी गंध जालें ॥ ७५ ॥

× × ×

वाचा पाणी पाद गुह्य गुद । क्षिति कर्मेंद्रिय पंचविध ।
पायुरूपें प्रसिद्ध । निजांशें ठेलें ॥ ७० ॥
धरणी वाच्यांश गगनीं । वायुसी जाली पाणी ।
पादांश मिळाला वन्ही । आपीं गुह्य जाली ॥ ७६ ॥

:

'विवेकचिंतामणी'च्या तृतीय परिच्छेदांतच 'स्थूलशरीरांत पंचीकृत' (ओ. ४७–४९) या विभागांत 'करणहमुगे'मधील कांहीं भाग संक्षेपानें आलेला आहे. या ओव्यांचें स्पष्टीकरण 'करणहसुगे'च्या मदतीशिवाय होऊं शकणार नाहीं.

:

## विवेकचिंतामणि

अस्तिचर्मादि पंचक । धरण्यादिक मुत्रादिपंचक ।
क्षुधातृषादि[११९] पंचक । अनळाचें ॥ ४८ ॥

---

११८. 'अल्पसंयोगे आपण' हा चरण 'आपसंयोगे अपान' असा हवा.

११९. ४८ व्या ओवींतील दुसऱ्या चरणांत जळाचा उल्लेख राहून गेला आहे.

धावन चलनादिक । पंचक वायूचे मुख्य ।
कामक्रोधादी[१२०] पंचक । आकाशाचे म्हणवी ॥ ४९ ॥

## करणहसुगे

अस्थि मांस आणि चर्म । नाडी चक्र तथा रोम ।
हे गुणपंचक विषम । अंश पृथ्वीचे ॥ ५६ ॥
लाळ मूत्र तथा स्वेद । शुक्र शोणित एवं विविध ।
इये पांच गुण प्रसिद्ध । अंश जळाचे ॥ ५७ ॥
क्षुधा आणि तृषण । निद्रा आलस्य मैथुन ।
यवं गुणपंचक भिन्न । अंश तेजाचे ॥ ५८ ॥
धावन वळन अकोचन । प्रसारण वियोगण ।
ईय भिन्नभिन्नभिन्न । पंचगुण वायोचे ॥ ५९ ॥
राग द्वेष तथा भय । हे गुणपंचक निःसंशय ।
लज्जा मोह गुण इय । अंश आकाशाचे ॥ ६० ॥

‘ विवेकचिंतामणि ’ व ‘ करणहसुगे ’मधील हीं साम्यस्थळें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचीं आहेत. मराठीपुरतें बोलावयाचें तर हे दोन्हीहि ग्रंथ एकाच ग्रंथकारानें लिहिले ( अनुवादिले ) असल्यानें असें होणें स्वाभाविक होतें.

परंतु निजगुणशिवयोगींनीं चन्नबसवेश्वरांचा ग्रंथ पाहिला होता काय या प्रश्नाचा विचार कन्नड संशोधकांनीं करण्यासारखा आहे. निजगुण बसवेश्वरा-

---

१२०. आधारभूत श्लोक :—

अस्थि मांस त्वचा नाडी रोम चैवा तु पंचकं ।
क्षिति पंच गुणा प्रोक्तं सा अंशं तु प्रकीर्तितः ॥ १८ ॥
लाळ मूत्र तथा स्वेद शुक्र शोणितमेव च ।
आप पंचगुणाश्चैव सा अंशं तु प्रकीर्तितः ॥ १९ ॥
क्षुधा तृष्णा तथा निद्रा आलस्य संगमेव च ।
अग्नि पंचगुणं प्रोक्तं सा अंशं तु प्रकीर्तितः ॥ २० ॥
धावनं वळनं चैवा कोचनं च प्रउारणं ।
निरोधश्चेतु विज्ञेय वायु पंचमिति स्मृतः ॥ २१ ॥
राग द्वेषं भयं लज्या मोहश्चैव यथा तथा ।
व्योम पंचगुणा प्रोक्तं सा अंशं तु प्रकीर्तितः ॥ २२ ॥

‘दासबोधा’च्या १७ व्या दशकांतील ८ व्या समासांत ( ओ. २४–२८ ) व ९ व्या समासांत (ओ. १२–१६) आणि ‘ पंचीकरण ’ नांवाच्या प्रकरणांतील ३२ व ३३ क्रमांकांच्या अभंगांत रामदासांनीं हीच कल्पना मांडलेली आहे.

दिकांचा निर्देश करीत नाहींत. बसवेश्वरादिकांच्या तत्त्वज्ञानापेक्षां आधींच्या वेदागमांतील तत्त्वज्ञानाकडे त्यांचा अधिक ओढा आहे. पारंपारिक ( Traditional ) तत्त्वज्ञान निजगुण मांडतात. पण तरीहि या तत्त्वज्ञानांत जी नवी भर पडत गेली तिच्याशीं त्यांचा परिचय होता असें म्हणतां येईल काय ?

' करणहसुगे 'मधील तत्त्वज्ञान सर्वस्वीं ' स्वतः'चें नवीन, असल्याची भाषा खुद्द चन्नबसवेश्वरांनींहि केलेली नाहीं. तर पारमेश्वरागमाच्या, विजयभैरवी-नामक उपागमांतील तत्त्वपटलावर आपण हें तत्त्वज्ञान आधारलें आहे असें ते स्पष्टपणें सांगतात.[१२१]

निजगुणांनीं आगमांचा अभ्यास चांगला केला होता हें उघड आहे. ' आगम विशेष ' विभागांत ( द्वितीय परिच्छेद, ओ. ५०–९३ ) त्यांनीं पारमेश्वरागमाचे मातंगतंत्र, यक्षणीशास्त्र, पद्मागम, पौष्कर, सुपयोग, हंसागम व सामान्यागम असे सप्तभेद सांगितले आहेत; ( ओ. ८८ ). त्यांत विजय-भैरवीचा उल्लेख नाहीं हें खरें. परंतु ज्या श्लोकांचा आधार चन्नबसवेश्वर घेतात ते श्लोक, कोणत्याहि आगमांतील असोत, निजगुणांपुढें असणें शक्य आहे. याच्याच जोडीला चन्नबसवेश्वरांच्या ग्रंथाचें वाचन त्यांनीं केलें असण्याची शक्यता नजरेआड करून चालणार नाहीं.

शांतलिंगस्वामींनीं अनुवादासाठीं ' विवेकचिंतामणि ' व ' करणहसुगे ' हे दोन ग्रंथ निवडण्यांतहि मोठें औचित्य व मार्मिकता दाखविली आहे असें मला वाटतें. वीरशैव तत्त्वज्ञानांतील दोन विचारधारांचे प्रतिनिधित्व करणारे दोन कवि व त्यांचे दोन ग्रंथ निवडण्यांत शांतलिंगांची समन्वयदृष्टि दिसून येते. या विचारधारांत वरवर कांहीं भेद दिसले तरी त्यांतून एकच प्रवाह वाहात आहे याची जाणीव त्यांना होती. तीच जाणीव ' विवेकचिंतामणि ' व ' करणहसुगे ' यांमधील साम्यस्थळें पाहतांना आपणांसहि होते.

## ८. ' विवेकचिंतामणी 'च्या प्रतींतील फरक

' विवेकचिंतामणी 'च्या मराठी अनुवादाचें एकमेव हस्तलिखित उपलब्ध आहे. आणि तेंच आज विद्यापीठ-प्रत म्हणून प्रसिद्ध होत आहे. हें हस्त-

---

१२१. " He further clearly and explicitly mentions the source of this scheme. It is the Tattava-Patala of the Vijaya-bhairavi, a sub-Agama of the Parameshvara. In many places he quotes Sanskrit verses, which, he says, are from the Vijayabhairavi, in support of the statements in his book. "—A Hand-book of Veerashavism, p. 154-55.

लिखित श्री. बेटगेरी कृष्णशर्मा यांना बेळगांव जिल्ह्यांतील यमकनमर्डी येथें मिळालें. नंतर तें प्रा. द. रा. बेंद्रे यांच्याकडून माझ्या हातीं आलें.

हस्तलिखिताचा आकार ८" × ४" असा असून कागद निळसर आहे. लेखन कांहींसें अशुद्ध असलें तरी अक्षर वळणदार व ठसठशीत आहे. पृष्ठाच्या दोन्ही बाजूस १" जागा समास म्हणून सोडली असून त्यांत डाव्या बाजूस पृष्ठाचा व उजव्या बाजूस अध्यायाचा व पृष्ठाचा क्रमांक दिलेला आहे. तसेंच प्रत्येक पृष्ठावर उजव्या बाजूस 'राम' असें लिहिलें आहे. ओव्यांचे क्रमांक देतांना चुका झालेल्या आहेत. पण हस्तलिखित संपूर्ण स्वरूपांत व सुस्थितींत उपलब्ध झालें आहे.

'विवेकचिंतामणी'चें दुसरें हस्तलिखित मिळूं शकलें नाहीं. अण्णा ढोणे वैरागकर नांवाच्या गृहस्थांकडून एक हस्तलिखित मिळाल्याचा उल्लेख मल्लिकार्जुन-शास्त्र्यांनीं केलेला आहे. याच हस्तलिखितांतील पहिले दोन परिच्छेद 'विवेकचिंतामणि' (पूर्वभाग) या नांवानें रावसा. वारदांनीं स. १९०९ मध्यें प्रसिद्ध केले. हें हस्तलिखित मिळविण्याचा प्रयत्न करूनहि तें हातीं लागलें नाहीं.

तेव्हां पहिल्या दोन परिच्छेदांतील फरक, पाठभेद यांचा विचार करणें शक्य आहे. पाठभेदांपैकीं महत्त्वाचे तेवढे संहितेनंतर दिले आहेत. अर्थाच्या व भाषेच्या दृष्टीनें हे पाठ निवडले आहेत. प्रस्तुत प्रतीला 'विद्यापीठ-प्रत' व वारदांनीं प्रसिद्ध केलेल्या प्रतीला 'वारद-प्रत' असें नांव दिलें आहे.

वारद-प्रतींतील ग्राह्य पाठांचीच संख्या अधिक असल्यानें ते पाठ दिले आहेत; त्यामानानें विद्यापीठ-प्रतींतील ग्राह्य पाठ कमी आहेत असें वाटलें तरी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे कीं, या प्रतींतील पुष्कळ पाठ ग्राह्य आहेत. पण ते दिलेले नाहींत. कारण अर्थ लावण्यास अगर भाषेचें वळण कळण्यास तेथें वारद-प्रतीची मदत घेणें जरुरीचें नाहीं. न दिलेल्या पाठांपैकीं कांहीं असे:—

| विद्यापीठ-प्रत | वारद-प्रत |
| --- | --- |
| विष्णु अभिमानी (१—६९९) | विश्वाभिमानी (१—६९९) |
| निरांकुशतृप्ती (१—७९९) | निरांकुशवृत्ति (१—७९९) |
| लीन (१—९०७) | लिंग (१—९०७) |
| वळघलियां (१—९७५) | बळ घालिया (१—९७८) |
| निस्पंद (१—१००४) | निष्यंद (१—१००७) |
| कैसेनि (१—१०१६) | कासिनि (१—१०१९) |
| सर्वकामाती (१—१०२६) | सर्वकामासि (१—१०२९) |
| ग्राम्यजनकाऐसे (१—११७६) | ग्राम्य जे कां ऐसें (१—११८२) |
| विश्वासागम (२—३०) | विश्वास आगम (२—३०) |

या दोन प्रतींमधील कमीअधिक ओव्यांची चर्चा न करतां मूळ (?) कन्नड ग्रंथांतील कांहीं विभाग या प्रतींतून कसे गळले आहेत तें पाहणें योग्य ठरेल. तुलाप्रमाण, सूत्रलक्षण, भाष्यलक्षण, अधिकरणलक्षण, गुरुलक्षण, प्रमाणलक्षण, पदार्थविवेक, पदार्थद्वय, बिंबप्रतिबिंबभाव, निराकार प्रतिबिंब, प्रतिबिंबाचें प्रतिबिंब, बिंबसाम्यभंग, उपाधिसाम्य, उपाधेयभिन्नत्व, अनादिषट्क, तत्त्वार्थ, मिथ्यात्वाविरोध, निरंजनत्वसिद्धि, निर्गुणसाधन, ज्ञानास प्रतिबंधक, आगमसार, हे विभाग दोन्ही प्रतींत नाहींत. सिद्धारिचक्रविषय, तर्पणादिसंख्या, अक्षमालाफलतारतम्य, ध्यानलक्षण, शिवलिंगस्वरूप, शिवलिंगभेद, गायत्रीनिजस्वरूप, पंचब्रह्मयज्ञादि, सिद्धांतमतविवेक, उपनिषन्मीमांसा, समन्वयसंग्रह, ब्रह्मशब्दार्थ, कारणवाक्यें, शिवच शास्त्रयोनि, पतित्वोपपत्ति, शिवजीवैक्य, सगुणत्वसमर्थन, अष्टाभिधानें, शिवसर्वोत्तमत्व, शिवज्ञानसार, पशुसंज्ञा, करणत्रय व शिवसारूप्यसिद्धांत हे विभाग वारद-प्रतींत आहेत, पण विद्यापीठ-प्रतींत नाहींत. दोन्ही प्रतींत संपूर्णपणें गळलेले विभाग (अखेरचा सोडून) प्रथम परिच्छेदांतील आहेत. मुळांतील कांहीं गाळावयाचें नाहीं व पदरचें कांहीं घालावयाचें नाहीं असें धोरण मराठी अनुवादामध्यें सांभाळलें गेलें आहे. मग हे विभाग दोन्ही प्रतींत गळले कसे ? येथें एक गोष्ट सूचित करावीशी वाटते, आणि ती म्हणजे मूळ ग्रंथाची चिकित्सक आवृत्ति ( Critical edition ) काढण्यांत मराठी अनुवादाची मदत घेण्यासारखी आहे. 'विवेकचिंतामणी'च्या उपलब्ध कन्नड हस्तलिखित व मुद्रित प्रतींतील कोणकोणते विभाग मराठी प्रतींत आढळतात अथवा आढळत नाहींत, हें पाहून त्या ग्रंथांतील प्रक्षेपांचा ( interpolations ) विचार करतां येईल. अर्थात् हें काम कन्नड संशोधकांचें आहे.

येथें हें सांगितलें पाहिजे कीं दोन्ही प्रतींत न अढळणारे विभाग मला मूळ ग्रंथांतील प्रक्षेप वाटतात. हे विभाग असलेली एखादी प्रत शांतलिंगस्वामींना उपलब्ध झालीहि असेल. पण अशी प्रत मला मूळ ग्रंथाला जवळची वाटत नाहीं.

वारद-प्रतींत असलेले पण विद्यापीठ-प्रतींत नसलेले विभाग सर्व कन्नड हस्तलिखितांत आहेत कीं नाहींत हाहि शोध घेण्यासारखा आहे. हा शोध घेतल्यावर विद्यापीठ-प्रत हीच मूळ व शुद्ध कृतीला जवळची आहे हें ध्यानांत येईल. अर्थात् याविषयीं येथें अधिक चर्चा करत नाहीं. पुढें टीपांत हा विषय मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

## ९. विवेकचिंतामणी 'ची भाषा व काव्यमयता

'विवेकचिंतामणी 'चें लेखन श. १५२६ मध्यें झालेलें असलें तरी उपलब्ध प्रत श. १७६६ मधील आहे. त्यामुळें भाषेचें जुनें वळण या प्रतींत तितकेंसें टिकलेलें दिसत नाहीं. तरीहि कांहीं भाषाविशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत.

शांतलिंगस्वामींची मातृभाषा कन्नड असावी. परंतु कन्नड भाषेची छाया ‘ विवेकचिंतामणी ’वर पडलेली आढळत नाहीं. मुदल ( मोदलु ), मातु, व कांहीं शस्त्रवाचक शब्द कन्नड आहेत. एकूण भाषेचें वळण देशी नसून संस्कृतकडे अधिक झुकलेलें आहे.

**अनुस्वार :**

अनुस्वारांमध्यें ते नको तेथें दिलेले व हवे तेथें गाळलेले आढळतात. अनावश्यक अनुस्वारांचीं कांहीं उदाहरणें :—

संत < सत्ता, पंचन < पचन,
औरंसा < औरसा, अंत्याश्रमियासि < अत्याश्रमियासि,
पांडवा < पाडवा, हंसितव्य < हसितव्य.

पुढील शब्दांत अनुस्वार गळलेले आहेत :—

वैरभ < वैरंभ, मदप्रपंच < मंदप्रपंच,
मदानुसंधानपूर्वक < मंदानुसंधानपूर्वक, सहिता < संहिता,
यत्रोद्धारकादि < यंत्रोद्धारकादि, अति < अंति.

**स्वरप्रक्रिया :**

अ > आ : साहकारी < सहकारी, साहवें < सहावें,
नामी < नमी, दमा < दम,
आस्वतंत्र, < अस्वतंत्र, आणिमा < अणिमा,
आनादी < अनादि, आसती < असती.

आ > अ : अनयासें < अनायासें, अणीक < आणिक,
अश्रम < आश्रम, साहवें < सहावें,
अधिक्य < आधिक्य, अक्षेप < आक्षेप,
अनंद < आनंद, अपण < आपण,
अशिर्वाद < आशिर्वाद, अस < आस,
अरूढी < आरूढी, अहे < आहे,
अगम < आगम, अटोपे < आटोपे,
अभासली < आभासली, अबाळ < आबाल,
प्रत्याहर < प्रत्याहार, अज्ञा < आज्ञा,
अश्चर्य < आश्चर्य.

अंत्यस्वरलोप : मृत्य < मृत्यु, हेत < हेतु.

स्वरागम : अचरिया < चरिया ( चर्या )

स्वरलोप : अक्रा < अकरा, प्रावर्ण < प्रावरण,
कीर्णे < किरणें, आवर्ण < आवरण,
चर्मशरीरी < चरमशरीरी, तार्तम्य < तारतम्य.

स्वरभक्ति : जयमुनी < जैमिनी, अचरिया < ( अ ) चर्या,
परवाहेश्वरत्वें < प्रवाहेश्वरत्वें, स्वतंतर < स्वतंत्र,
विवरण < वैवर्ण्य, घंटाकरण < घंटाकर्ण.

**व्यंजनप्रक्रिया :**

द्वित्तीकरण : अभिमत्त < अभिमत, मत्तांतरें < मतांतरें,
पट्ट < पट.

संयुक्तव्यंजनप्रक्रिया : मछपुराण < मत्स्यपुराण, बोध < बौद्ध,
मछिंद्रनाथ < मत्स्येंद्रनाथ,
अविछिन्नाकाश < अविच्छिन्नाकाश,
आछादित < आच्छादित.

क > ग : प्रगट < प्रकट, प्रगटोनिया < प्रकटोनिया.

त > थ : भरथ < भरत.

त > द : जाग्रदावस्थेचे < जागृतावस्थेचे.

न > ण : हाणी < हानि.

ण > न : पंचानुव्रत < पंचाणुव्रत.

श > स : सेजार < शेजार, साकटीय < शाकटीय,
सिंपुनी < शिंपुनी, नासादिक < नाशादिक,
अवस्य < अवश्य.

स > श : प्रध्वंशन < प्रध्वंसन, विकाश < विकास,
संशक्ति < संसक्ति, शारोत्तर < सारोत्तर,
शिमापर्वत < सीमापर्वत, मिमांशीक < मीमांसिक,
विकाशक < विकासक.

श > ष : विषद < विशद.

ष > श : शट्क < षट्क.

ष > स : कसाय < कषाय.

ष > ख : विशेख < विशेष, शोखून < शोषून,
अशेख < अशेष, पोखीत < पोषीत,
तोषत < तोखत.

ख > ष : पाषांडियासी < पाखंडियासी.

| | | |
|---|---|---|
| ल > ळ | : मळीन < मलिन, | प्रतिफळीत < प्रतिफलित, |
| | चळण < चलन, | नीळोत्पळ < नीलोत्पल, |
| | निश्चळात्मा < निश्चलात्मा, | कुटीळ < कुटिल. |
| वर्णविपर्यय | : निळारंभ < निरालंब, | मरगज < मरकत, |
| | सकळ < कळस. | |
| विसर्गलोप | : स्वतां < स्वतः, | स्वत < स्वतः, |
| | तत्त्वता < तत्त्वतः. | |
| 'य'श्रुति | : येकेवीण, येक, येकदेशी, येकात्मा, येकट. | |
| 'व'श्रुति | : वोळखिलें, वोहळोदके, वोवून, वोविजेल, वोज. | |

**व्याकरणदृष्ट्या** पाहतां कीजेल, सांगिजेल, वोविजेल, जाणिजें, कल्पिजे, असिजे, सांगिजेती, होआवें, न वजावे, म्हणीतले, जाणीतले, बुझला हीं क्रियापदें व पापियांचे, अज्ञानियांसी, निजभर्तृचेनि, नित्यकर्माचेनि, वायोचा, ब्रह्मियाची यासारखीं सामान्यरूपें लक्ष वेधून घेतात. **शब्दसंग्रहांत** हातवसे, वाड, पवाडी, अपैसे, साचोकारीं, निरुतें, नावेक, बहुवस, त्रिशुद्धी, आन, पेणें, परवडी, हराश, पढिये, भीतरी, पासाव यांसारखे जुने शब्द आढळतात. 'उपपुराणें अष्टादशें'-मध्यें विशेष्यनिघ्न विशेषणाचें रूप मिळतें. श्रीहरू, निर्धारू, लभ्यांशु, लोकांतु, चार्वाकु, शास्त्रांतु, संसारु, व्यवहारु, निवांतु, सतु हे 'उ'कारांत व कल्हो, नित्यनिग्रहो यांसारखे 'ओ'कारांत शब्दहि सांपडतात. **लेखनविशेषांत** शृती < श्रुति, विदृम < विद्रुम, स्छुरिकास्त्र < छुरिकास्त्र, प्रवर्द्धुनी < प्रवर्धुनी, रुतुवंती < ऋतुवंती, असे शब्द लिहिण्याची लकब दिसते. वेव्हार < व्यवहार, संमोह < समूह, समंध < संबंध हे शब्द त्याच प्रकारचे आहेत. 'स्थ' हें अक्षर सर्वत्र 'स्छ' असें लिहिलें गेलें आहे.

अशुद्ध रूपेंहि बरींच आहेत. त्यांत सूख, परिक्षा, इती, लौकीक, अशीं न्हस्वदीर्घाचा विधिनिषेध न पाळणारीं आहेत; तशींच विषई, काळत्रई, न्याईक, ठाई, माइक, समई, संप्रदाई, यांसारखींहि आहेत. 'यी'च्या जागीं 'ई' लिहिण्याची संवय या शब्दांत दिसते. 'विवेकचिंतामणी'तील भाषेचें स्वरूप थोडक्यांत असें आहे.

मुळांत 'विवेकचिंतामणि' हा गद्य ग्रंथ असला तरी मराठी अनुवादांत त्यावर काव्यवेष चढविलेला आहे. त्यामुळें त्याचा काव्यदृष्ट्याहि थोडासा विचार करणें आवश्यक आहे.

विवेकचिंतामणी'तले पहिले दोन परिच्छेद तर केवळ विचारप्राधान्याचे. पहिल्या परिच्छेदांतला विषय 'वेदांतसकळशास्त्रनिर्णया'सारखा. तरीहि चपखल दृष्टान्तांच्या द्वारें वेदान्त आणि षड्दर्शनांचा प्रपंच सोपा करून मांडला आहे.

अशा ठिकाणीं विचारांचा अनभ्रपणा (Clarity of thought) हा महनीय विशेष वाटतो. उदाहरणार्थ, चार्वाकाचें मत सांगतांना तें इतक्या साध्या व सोप्या शब्दांत सांगितलें गेलें आहे:—

तयाचे प्रतिपादन । सूख तेचि स्वर्गभुवन ।
दु:ख तेचि कारण । नर्कभोग ॥ १-१४२ ॥
मरण तेचि मोक्षवासना । स्वर्गनर्क नास्ती अन्ना ।
म्हणोनी संभाषणा । करीत असें ॥ १-१४३ ॥

वेगवेगळीं मतें सांगतांना कोठेंहि गोंधळ उडालेला नाहीं. विचारांच्या अनभ्रपणावर उपमा, दृष्टान्त आणि न्याय यांचें लेणें चढलें आहे.

दृष्टान्तांमध्यें सांकेतिकता आढळली तरी बरेंचसें काव्यसौंदर्य दृष्टान्तामुळें आलें आहे. शुक्ति-रजत, तंतु-पट, मृत्तिका-घट, सुवर्ण-अलंकार, दीप-घट, घट-आकाश ; हे जुनेच दृष्टान्त नवे होऊन आलेले दिसतात. ईश्वर हा जगाचें कारण आहे, हें सांगतांना कवि म्हणतो,

कुल्लाळन्यायें ईश्वरमुख्य । निमित्तकारण असें ॥ १-२९ ॥
जैसा कुल्लाळ कर्तृत्वे नेमक । होऊनी नेमीतसे घटादिक ।
तैसा शरीरादि अनेक । ठाई नेमीतसे ॥ १-५१ ॥

किंवा हें सारें कर्तृत्व एका ईश्वराचें आहे, याचें स्पष्टीकरण असें केलें आहे :

म्हणोनि रथाऐसें कर्तृत्व हें । बहुताचे म्हणती जरी ॥ १-४१ ॥
तरी तया रथासी उभारणी । सूत्र येक आचार्याचेनि ।
होय प्रसिद्ध म्हणोनि । अनेक कर्ता न घडे ॥ १-४२ ॥

किंवा ईश्वराचे गुण असे वर्णिले आहेत :

पल्लवकूष्मादि साध्यसाधक । होय तैसा सकळिक ।
उत्पन्नकर्ता मुख्य । ईश्वर आपण ॥ १-४८ ॥

अशा ठिकाणीं सांकेतिकता जाणवतहि नाहीं. बौद्धमतदेखील किती थोडक्यांत दिलें आहे पाहा,

दीपज्वालपरी । क्षणीक भोग भासे वेव्हारीं ॥ १-१५२ ॥

किंवा अंतरात्म्याचें व विषयांचें वर्णन,

कमळपत्रोदकन्याये यथार्थ । जीव संसाराआंत ।
असे लिप्त अलिप्त । तो अंतरात्मा ॥ १-४३२ ॥
शुक्तिकाकार रजताकार । स्वप्नविषय दिसत ॥ १-३९५ ॥

'जगत् कैसें दिसत' या प्रश्नाचें उत्तर अत्यंत मार्मिक दाखला देऊन कवीनें दिलें आहे,

जैसे चित्रांत लिहिले प्रतिमेचें । प्रावर्णयुक्त नाना वर्णांचे ।
परि शीतादि निवृत्ति साचें । करावयां असमर्थ ॥ १-४५९ ॥

चित्रांतल्या प्रावरणाचा हा दाखला जगाला योग्य नाहीं, असें कोण म्हणेल?

व्यष्टि आणि समष्टि यांचे संबंध स्पष्ट करावयाला एक उदाहरण दिलें आहे,

अनेक वृक्षवन । संमोह मिळोन ।
येकचि वन । म्हणवी जैसे ॥ १-४८१ ॥

याखेरीज आणखी कितीतरी उदाहरणें आपणांस मिळतील. त्यांत कवित्वाचें दर्शन घडतें.

जग मिथ्या आहे, हा विचार किती सुंदर रीतीनें व्यक्त झाला आहे.

गगनकूष्मांड ऐसें सर्वथां । शून्यसत्य ॥ १-५३५ ॥
म्हणोनी स्वप्नइंद्र । जाला ऐसा प्रकार ।
कां गंधर्वनगर । न्यायेपरी ॥ १-५३७ ॥
कां स्वप्नीं गजादीक दोषें । देखोनी भयविशेषें ।
तें प्रबोधें भय नासें । तैसी माया मिथ्या ॥ १-५३८ ॥

मायेचा मायावीपणा आणखी एका ओवींत असाच सुंदर तऱ्हेनें सांगितला आहे,

आणि रज्जुसर्प स्थाणुचोर । स्वप्नींइंद्रजाला गंधर्वनगर ।
शुक्तिकारजत नभनीळवर्णाकार । मरीचीकाजळ ॥ १-६३५ ॥

परंतु मिथ्याज्ञानानें सत्यसिद्धि कशी होऊं शकते हेंहि विशद केलें आहे,

भ्रांतिस्वप्नवेशेंकरुनी । वनितादि संभोगाचेनि ।
वीर्यस्खलित स्वप्नीं । होय सत्य ॥ १-८८३ ॥
यथार्थ नव्हे दर्पणाआत । प्रतिबिंब सत्य ।
मुखलावण्यें अत्यंत । सादृश्य होय ॥ १-८८५ ॥

देहवासना संपल्यावर मुक्ति मिळते, हें सांगण्यासाठीं एक मजेशीर दृष्टान्त कवि देतो,

रुक्षाग्री वळघलियां पुरुषा । रुक्षशाखा भंगलिया जैसा ।
मध्ये निराधारसरिसा । वोळंबत असें ॥ १-९७५ ॥
पतनासी अनिछा परी । पडेल साचोकारीं ।
तैसे देहवासना नसे तरी । मुक्ति निश्चयें ॥ १-९७९ ॥

ज्ञानी पुरुषाचें वर्णन कवीनें विस्तारानें केलें आहे. ज्ञानी माणसाच्या कर्माबद्दल कवि म्हणतो,

जैसा काष्टांत वन्ही वसें । परी ते वन्हींआंतु काष्ठ नसे ।
तैसा कर्मद्वय वेव्हारी असें । विवेकिया ॥ १-१०१९ ॥
जैसा दावाग्नी अवरला पर्वत । तयांसी मृगपक्षी नाश्रित ।
तैसे नातळे सुकृत दुष्कृत । ज्ञानाग्निदग्धपुरुषा ॥ १-१०२१ ॥

ज्ञानाचा प्रभावसुद्धां कमी नाहीं. कवि म्हणतो,

अणीक जीवन्मुक्ताचे संचित । कर्म तें ज्ञानाग्नीनें भस्मीभूत ।
होय जैसें तृणाहुत । परि जाणावें ॥ १-१०६० ॥

एवढेंच नव्हें तर त्याला पुन्हां जन्म नाहीं. भाजलेलें धान्य जसें उगवत नाहीं, त्याप्रमाणेंच—

भाजिले चणवट भोग्य । मंत्रासीच योग्य ।
परी अंकुरोत्पत्ती प्रयोग । कारण नाहीं ॥ १-१०६३ ॥

हा दृष्टान्त नवा नसला तरी समर्पक आहे. अशा जीवन्मुक्ताची कवि प्रशंसा करतो,

श्रिताश्रित मरुतवशें । मेघपटलीं गगनाऐसें ।
निर्मळ असें । सत्यार्थ जाणावे ॥ १-११६१ ॥
निजभर्तृचेनि संगे । सुरतक्रीडानंद भोगें ।
असणें पुश्चलीसि प्रसंगें । तैसे स्वभावसिद्ध ॥ १-११६३ ॥
आणीक विराटपुरुषा । ऐसा गुह्यानंदसुखा ।
स्त्रीलंपटा होऊनि अशेखा । असिला तरी ॥ १-११८१ ॥

जीवन्मुक्ताला येणाऱ्या अनुभवाचें वर्णन पाहण्यासारखें आहे,

अणीक ब्रह्मज्ञान उदय । जालियां ज्ञानोदय ।
उत्तम सूर्योदय निःसंशय । मयवृत्तिन्यायें ॥ १-१०४५ ॥

एके ठिकाणीं अहंकाराला चुंबकाचा दृष्टान्त दिला आहे,

जैसे चुंबकाचेनि । सन्निधानेकरूनी ।
जड लोहालागूनी । चेष्टा होय ॥ १-७७० ॥

अज्ञानाचें उदाहरण म्हणून दशमपुरुषाचा विनोदी दृष्टान्त दिला आहे.

कश्चित् दशमपुरुष पूर्वीं । उतरोनियां जान्हवी ।
वरी आपणासी स्वभावीं । विचारू ठेले ॥ १-८१७ ॥

ते समईं क्रमेकरूनी । नवसंख्यपुरुष मेळऊनि ।
अपणासी विचारोनि निदानी । तें अज्ञान म्हणवीं ॥ १-८१८ ॥

या अज्ञानावर उतारा म्हणून तत्त्वमसि दृष्टान्त सांगितले आहेत,

दशमपुरुषाचें मरण । दुःखभाव निरसून ।
तूचि दशमपुरुष आपण । तैसे सत्य स्वभावसिद्ध ॥ १-८७१ ॥

याच्या जोडीला आणखी दोन राम (१-८६९) व कर्ण (१-८७०) यांचे दृष्टान्त सांगितले आहेत. अशा तऱ्हेनें पहिल्या परिच्छेदांत सुलभ वेदान्त-कथन केलें आहे.

इति सकळ वेदशास्त्रार्थ । मुख्य निरोपिला प्राकृत ।
अधिकारियासि क्लप्त । होय तैसा ॥ २-१ ॥

असे उद्गार कवीनें दुसऱ्या परिच्छेदाच्या प्रारंभीं काढले आहेत.

दुसऱ्या परिच्छेदांत 'शिवसिद्धांततत्त्वकथन' आहे. भाष्याला येथें फारसा वाव नाहीं. त्यामुळें कवित्वालाहि अवसर कमीच. कन्या—सल्लक्षण, दुर्लक्षण, शकुन—अपशकुन, आणि नीतिसंग्रह हे या परिच्छेदांतील तीन भाग स्वतंत्र काव्य म्हणून वाचले तरी समाधान करणारे आहेत.

'नीतिसंग्रहांत' संस्कृत सुभाषितांचे पडसाद असले तरी कवीचे बारीक-सारीक अनुभव व निरीक्षण यांचा प्रत्यय येतो.

पहिल्या दोन परिच्छेदांतील काव्याचें स्वरूप हें असें आहे. त्यांतील भाष्याचें सौंदर्य, साधेपणा व सोपेपणा यांत आहे. त्याबद्दल कवीच्याच शब्दांत असें म्हणतां येईल:

अनयासें तत्त्वविचार । अभिव्यक्त ॥ १-२५ ॥

विचारसौंदर्य पाहात असतांनाच आपल्याला 'विवेकचिंतामणीं'तील कल्पना-सौंदर्याची कांहींशी कल्पना येते. कवीच्या कल्पनाशक्तीला वाव आहे तो पुढल्या परिच्छेदांत. येथें दृष्टान्तांबरोबरच वर्णन करण्याची कवीची कला दिसून येते. हा कवि चांगला 'निवेदनकार' कवि आहे. त्याच्या निवेदनांत ढंग आहे आणि वर्णनांत रंग आहे. कवीनें वेदागम-पुराणांबद्दल म्हटलें आहे,

क्षीर आणी शर्करा । मधुयुक्त जालिया येकत्रा ।
अति मधुरोत्तरा । रसीक होय ॥ ३-५ ॥

तेंच त्याच्या काव्यांतील विचार, कल्पना आणि मांडणी यांच्या सुरेख संगमाबद्दल म्हणतां येईल.

याच तिसऱ्या परिच्छेदांत अठ्ठावीस नरकांचें, पातकांचें, आकाश, वायु, जल यांच्या ' पंचीकृता'चें आणि मृत्यु केव्हां येतो त्याचें तपशीलवार वर्णन आहे. त्यांतहि सुंदर कल्पना आढळतात,

ध्रुव आणी अरुंधती । चंद्रछाया महापथ इति ।
न दिसे तरी येक वर्षा प्राप्ती । मरण होय ॥ ३-१६८ ॥
अकस्मात आपुलें शरीर । अतिस्थूळ नातरी अति कृशाकार ।
अथवा अतिकृष्ण देखिले गौर । तरि अष्टमासा मृत्यु ॥ ३-१७२ ॥
अभ्ररहीत निजदक्षिण दिशेसी । कां उदकांत इंद्रचाप आपणासीं ।
दिसे तरी त्रिमासीं का द्विमासीं । देहनाश होय ॥ ३-१७७ ॥
दक्षिणदिशे जातां स्वप्नीं । आपणासी कृष्णवस्त्रधारिणी ।
दिसे पुरुष आणि कामिनी । तरी शीघ्र मृत्यु ॥ ३-१८२ ॥

मरणाच्या पूर्वसूचनांचें हें वर्णन सुंदर नाहीं काय ? मृत्यूच्या पावलांचे आवाजच कवीनें ऐकविले आहेत.

सप्तपाताळांच्या वर्णनांत,

महातळ रसातळ । तळातळ सुतळ ।
नितळ वितळ । अतळ ॥ ३-२१२ ॥

या साऱ्यांचें अद्भुत वर्णन आहे. त्यांचें सौंदर्य एका ओवींत आलें आहे,

म्हणऊनियां प्राकारें । गोपुरादी विचित्रें ।
रचनेनें मनोहरें । रसरंजित ॥ ३-२१४ ॥

चवथ्या परिच्छेदांत जंबुद्वीपाचें वर्णन आहे. लांबी, रुंदी, इत्यादि तपशील अशा वर्णनांत सर्वत्र आढळला तरी येथें केलेलें काल्पनिक नगरांचें वर्णन मनोहर आहे. त्याच्याच जोडीला उत्कृष्ट असा वृक्षां-पक्ष्यांनीं जिवंत व बोलका झालेला निसर्ग आहे.

आणि मेघविघ्नावती । सुंदर कामावती ।
सावर्णी सुमती । कुसुमावती ॥ ४-५० ॥

अशीं नगरांचीं नांवें आढळतात. या नगरांचें सौंदर्य ' पल्लव-तोरणांनीं ' वाढलें आहे.

पल्लवतोरणें । देखिलिया नयनें ।
संतोष होय तैसी स्थानें । मनोहर ॥ ४-१३० ॥
मंदार पारिजात संतान । कल्पवृक्ष हरिचंदन ।
म्हणिजे पंच निर्जन । सुरतरू असती ॥ ४-११३ ॥

असे ' सुरतरू ' नगरोद्यानांत आहेत. शिवाय,

कमळकुमुद कल्हारादिक । कंज कुसुमें ॥ ४-११५ ॥
जाईजुई मोगरें । लतासुमनें परिकरें ।
मधुमती आदि विस्तारें । कल्पलतासहित ॥ ४-११७ ॥

अशा ' कल्पलता ' आहेत.

इक्षु पुंडरीकक्ष कर्दळी । कर्पूरकर्दळी नारिकेळी ।
सुगंध नारेळी । फणस रसफणसे ॥ ४-११८ ॥
च्युतच्युतिक जंबू । पूग पुन्नाग खर्जुरी कदंबू ।
केशरीमधुमलयजयंबू । मंदार बदरी ॥ ४-११९ ॥

असे ' विशेषतरू'हि आहेत. पण या सगळ्याला जिवंतपणा आणला आहे पक्ष्यांनीं व प्राण्यांनीं. त्यांत पुढील प्रमुख आहेत,

चकोरचक्रवाक । हंसराज हंसादिक ।
महापक्षी अनेक । संमोहातें ॥ ४-११६ ॥
शुकपीकमयुर । कपोत पारवे मयोर ।
दुराद्यादि विचित्र । पक्षी संमोहानें ॥ ४-१२६ ॥

त्याचप्रमाणें ' विद्याधर अप्सरसयक्षराक्षसगंधर्वकिन्नरादिक पुरुष ' आहेतच. देवगणिकांमध्यें कवीनें आवर्जून पुढील नांवें ' घेतलीं ' आहेत,

रंभा उर्वशी । तिळोत्तम चित्ररेखा मंजुघोषी ।
मेनिका सुकेशी । आदि देवगणिका ॥ ४-१३७ ॥

या देवगणिकांचा संचारहि या नगरांत आहे. या सर्व निसर्गवर्णनांत ( आणि नगरवर्णनांतहि ) कवि अनेक गोष्टींची यादी देतो. त्यांत स्वतंत्र कल्पना आणत नाहीं.

कल्पनासौंदर्याचा आढळ अधिक प्रमाणांत होतो सहाव्या परिच्छेदांत. दिवस, रात्र, सूर्य, चंद्र, नवग्रह, मेघ या सर्वांचें वर्णन त्या दृष्टीनें पाहण्यासारखें आहे. त्याची कल्पना तडिल्लतेसारखी डोळे दिपविणारी नसली तरी आल्हादक खास आहे.

कवीनें मेघांची नामावलि ( वारिधर, जीमूत, घरमेघ इ. ) तर दिली आहेच, पण मेघवर्णनांत एके ठिकाणीं तो कालिदासाचा अनुवाद करीत आहे, हें ध्यानांत येऊन मौज वाटते,

अणीक येथे धूम ज्योती । मारुत सलिल इति ।
येककूटें मेघ तया मेघाअती । वृष्टि होय ॥ ६-४५ ॥

येथें ' धूमज्योतिःसलिलमरुतां संनिपातः क्व मेघः ' या काव्यपंक्तीची आठवण होणें स्वाभाविक आहे. मेघांनीं त्याच्या कल्पनेला स्फुरण दिलें आहे. कवि मेघाला ' विमानस्थानक ' म्हणतो ( ६-१३४ ) आणि त्याला मेघ ' अभ्रकथराचे परी ' वाटतात. ( ६-९५ ). अभ्रकासारखे मेघ वाटणें कविदृष्टीलाच शक्य आहे.

सूर्याचें वर्णन असें केलें आहे,

हिरण्यकेशमुख । रोमानें अतिप्रकाशक ।
कमळादि धरूनि चतुष्क । भुजाने शोभे ॥ ६-१५६ ॥
किरट केयूर कुंडला । आदि अनेक अभरणे सकळा ।
वस्त्रगंधमाळा । अळंकृत होऊनी ॥ ६-१५७ ॥

त्याचे घोडेदेखील,

सप्तवारू मनोवेगीं । अपाडाचे ॥ ६-१६२ ॥

आणि रथाचें भ्रमण कुल्लाळचक्राप्रमाणें ( ६-१६३ ). त्याला चंद्र,

मोगरियाच्या पुष्पपरी । श्वेताकार ॥ ६-२१८ ॥

वाटतो. नवग्रहांचें ' रंगीत ' वर्णन आहे. मंगळाचा पद्मपरागवर्ण, बुधाचा कुंकुम, बृहस्पतीचा तप्तकांचन, शुक्राचा कुंदन आणि शनैश्चराचा बीजांजन. हें सारें वर्णन देवलोकाचें.

' विवेकचिंतामणि ' म्हणजे अनेक कला-विद्यांचें माहेरच आहे. कामशास्त्र, साहित्य, संगीत, शस्त्रें, खेळ इत्यादि आणखी कांहीं विषय ग्रंथभर पसरले आहेत. कवीची विद्वत्ता व बहुश्रुतता येथें चांगली ध्यानांत येते.

काम म्हणजे एक पुरुषार्थ याच दृष्टीनें कामशास्त्रांतील कांहीं भाग मांडला गेला आहे.

चवथ्या परिच्छेदांत नायक, नायिका, अष्टनायिका, हस्तिनी, पद्मिनी इ० स्त्रीभेद, चुंबन व दंतक्षतप्रकार यांसारखे विषय आले आहेत.

याच ठिकाणीं गर्भोत्पत्ति, गर्भविकास, गर्भनिश्चिति यांची चर्चा करणाऱ्या गर्भोपनिषदाचा विचार करावयास पाहिजे. स्त्री ' रुतुवंती ' झाल्यावर पंधरा दिवसापर्यंत समागम झाल्यास गर्भोत्पत्ति होते, असें सांगणारी पुढील ओवी पहा—

जैसें शुक्तीचे ठाई पडोनी । स्वातीउदक बद्ध होऊनी ।
मौक्तिक होय संयोगाचेनि । तैसा पिंड जाला ॥ ९-८७ ॥

( ८८ ते ९६ ) या ओव्यांत गर्भाचा दर महिन्याला विकास वर्णिला आहे. अपत्य काय होणार, त्याबद्दल कवि सांगतो,

शुक्लाधिकानें पुरुष । शोर्णिताधिकानें स्त्रीवेश ।
शुक्लशोर्णित समाने निर्जस । नपुंसक होय ॥ ९-१०५ ॥

आणि ' कर्मवैचित्र्यामुळें स्त्रीला पुरुषाचा व पुरुषाला स्त्रीचा जन्म मिळतो, असेंहि कवि म्हणतो,

अणीक त्या कर्मवैचित्राचेनि । पुरुष तो होय कामिनी ।
कामिनी ते पुरुष होऊनी । जन्मत असे ॥ ९-११९ ॥
मी अहंस्वामी दीर्घ । मी सुंदर मी योग्य ।
मी कुसुम मी पुष्टांग । म्हणोनी इत्यादि ॥ ९-५ ॥

असे ' जाले मूढ जन हे ', ( ओ. ९-३ ) म्हणून कवीनें,

इति सकळभुवन । पद्धती विवरून ।
सांगीतली भिन्न । ...॥ ९-१ ॥

आणि त्याचप्रमाणें

तारतम्यानें समस्ती । मत्ताभिमानें जीवजाती ।
तयासी होय जे जे गती । तें सांगीतलें ॥ १०-१ ॥

असेंहि म्हटलें आहे.

प्राणत्यागाचें फळ तपशीलवार कथन केलें आहे. प्राण गुदगुह्यांतून गेला तर पिशाचलोक, श्रोतृरंध्रमुखें पितृलोक, मुखें दैत्यलोक, नेत्ररंध्रें स्वर्गलोक, आणि नासिकें मृत्युलोक, यांची प्राप्ति होते.

' विवेकचिंतामणीं 'त साहित्यविचारांचा सुगंध चांगला दरवळत आहे. काव्याचे छंद, अलंकार, रस, रीति, गुण या सर्वांची कवीला माहिती आहे.

आणीक तेथे युक्ति प्रयुक्ती । मध्यमप्रतिष्ठा सप्रतिष्ठा गायत्री ।
उष्णिक् अनुष्टुक् बृहती । पंक्ती त्रिष्टुप् ॥ ३०१ ॥
जगती अतिजगती । शुक्वरी अतिअध्यष्टी धृती ।
अतिधृति कृती प्राकृती । अतिकृति हे ॥ ३०२ ॥
विकृति संस्कृती । अभिकृती उत्कृती ।
म्हणिजे षड्विंशती । छंदरव जाणोनियां ॥ ४-३०३ ॥

छंदांची संख्या सव्वीस सांगितली आहे.

अलंकारांमध्यें ' समासोक्ति पर्यायोक्ति ' ( ४-३०४ ) पासून प्रारंभ करून ' भाविक उदात्त म्हणिजे पांसष्टि इति ' असे अलंकार दिले आहेत. रस, रीति, गुण सांगतांना नवीन कांहीं येत नाहीं. भाषाभेद ' कविश्वरयुक्त ' आहेत, असें म्हणून,

संस्कृत प्राकृत अपभ्रंश । पिशाचकादि भाष ॥ ४-३२१ ॥
असे भाषाभेद दिले आहेत.

दुसऱ्या परिच्छेदांत ‘ चतुर्विधवाक् ’ स्वरूपांचें विवेचन आढळतें. तसेंच लक्षणादि शब्दशक्तींबद्दलहि चर्चा आढळते.

गंगाजळाभीतरीं । नाहीं सर्वथा नगरी ।
असे गंगेचे तिरीं । हें जहल्लक्षण ॥ १-८४८ ॥

अशा तऱ्हेचा साहित्य-विचार या ग्रंथांत आहे.

संगीताच्या अंगोपांगांचें ज्ञान कवीला आहे. स्वर, राग, ताल, आरोह, अवरोह, मात्रा, इ० संगीताच्या अंगांचें विस्तृत वर्णन चवथ्या परिच्छेदांत आलें आहे.

‘ मधुरमंद्रतार ’ असे स्वरप्रकार ( ४-४०८ ) आणि ‘ षड्जादि सप्तस्वर ’ ( ४-४०९ ) यांची माहिती कवि देतो. ‘ मधुमाधवीशंकराभरण ’ ( ४-४६२ ) यांच्यापासून,

अष्टविध गौळ । साळंगाचे मित्रराग ॥ ४-४९५ ॥

यांच्यापर्यंत रागांचे विविधप्रकार सांगितले आहेत.

‘ गीतं वाद्यं च नृत्यं च त्रयं संगीतमुच्यते ’ अशी कवीची धारणा दिसते. म्हणून गीताबरोबर वाद्याचाहि विचार त्यानें केला आहे. मृदंग ( ४-५१० ), त्यानंतर ‘ मुखें फुंकूनि वाद्यवायन ’ आणि,

काहळापट्टाहशंख । भेरी जेंगटादिक ॥

अशीं वाद्यें दिलीं आहेत. कश्यप, ब्रह्म, सारंग, रुद्र, इ. वीणांचे प्रकार मिळून,

द्वेविंशती । प्रकारतंती । वाद्य म्हणवी ॥ ४-५१७ ॥
असें तो म्हणतो.

तालांचे भंगताळ, उपभंगताळ, विभंगताळ इ. प्रकार सांगितले आहेत ( ४-५५० ).

सांगीतले भरत । शास्त्र प्रणित योग्यत ।
योग्यतालधरवंत । संमेळेसी ॥ ४-५५२ ॥

असा भरताचाहि निर्देश आढळतो. नृत्य आणि नाट्य ( नृत्, नट् ) या दोन्ही कल्पना येथें एकच दिसतात. म्हणून पुढें लगेच नाटकाचा उल्लेख येतो.

अणीक नाटकाचे ठाईं दिनदिनास । विचित्र म्हणोनी रस ।
भावसंविधानआश्रय म्हणिजे प्रबोधांश । चतुष्टें जाणोनि ॥ ४-५५३ ॥
मुख दृष्टि हस्त । पाद अंगादि समस्त ।
अभिनव यथातथ्य ।....... ॥ ४-५५४ ॥

पाहिजे, असेंहि कवि म्हणतो. याच संदर्भात 'तांडवनृत्या'चा निर्देश कवीनें केला आहे (४-५५८).

इतिगुणानुग्रण जालें वाद्य । वाद्यानुगुण्यसार नृत्यभेदें ॥ ४-५६० ॥

असें वाद्य व नृत्य यांच्यांतील नातें कवि शोधतो.

विविध शस्त्रांचे उल्लेख चवथ्या परिच्छेदांत आहेत. खड्ग, करा, कुठार हीं नांवें नवीन नाहींत. फरशपट्टी, जमदाड, छुरि, हीं नांवें अन्यत्र आढळण्यासारखीं आहेत. परंतु, लौडी, बाकुलें, जांबळिया, कीरस, कंकडायुध, शेणायुध या नांवांचा विचार व्हावयास हवा.

लौडी आणि बाकुलें हीं नांवें कानडीवरून आलीं असावींत. 'लोडु' हें गदेसारखें आयुध असतें. 'बाकु' म्हणजे तलवार. या दोन शब्दांवरून लौडी व बाकुलें हे शब्द मराठींत कवीनें बनविले असावेत. कंकडायुध म्हणजे बाण, असा अर्थ घ्यावासा वाटतो. कंक म्हणजे बगळा, क्रौंच. त्याचीं पिसें बाणाच्या शेवटीं लावत असत, अशी माहिती शब्दकोशांत मिळते. उरलेलीं नांवें चिंतनीय आहेत.

येथेंच कांहीं खेळांचा उल्लेख करावयाला हरकत नाहीं. (राज)सभेचें वर्णन करतांना हीं नांवें येतात,

संगीतसाहित्यादिक विद्या संभाषणें । मळमहिषादि युद्धरचनें ।
सारी सतरंज द्युत विनोदाने । विराजत असती ॥ ४-१३८ ॥

सारी (सारीपाट), सतरंज (= बुद्धिबळ. हा शब्द हवा तर फारशी मानावा. 'चतुरंग' वरून तो सिद्ध होतो.) आणि द्यूत (जुगार) अशीं तीन नांवें येतात.

देशवर्णनांत तापी वगैरे नद्यांचा उल्लेख येतो (४-५७८ ते ८४). श्रीशैल्य, उज्जनी, कुंभकोण इ. पवित्र स्थळें (४-५८६ ते ५९५) आणि

वाराणसी विशालाक्षी । कंचीपुरी कामाक्षी ।
लंकास्थानीं शांकरिकी । कोल्हापुरीं महालक्ष्मी ॥ ४-५९० ॥

हींहि नांवें आढळतात.

अणीक अयोध्या मथुरावती । मायापुरी काशी कांती ।
अवंतिका द्वारावती । म्हणिजे सप्तपुरी ॥ ४-५९८ ॥

या ' सप्तपुरी ' वर्णनांत पुढील संस्कृत श्लोकाचा अनुवाद आहे :—

अयोध्या मथुरा माया । काशी कांची अवंतिका ।
पुरीद्वारावती चैव । सप्तैते मोक्षदायकाः ॥
द्राविड कर्नाटक । म्हणिजे छपन्न देश ॥ ४-६१० ॥

असें म्हणून कवीनें वंग, कलिंग, मरहट, अशीं नांवें दिलीं आहेत.

यानंतरे काम्य कानडा अंध्र आणी द्राविड ॥ १-९४ ॥

अशा चार जाती सांगितल्या आहेत.

माणसांच्या वर्णनाकडे कवीचें लक्ष नाहीं. द्वीपांतील माणसांचें ( काल्पनिक!) वर्णन म्हणजे केवळ उंची दिली आहे. त्यामुळें कालविपर्यासासारखा प्रकार येथें आढळत नाहीं.

दहाव्या परिच्छेदांत ' काळकर्म विशेष ' हा विषय आहे. सूक्ष्म व स्थूळ काळाच्या गणनेचीं परिमाणें सांगून,

तिथि वार नक्षत्र योग । करण मणिजे पंचांग ॥ १०-३६ ॥

यांचेंहि विवेचन केलें आहे. ऋतु, अयन, संवत्सर, युग हेहि विषय त्यांत आहेत.

' विवेकचिंतामणी'चें अंतरंग असें आहे. त्याची रचना प्रसन्न असली तरी कांहींशी शिथिल आहे. सामान्यतः ओवी तीन चरणी आहे. पण कांहीं ठिकाणीं तिची लांबी कमी-अधिक झाल्याचें दिसतें.

याच शैथिल्याबरोबर शब्दांची ओढाताण करून अर्थ लावावा, अशी शब्दरचनाहि आढळते. पण अशीं स्थळें थोडीं आहेत. एकंदर रचना प्रसन्न आहे असें म्हटलें पाहिजे. विचार, कल्पना आणि रचना यांचा मागें म्हटल्या-प्रमाणें संगम झाला आहे. आपण दृष्टान्त आणि कल्पनासौंदर्य यांचा विचार केला. अनुप्रास तर कवीचा आवडता अलंकार आहे.

कलहप्रिया काकदृष्टिणी । कामरूपी काळी किंकिणी ।
कपाळी वीर कौमारिणी । विरूपाक्षी ॥

अशीं कितीतरी उदाहरणें देतां येतील.

वेगवेगळे ' न्याय ' त्याचे आवडते आहेत. कमळपत्रोदक, वावडि, कातरि, घृतकाठिण्य, घटाकाश, कुलाल, पारिशेष, गंधर्वनगर, प्रतिबिंब, तंतुपट, लोहकांतातर-कुंतन, तमचक्षु, निस्तरंगसागर, व्याघ्रसंदर्शन, रज्जुसर्प, रक्तस्फटिक, अशा कितीतरी न्यायांचा कवि उपयोग करतो.

## १०. ' विवेकचिंतामणी 'चे आधारग्रंथ

' विवेकचिंतामणि ' हा एक अनेक विषयांचा कोश ( Encyclopaedia ) आहे. निजगुणशिवयोगींसंबंधीं व त्यांच्या या बृहद्ग्रंथासंबंधीं ई. पी. राइसनीं म्हटलें आहे : " His best known work is the Vivekachintamani, a very useful encyclopaedia of Sanskrit terms and Veerashaiva lore."[१२२] अशा ग्रंथाला इतर अनेक ग्रंथांचा आधार घ्यावा लागतो.

" यांत ७५० विषयांपेक्षां जास्त विषयांवर माहिती आली असून यांत श्रीनिजगुणांच्या विद्वत्तेची व षट्शास्त्रसंपन्नतेची साक्ष पटते ;"[१२३] हें श्री. ना. ब. जोशी यांचें मत योग्य असेंच आहे. निजगुणांच्या ज्ञानाला मर्यादा नव्हती व बुद्धीला अ-विषय असा कांहीं नव्हता. त्यांच्या काळीं उपलब्ध असलेल्या सर्व ज्ञानांगांशीं त्यांचा सूक्ष्म परिचय होता. ते स्वतःच एक ' ज्ञानकोश ' होते. ते निव्वळ ज्ञानी नव्हते तर महान् अनुभवी होते. त्यांच्या ज्ञानाला अनुभवाचें अधिष्ठान होतें.

या ग्रंथांत त्यांना ' वेदपुराणशास्त्र । नेमूनि मुख्य सारांतर ' ( १-११ ) प्रकट करावयाचें होतें. ' सकळ सन्मतीं ' ' महानुभव सत्य सिद्धार्थ ' सांगावयाचा होता ( १-१२ ). हें करतांना आपण वेद, आगम, स्मृति, पुराण, इतिहास यांना अनुसरणार आहोंत ही गोष्ट ग्रंथारंभींच त्यांनीं स्पष्ट केली आहे :—

म्हणोनि वेदागमस्मृति । पुराण इतिहास पुरातनयुक्ती ।
अनुसारें सांगिजेल पद्धती । अनुभविया मानें ऐसे ॥ १-२१ ॥
नव्हे स्वकपोळ कल्पित । सकळसारांतर रहस्यार्थ ।
स्वरूपाचा सत्यार्थ । संग्रह कीजेल ॥ १-२२ ॥

जणूं ' नामूलं लिख्यते किंचित् ' अशी प्रतिज्ञा करूनच ते लिहावयास बसले आहेत. ' जगस्वहीतनिमित्यें ' त्यांनीं ही,

पूर्वाचार सिद्ध वचनीं । शास्त्ररचना केली ॥ १-२६ ॥

' प्रमाणग्रंथविभागां 'त ( २-११७७ ते ११८१ ) त्यांनीं सूतसंहिता, पाराशरपुराण शिवगीता, शिवराघवसंवाद, वायवीयसंहिता, शैव, पाशुपत, सोम, लाकुल, भागवत, व शिवसिद्धांत या ( मतांचा वा ) ग्रंथांचा निर्देश केलेला आहे.

---

१२२. History of Kanarese Literature, p.
१२३. श्रीनिजगुणशिवयोगी : काल व कार्य, पृ. ५.

ज्या आगमांचा आधार निजगुणशिवयोगी घेतात त्या आगमांचा काळ, उगम आणि तत्त्वज्ञान यांचा थोडाफार विचार करणें जरुरीचें आहे. प्रा. म. रे. साखरे यांनीं आगमांसंबंधीं केलेलें विवेचन मौलिक आहे.[१२४]

शैवागम, शाक्तागम आणि वैष्णवागम असे तीन प्रकारचे आगम असून त्यांत शिव, शक्ति आणि विष्णु या इष्टदेवता किंवा आराध्यदेवता मानल्या आहेत. आगमांना ' तंत्र ' असेंहि नांव दिलें जातें. माधवाचार्य " तदुक्तं तंत्रतत्वज्ञैः " असें जेव्हां म्हणतात तेव्हां तेथें आगम हाच अर्थ अभिप्रेत असतो. परंतु सामान्यतः शैवागमांसाठीं आगम व शाक्तागमांसाठीं तंत्र अशीं नांवें वापरलीं जातात.

येथें शैवागमांचीच थोडीशी चर्चा करावयाची आहे. एकूण २८ आगम असून त्यांतील फारच थोडे प्रसिद्ध झालेले असल्यामुळें अजून त्यांचा व्हावा तसा चिकित्सक ( Critical ) अभ्यास झालेला दिसत नाहीं. त्यांच्या काळाचा विचार करतां आगमांची रचना ब्राह्मणग्रंथांच्या काळापासून होऊं लागली होती असें मत नारायणस्वामी अय्यर यांनीं दिलेलें आहे.[१२५] श्वेताश्वरोपनिषद् व गीता यांच्यावर आगमांचा प्रभाव दिसतो; त्यांचें स्वरूप आगमांशीं जुळतें आहे असें प्रा. साखरे यांचें म्हणणें आहे. गीतेंतील वेदविरोधी वचनांत त्यांना हा आगमांचा प्रभाव दिसतो. गीता व आगम यांतील कांहीं साम्यस्थळें त्यांनीं दाखविलीं आहेत. या साम्यस्थळांची संख्या ४४ असून त्यांत पारमेश्वरागम ( ३३ ), सूक्ष्मागम ( ७ ), देवीकालोत्तरागम ( ३ ) आणि कामिकागम ( १ ) यांतील श्लोकांचा समावेश आहे. मुख्यतः पारमेश्वरागम आणि गीता यांच्यांत अधिक साम्यस्थळें दिसतात. त्यांच्या आधारें एखादा निष्कर्ष काढावयास पारमेश्वरागमाची कालनिश्चिति करणें आवश्यक आहे. ती होईपर्यंत हा मुद्दा अनिर्णीत राहिला तरी महाभारतांतील आगमशास्त्रांच्या उल्लेखावरून[१२६] आगम हे प्राचीन आहेत असें मानावें लागेल.

आगमांचें मूळ ( Source ) शोधण्याचाहि प्रयत्न झालेला दिसतो. याबाबतींत तीन मतें पुढें आलेलीं आहेत. आगमांचा उगम ब्राह्मणग्रंथांतून झाला व पुढें उपनिषदांप्रमाणेंच त्यांची वाढ झाली असें एक मत आहे. तिरुमूलर, हरदत्त शिवाचार्य आणि श्रीकंठ या शैवसिद्धांताच्या आचार्यांनीं वेद व आगम यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. त्यांमध्यें विरोध नाहीं असें

---

१२४. Introduction to Lingadharana Chandrika, p. 237–303.

१२५. Siddhanta Deepika, Vol. VI, p. 136.

१२६. महाभारत, शांतिपर्व, अ. २६८ : ' ऋते त्वागमशास्त्रेभ्यो ब्रूहि तद्यदिपश्यसि '.

म्हटलें. ‘सिद्धांतो वेदसारत्वात्’ आणि ‘वेदांतार्थमिदं शास्त्रं सिद्धांतं परमं मतम्’ या सुप्रभेदागमांतील व मुकुटागमांतील उक्ति या मतास पाठिंबा देतात.

आगम हे उपनिषदांतील शिकवणच सांगतात असा डॉ. व्ही. व्ही. रामनन् यांचा अभिप्राय आहे.[१२७] सूर्यनारायणशास्त्री यांचेंहि असेंच मत दिसतें.[१२८]

तिसरें मत म्हणजे आगमवाङ्मय हें स्वतंत्र असून त्याचा वेदांशीं संबंध नाहीं. आगमांचें मूळ वेदांत नसून तमिळमध्यें आहे. परंतु आगमांच्या मुळाशीं असणारे हे तमिळ आधार आज उपलब्ध नाहींत.

या तीन मतांपैकीं तिसरें मत प्रा. साखरे यांना मान्य आहे. त्यांनीं वेद आणि आगम यांतील भेदस्थळें स्पष्ट केलेलीं आहेत. वेदांतील यज्ञप्राधान्य आगमांत नाहीं; वेदांत अनेक देवतांची उपासना आहे, तर आगमांत एकाच देवाला उपास्य मानलें आहे; वेदांत प्रतिमापूजा नाहीं, पण आगमांत आहे; आगमांत धर्म-मोक्षाचीं द्वारें सर्वांना उघडीं आहेत, तसें वेदांत नाहीं; वेदांत योगाला स्थान नाहीं, परंतु आगमांत आहे; असे कांहीं महत्त्वाचे फरक त्यांनीं सांगितले आहेत.

तंत्रांचा वेदांवरहि प्रभाव पडला. विशेषतः अथर्ववेद व तंत्रवाङ्मय यांचा निकटचा संबंध आहे असें म्हणून आगम व तंत्रें हीं अवैदिक आहेत असेंच आपलें मत प्रा. साखरे यांनीं दिलें आहे. ‘वेदमार्गप्रच्युतानां तंत्रमार्ग-प्रवेशनम्’सारख्या विधानांत वेद व तंत्र यांतील विरोध दिसतो खरा.

आगमांतील विषय क्रिया, चर्या, योग आणि ज्ञान अशा चार पादांत विभागलेले आढळतात. उपनिषदांतील ब्रह्माचें स्थान शैवागमांत शिवाला दिलें जातें. आगम वेदांतांतील मायावाद मानत नाहींत. त्यांत भर आहे तो भक्तीवर. आगम आणि वेद यांच्यांतील भेद लक्षांत घेऊनहि त्यांच्या एक-मेकांवर क्रिया-प्रतिक्रिया झाल्या. त्यांच्यांत कांहीं देवघेव झाली. ‘श्रुतिश्च द्विविधा वैदिकी तांत्रिकी च’ किंवा ‘शिवागमोऽपि द्विविधः श्रौतोऽश्रौतश्च संस्मृतः’ असें म्हणावें लागण्याइतपत त्यांच्यांत जवळीक निर्माण झाली.

शैवागमांचा वीरशैव तत्त्वज्ञानाशीं कोणत्या प्रकारचा संबंध आहे याची थोडीशी चर्चा डॉ. नंदीमठ यांनीं केलेली आहे.[१२९] तिच्याच आधारें हा विषय समजून घेणें योग्य होईल. वीरशैव तत्त्वज्ञानाला ‘वीरशैवसिद्धांत’ किंवा ‘षट्स्थलसिद्धांत’ हें नांव आहे. ‘शैवसिद्धांता’हून हें तत्त्वज्ञान निराळें आहे.

---

१२७. Introduction to the studies in Shaivasiddhanta, p. 4.

१२८. Shivadwaita of Shrikantha, p. 6.

१२९. A Hand-book of Veerashaivism, p. 11-13.

शैवसिद्धांत शैवागमांना प्रमाणग्रंथ मानतो. शैवागमांतील प्रतिमापूजा वीरशैव-सिद्धांताला मान्य नाहीं. दीक्षासमयीं गुरूनें दिलेल्या इष्टलिंगाचीच पूजा—देवळांतील स्थावरलिंगाची नव्हे—वीरशैवांना संमत आहे. वीरशैवसिद्धांत अथवा षट्स्थलसिद्धांत आणि शैवागम यांच्या संबंधाविषयींचा एक समज त्यांनीं नमूद केलेला आहे. आणि तो म्हणजे २८ शैवागमांच्या पूर्वभागांत शैवसिद्धांत व उत्तरभागांत वीरशैवसिद्धांत मांडला गेला आहे. 'विवेकचिंतामणी'च्या द्वितीय परिच्छेदावरून निजगुणशिवयोगींचा असाच समज असल्याचें स्पष्ट होतें. परंतु हा समज कितपत समर्थनीय आहे हें ठरविण्यास आधार उपलब्ध नाहीं, असें ते म्हणतात. निजगुणांना आगम हे अवैदिक वाटत नसावेत असेंहि म्हणतां येईल.

ज्या ग्रंथांचा त्यांनीं आधार घेतला आहे, त्या ग्रंथांतील कांहीं श्लोकांचें स्पष्ट प्रतिबिंब त्यांच्या लेखनांत कसें दिसतें हें पाहणें उद्बोधक ठरेल.

त्या पुराणाचे ठाईं सर्ग । प्रतिसर्ग वंशमन्वंतर ।
वंशानुचरित्र म्हणिजे साचार । पंचलक्षणें ॥ १-१२९ ॥

ही ओवी म्हणजे पुढील श्लोकाचा[१३०] अनुवाद आहे :—

सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तरापिच ।
वंशानुचरिते चेति पुराणं पंचलक्षणम् ॥

तर,

एवं विचरतस्तस्य भवन्त्येते परिग्रहाः ।
विद्याभार्या सुतस्तोषः क्षमाहि परिचारिका ॥
माता भक्तिः पिताऽऽचारः सत्यं नप्ता शमस्सखा ।
वैराग्यं सुहृदाचार्यो दमः श्रद्धा स्वसा मता ॥
दासीत्वहिंसा दासः स्यादस्तेयं परिकीर्तितम् ।
मैत्र्याद्यास्तनयाः प्रोक्ता धर्मोऽसौ वाहनं मतम् ॥
ज्ञानंदेहस्तथा क्षेत्रं विचारस्सर्वगोचरः ।
देशो मोक्षः सुगम्योऽयं प्राणलिंगांगसंगिनः ॥

या श्लोकांचें[१३१] स्मरण पुढील ओव्या वाचून होतें :—

विद्या ते सतीसहित । संतोष तो सुत ।
विराग तो बंधू संतत । क्षमा ते परिचारिका ॥ २-९१६ ॥
शांति ते सखी भक्ति ते माता । आचार तो पिता ।
सत्य ते सती पुत्र वनिता । ते श्रद्धा जाणिजें ॥ २-९१७ ॥

---

१३०. शिवपुराण, वायवीयसंहिता, पूर्वभाग, १-३६, पृ. ७.
१३१. अनादिवीरशैवसारसंग्रह, भाग २ रा, पृ. २२२-२३.

मैत्रादि सद्गुण ते पौत्र । ज्ञान ते देह विचार ते क्षेत्र ।
अहिंसादिक ते साचार । दासादिक ॥ २-९१८ ॥
अस्ति ते शेवकजन । धर्म ते वाहन ।
दम तो आचार्य आपण । मुक्ति ते देश ॥ २-९१९ ॥

या ओव्या ' निराभारिवीरशैव विषयां'तील आहेत.

आणखी एक साम्यस्थळ सांगतों. ' प्राण्यांचें तारतम्य ' सांगतांना निजगुण म्हणतात :—

क्रिमि कीटक पतंग जात्यादिक । तयाहूनि पशु अधिक ।
पशूपरीस अधिक विशेख । मनुष्यजाती ॥
मनुष्याहूनि द्विजाधिक्य । तया द्विजापरीस विप्र विशेख ।
तया विप्राहूनि ऋतुबुध्यादिक । आधिक्य म्हणवी ॥
तया ऋतुबुध्यापरीस । कर्तार अतिविशेष ।
तया कर्ताराहूनि सन्यास । अधिक्य म्हणवी ॥
तया सन्यासियाहूनि । अधिक्य म्हणिजे ज्ञानी ।
तया ज्ञानियां द्विगुणी । शिवार्चक आधिक्य ॥
तया शिवार्चकापरीस । लिंगांगसंयोगी विशेष ।
तया लिंगांगसंयोगाहूनि उत्कर्ष । षडस्थळज्ञानी ॥
तया षडस्थळा ज्ञानियासमान । त्रैलोक्यात आन कवण ।
एकही नाही म्हणउन । तया कारण ॥
मुमुक्षत्वे षडस्थळ । असमज्ञानी केवळ ।
जाला वीरशैव तो सकळ । वंद्य पूज्ययोग्य ॥

हें तारतम्य ' शंकरसंहिते 'मध्यें[१३२] पुढीलप्रमाणें दिलेलें आढळतें :—

क्रिमिकीटपतंगेभ्यः पशवः प्रज्ञयाऽधिकाः ।
पशुभ्योऽपि नराः श्रेष्ठास्तेषु श्रेष्ठा द्विजातयः ॥
द्विजातिष्वधिका विप्रा विप्रेषु ऋतुबुद्धयः ।
ऋतुबुद्धिषु कर्तारस्तेभ्यः सन्यासिनोऽधिकाः ॥
तेषु विज्ञानिनः श्रेष्ठास्तेषु शंकरपूजकाः ।
तेषु श्रेष्ठा महाभाग मम लिंगांगसंगिनः ॥
लिंगांगसंगिष्वधिकः षट्स्थलज्ञानवान् भवेत् ।
तस्मादप्यधिको नास्ति त्रिषु लोकेषु सर्वदा ॥
स वंद्यः सर्वदा पूज्यः संसारविजिगीषुभिः ।
तस्मै देयं ततो ग्राह्यं स च पूज्यो यथाह्यहम् ॥

---

१३२. वीरशैवानन्दचन्द्रिका ( वादकाण्डः ), पृ. ४४५.

'विवेकचिंतामणी'मध्यें वेदागमपुराणांबरोबरच योगशास्त्र, कामशास्त्र, संगीतशास्त्र, ज्योतिषशास्त्र, काव्यशास्त्र, भूगोलशास्त्र इत्यादि शास्त्रांतील माहिती निजगुणांनीं पुरविली आहे. या शास्त्रांवरील उपलब्ध ग्रंथांचें त्याचें वाचन किती विस्तृत होतें याची कल्पना करणें शक्य आहे. 'विवेकचिंतामणी'च्या आधारग्रंथांत या शास्त्रीय विषयांवरील ग्रंथांचाहि समावेश करणें आवश्यक आहे. परंतु येथें ती चर्चा न करतां केवळ कांहीं ग्रंथांचाच स्थूल निर्देश केलेला आहे. हे ग्रंथ त्यांनीं कसे आत्मसात् केले होते; त्यांच्या लेखनांत त्यामुळेंच त्यांतील कांहीं भाग कसा सहजगत्या प्रतिबिंबित होतो हें दाखविण्यासाठींच कांहीं साम्यस्थळें अभ्यासकांपुढें ठेविलीं आहेत.

मराठी अनुवादाबाबत बोलावयाचें तर शांतलिंग मूळ कृतीपासून थोडेदेखील दूर जात नाहींत.[१३३] क्वचित् त्यांचे दृष्टांत मराठींतील कांहीं कवींचें स्मरण करून देतात. विशेषतः मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांच्या ग्रंथांशीं त्यांचा परिचय होता काय ? 'विवेकचिंतामणीं'तील लोहचुंबकाचा दृष्टांत असलेली ओवी (१–७७०) 'विवेकसिंधू'तील तशाच एका ओवीची आठवण करून देते. 'विवेकचिंतामणि' (१–१०६२) व 'ज्ञानेश्वरी' (९–३९८) या ओव्यांतहि कल्पनासाम्य आढळतें. शांतलिंगांचे शिष्य कृष्णाप्पा 'ज्ञानेश्वरी'चें निरूपण करीत असल्याचा उल्लेख आढळतो.[१३४] तेव्हां 'ज्ञानेश्वरी'शीं त्यांचा परिचय असणें अशक्य नाहीं. कांहीं साम्यस्थळें सांपडलीं तरी एखादा निष्कर्ष काढणें योग्य नसतें. विशेषतः अनेक दृष्टांतांचा वा न्यायांचा उगम संस्कृतांत असल्यामुळें त्यांचा वापर सार्वत्रिक–सार्वभाषिकदेखील–असतो. हें लक्षांत घेतलें नाहीं तर विनाकारण एखाद्याला कोणाचा तरी ऋणी ठरविलें जातें. शांतलिंग हे निजगुणांखेरीज दुसऱ्या कोणाकडून उल्लेखनीय असें कांहीं घेत नाहींत. त्यांनीं निजगुणांखेरीज अन्य कोणाचाहि उल्लेख केलेला नाहीं. परंतु निजगुणच जेथें मुकुंदराज–ज्ञानेश्वरांचे ऋणी आहेत असें ठरविण्याचा आज प्रयत्न होत आहे, तेथें शांतलिंगस्वामी यांच्यावर मराठींतील पूर्वकवींचा विपुल प्रभाव दिसतो असें कोणी म्हटलें तर मला आश्चर्य वाटणार नाहीं. एखाद्यावर दुसऱ्याचा प्रभाव आहे हें सिद्ध करावयाच्या हट्टास पेटल्यावर तसें करतां येतें; पण संशोधनांत तें उपयोगी नाहीं.

'परमानुभवबोधे' या निजगुणांच्या ग्रंथांतील ४ थ्या अध्यायाचें मराठीभाषांतर गेल्या वर्षीच श्री. ना. ब. जोशी यांनीं प्रसिद्ध केलें आहे. या ग्रंथाला त्यांनीं एक विवेचक प्रस्तावना लिहिली असून निजगुणांच्या कालाची व कार्याची

---

१३३. मुळांतलें कांहीं विषय पूर्णपणें गळले आहेत त्यांची चर्चा अन्यत्र केली आहे.

१३४. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ४३५.

साक्षेपानें चर्चा केली आहे. त्या चर्चेंतील एका भागाचें परीक्षण वर मांडलेल्या विचारांच्या संदर्भांत करणें आवश्यक आहे.

कारण निजगुणांनीं मुकुंदराज ज्ञानेश्वरांचे ग्रंथ पाहिले असावेत असें म्हणण्याचें ' धाडस ' (हा जोश्यांचाच शब्द) श्री. जोश्यांनीं केलें आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाच्या आधारें त्यांचा काल ठरविण्याचा प्रयत्न करतांना कांहीं महत्त्वाचे मुद्दे त्यांनीं उपस्थित केले आहेत.[१३५]

निजगुणांच्या ' परमानुभवबोधे ' या ग्रंथाचें मुकुंदराजांच्या ' विवेकसिंधू 'शीं व विशेषतः ' परमामृता'शीं पुष्कळ साम्य आहे. एवढेंच नव्हे तर ज्ञानेश्वरांच्या ' अमृतानुभवा 'शींहि ( विवेचनपद्धतीबाबत ) त्याचें साम्य आहे; असें जोशी म्हणतात. त्यांनीं दिलेलीं कारणें :—

( १ ) प्रथम व्यतिरेक सांगून नंतर अन्वय सांगण्याची पद्धत ही मुकुंदराज व निजगुण यांच्यांतील साधारण (Common) बाब आहे.

( २ ) दोघांच्या तत्त्वज्ञानांत सारखेपणा आहे.

( ३ ) जीवन्मुक्तांचीं उदाहरणें म्हणून मुकुंदराज व निजगुण शुक-वामदेवांचाच निर्देश करतात.

( ४ ) निजगुण हे मुकुंदराज व ज्ञानेश्वरांप्रमाणें बृहदारण्यकाचाच उल्लेख करतात.

( ५ ) परमानुभवबोधे, परमार्थगीता, परमार्थप्रकाशिका, विवेकचिंतामणि व अनुभवसार या निजगुणांच्या सात ग्रंथांपैकीं पांच ग्रंथांच्या नांवांत परम, विवेक व अनुभव हेच शब्द आहेत.

( ६ ) कर्नाटकांत ' विवेकसिंधूचा ' प्रसार झाला होता.

( ७ ) खि. सन १४५० च्या सुमारास मराठीचा संचार विजयनगर राज्यांत झाला असण्याचा संभव आहे.

श्री. जोश्यांच्या मुद्यांना थोडक्यांत असें उत्तर देतां येईल :—

( १ ) विवेचनपद्धतीवरून दोन ग्रंथकारांचा संबंध जोडावयाचा म्हटल्यास अनर्थ होईल. अन्वय-व्यतिरेकाची पद्धत पूर्वीं नव्हती; ती सर्वांत प्रथम मुकुदराजांनींच वापरली असें असतें तर ही पद्धत निजगुणांनीं त्यांच्यापासून उचलली असें म्हणतां आलें असतें; पण वस्तुस्थिति तशी नाहीं.

---

१३५. श्रीनिजगुणशिवयोगी : काल व का॑, पृ. ८-१४ व १९.

(२) निजगुणांचा अद्वैताकडे ओढा असल्यामुळें हा सारखेपणा आढळतो.[१३६]

(३) शुक आणि वामदेव हीं जीवन्मुक्तांचीं नांवें स्वतंत्ररीत्या निजगुणांना माहीत नसावींत असें मानणें अशक्य आहे. हीं नांवें ते देतात यावरून त्यांनीं 'विवेकसिंधू'चें वाचन केलें असावें हा तर्क बुद्धिग्राह्य नाहीं.

(४) हीच गोष्ट 'बृहदारण्यका'च्या उल्लेखाची.

(५) ग्रंथनामांवरील प्रभावाचा मुद्दाहि पटण्यासारखा नाहीं. हे शब्द मराठी ग्रंथांच्या नांवावरून सुचले असतील हें सिद्ध करण्यास अधिक पुराव्याची आवश्यकता आहे.

(६) कर्नाटकांत 'विवेकसिंधू'चा प्रसार झाला होता व मराठीचा संचार विजयनगर राज्यांत झाला असावा हें म्हणणें इतिहासाला धरून आहे. विजापूरच्या रुक्मांगद स्वामींप्रमाणेंच त्यांच्याहि आधींच्या मुडलगी येथील स्वामींचा निर्देश येथें करतां येईल. कारण मुडलगीच्या स्वामींची परंपरा ही मुकुंदराजांची परंपरा होय. परंतु मुडलगी-मठाचा इतिहास निजगुणांच्या कालपर्यंत जाऊन भिडत नाहीं. तसेंच विजयनगर-राज्यांत मराठी वाङ्मयाचा प्रसार झाल्याचा पुरावा हातीं येत नाहीं.

निजगुणांचें वास्तव्यस्थान म्हणून मानलें जाणारें 'शंभुलिंगन बेट्ट' हें ठिकाणहि कोळ्ळेगल तालुक्यांत, मैसूर जिल्ह्यांत आहे. तेथें मराठीशीं व 'विवेकसिंधू'शीं निजगुणांचा परिचय होणें असंभाव्य आहे. मला वाटतें या गोष्टीची जाणीव झाल्यामुळेंच श्री. जोशी लिहितात : "श्रीनिजगुणांना त्यांच्या यात्राटनांत परमामृत, विवेकसिंधु व अनुभवामृत या ग्रंथांचा परिचय झाला असावा व त्यांचें वाचन झालें असावें."[१३७] परंतु हें निव्वळ अनुमान आहे, त्याला भरभक्कम आधार दिलेला नाहीं. निजगुणांना मराठी भाषा चांगली अवगत होती हें सिद्ध केल्याशिवाय एखादा सिद्धांत मांडणें हें 'धाडस' होय. माझ्या समजुतीप्रमाणें श्री. जोश्यांनीं सिद्धांत म्हणून कांहीं हें मांडलेलें नाहीं.

---

१३६. "लिंगायतपंथांत शिवाद्वैत अथवा शक्तिविशिष्टाद्वैतास महत्त्व असलें तरी अखेरचा निजानुभव अद्वैत स्थितींतच असल्याचा साक्षात्कार निजगुणांना झाला असल्यानें त्यांनीं आपल्या ग्रंथांत अद्वैत सिद्धांताचेंच प्रतिपादन केलें आहे;" हें जोश्यांचें विधानच त्यांचा दुसरा मुद्दा खंडावयास पुरेसें आहे.

१३७. श्रीनिजगुणशिवयोगी : काल व कार्य, पृ. १३.

परंतु त्यांच्या अनुमानांचीहि चिकित्सा करणें जरुरीचें होतें. मराठी व कन्नड भाषांत वाङ्मयाची देवघेव होत होती. निजगुण व मुकुंदराज-ज्ञानेश्वर यांच्यांत ती झाली याला भक्कम पुरावा हवा, इतकेंच माझें म्हणणें.

## ११. मराठी–कन्नडमधील वाङ्मयीन देवघेव

मराठी व कन्नड या भाषांचे संबंध अत्यंत निकटचे असल्यामुळें, या दोन भाषा बोलणारीं माणसें अनेक शतकें एकत्र वाढल्यामुळें, या दोन भाषांतील वाङ्मयाची देवघेव फार पूर्वींपासून चालत आली आहे. मराठींतील कन्नड शब्द व कन्नडमधील मराठी शब्द या दोन भाषांतील जुन्या बांधव्याचे द्योतक आहेत. जिवंत माणसांप्रमाणें जिवंत भाषांतहि देवघेवीचा व्यवहार अखंड चाललेला असतो. ही एक अत्यंत नैसर्गिक क्रिया आहे. मग ती कोणास आवडो अगर न आवडो.

भाषा केवळ शब्दांचीच देवघेव करीत नाहींत तर वाङ्मयाचीहि करतात. कन्नड-मराठींतील वाङ्मय-विनिमयाचा ( Exchange of Literature ) त्रोटक इतिहास येथें देणें उचित ठरेल. ज्या 'आंतरभारती' वृत्तीची जोपासना करण्याची भाषा आज आपण करीत आहोंत, ती वृत्ति या इतिहासांतून दृग्गोचर होते.

'विवेकचिंतामणी'प्रमाणेंच मराठींत कन्नडमधून आलेला ग्रंथ म्हणजे 'लीलाविश्वंभर'. थोर कन्नड कवि चामरस यांच्या 'प्रभुलिंगलीले'चें हें भाषांतर 'ब्रह्मदास' नांवाच्या कवीनें १८ व्या शतकाच्या प्रारंभीं केलें. या भाषांतराचा लेखनशक उपलब्ध नाहीं. परंतु याच कवीचा 'ज्ञानाब्धितरंग' हा ग्रंथ स. १७०८ मध्यें पूर्ण झाला. 'लीलाविश्वंभर' हें अल्लमप्रभूंचें 'लीलाचरित्र' आहे. या ग्रंथांतील कांहीं अध्याय प्रा. अ. का. प्रियोळकरांनीं प्रसिद्ध केले आहेत.[१३८]

कन्नड-महाभारतकार कुमारव्यास यांच्या कृतीचें भाषांतर करण्याचा नव्हे, तर त्याचा आदर्श पुढें ठेवून महाभारत लिहिण्याचा प्रयत्न चंद्रात्मज रुद्रानें केला.

मज संस्कृतीं नाहीं अभ्यास । कर्नाटक कवि कुमारव्यास ।
त्याचेनि आधारें ग्रंथविलास । प्रारंभिला या हेतु ॥

असें चंद्रात्मज रुद्रानें म्हटलें आहे. कुमारव्यासांच्या 'उद्योगपर्वा'तील

अरसुगळिगिदुवीर, द्विजरिगे
परम वेदद सार, योगी–
श्वरर तत्वविचार, मंत्रीजनके बुद्धिगुण ॥

---

१३८. मराठी-संशोधन-पत्रिका, जुलै, १९५४.

विरहिगळ श्रृंगार, विद्या
परिणतरलंकार, काव्यके
गुरुवेनलु, रचिसिद कुमारव्यास भारतव ॥
वेदपारायणद फल, गं –
गादि तीर्थस्नान फल, कृ –
च्छ्रादितपसिन फलवु, ज्योतिष्टोम याग फल ॥
मेदिनिय नोलिदित्त फल, व –
स्त्रादि कन्यादान फल बहु –
दादरिसि भारत दोळोंदक्षरव केळि दरिगे ॥

या उताऱ्याशीं, मुक्तेश्वरांच्या ' सभापर्वा'तील

जो राजयातें वीररसु । विप्रवर्यांतें वेदसारांशु ।
तत्वार्थबोध परमहंसु । योगेश्वरू भावीति ॥ १५ ॥
बुद्धियुक्तीचा सागरू । ऐसे मानिती मंत्री चतुरु ।
विलासियाते श्रृंगारू । सुरतानंदुवर्धका ॥ १६ ॥
विद्याप्रवीण शास्त्रमंडित । कौतुकें मानिती कर्णामृत ।
दोषादोषीं यांचे आर्त । पुरवी गंगेसारिखे ॥ १७ ॥
पर्वतांमाजीं कनकमेरू । तडागांमाजीं क्षीरसागरू ।
महाराष्ट्रांसी काव्यगुरु । हा गौरवू ये ग्रंथीं ॥ १८ ॥

या ओव्यांचें असणारें विलक्षण साम्य श्री. शं. बा. जोशी यांनीं मार्मिकपणें दाखविलें आहे.[१३९] एवढ्या आधारावर कोणताच व्यापक निष्कर्ष निघत नाहीं. मुक्तेश्वर इथून तिथून कुमारव्यासांचाच अनुवाद करतात असा सिद्धांत एका साम्यस्थळावरून मांडतां येणार नाहीं. कुमारव्यासांचें भारत त्यांनीं वाचलें असेल किंवा ऐकलें असेल. कुमारव्यास-भारत गमकपद्धतीनें गाण्याची खेडोपाडीं-देखील प्रथा आहे. मुक्तेश्वरांचा संबंध असलेलें डंबळ हें गांव कुमारव्यासांच्या कोळीवाडा या गांवापासून जवळच आहे.[१४०] त्यामुळें तेथील वास्तव्यांत कन्नड भाषेशीं व कुमारव्यास-भारताशीं मुक्तेश्वरांची ओळख झाली असावी इतकाच या साम्यस्थळाचा अर्थ.

---

१३९. मऱ्हाटी संस्कृति : कांहीं समस्या, पृ. १०४-५.

१४०. डंबळशीं असणारा मुक्तेश्वरांचा संबंध कोणता हा वादग्रस्त प्रश्न आहे. जिज्ञासूंनीं त्यासाठीं माझा ' मुक्तेश्वरावर प्रकाश ' हा महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, एप्रिल-मे-जून, १९५९ मधील लेख पाहावा.

कन्नडमधील वाङ्मय मराठींत कसें आलें किंवा त्यानें कांहीं चांगले मराठी कवि कसे प्रभावित झाले हें पाहिल्यावर मराठी वाङ्मयाचें कन्नडमध्यें कसें रूपांतर झालें तें पाहूं. मराठींतील एका संपूर्ण ग्रंथाचें कन्नडमध्यें भाषांतर करण्याचा प्रयत्न स. १७५० च्या सुमारास झालेला दिसतो.

'कवि माहीत नसलेले कांहीं ग्रंथ' या नांवाखालीं 'भागवत-टीका' नांवाच्या ग्रंथासंबंधीं आर्. नरसिंहाचार्यांनीं कांहीं माहिती दिलेली आहे.[१४१] "येकाकार टीकायम्ब हेसरूळ हाडिन रूपवाद व्याख्यान" असें म्हणून त्यांनीं ग्रंथांतील एक ओवी उद्धृत केली आहे. ती अशी :—

अदर पक्वान्न चोक्कडि । प्राकृतद पदमोडि ।
येकाजनार्दन माडिद परवडि । अदर रुचि नोडि भोगिसुव निजात्मभोक्ता ॥

ही भागवत टीका एकनाथांची आहे हें उघड आहे. 'येकाकार टीका असें नांव असलेलें गीत-रूप व्याख्यान' असें म्हणतांना 'येकाकार' या शब्दाचा किंवा दिलेल्या ओवींतील 'येका जनार्दन' या शब्दाचा एकनाथांशीं संबंध आहे हें नरसिंहाचार्यांना माहीत नव्हतें. त्यांना माहीत नसणेंहि स्वाभाविक आहे. ओवी हा छंद अपरिचित असल्यामुळें त्यांनीं या टीकेला गीत-रूप म्हटलें. परंतु त्यांनीं दिलेली ही माहिती अत्यंत मोलाची आहे. नाथांच्या भागवत-टीकेचें कन्नडमध्यें भाषांतर झालें होतें ही कोणालाहि आनंदित करणारी घटना आहे.[१४२] हें भाषांतर कोणी केलें होतें व केव्हां केलें होतें हें कळावयास मार्ग नाहीं. नरसिंहाचार्यांनीं अदमासें म्हणून दिलेला स. १७५० हा काळ मूळ प्रतींतील आहे कीं नंतर झालेल्या एखाद्या प्रतींतील आहे हेंहि स्पष्ट होत नाहीं.

तसेंच ग्रंथांत कवीनें आपलें नांव न देतां 'एकाजनार्दना'चा निर्देश सर्वत्र केला असेल तर ही रचना एकनाथांची संशयास्पद (Apocryphal) कृति मानावी लागेल. नरसिंहाचार्यांनीं दिलेली ओवी तर अगदीं एकनाथी आहे. एकनाथांच्या मुली कर्नाटकांत दिलेल्या होत्या. त्यांचें कर्नाटकांत जाणें-येणें व वास्तव्य होणें अपरिहार्य होतें. तेव्हां कन्नड भाषा त्यांना येत असण्याची शक्यता बरीच आहे. परंतु ग्रंथरचना करण्याइतपत कन्नडवर त्यांचें प्रभुत्व होतें कीं नाहीं हा खरा प्रश्न आहे.

---

१४१. कर्नाटक कविचरिते, भाग ३ रा, पृ. ३१८.

१४२. कन्नड लिपीमध्यें लिहिलेल्या 'भागवता'च्या प्रती मिळतात. 'एकनाथ-दर्शना'मध्यें एका प्रतीची माहिती दिलेली आहे. पण कन्नड भाषांतरा इतकी ती गोष्ट महत्त्वाची नाहीं.

एकनाथांचे म्हणून म्हटले जाणारे कांहीं कन्नड अभंग मी मिळविले आहेत. ते आजहि उत्तर कर्नाटकांत कीर्तनप्रसंगीं म्हटले जातात. अभंगांच्या शेवटीं 'एकाजनार्दन' ही मुद्रिका येते. मिळालेले अभंग असे आहेत:—

(१) नावुनीवु यल्लरि कूडि । होगोण नडिरी पंढरपुरी ॥
माडो चंद्रभागद स्नाना । अल्लि कोटि तीर्थस्थाना ॥
तगोळोनु पुंडलिकन भेट्टी । पूर्वजल्मद वैकुंठी ॥
**एकाजनार्दन** हीगे अंदा । विठ्ठलनाम नुडियेंदा ॥

(२) विठ्ठल मूरू अक्षर । नीनु नुडि नुडि ॥
लक्षचौऱ्याऐंशी योनिय तिरुगि । मानवजन्मक्के बंदि ओडि ओडि ॥
ई नामक्के यावदु सरि इल्ला । विठ्ठल नाम दृढ हिडि हिडि ॥
**एकाजनार्दनी** कै जोडी । परब्रह्म नीनु कूडि कूडि ॥

(३) मोहन केळि यल्लि होगती । नीरू कुडिलिक्के तरती ॥
अललललल लगुल्गु नडि । गडगिन हालु तुसुतुसु कुडि ॥
देवरू बरतार अडगी माडि । उणलाक कूतार उटको मडि ॥
**एकाजनार्दनी** कैय्यर जोडी । मत्त गोपी बंदाळ जगळा माडि ॥

(४) चरणद सुख निन्न । वदनद सुख निन्न ।
स्मरणद सुख निन्न । रमारमणा ॥
तोरो निन्न निजसुख । रमारमणा ॥
हेळुदु सुख निन्न । केळुदु सुख निन्न ।
जोड्डु सुख निन्न । रमारमणा ॥
जनर कडिंद दुःख । मनद कडिंद दुःख ।
**एकाजनार्दनी** निन्न-।-ल्लिये निजसुखा ॥

हे अभंगहि एकनाथांच्या संशयास्पद वाङ्मयांतच समाविष्ट केले पाहिजेत. या अभंगांची भाषा शुद्ध नाहीं. खेड्यांतील भाविकांच्या—मुख्यतः वारकऱ्यांच्या—मुखांतून जसेच्या तसे ते उतरून घेतले आहेत. त्यांत मराठी व कन्नडचें मजेशीर मिश्रण झालेलें आहे. या वारकरी मंडळींपैकीं कोणीतरी या अभंगांना हा कन्नड वेष दिलेला असावा.

अभंगांहून 'भागवत-टीका' मला जास्त विचारार्ह वाटली. म्हणून त्या हस्तलिखिताचा मी खूप शोध घेतला. परंतु तें हातीं लागलें नाहीं. मराठी ग्रंथाचा पहिला कन्नड अनुवाद म्हणून तर त्या कृतीचें मला महत्त्व वाटतेंच; पण त्याच्या अभ्यासामुळें नाथांवर अधिक प्रकाश पडेल अशी माझी समजूत आहे.

एकनाथांप्रमाणेंच तुकाराममहाराजांच्या नांवावरहि कांहीं कन्नड अभंग आहेत. त्यांतील तीन असे:—

(१) अैदु काशियात्रा । द्वारकायात्रा मूर ।
पंढरपूरयात्रा । वंदे सार ॥
काशिगे दंडण । द्वारका मुंडण ।
पंढरपुरस्थान । ब्रह्मरूप ॥
हदनेंटु जाति । यल्ल वैष्णवरू ।
इल्लो हेर फेर । पंढरिस्थळक्के ॥
**तुकारामरन्तार** । यल्लिय साक्षात्कार ।
जीवन्मुक्त जनर । प्राणविल्ल ॥

(२) दरतिंगळिगे । एकादशी यडी । माडो दिल्लो मूढा । याको नीनु ॥
वंद दिवसक्के । होगोदिल्लो प्राणा । उणति याको अन्ना । हेळो नीनु ॥
भजनक्के करियल्ल । हेळती नीवेन । माडति गायन । तप्पदांग ॥
**तुकारामरन्तार** । सुकुमार आदी । मुंदे यमभादी । तप्पितु ह्यांग ॥

(३) ब्याडो ब्याडो मना । विडु मायामोह ।
काळ निन्न जीव । वैदान हिडदो ॥
काळ फाशि हाकि । वयोवाग निनगे ।
तायितंदि आग । बिडसोदिल्ल ॥
खास अण्णातम्मा । बिडसोदिल्ल तंगि ।
निन्नार अर्धांगी । नोडाळ दूर ॥
बिडसोदिल्ल अरस । एकं चक्रवर्ती ।
सुळ्ळे वणाभ्रांती । यारार इल्ल ।
कूलिखतनका । म्याळा कुडूतद ।
काळ वैराग । यारार इल्ल ॥
**तुकारामरन्तार** । बिडसोदिल्ल यार ।
रखुमादेवीवर । पांडुरंग भर्तृ ॥

हे अभंग म्हणजे कोणत्याहि एका अभंगाचें कांटेकोर भाषांतर नव्हे. त्यांत मूळ अभंगांची गोळावेरीज आढळते. उदाहरणार्थ, तुकोबांचा म्हणून वर दिलेला ' ब्याडो ब्याडो मना ' हा अभंग मुळांत[१४३] असा आहे :—

नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ॥ १ ॥ ध्रु ॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥ ७ ॥
सोडवीना राजा देशींचा चौधरी । आणीक सोइरीं भलीं भलीं ॥ २ ॥
तुका म्हणे तुला सोडवीना कोणी । एका चक्रपाणीवांचूनियां ॥ ३ ॥

तुकाराममहाराजांचे हे अभंगहि त्यांच्या नांवावर कोणीतरी रचले आहेत.

---

१४३. श्रीतुकारामबावांच्या अभंगांची गाथा, भाग दुसरा, अभंग २८०८, पृ. १६६ ( सरकारी प्रत, सन १९५० ).

मराठी व कन्नड भाषांवर सारखेंच प्रभुत्व असलेले कांहीं कवि होऊन गेले. अज्ञानसिद्ध नागेश, रंगबोध, अद्वयबोध, ज्ञानबोध, चंद्रात्मज रुद्र व त्र्यंबक हे त्यांपैकीं प्रमुख कवि होत. अज्ञानसिद्ध नागेशांनीं, इतर कांहीं कवींप्रमाणें, एक ओळ मराठी, तर एक ओळ कन्नड अशी मिश्र रचना केली आहे. अशा प्रकारची मिश्र रचना फार पूर्वींपासून चालत आली आहे असें दिसतें (कारण अज्ञानसिद्ध नागेशांच्या 'संकटहरणी'चा काळ श. १३१३ आहे). मिश्र रचना असलेलीं लोकगीतेंहि ऐकावयास मिळतात. त्यांपैकीं हें एक:—

कृष्णमुरारी । बिड्डु होगतीनी दारि ॥
सासू येका घरी । याके नम्मम्याले जोरि ॥
दहीदूध घेऊन । मथुरिगे होंटि दीन नान ।
आला ग धावून । हाद्याग बंदु निंत तान ।

मुडलगीचे रंगबोध–अद्वयबोधस्वामी* व (त्यांच्या शिष्यगणांपैकीं) ज्ञानबोध या सर्वांनीं मराठीबरोबरच कन्नडमध्येंहि स्फुट, पदांच्या स्वरूपाची रचना केलेली आहे. चंद्रात्मज रुद्राचीं दोन त्रुटित कन्नड प्रकरणें, मुडलगी येथेंच स्वामींच्या वाङ्मया-बरोबर मला उपलब्ध झालीं. 'मनीषापंचक' व 'महिम्नस्तोत्र' यांवरील त्या टीका आहेत. मुडलगी मठांतच मला मिळालेला 'उद्बोध प्राज्ञ' हा भामिनी-षट्पदी छंदांतील कन्नड ग्रंथ त्याचाच असावा असा माझा तर्क आहे.[१४४]

त्र्यंबक हाहि मराठी व कन्नडमध्यें रचना करणारा एक कवि आहे. त्याच्या 'प्रल्हादचरित्रा'बरोबर त्याचीं कांहीं कन्नड-पदें उपलब्ध झालीं आहेत. नगर जिल्ह्यांतील मांडवगणचा हा कुळकर्णी :

रुग्वेदी द्विज त्रियंबक कौसिक गोत्रद वंशिकनू ।
आर्यादेशद मांडोगणदा कुळकरणी अवनू ॥
गोपाळन चरणांबुज मनदळि ध्यानवधरिसिदनू ।
सद्गुरुदयपरिपूर्णदिरिंदा कळिमत हेळिदनू ॥

अशी एका कन्नडपदांत तो आपली माहिती देतो. त्र्यंबक हा पेशवाईअखेरचा कवि आहे असा माझा तर्क आहे.[१४५]

---

* यांच्याविषयींचें माझें संशोधन म. सा. पत्रिका, नवभारत व प्रतिष्ठान या नियतकालिकांत प्रसिद्ध झालेलें आहे.

१४४. चंद्रात्मज रुद्र, नवभारत,

१४५. त्र्यंबककृत 'प्रल्हादचरित्र', प्रतिष्ठान, नोव्हेंबर १९५७.

अर्वाचीन काळांत ही देवघेव खूप वाढलेली आहे. ज्ञानेश्वरी, गुरुचरित्र, भक्तिविजय, यांचीं कन्नड भाषांतरें झालीं आहेत. तसेंच कन्नडमधून लक्ष्मीशांच्या 'जैमिनीभारता'चे कांहीं संधि मराठींत अनुवादित झाले आहेत.

प्राचीन वाङ्मयापुरतेंच हें विवेचन केलें आहे. कन्नड कवींपैकीं कुमारव्यास व पुरंदरदास यांचा मराठीशीं अधिक संबंध आलेला असावा. कुमारव्यासांनीं वापरलेले मराठी शब्द या संबंधाचे निदर्शक आहेत. पुरंदरदास तर मूळचे पुण्याजवळच्या सासवडचे–पुरंदरचे. त्यांना मराठी भाषा चांगली येत असावी. परंतु त्यांच्या भाषेवर मराठीची छाप तितकीशी दिसत नाहीं.

ज्ञानेश्वरादिकांचा कन्नडशीं फारच थोडा संबंध आला असावा. 'कानडें' हा शब्द अगम्य, दुर्बोध या अर्थी ते वापरतात. त्यावरूनहि कन्नड ही न कळणारी ('ग्रीक आणि लॅटिन' या शब्दप्रयोगाप्रमाणें) भाषा असें सूचित होतें. आजहि खेड्यांतून 'तुला कानड्यानें सांगितलें काय' असा प्रयोग वापरला जातो.

आकानि केळले चिकाने तु या । भारले धसिणे मरुळादने ।
चलुवाने पंढरिराया चलुवाने । यह्ले दोनर्कवाने ।
पुंडलीकने भक्तिबंदा । रखुमा देवीवर विठ्ठलुने ॥

हा ज्ञानेश्वरांचा म्हणून आवटे-प्रतींत दिलेला अभंग,* एकनाथ–तुकारामांच्या कन्नड अभंगाप्रमाणेंच दुसऱ्या कोणीतरी रचलेला मानावा लागेल. 'विवेकचिंतामणी'च्या अनुवादाला मराठी–कन्नडमधील वाङ्मयीन देवघेवीची अशी बैठक आहे.

## १२. मराठींतील वीरशैव वाङ्मय

नाथसंप्रदाय, महानुभावसंप्रदाय, वारकरीपंथ, दत्तसंप्रदाय व रामदाससंप्रदाय या धर्मपंथांनीं प्राचीन मराठी वाङ्मय समृद्ध केलें. जैनांनींहि मराठी वाङ्मयाला हातभर लावला. परंतु मराठींतील जैन वाङ्मय इतके दिवस अंधारांत होतें तें आतां नुकतेंच कोठें बाहेर येऊं लागलें आहे.

वीरशैव पंथाचें मराठींतील वाङ्मय हा संशोधनाचा विषय आहे. आपलें तत्त्वज्ञान सामान्य माणसांपर्यंत पोंचावें म्हणून कर्नाटकांतील शिवशरणांनीं कन्नड भाषेचा आश्रय घेतला व त्यांतूनच प्रचंड व गुणसमृद्ध असें वचनसाहित्य निर्माण झालें.

कर्नाटकाबाहेर वीरशैव पंथाचा प्रसार झाला होता. महाराष्ट्रांतहि वीरशैवसमाज ठिकठिकाणीं आढळतो. कोल्हापूर, सांगली, सातारा, सोलापूर या पूर्वींच्या

---

* हा अभंग अशुद्ध आहे. तो मुळांत आहे तसाच दिला आहे.

मुंबई राज्यांतील जिल्ह्यांत व मराठवाडा आणि विदर्भ या आतां महाराष्ट्रांत आलेल्या प्रदेशांत फार पूर्वीपासून वास्तव्य करणारीं वीरशैव घराणीं विपुल आहेत. वीरशैवांचे पुष्कळ जुने मठ महाराष्ट्रांत आहेत.

अशा परिस्थितींत मराठींत वीरशैवांनीं वाङ्मय लिहिलेलें असणें स्वाभाविक आहे. तेराव्या शतकांतील वाङ्मयाचा आढावा घेतांना भावे लिहितात : " जंगमांचा प्रसारहि या काळचाच दिसतो. शके १२०० पासून शके १६०० पर्यंत जंगमांचे यत्न इकडे सडकून झाले व पुढें कृष्णाप्पा, जयरामस्वामी वगैरेंनीं हा तंटा मिटवून जंगमांना आपल्या पोतडींत घालीपर्यंत यांचेहि लहानसहान ग्रंथ इकडे होत होते. या पंथाच्या प्रसाराची निशाणी अजूनहि जुन्या डोंगरांतील शिवालयांचे पुजारी जंगम आहेत, याबाबींत दिसून येते. "[१४६]

भाव्यांच्या लिहिण्यावरून वीरशैव वाङ्मयाची निर्मिति होण्यास श. १२०० पासून सुरुवात झाली होती असें दिसतें. भाव्यांच्या उपरिनिर्दिष्ट विधानांतील सूर कांहींसा चमत्कारिक आहे. जंगमांना पोतडींत घालण्याची भाषा व हा सूर त्यांच्यासारख्या थोर संशोधकाला शोभणारा नाहीं. ज्या कृष्णाप्पा, जयरामस्वामींनीं हें केलें असें भाव्यांचें म्हणणें—ते शातलिंगस्वामी या वीरशैव सत्पुरुषाचे शिष्य-प्रशिष्य होते ; हें लक्षांत घेतां 'पोतडींत घालण्या'ची भाषा त्यांच्याबाबतींत अयोग्य वाटते. वास्तविक जंगमांचे ग्रंथ—लहानसहान असले तरी—मराठी वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. ते उपलब्ध होत नाहींत याविषयीं भाव्यांनीं हळहळ व्यक्त करावयास हवी होती.

रेवणसिद्ध नांवाचा एक ग्रंथकार होऊन गेला व त्यानें 'परमरहस्य' नांवाचा ग्रंथ लिहिला होता. रेवणसिद्ध नांवाचा एक सिद्ध ज्ञानेश्वरकालीन असून तो नेवाशानजीक मर्मगिरीवर राहात होता. रेवगी येथें याच नांवाचा जंगम राहात होता. त्याची समाधि रेणावी (जि. सातारा) येथें आहे. हाच 'परमरहस्या'चा कर्ता असावा.

चौदाव्या शतकांतील रामलिंग, लिंगदास, शिवलिंग या जंगम ग्रंथकारांचा भाव्यांनीं निर्देश केला आहे. रामलिंगाचा शिष्य सुजात याच्या पदांपैकीं एक नमुन्यादाखल त्यांनीं दिलें आहे.[१४७] या कवींच्या ग्रंथांचा नामनिर्देश त्यांनीं केलेला नाहीं. परंतु या कवींनीं 'ग्रंथरचनाहि' केली असल्याचें भावे सांगतात.

'पाताळकांडा'चा कर्ता कान्हो त्रिमलदास हा जंगम असावा असें भाव्यांनीं म्हटलें आहे. याच काळांतील वडवाळसिद्ध नागेशांना (त्यांची

---

१४६. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. २०१-२.
१४७. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. २३३.

ग्रंथरचना उपलब्ध नाहीं ) वीरशैव मानणारी कांहीं मंडळी आहेत. "कांहीं कारणानें मुसलमान झालेल्या जातवेद भैरंभटाला पुनः हिंदुधर्माची दीक्षा देणारा वरदनागेश ऊर्फ वडवाळसिद्ध हा वीरशैव असावा ;"[१४८] असें शं. बा. जोश्यांचें मत आहे. काशीच्या जगद्गुरु विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामींनाहि तसेंच वाटतें.[१४९] परंतु हें मत विवाद्य आहे.

लिंगेश्वर, लिंगया किंवा लिंगाप्पा या नांवाच्या शैव संताच्या पदांचें व अभंगांचें बाड मिळाल्याचें सांगून भाव्यांनीं त्याचे दोन अभंग दिलेले मिळतात.[१५०] परंतु या कवीचा काळ, चरित्र यांविषयीं कांहींच माहिती मिळत नाहीं.

जो निःसंशय वीरशैव आहे व ज्याची ग्रंथरचना उपलब्ध आहे असा कवि म्हणजे मन्मथस्वामी. 'परमरहस्यसारामृत' हा ग्रंथ[१५१] व कांहीं अभंग [१५२] अशी त्यांची रचना प्रकाशित झाली आहे. 'अनुभवानंद' व 'स्वयंप्रकाश' हीं त्यांचीं अप्रसिद्ध प्रकरणें मला मिळालीं आहेत.

'परमरहस्या'मध्यें षट्स्थल-विवरण आहे तर बाकीच्या रचनेंत आपलें तत्त्वज्ञान सुबोधपणें मांडलें आहे. लातूरजवळील कपिलधार नांवाच्या ठिकाणीं मन्मथस्वामींचें वास्तव्य होतें. 'परमरहस्या'चें लेखन त्यांनीं श. १५२२ मध्यें तेथेंच संपविलें. म्हणजे ते शांतलिंगस्वामींचे समकालीन होते व 'विवेकचिंतामणी'च्या फक्त चार वर्षें आधीं त्यांनीं हा ग्रंथ लिहिला हें स्पष्ट होतें.

'नागेश' असें आपल्या गुरूचें नांव मन्मथस्वामी देतात. हा नागेश 'मानूरमठ सिंव्हासनाधिकारू' आहे. मन्मथस्वामींसंबंधीं लिहितांना या उल्लेखाचा चुकीचा अर्थ मी लावला होता. "The third Nagesh, on the authority of his disciple Manmatha Swami, was the Adhikari of Manur Matha, situated in Ahmednagar District;"[१५३] असें मी म्हटलें होतें. पहिले दोन नागेश—म्हणजे वडवाळसिद्ध व अज्ञानसिद्ध—मन्मथस्वामींचे गुरु असणें शक्य नाहीं असें माझें मत होतें.

परंतु अधिक संशोधनान्तीं, मानूरचा शोध मला लागला. मन्मथस्वामींनीं निर्देशिलेलें मानूर अहमदनगर जिल्ह्यांतील नसून वडवाळजवळचें आहे. या

---

१४८. मऱ्हाटी संस्कृति : कांहीं समस्या, पृ. १७५.

१४९. वीरशैव परिषद् अधिवेशन १ लें, सांगली, अध्यक्षीय भाषण, पृ. ७.

१५०. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ४३४-३५.

१५१. परमरहस्यसारामृत, देशिकेंद्र छापखाना, लातूर, शके १८५३.

१५२. श्रीमन्मथबोधामृत, सोलापूर, स. १९५४.

१५३. Journal of the Karnatak University, Vol. II, No. 2, p. 105.

मानूरशीं वडवाळसिद्धांचा संबंध आहे. वडवाळसिद्ध नागेश व मन्मथस्वामी यांच्यांत काळाचें फार मोठें अंतर आहे. तरीहि वेगळ्या स्वरूपांत नागेशांनीं गुरूपदेश दिलेला असणें शक्य आहे. मन्मथस्वामींचें ‘मन्मथशिवलिंग’ असेंहि नांव आढळतें. शिवलिंग नांवाच्या कवीची ‘शिवरात्रकथा’ औंधच्या भवानी म्युझियम व ग्रंथालय या संस्थेंत आहे. तिचीं फक्त ६ ते ३५ पृष्ठें मिळालीं असून तिचें लेखन श. १६७० मध्यें झालेलें दिसतें. या ग्रंथाचें हस्ताक्षर येरूळच्या हणवंत गिरि गोसावीचें आहे.[१५३] हा ग्रंथ मन्मथस्वामींचा आहे कीं नाहीं याचा निर्णय ग्रंथ पाहिल्याशिवाय घेतां येणार नाहीं.

एकंदरींत पाहतां मराठींतील फारच थोडें वीरशैव वाङ्मय अभ्यासकांच्या हातीं लागलें आहे. याचा अर्थ एवढेंच किंवा अगदीं अल्प असें वाङ्मय मराठींत वीरशैवांनीं लिहिलें असें नव्हे. तेराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत त्यांची वाङ्मयनिर्मिति होत होती ही गोष्ट या वाङ्मयाचा आढावा घेतल्यावर ध्यानीं येते.

हे वाङ्मय बाहेर कां आलें नाहीं याची कारणमीमांसा करण्यासारखी आहे. ज्या शैव-वैष्णवांच्या तंट्याचा उल्लेख नेहमीं करण्यांत येतो त्या तंट्यामुळें, महाराष्ट्रांतील बहुजनसमाजापासून वीरशैव व त्यांचें वाङ्मय अलिप्त राहिले : त्यांच्याविषयीं आवश्यक तितकी आत्मीयता निर्माण झाली नाहीं असें म्हणतां येईल काय? हें अंतर शैवांच्या कट्टरपणामुळें निर्माण झालें हें जें वरचेवर सांगितलें जातें त्यांत सत्यांश थोडा आहे. कारण वैष्णवहि कमी कट्टर होते असें नाहीं. खरें म्हणजे महाराष्ट्रांत शिवशरण व विठ्ठलभक्त; वीरशैव व वारकरी यांच्यांत मानला जातो तसा व तितका तंटा होता काय? विठ्ठलानें मस्तकावर शिवलिंग धारण केलें आहे असें मानणाऱ्या विठ्ठलभक्तांनीं शिवभक्तांशीं व व्यापक मानवधर्माची शिकवण देणाऱ्या वीरशैवांनीं विठ्ठलभक्तांशीं तीव्र स्वरूपाचा कलह केला असें मानणें म्हणजे त्यांची भूमिका समजून न घेणें होय.

अन्यत्र शैव-वैष्णवांत वाद निर्माण झाले तसे महाराष्ट्रांत होण्याचें कारण नव्हतें. कारण नाथसंप्रदायासारखा या दोन्ही पंथांना सांधणारा बळकट दुवा महाराष्ट्रांत अस्तित्वांत होता. “शके ११०० चे सुमारास नाथसंप्रदाय आपल्या महाराष्ट्रांत पुष्कळ पसरलेला होता” असें भाव्यांनीं म्हटलेंच आहे. नाथसंप्रदाय हा शैवसंप्रदाय आहे. या संप्रदायाचें फारसें वाङ्मय उपलब्ध नाहीं. परंतु जें आहे तें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. वीरशैव तत्त्वज्ञानाचा महाराष्ट्राला केव्हां परिचय होऊं लागला याचा शोध घेतांना या वाङ्मयाचा विसर पडून चालणार नाहीं.

---

१५३. हस्तलिखित क्रमांक ६९. या हस्तलिखिताविषयींची माहिती कळविल्याबद्दल सदर संस्थेच्या क्यूरेटरांचा मी आभारी आहे.

मत्स्येंद्रनाथांचे शिष्य गोरक्षनाथ यांचें एक मराठी पद भाव्यांनीं दिलें आहे.[१५४] त्या पदांत आलेले ' निजलिंग ' आणि ' आत्मलिंग ' हे शब्द सूचक आहेत. ' प्रभुलिंगलीले 'मध्यें अल्लमप्रभू व गोरक्ष यांच्या भेटीचें वर्णन आहे[१५५] व शेवटीं गोरक्षांना शिवदीक्षा दिल्याचें सांगितलें आहे. ' प्रभुलिंगलीले 'मध्येंच अल्लमप्रभू व मायादेवी यांची मत्स्येंद्रनाथांच्या स्त्रीराज्यांतील वास्तव्याची आठवण करून देणारी कथा आहे. मत्स्येंद्रनाथ व अल्लमप्रभू ; ' प्रभुलिंगलीलें 'तील गोरक्ष व गोरक्षनाथ यांच्या गोष्टींत कथासादृश्य आणि नामसादृश्य याखेरीज कांहीं नाहीं ! या प्रश्नाची चर्चा करण्याचा मोह टाळून इतकेंच म्हणतों की नाथ-संप्रदायाचा (त्यांतील कांहीं प्रमुख व्यक्तींचा), वीरशैव पंथाशीं निकट संबंध दिसतो.

गोरक्षनाथांप्रमाणेंच ज्ञानेश्वरांच्या अभंगांतूनहि त्यांना वीरशैव पंथाचा व तत्त्वज्ञानाचा परिचय असावा असें दिसतें. लिंग, आत्मलिंग, ज्योतिर्लिंग या शब्दांचा वापर तेहि करतात. कांहीं अभंग त्यादृष्टीनें चिंत्य आहेत :—

**( अभंग ४२१ )**

विदेह **आत्मलिंगा** गुरुकृपेचा तुषारु ।
पूर्णें पूण भरिला घट हळुहळु बिंदु उदारू ॥
वरुषला **लिंगावरी** तेणें तुष्टला श्रीगुरु ।
प्रसन्न निवृत्तिराजा ज्ञान देउनी उदारू ॥ १ ॥
...विराले अभिमान ममता झाली समाप्ती ।
खुंटलिया उर्मी दाही स्नपन झालें **लिंगाप्रती** ॥ ४ ॥

**( अभंग ४२२ )**

आदि **आत्मज्योतिर्लिंगा** । लांबियेला घट्ट ॥
स्थावरिलें मायावस्त्र । **लिंगावरी** प्रविष्ट ॥ १ ॥

**( अभंग ४२४ )**

**शिवनाम** शीतळ मुखीं । सेवीं पां कापडिया रे ॥
दडदडदड दुडुदुडुदुडु । पळ सुटला कळिकाळी बापुडीया रे ॥ १ ॥
ओं नमो शिवा आदी । कावडी घेतली खांदीं ॥
मिळाली संत मांदी । त्यांचे रजरेणुवंदी ॥ ध्रु ॥

---

१५४. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ४३.
१५५. ( भविष्यत्पुराणांतर्गत ) प्रभुलिंगलीला, भाग ३ रा, अ. १९, श्लो. ३३-११३.

गुरुलिंगजंगम । त्यानें दाविला आगम ।
एकाग्र करी मन । तेणें होईल समाधान ॥ २ ॥

अभंग ४२४ वरून तर खात्रीच पटते. कारण त्यांत गुरुलिंगजंगम, शिवनाम व आगम यांचा स्पष्ट उल्लेख आहे. एरव्हीं केवळ 'लिंग' हा शब्द आला म्हणून एखादें अनुमान काढणें बरोबर ठरणार नाहीं.

(अभंग ४२०)

स्वर्ग जयाची साळोंखा । समुद्रपाळीं पिंड देखा ॥
शेषासारिखी बैसका । जो आधार तिहीं लोकां ॥ १ ॥
लिंग देखिलें देखिलें । त्रिभुवनीं तिहीं लोकीं विस्तारलें ॥ ध्रु ॥
मेघधारीं तपन[१५६] केलें । तारापुष्पीं वरी पूजिलें ॥
चंद्रफळ ज्या वाईलें । ओंवाळिलें रविदीपें ॥ २ ॥
आत्मनैवेद्य समर्पिले । ब्रह्मानंदीं मग वंदीलें ॥
ज्यातिलिंग[१५७] मग धाईलें । ज्ञानदेवीं ह्रदयीं[१५८] ॥ ३०३ ॥

या अभंगांत केवळ काव्यसौंदर्याचेंच दर्शन घडतें कीं, त्यांत वीरशैव-तत्त्वज्ञानाच्या कांहीं छटा आढळतात? लिंग आणि ज्योतिर्लिंग हे शब्द इष्टलिंग व ज्योतिर्लिंग यांचे वाचक असतील तर इष्टलिंग हें अंतःस्थित ज्योतिर्लिंगाचें व्यक्त स्वरूप होय; किंवा लिंग म्हणजे घनलिंग, भावलिंग किंवा महालिंग आणि तेंच 'ह्रदयीं' ज्योतिर्लिंगाच्या रूपानें वसत आहे. अशा प्रकारच्या विचारांशीं त्यांचा परिचय असावा असें मानावयास येथें वाव आहे इतकेंच. काश्मिरी शैवसंप्रदायाचें तत्त्वज्ञान त्यांना माहीत होतेंच. त्यामुळेंहि अशा कल्पना त्यांच्या वाङ्मयांत येणें शक्य होतें.

या विषयाचें अधिक विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु भागवत-धर्म-मंदिराचा ज्या 'ज्ञानदेवें रचिला पाया' ते ज्ञानदेव स्वतः शैव-वैष्णवांच्या समन्वयाचें उत्कृष्ट प्रतीक होते. पुंडलीकानें 'विष्णुसहित शिव आणिला पंढरीं' अशी ज्ञानदेवादिकांची श्रद्धा होती. त्यामुळें त्यांना शैव (वीरशैवहि) परके वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण पुढें मात्र कांहीं दुजाभाव निर्माण झाला असावा.

महानुभावांप्रमाणेंच वीरशैवांसंबंधीं कांहीं समज-गैरसमज महाराष्ट्रांत निर्माण झाले असावेत. विशेषतः वर्णाश्रमधर्मावर उघड उघड आघात करण्याची

---

१५६. स्नपन.
१५७. ज्योतिर्लिंग.
१५८. पांगळ-संपादित ज्ञानेश्वर-गाथेंत या अभंगांचे हेच क्रमांक दिले आहेत.

बंडखोरी, श्रेष्ठ धारिष्ट्य, या पंथांनीं दाखविलें हीच बाब त्यांच्याविषयीं गैरसमज निर्माण होण्यास कारणीभूत झाली असावी. "महानुभावांना वीरशैवांप्रमाणें अत्यंत उग्र सामाजिक विरोध सोसावा लागला, याचें कारण वरील सर्व पंथांनीं कांहीं आडपडदा न ठेवतां वर्णाश्रमाचा पाया उखडून टाकण्याचा प्रयत्न केला याशिवाय दुसरें कांहीं नाहीं ;" असें श्री. शं. बा. जोशी म्हणतात.[१५९] ज्ञानेश्वरांनींहि 'कुळयातिवर्ण। हे अवघेचि गा अकारण' असें म्हटलें. अठरापगड जातीचे वारकरी भागवत धर्माच्या झेंड्याखालीं एकत्रित झाले. गुरुदेव रानड्यांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्रांत 'आध्यात्मिक लोकशाही' (Spiritual Democracy) स्थापन झाली.

वास्तविक शिवशरणांनीं श्रीबसवेश्वर-अल्लमप्रभूंच्या नेतृत्वाखालीं 'अनुभवमंटपा'ची स्थापना करून कर्नाटकांत नेमकी हीच गोष्ट केली होती. वीरशैव व वारकरी या दोन्हींहि पंथांना भक्तीचाच आधार होता. 'स्त्रियः वैश्यास्तथा शूद्राः' या सर्वांना मोक्षद्वार उघडें करण्याचा दोन्ही पंथांचा प्रयत्न होता. माणसामाणसांमध्यें भेदाची भिंत राहूं नये, भक्त ते सारे एकच; अशा समदृष्टीची जोपासना दोन्हीहि पंथांनीं केली.

परंतु असें असूनहि वीरशैव पंथाचें हृद्गत महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाला कळावें तितकें कळलें नाहीं. तें कळलें असतें तर आरशांत पाहिल्यावर जसें आपलेंच प्रतिबिंब आपणांस दिसतें तसें कांहींतरी झालें असतें. भेद जाणवला असता. भेदांतील अभेदहि दिसला असता. ज्या पवित्र मातीवर भेद आणि अभेद एकत्र वावरतात तेथें असें होणें अशक्य नव्हतें.

अशा कांहीं कारणांनीं कळतनकळत वीरशैव वाङ्मय बाजूस राहिलें. आपलें वाङ्मय पंथाबाहेर जाऊं नये अशीहि वृत्ति जुन्या काळीं होती. या वृत्तीमुळें व इतरेजनांप्रमाणेंच पंथीयांनींहि जरूर तें लक्ष न दिल्यामुळें हें वाङ्मय अंधारांतच राहिलें. भाव्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे रानांतल्या कुंदफुलांप्रमाणें हें वाङ्मय निर्माण झालें, उमललें, कोनाकोपऱ्यांत दरवळलें आणि जागच्या जागीं सुकून गेलें. सुदैवानें त्यांतील कांहीं न सुकलेलीं फुलें वर डोकें काढीत आहेत; कांहीं दुरून खुणावीत आहेत.

मराठींतील वीरशैव वाङ्मयाची एकंदरींत अक्षम्य उपेक्षा झाली. कै. न. स. खरशीकरशास्त्र्यांनीं शांतलिंगस्वामींचा 'करणहसुगे' हा ग्रंथ स. १९४६ मध्यें

१५९. मऱ्हाटी संस्कृतिः कांहीं समस्या, पृ. १७८-७९. महानुभावांइतका विरोध वीरशैवांना झालेला दिसत नाहीं. महानुभावपंथीयांहून याच पंथाचे लोक अधिक प्रमाणांत व सर्वत्र महाराष्ट्रांत आढळतात ही गोष्ट त्यांना 'उग्र सामाजिक विरोध' झाला नाहीं याची द्योतक मानतां येईल.

प्रकाशांत आणला. त्यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या मन्मथस्वामींच्या 'परमरहस्य-सारामृता'ची (स. १९३१) दखल अभ्यासकांनीं घेतली नाहीं. उपेक्षा ही अप्रकाशित वाङ्मयाच्याच वाट्यास येते असें नाहीं. 'लीलाविश्वंभर' हा ग्रंथ प्रकाशनाच्या वाटेवर आहे. पूर्वी तो छापला गेला होता ही ज. शा. देशपांड्यांची माहिती बरोबर नाहीं.[160]

सोलापूरच्या रावसा. वारदांनीं आपल्या 'वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाले'-मध्यें अनेक वीरशैव ग्रंथ प्रसिद्ध करून मोठें कार्य केलें आहे. 'विवेकचिंता-मणी'च्या दोन परिच्छेदांखेरीज बाकीचे ग्रंथ हीं संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें आहेत. पन्नास वर्षांपूर्वी त्यांनीं केलेल्या या कार्याचें मोल फार आहे.

## १३. समारोप व आभार

प्रस्तावना बरीच लांबली. तरीहि अजून कांहीं गोष्टींची चर्चा करतां आली असती. 'विवेकचिंतामणी'च्या या अभ्यासांत कांहीं उणीवा राहून गेलेल्या असणें शक्य आहे याची मला जाणीव आहे. अनेक विषय असणाऱ्या या ग्रंथाचा सर्वांगीण विचार करण्याची—म्हणजे सर्वच विषयांचा तपशील कांटेकोरपणें तपासण्याची—कल्पना डोळ्यांपुढें नव्हती. उदाहरणार्थ, प्रथम परिच्छेदाची 'सर्वदर्शनसंग्रहा'शीं तुलना करून मांडलेल्या तत्त्वज्ञानाचा सखोल विचार करतां आला असता. परिच्छेदांतील 'संगीत' (राग, नृत्यें, वाद्यें इ.) हा स्वतंत्र अभ्यास करण्यासारखा विषय आहे. म्हैसूरचे श्री. आर्. सत्यनारायण हे मूळ ग्रंथांतील केवळ संगीताविषयींच्याच भागाची एक चिकित्सक आवृत्ति तयार करीत आहेत. असें काम करण्यासारखे अनेक विषय असलेल्या 'विवेकचिंतामणी'चें संपादन करतांना कांहीं मर्यादा स्वतःवर घालून घेतल्या होत्या. त्यामुळें येथें अमुक केलेलें नाहीं, असें वाटूं नये. तसेंच 'विवेकचिंतामणी'चा माझा अभ्यास संपला आहे; आतां मला कांहींच म्हणावयाचें उरलेलें नाहीं; अशीहि परिस्थिति नाहीं. पुष्कळ काळ चालणाऱ्या अभ्यासांतील कांहीं भाग येथें आला आहे इतकेंच.

ग्रंथाला जोडलेल्या टीपा अर्थस्पष्टीकरणात्मक किंवा विवरणात्मक नसून मुख्यत: अर्थनिर्णयाला साहाय्य व्हावें म्हणून दिलेल्या आहेत. ग्रंथाचा विस्तार लक्षांत घेतां व प्रत्येक विभागांतील भिन्न भिन्न परिभाषेचा विचार करतां, विस्तृत स्पष्टीकरणात्मक किंवा विवरणात्मक टीपा देणें व्यवहार्य नव्हतें. म्हणूनच मूळ कन्नड ग्रंथांतील शब्द (अथवा त्याआधारें शब्दार्थ) दुर्बोध किंवा संशयास्पद शब्दांपुढें दिलेले आहेत. हाहि एक पाठभेद देण्याचाच प्रकार झालेला

---

१६०. नवें नवनीत, पृ. ६२३ : "हा ग्रंथ पूर्वी छापला होता असें कळतें, परंतु त्याची छापील प्रत पाहण्यास मिळाली नाहीं."

आहे. वीरशैव तत्त्वज्ञानासंबंधीं देखील अधिक लिहिण्याचा मोह टाळलेला आहे. 'विवेकचिंतामणीं'त जेवढें तत्त्वज्ञान येतें तेवढेंच स्पष्ट करण्याची मर्यादा मी स्वतःला घालून घेतली होती. हें काम करीत असतांना कांहीं चुका झाल्या असणें संभवनीय आहे. त्यांच्याकडे सहानुभूतीनें पाहावें अशी प्रार्थना आहे. तत्त्वज्ञानाचा भाग लिहितांना डॉ. एस्. सी. नंदीमठांच्या पुस्तकाचा फार उपयोग झाला.

'विवेकचिंतामणी'च्या मराठी अनुवादाची एकुलती एक प्रत श्री. बेटगेरी कृष्णशर्मा व कविवर्य द. रा. बेंद्रे यांच्या कृपेनें मिळाली. त्याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे. डॉ. आर्. सी. हिरेमठ व डॉ. शं. गो. तुळपुळे यांचें प्रोत्साहन मला लाभलें. माझे स्नेही व बागलकोट येथील श्रीबसवेश्वर कॉलेजमधील प्रा. उमापतिशास्त्री हे मूळ 'विवेकचिंतामणी'ची शुद्ध प्रत प्रसिद्ध करीत आहेत. तुलनेसाठीं आपल्या मुद्रण-प्रतीचा उपयोग करूं दिल्याबद्दल व माझ्याबरोबर मूळ ग्रंथाचें वाचन केल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

कर्नाटक विद्यापीठ व पुणें विद्यापीठ यांनीं या पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी पतकरली म्हणूनच हें काम मला करतां आलें. कर्नाटक विद्यापीठाचे कुलगुरु रँ. दा. चिं. पावटे व पुणें विद्यापीठाचे कुलगुरु म. म. द. वा. पोतदार यांच्या 'पुरस्कारा'नें मी उपकृत झालों आहे. कर्नाटक विद्यापीठाच्या प्रकाशन विभागाचे प्रमुख श्री. चन्नवीर कणवी, कार्यवाह श्री. एस्. एस्. वोडेयर, उपकार्यवाह श्री. एस्. बी. शापेटी यांनीं वेळोवेळीं लागेल ती मदत केली. कर्नाटक विद्यापीठानें मला या संशोधनासाठीं खास अनुदान दिलें. त्याहि गोष्टीचा कृतज्ञतापूर्वक निर्देश करतों. कर्नाटक विद्यापीठाच्या सूचनेस मान्यता देऊन या ग्रंथाच्या प्रकाशनांत भाग घेतल्याबद्दल मी पुणें विद्यापीठाचा व तेथील अधिकारीवर्गाचा अत्यंत आभारी आहे. पुणें विद्यापीठ मुद्रणालयाचा, दिलेल्या सहकार्याबद्दल, मी आभारी आहे.

कर्नाटक विद्यापीठ व पुणें विद्यापीठ यांचें संयुक्त प्रकाशन म्हणून हें पुस्तक बाहेर येत आहे. 'विवेकचिंतामणी'सारखेच आणखी कांहीं ग्रंथ या विद्यापीठांच्या आश्रयाची वाट पाहात आहेत. त्याहि ग्रंथांच्या संपादनाची संधि मला मिळेल अशी आशा करून पुन्हां एकदां सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतों.

मराठी विभाग, कर्नाटक आर्टस् कॉलेज,
धारवाड.
१०-२-१९६२.

पण्डित आवळीकर

# विषयानुक्रमणिका

६६३-६७४, वीरशैवलक्षण ६७५-६९६, वीरशैवभेद ६९७-७०२, दीक्षाक्रम ७०३-७५४, क्रियादीक्षा ७५५-७८१, सप्तविधदीक्षा ७८२-७९९, वीरशैवपूजाकर्मानुष्ठान ८००-८०६, वीरशैवभस्मधारण ८०७-८२२, वीरशैवकलान्यास पृ. १३८-१३९, वीरशैवषडंगन्यास पृ. १३९, पंचब्रह्मन्यासरुद्राक्षधारण पृ. १३९-१४०, वीरशैवशिवसमर्चना ८२३-८२७, पंचगव्याभिषेक ८२८, पंचामृताभिषेक ८२९-८३३, मातृकाक्षरन्यास पृ. १४२-१४३, कलान्यासपूजादि पृ. १४३, विशेषवीरशैवषट्स्थलविषय ८३४-८३८, आचारलिंगत्रय ८३९-८४२, त्रिविधगुरुलिंग ८४३-८४७, त्रिविधशिवलिंग ८४८-८५१, जंगमलिंगत्रैविध्य ८५२-८५७, त्रिविधप्रसादलिंग ८५८-८६२, त्रिविधमहालिंग ८६३-८६६, आचारलिंगषड्भक्त ८६७-८७६, गुरुलिंगषड्भक्त ८७७-८८२, शिवलिंगषड्भक्त ८८३-८८८, जंगमलिंगषड्भक्त ८८९-८९४, प्रसादलिंगषड्भक्त ८९५-८९९, महालिंगषड्भक्त ९००-९०५, एकशेएक स्थलें ९०६-९१४, निराभारिवीरशैवविषय ९१५-९३२, प्राण्यांचें तारतम्य ९३३-९४१, चर्यापादप्रारंभ ९४२-९४४, आश्रमचतुष्टय ९४५-९४६, ब्रह्मचर्याश्रम ९४७-९६१, गृहस्थाश्रम ९६२-९६४, कन्यादुर्लक्षण ९६५-९७३, कन्यासल्लक्षण ९७४-९८१, शैवनित्यकर्मविचार ९८२-९८८, गायत्रीजपविधान ९८९-९९६, गायत्रीमूर्तिस्वरूप ९९७-१००४, उदयकालगायत्रीध्यान १००५-१००८, मध्याह्नकालगायत्रीध्यान १००९-१०१२, सायंकालगायत्रीध्यान १०१३-१०१७, यज्ञप्रक्रिया १०१८-१०२३, रुद्राग्निमूर्ति १०२४-१०३४, गृहीधर्मानुशासन १०३५-१०४२, पंचकर्मविभाग १०४३-१०४८, निर्मलकर्मविवेक १०४९-१०५९, नीतिसंग्रह १०६०-१०९९, वानप्रस्थाश्रम ११००-११०३, प्रयाणवारशूल ११०४-११०५, शुभशकुन ११०६-११०८, दुर्दर्शन ११०९-१११०, शुभदर्शन ११११-१११२, अरण्यवास १११३-१११४, वानप्रस्थदीक्षा १११५-११२२, पंचाग्निमध्यतप ११२३-११२७, यत्याश्रम ११२८-११२९, कुटीचक ११३०-११३२, बहूदकयति ११३३-११४०, हंसयति ११४१-११४७, परमहंसयति ११४८-११६२, अत्याश्रमी ११६३-११७०, शिवयोगाधिकारी ११७१-११७६, प्रमाणग्रंथविभाग ११७७-११८१, योगपादप्रारंभ ११८२, शिवयोगलक्षण ११८३-११८९, शिवयोगभेद ११९०-११९६, अहिंसालक्षण ११९७-१२१८, शिवयोगासन १२१९-१२२५, योगास घटचक्रादि विवेक १२२६-१२५९, योगतंत्रसंग्रह १२६०-१२६८, सर्वयोगांगफलादि संग्रह १२६९-१२७५, योगविघ्नादिक १२७६-१२७९, योगफलादि १२८०-१२८८, योग्यांचें तारतम्य १२८९-१२९१, निर्गुणयमादि योगलक्षण १२९२-१२९८, षट्चक्रविषय-

## पंचम परिच्छेद – मृत्युलोकस्थितिवर्णन ... पृ. २५४ ते २६२



## षष्ठम परिच्छेद – देवलोकवर्णन ... ... पृ. २६३ ते ३०५

ज्योतिश्चक्रराशिग्रह ४६-५३, वर्षयोग ५४-५७, सप्तपवनाधारादि ५८-६०, अभ्रनगरनिवासी बालग्रहादि ६१-७०, विनायक ७१-७८, वीरस्वर्ग ७९-८३, सिद्धविद्याधरादि लोक ८४-९०, दशमेघस्थानें ९१-९८, गंधर्वग्रह ९९-१०३, मातृकायोगिनीशक्ति १०४-११५, आयुधभेदविशेष ११६-१२०, गुरुत्मंतगंगा इत्यादि १२१-१२७, गगननंदिकेश्वर १२८-१२९, दक्षब्रह्म १३०-१३२, एकादशरुद्रगणादि स्थानें १३३-१३७, सूर्यरथपरिमाणगतिस्थित्यादि १३८-१५१, रविकलाकिरणादि १५३-१६७, अहोरात्रकल्पना १६८-१७३, अहोरात्रसंध्यास्वरूप १७४-१८२, रविगतिविघ्ननिवृत्ति १८३-१८७, द्वादशादित्य व त्यांचे परिवार १८८-२०५, सपरिवार चंद्रमंडलकलादि २०६-२१७, नक्षत्रमंडल २१८-२२०, कुजादि पंचग्रह २२१-२३१, राहुकेतु २३२-२३४, ग्रहमंडलपरिमाण २३५-२४२, सूर्यचंद्रग्रहणें २४३-२४८, सप्तर्षिमंडल २४९-२५६, भुवर्लोकाचा वृषभेश्वर २५७-२६४, स्वर्लोकदेवेंद्र २६५-२६९, अजानदेवता २७०-२७१, कर्मानें देवत्व मिळविलेले २७२-२७३, देवतास्वरूप २७४-२७७, महर्लोक मार्कंडेयमुनि २७८-२८०, जनोलोक २८१-२८४, तपोलोक २८५-२८७, सत्यलोक चतुर्मुख ब्रह्म २८८-२९४, चौसष्ट सिद्धींतील पार्थिवाष्टक २९५-२९९, आपतत्त्वसिद्ध्यष्टक ३००-३०३, तैजससिद्ध्यष्टक ३०४-३१२, वायुसिद्ध्यष्टक ३१३-३१५, अंबरसिद्ध्यष्टक ३१६-३१८, मानससिद्ध्यष्टक ३१९-३२१, अहंकारसिद्ध्यष्टक ३२२-३२३, बुद्धिसिद्ध्यष्टक ३२४-३२६, चतुर्मुखसिद्धींचें पर्यवसान ३२७-३२८, नवब्रह्म्यांची उत्पत्ति ३२९-३३४, मरीचिब्रह्म्यापासून कश्यपसंतति ३३५-३३७, अदिति-देवांची संतति ३३८-३४३, दैत्यसंतति ३४४-३४७, दनुकांतेपासून राक्षससंतति ३४८-३४९, असुरसंतति ३५०-३५१, रत्नगंधर्वाप्सरगणादींची उत्पत्ति ३५२-३५३, विनतेपासून पक्षिसंतति ३५४-३५६, कपिलेपासून अमृतगोब्राह्मणसंतति ३५७, कद्रूपासून सर्पसंतति ३५८, मृगपशुपर्वतादींची उत्पत्ति ३५९-३७१, भृगुब्रह्मसृष्टि ३७२, अंगिरोब्रह्मसृष्टि ३७३, पुलस्त्यब्रह्मसंतति ३७४-३७७, पुलहक्रतुब्रह्मसंतति ३७८-३७९, दक्षब्रह्मसंतति ३८०-३८७, अत्रिब्रह्मसंतति ३८८-३८९, वसिष्ठसंतति ३९०-३९१, चतुर्मुखांपासून प्रजापतिसंतति ३९२-४००, धातृविधातृसंतति ४०१-४०८, सुखतारतम्य ४०९-४१८, वैकुंठलोक ४१९-४२७, सुब्रह्मण्यलोक ४२८, उमालोक ४२९, कामधेनुलोक ४३०, रुद्रलोक ४३१-४४३, अणिमादिकांचीं लक्षणें ४४४-४५४, शिवलोकविस्तार ४५५-४६०, अष्टभैरव ४६१-४९२, श्रीशिवनगर ४९३-५०८, महादेवाचें राजगृह ५०९-५२०, शिवसभास्थान ५२१-५५१, पूर्वसभा-

---

# विवेकचिंतामणि

## प्रथम परिच्छेद

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥
श्रीगुरुसच्चिदानंदात्मने श्रीशंभूनीलकंठाय नमः ॥

वागार्थविवसंप्रोक्तौ वागर्थाप्रतिपद्यते ।
जगत्पितृवरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥ १ ॥

ओं नमो शंभूश्रीनीलकंठा । प्रणवरूपा प्रणवकूटा ।
प्रणवभरिता प्रणववरिष्ठा । नित्यस्वरूपा ॥१॥

सकळैककर्तृ सकळैकभर्तृ । सकळैकहर्तु सकळैकमित्रु ।
सकळैकमातृ सकळैकपितृ । सकळैकगुरु देवा ॥२॥

अखिलरूपा अखिलपरा । अखिलजीवना अखिलाधारा ।
अखिलजीवधरा । विश्वात्मया ॥३॥

जगदअस्ति जगद्वती । जगतृप्ति जगत्शांती ।
जगत्प्राण जगत्पती । तू अनादिसिद्ध ॥४॥

नत्राअन्यास्ति शिवपरू । ऐसा वेदअगमासी निर्धारु ।
म्हणोनि मुख्य तूं श्रीहरू । सकळारंभी ॥५॥

देवाधिदेवा दैवविशा । सकळसाभासनिराभासा ।
घटशून्यत्व अनंतआकाशा । तुज येकेवीण ॥६॥

जैसी बिंदुसंख्या येकत्यावीण । सकळ शून्य निर्वाण ।
तैसे तुजयेकेवीण शून्य । अनंतब्रह्मगोळा ॥७॥

तूं अनादसिद्ध स्वयेसत्ता । भोगमोक्षादि सर्वार्थदाता ।
म्हणोनि शास्त्रारंभी स्तविता । सकळ होय ॥८॥

तुझिया कृपावरविशेषें । इंद्रियादि मन हातवसे ।
बुद्धि प्रसारे अपैसे । परमार्थ विषईं ॥९॥

वरि लोका लभ्यांशु निजार्थेसिद्धी । निजमुक्ती होती त्रिशुद्धी ।
आणि शास्त्रार्थ होय वृद्धी । श्रीशंभोनीलकंठा ॥१०॥

अथ श्रीमद्यनेकहितोपचार । निमित्य वेदपुराणशास्त्र ।
नेमूनि मुख्यार्थसारांतर । प्रकट कीजेल ॥११॥

विश्वविषयाची सुस्थिती । निमित्यें महानुभवसत्यसिद्धार्थी ।
सांगिजेल सकळ सन्मतीं । विवेकचिंतामणीं ॥१२॥

म्हणोनिया कल्पूनिया नाम । शास्त्र कीजेल निरोपम ।
तो तूं परमानंदा ऐके क्रम । श्रीशंभोनीलकंठा ॥१३॥

श्रीमद्यनेकभुवनभुवन । आरंभ मूळस्तंभरूप निर्वाण ।
शंभूनीलकंठादि करून । निराभासी देशिकोत्तमा ॥१४॥

पर्यंत गुरुरूपपरंपरेशी । मानसीक वाचीक कायिकेंसी ।
अभिवंदूनि निजमानसीं । प्रेमे नमस्कार ॥१५॥

मंगळार्चनी निर्विघ्न । प्रकरणपरिसमाप्ती संपूर्ण ।
शिष्यप्रशिष्यप्रवाहप्रवर्तन । श्रवण शोभित ॥१६॥

ऐक तया शुद्धमया । चित्तस्वस्थ कलत्रया ।
अपण तराया सिद्धी होआवया । म्हणोनियां निर्धारावें ॥१७॥

अथ अनादि निर्मळ चिद्रूप । सर्वोत्कर्ष ब्रह्मस्वरूप ।
सर्वज्ञत्व सर्वकर्तृत्वें सिद्धिप । अनादि परमेश्वर ॥१८॥

परमेश्वरप्रणीत परम । परिणाम म्हणवी उत्तम ।
द्वितीय अगम नीगम । तेही अनादसिद्ध ॥१९॥

तया वेदागमयुक्तिसन्मत्तें । उभयासी मूळ निरुतें ।
अपणचि सिद्ध सत्यार्थें । जाला असें ॥२०॥

म्हणोनि वेदागमस्मृति । पुराण इतिहास पुरातनयुक्ती ।
अनुसारें सांगिजेल पद्धती । अनुभविया मानें ऐसे ॥२१॥

नव्हे स्वकपोळकल्पितकृत्य । सकळसारांतर रहस्यार्थ ।
स्वरूपाचा सत्यार्थ । संग्रह कीजेल ॥२२॥

स्वतसिद्ध स्तंभज मणी । शब्दरत्नें रचनें आणूनी ।
माळा वोविजेल यथा ठेवणी । अनुक्रमें ॥२३॥

तेजोमय कंठाभरण अनर्घ्य । भूषावया प्रेम सौभाग्य ।
वरि मुमुक्षुजनासी योग्य । सर्वकाळी हें ॥२४॥

जगतस्थितिगतिप्रकार । परि शोधूनियां सारांतर ।
अनयासें तत्वविचार । अभिव्यक्त करूनी ॥२५॥

हे ग्रंथी सुलभ जाणोनी । कृतार्थ होआवे म्हणोनी ।
पूर्वाचारसिद्धवचनीं । शास्त्ररचना केली ॥२६॥

ते विवेकचिंतामणीशास्त्र । प्राकृतभाषा सविस्तार ।
सांगिजेल म्हणे शांतेश्वर । जगस्वहीतनिमित्यें ॥२७॥

॥ इति पीठिका निरोपणं ॥

प्रथम चक्षुरादि बाह्येंद्रिया । जगदीशे गोचर होऊनियां ।
पृथक्बुद्‌बुदाकार अतिशया । सावेवसहित ॥२८॥

तें वटवत असे अनेक । कार्य होउनि प्रवर्तक ।
कुल्लाळन्यायें ईश्वर मुख्य । निमित्तकारण असे ॥२९॥

ईश्वरापासूनि अक्षेप । चक्रदंडापरी पुण्यापुण्यरूप ।
कर्म म्हणिजे संस्कारस्वरूप । साहकारी कारणाने ॥३०॥

मृत्तिकान्यायें विंदुमाया तिचेनें । शुध्दाशुध्द होऊनि उपादानें ।
कारणाने गमनागमनें । सुखदुःखादिकें ॥३१॥

अनेंक वेव्हारभेदेकरून । भिन्न जाला आत्मा त्यालागुन ।
भोगमोक्षालागि उत्पन्न । तें सांगेन जाणावया ॥३२॥

तया आत्म्याचे ठाई प्रकृतिप्रमाण । काळकर्मादिकरून ।
जगत्कर्तृत्वकर्ता आपण । ईश्वर प्रसिद्ध ॥३३॥

नास्ति म्हणती जरी कश्चित । तरी प्रकृतीआदि समस्त ।
जडरूप अचेत । होऊनि असे ॥३४॥

तया नसता चैतन्य अधिष्ठान । अपणचि जगत उत्पन्न ।
नव्हे म्हणुनि निर्वचन । प्रमथूनियां ॥३५॥

अणीक चैतन्यस्वरूप जीव । तयासी जगकृत्य जगत्कर्तृत्व ।
कां न घडे सर्वथैव । म्हणती जरी ॥३६॥

तरी तयासी किंचिज्ञत्व । अदृष्टपरतंत्रत्व ।
आणि अनैश्वर्यत्व । दोष असती ॥३७॥

म्हणोनी जिवासी स्वतंत्र । जगत्कर्तृत्वव्यापार ।
सृजावया सामर्थ्य साचार । न घडे सर्वथा ॥३८॥

म्हणऊनियां परशिष्यन्यायें । परमेश्वर ज(ग)त्कायें ।
कर्ता म्हणोनि सुनिश्चयें । प्रमाणसिद्ध ॥३९॥

हिरण्यगर्भ समवर्तताग्रे । भूतस्य जातो पतिरेकं आसीत साचारें ।
म्हणोनि सूत्यानुसारे । निश्चये जाणावें ॥४०॥

अणीक हें जगद्रूपे महाकार्य । दिसे तार्तम्य परि न्याय ।
म्हणोनि रथाऐसे कर्तृत्व हें । बहुताचे म्हणती जरी ॥४१॥

तरी तया रथासी उभारणी । सूत्र येक आचार्यांचेनि ।
होय प्रसिद्ध म्हणोनि । अनेक कर्ता न घडें ॥४२॥

अणीक भिन्नाभिन्न अभिमाने । अपण आपुले पोपत्व करणे ।
अनेक कर्तृत्व तेणे । येक कार्य न घडे ॥४३॥

म्हणोनि अखिल जगातें । ईश्वर कर्ता निरुतें ।
येक असे म्हणोनि निश्चितें । निर्धार जाणावा ॥४४॥

अणीक सर्वाठाई सर्वकाळ । सर्वकाळ उदये संमेळ ।
होयिये तयाचेनि सकळ । कर्तृत्वादि ॥४५॥

नित्यत्व व्यापकत्व । कोण्ही येक कार्यनिर्मित ।
करूं जाणे सर्वेश्वर समर्थ । तयावांचून नव्हे ॥४६॥

म्हणोनि कर्तृत्वादि ईश्वरासी । सर्वज्ञत्व सर्वशक्तित्वेसीं ।
काळवंत मूर्तिमंत स्वइछेसी । होऊनियां ॥४७॥

पल्लवकूष्मादि साध्यसाधक । होय तैसा सकळिक ।
उत्पन्नकर्ता मुख्य । ईश्वर आपण ॥४८॥

अणीक तया निष्कळंकत्वे वेढून । सर्वहृदयअंतर्याम होऊन ।
वाह्य श्रुतीस्मृतीज्ञेयरूपानें । नेमक म्हणवी ॥४९॥

तयाकारणें ईश्वरासी । सर्वप्रेरकत्वे जैसीं ।
लोकांतु निश्चयेसी । मातु प्रसिद्ध ॥५०॥

जैसा कुलाळ कर्तृत्वे नेमक । होऊनी नेमीतसे घटादिक ।
तैसा शरीरादि अनेक । ठाई नेमीतसे ॥५१॥

म्हणोनि विश्व बहुधा अनेक । विश्वेश्वरापासूनि नेमक ।
ऐसा हा अक्षेप मुख्य । श्रुती बोलती ॥५२॥

सर्वात्मा अद्वितीय । ईश्वर निजस्वरूपमय ।
म्हणौनि अनेक अतिशय । त्या ईश्वरासी ॥५३॥

पितृकर्तृत्वादीक नाही । तो नित्यनिग्रहो स्वदेही ।
त्यालागी अवाध काळत्रई । स्वतंत्र ईश्वर ॥५४॥

जिवाचे कर्मणानुसारे । होउनिया दातृत्व फळभरे ।
सुखदुःख द्यावया साचारें । ईश्वरू कर्ता ॥५५॥

परि रागद्वेष गुणभेदा । विनिर्मुक्त सदां सर्वदां ।
ऐसा हा अक्षेप स्मृतिवेदा । आगमासी ॥५६॥

ईश्वरापासूनि सृष्ट्यादि । जाले व्योमादि विश्वादि ।
अनेक करावया त्रिशुद्धी । मनुष्य समर्थ नव्हे ॥५७॥

त्याकारणे ईश्वरादी अनादी । सर्वेश्वरत्व सर्वादि ।
सुस्थीर म्हणऊनि त्रिशुद्धी । जाणावें बुधजनीं ॥५८॥

अथ यानंतरे परमेश्वर । निर्मिता जाला परस्पर ।
चेतअचेतरूप जगत्र । त्याचे ठाई ॥५९॥

भोगमोक्षार्थ अपेक्षा वसे । भिन्नाभिन्न जाणीववशें ।
अभिमाने प्रवर्तवीत असें । सकळ मत्तांतरें ॥६०॥

मग वादियासी निरंतर । अभिमत्त जालें शास्त्र ।
ते कवण कैसा निर्धार । सांगिजेल ॥६१॥

प्रथम मुख्य प्रमाण ऋग्वेद । यजुर्वेद सामवेद ।
अणीक अथर्वणवेद । इति वेद चार्‍ही ॥६२॥

हिये प्रसिद्ध सिध्दार्थ । स्वयंभु ईश्वरप्रणीत ।
म्हणोनी वोलत । असती निगम ॥६३॥

अणीक ते वेद चार्‍ही विविध । ऋग्वेद येकविंशति भेद ।
शाऐंशी भेद यजुर्वेद । होउनि असें ॥६४॥

सामवेद सहस्र भेद । अथर्वणवेद नवविध ।
इति परिक्रमे प्रसिद्ध । होऊनि आसती ॥६५॥

विधिवाद अर्थवाद मंत्रवाद । नामध्येय म्हणिजे भेद ।
चतुष्टानें समस्त धर्मवोध । करीत असती ॥६६॥

त्याचे ठाई । राजाज्ञा ऐसा पुरुषासि नेम । निषेध त्यजूनि स्वधर्म ।
करवी यथा स्वकर्म । तो विधिवाद म्हणवी ॥६७॥

वेदकांसी प्रसिद्ध । देतसे विद्यार्थभेद ।
तो अर्थवाद । म्हणवी निरुतां ॥६८॥

आचारवाक्याप्रमाणे । सकळ विहीत वर्तणें ।
तो म्हणवी आपण । मंत्रवाद ॥६९॥

जननीजनकाऐसें निरुतें । नाम ठेविलें यागादिकातें ।
ते म्हणवी सिध्दार्थें । नामध्येय ॥७०॥

अणीक तया वेदालागून । पाद हस्त मुख घ्राण ।
नेत्र श्रोत्र इति निपुण । प्रसिद्ध जाणावें ॥७१॥

छंदांश पाद कल्प हस्तक । व्याकर्ण मुख सीक्षा नासिक ।
ज्योतिष नेत्र निरुक्त श्रवणादिक । हे षडांग वेदाचे ॥७२॥

मंत्र त्रिष्टुप् अनुष्टुप् । गायत्री आदि परिरूप ।
अक्षरगणागण अक्षेप । ते छंदसु म्हणावें ॥७३॥

आश्वलायनिया वोद्धायनिया । अपस्तंबरूपें सूत्रे हिया ।
यज्ञप्रयोगादि अतिशया । ते कल्प म्हणवी ॥७४॥

वैदिकादि यथार्थ । शब्दसिद्धी सामर्थ्य ।
ते अकारण निभ्रांत । म्हणवीतसें ॥७५॥

उदात्त अनुदात्त स्वरीत प्रचय । चतुर्विध स्वरकरण निश्चय ।
पूर्वक पदपाळिक्रम वेदाध्याय । ते शिक्षा म्हणवी ॥७६॥

लग्न तिथी वार नक्षत्र । योग कर्णादि अनुसार ।
सिद्धी सुविचार । तें ज्योतीष म्हणवी ॥७७॥

वैदिकादि शब्दातें । जाणोनि यथा निरुतें ।
निर्वचन नेमक तें । निरुक्त म्हणवी ॥७८॥

आणीक मिमांसीक । न्याईक पुराण स्मृति हियें चतुष्क ।
म्हणवितातिे मुख्य । उपांगें वेदासी ॥७९॥

याचे लक्षण पुढे सांगो ॥

अणीक अयुर्वेद अर्थवेद । धनुर्वेद गंधर्ववेद ।
हे चतुर्विध उपवेद । जाणावे याचे ठाई ॥८०॥

व्याधिनिंदा व्याधिचिन्ह । मंत्राषधी चिकित्साप्रयत्न ।
आयुरारोग्यलक्षण । सांगे अयुर्वेद ॥८१॥

दक्षणा आज्य चरू उपाहार संपादन । करी त्यालागी पुरातन ।
धर्मचतुर्विधासि साधन । सांगे तो अर्थवेद ॥८२॥

शत्रुजय मारण उच्चाटण । मंत्रशास्त्रप्रयोगादि लक्षण ।
सांगे यथाविधी निपुण । तो धनुर्वेद ॥८३॥

सामवेदजनित सविस्तार । सरिगमपदनी सप्तस्वर ।
गीतप्रबंधरचना अपार । सांगे गंधर्ववेद ॥८४॥

अणीक श्रीरुद्रः ॥ १ ॥ बृहदारण्यः ॥ २ ॥
श्वेतस्वरः ॥ ३ ॥ कैवल्यः ॥ ४ ॥ कालाग्निः ॥ ५ ॥
कंठवल्लिः ॥ ६ ॥ कात्यायन ॥ ७ ॥ ब्रह्मः ॥ ८ ॥
नारायणः ॥ ९ ॥ हंसः ॥ १० ॥ परमहंसः ॥ ११ ॥
भास्करः ॥ १२ ॥ ब्रह्मबिंदुः ॥ १३ ॥ अरुणिः ॥ १४ ॥
अमृतबिंदुः ॥ १५ ॥ चर्चाः ॥ १६ ॥ पंचब्रह्मः ॥ १७ ॥
जाबाल्यः ॥ १८ ॥ तेजोबिंदुः ॥ १९ ॥
वाजसनेयः ॥ २० ॥ बौधायनीयः ॥ २१ ॥
अश्वलायनीयः ॥ २२ ॥ मैत्रायनीयः ॥ २३ ॥
सांख्यायनीयः ॥ २४ ॥ वासुरायनीयः ॥ २५ ॥
शौनकीयः ॥ २६ ॥ शिवकल्पः ॥ २७ ॥
श्रोत्रश्रवणः ॥ २८ ॥ पराक्रमः ॥ २९ ॥ क्रौंचः ॥ ३० ॥
मुद्गलः ॥ ३१ ॥ मंडूकः ॥ ३२ ॥
एवं उपनिषधें बत्तीस ॥

तयांत मुख्य निरोपण । ज्ञानसंपादन भस्मरुद्राक्षधारण ।
ब्रह्मज्ञानविचारविवरण । बोलत असती ॥८५॥

यानंतरे मनुस्मृति । उसानस्मृती अंगिरास्मृति ।
अत्रिस्मृति हरितस्मृति । याज्ञवल्क्यस्मृती साहवी ॥८६॥

यमस्मृती अपस्तंबस्मृती । संवर्तस्मृती कात्यायनस्मृती ।
बृहस्पतिस्मृति पाराशरस्मृति । व्यासस्मृती तेरावी ॥८७॥

शंखलिखितस्मृती देवलस्मृती । दक्षस्मृती गौतमस्मृती ।
इति नवदश धर्मशास्त्रें ॥८८॥

ज्या ऋषेश्वराचे स्फूर्ती । पासूनि निर्माण जाल्या स्मृती ।
ते ते नाम जाले ऐसे परिमीती । नवदश धर्मशास्त्रें ॥८९॥

इया स्मृतीचे ठाई पृथक । कृतायुगीं मनुस्मृती धर्म मुख्य ।
त्रेतायुगी गौतमस्मृती विशेष । धर्म मुख्यता ॥९०॥

द्वापारयुगीं शंखलिखित । स्मृतिधर्म मुख्य निभ्रांत ।
पाराशरस्मृतीधर्म सत्य । कलियुगी मुख्य ॥९१॥

तया स्मृतीचा ठाई निर्धार । यातिवर्णआश्रमाचार ।
दायादादी भाग वेव्हार । भेद विवरीत असती ॥९२॥

महापातका उपपातका । परिहर तया अशेखा ।
प्रायश्चित्तविधी संख्या । सांगत असे ॥९३॥

यानंतरे काम्य कानड । अंध्र आणी द्राविड ।
याती च्यार्‍ही प्रचंड । निरुतें जाणिजे ॥९४॥

ब्राह्मण आणि क्षेत्री । वैश्य शूद्र इति चार्‍ही ।
वर्णभेद परी । प्रसिध्द परी म्हणिजे ॥९५॥

गर्भाधान पुंसवन । श्रीमंत उन्नयन ।
जातकर्म नामकरण । उपनिष्कामना ॥९६॥

आणि अन्नप्राशन । चौल उपनयन ।
महानेम्य म्हणऊन । परिक्रमें ॥९७॥

महाव्रत उपोषितु । शोभन उदह मृत्यु ।
इति षोडशकर्मयुक्तु । अणीक वरी ॥९८॥

यजन याजन अध्ययन । अध्यापन दान ।
प्रतिग्रह म्हणऊन । इति षट्कर्मयुक्त ॥९९॥

वरि शिवव्रती शिवार्चन । शिवभक्त्यादि सकळ सद्गुण ।
संयुक्त असे तो ब्राह्मण । म्हणवीं निरुता ॥१००॥

यानंतरे प्रजापाळण । यजन अध्यापन ।
दुर्जय दुष्ट मृग पक्षि शत्रु संहारण । पराक्रमयुक्त ॥१०१॥

अन्नदान वस्त्रदान । कन्यादान हिरण्यदान ।
गोदान उभयमुखीदान । म्हैसी अश्वदानादि ॥१०२॥

श्वेताश्वदान काळमुखीदान । महामेरुदान ।
कल्पवृक्षदान विद्यादान । आदि मुख्य महादानें ॥१०३॥

तया दानार्थासी विशेषें । देशकाळपात्रपरिक्षा प्रेमरसें ।
विष्णुभक्त्यादीक कर्मीं युक्त असे । तो क्षेत्री म्हणवी ॥१०४॥

यानंतरे प्रथम द्वितीय स्थान । तृतीय स्थान चतुर्थ स्थान ।
पंचमस्थानादि षष्ठम स्थान । संख्याक्रमे स्थाने छत्तीस ॥१०५॥

अणीक योग येक कारण । रूपभूमी संज्ञा जाण ।
चंद्रआदित्यादि करून । येकत्व्यासी नाम ॥१०६॥

बावन्न द्वाद्वद द्वितीय । युग्म युगुळ युग उभय ।
बाहु पद पक्ष नयनमिथुनादि नाम्नेय । संज्ञा द्वितीयासी ॥१०७॥

तृतीया तृतीय हरनयन । अग्नी पुर वररत्न ।
आदिकरूनि संज्ञा जाण । तृतीयासी नाम ॥१०८॥

चौ गती कसाया चतुर्वेद । वर्णअश्रम पुरुषार्थ ।
समुद्रादी संज्ञा हेत । चतुष्कासी नाम ॥१०९॥

पंच हरवक्त्र वृत्त । इंद्रिये विषय भूत ।
बाण पांडवादी संज्ञा स्थित । पांचासी नाम ॥११०॥

षट् द्रव्य ऋतु रस गुण । स्कंदमुख वेदांग कर्म वर्ण ।
दर्शन आदिकरून । षडासी नाम ॥१११॥

सप्त मुनी गिरि राजांग । धातु स्वर सभाअंग ।
सागर तुरंग । संज्ञा सप्तासी नाम ॥११२॥

अष्ट वसु दिग्गज मद । मूर्ति योग सिद्धी आनंद ।
कर्मादि संज्ञाभेद । अष्टासी नाम ॥११३॥

नव रंध्र रस निधी । खंड नाथ भक्त विधी ।
ग्रह रत्न भावादि । संज्ञा नवासि नाम ॥११४॥

बिंदु नास्ति शून्य । अनुस्वर गगन ।
दिशा आदीकरून । दशकासी नाम ॥११५॥

अणीक शमविशम दशकासी नाम गुणितांधिक । गुणित क्रमादी अनेक ।
वस्तूचे क्रियालेख । व्यंजनारंभ ॥११६॥

प्रवाळपरिक्षा सुवर्णवान । वज्रपाचादी नाना रत्न ।
परिक्षा व्याप्ति लक्षण । सर्वसंपन्नयुक्त ॥११७॥

वरि वाणिज्य कृषि गौपाळण । सूर्यभक्ति निपुण ।
कर्मयुक्त असे तो आपण । वैश्य म्हणवी ॥११८॥

यानंतरे ब्राह्मणादी वर्ण । त्रयाची सेवा क्षेत्रादिरक्षण ।
सकळ देवताभक्ति भजन । युक्त असे तो शूद्र म्हणवी ॥११९॥

अणीक ब्रह्मपुराण । पद्मपुराण वैष्णवपुराण ।
शैवपुराण भागवतपुराण । नारदपुराण साहवें ॥१२०॥

मार्कंडेयपुराण अग्निपुराण । भविष्योत्तरपुराण ।
ब्रह्मवैवर्तपुराण जाण । लिंगपुराण अक्रात्रें ॥१२१॥

वराहपुराण स्कंदपुराण जाण । वामनपुराण कूर्मपुराण ।
मछपुराण गरूडपुराण । ब्रह्मांडपुराण अठरावें ॥१२२॥

एवं अष्टादश पुराण । ऋषेश्वरप्रोक्त शिवप्रसन्न ।
वेदाचे नष्टसंख्यार्थ सांगणें । प्रतिपादीत असती ॥१२३॥

शिव स्कंद लिंग कूर्म वामन । वराह भविष्योत्तर मछपुराण ।
मार्कंडेय ब्रह्मांड मिळोन । दश शिवपुराणें ॥१२४॥

नारदीया भागवत । गरूड वैष्णव चतुर्थ ।
हिये प्रसिद्ध म्हणवीत । विष्णुपुराणें ॥१२५॥

ब्रह्मपुराण । पद्मपुराण ।
उभय मिळोन । ब्रह्मपुराणें ॥१२६॥

ब्रह्मवैवर्त ते सूर्यपुराण । अग्नी तें अग्निपुराण ।
एवं कारण । मुख्य पुराणें ॥१२७॥

हिया पुराणाचेनि अनुसारें । देवतातार्तम्यविचारें ।
अधिक्य उणे निर्धारें । येथेंचि निश्चयें जाणावें ॥१२८॥

त्या पुराणाचे ठाई सर्ग । प्रतिसर्ग वंशमन्वंतर ।
वंशानुचरित्र म्हणिजे साचार । पंच लक्षणें ॥१२९॥

समस्त वैदिकादि । तांत्रिक धर्मविधि ।
संमोह संपादनोपाधी । सांगत असें ॥१३०॥

यानंतरे सनत्कुमारपुराण । नारसिंहपुराण नंदिपुराण ।
शिवधर्मोत्तरपुराण । दुर्वासपुराण पांचवें ॥१३१॥

नारदपुराण कपिलपुराण । मानवपुराण उसानपुराण ।
ब्रह्मांडपुराण वरुणपुराण । कळीपुराण बारावें ॥१३२॥

वसिष्ठलैंग्य पुराण । शाम्रपुराण शौर्यपुराण ।
पाराशरपुराण मरीचयपुराण । भार्गवपुराण बारावें ॥१३३॥

एवं उपपुराणें अष्टादशें । प्रोक्त त्या त्या नामाधिवशें ।
त्याचे ठाई वैदिकधर्म विशेषें । प्रतिपादी प्रसिद्ध ॥१३४॥

यानंतरें भारता । रामायणा उभयता ।
व्यासवाल्मीकप्रणीता । ते इतिहास म्हणती ॥१३५॥

सत्वादि गुणभेद । त्रिदेवतालक्षण विषद ।
देवदानवादी प्रसिद्ध । जननादिक्रमें ॥१३६॥

युधिष्ठिर रामचंद्रादी समस्त । राजयाचा वृत्तांत ।
अणीक वैदिकधर्म दढी करित । असें निश्चयें ॥१३७॥

यानंतरे वृहस्पती । आरोहत सुगतस्थिती ।
हियापासूनियां प्रीति । कल्पीत जालें ॥१३८॥

चार्वाकु जैन बोध । तृतीय कर्मे विषद ।
अवैदीक प्रसिद्ध । शास्त्र प्रसिद्ध जालें ॥१३९॥

चार्वाक तो जगत अपार । पृथ्व्यादि चतुर्भूत विकार ।
उत्पन्न सहज विस्तार । जाले म्हणें ॥१४०॥

स्त्रीपुरुष उभयासंगें । जगउत्पत्ती विषययोगें ।
आन येक कर्ता प्रसंगें । त्रिशुध्दी नाही म्हणें ॥१४१॥

तयाचे प्रतिपादन । सूख तेचि स्वर्गभुवन ।
दुःख तेचि कारण । नर्कभोग ॥१४२॥

मरण तेचि मोक्षवासना । स्वर्ग नर्क नास्ती अन्ना ।
म्हणोनी संभाषणा । करीत असें ॥१४३॥

यानंतरे जैनमत्तीं । सिद्ध वध्द नर्क इति ।
पुरुषत्रयपध्दती । लक्षण निरुतें ॥१४४॥

वडीसवडीमेलेस्वकल्प । ज्वलिनीकल्प पद्मावतीकल्प ।
शारदाकल्प कूटकल्प । मंत्रऔषधी प्रोक्त ॥१४५॥

ते परमसिध्द निकर । लुतिनीसदिगंवर ।
मयोरपरपाणीपात्र । पंचमळधारी ॥१४६॥

असत्यतस्कर । अतिकांक्षपरद्वार ।
हिंसादि अनुसार । पंचानुवृत्तयुक्त ॥१४७॥

मधुपल्लववडादि निषेध द्रव्यजाति । त्यजूनियां तप्तशिळे सौनवस्ती ।
अतिउग्र तपचरी मूर्ती । मुनिवृंद अर्थे ॥१४८॥

अथ जैन तीर्थाकारः ॥ वृषभ ॥१॥ अजित ॥२॥
शांभव ॥३॥ अभिनंदन ॥४॥ सुमति ॥५॥
पद्मप्रभुः ॥६॥ सुपार्श्वः ॥७॥ चंद्रप्रभु ॥८॥
पुष्पदंत ॥९॥ शीतळः ॥१०॥ श्रीअंशः ॥११॥

वासयुज्यः ॥१२॥ विमलः ॥१३॥ अनंतः ॥१४॥
धर्मः ॥ १५ ॥ सत् ॥ १६ ॥ कौथः ॥ १७ ॥
आरूहतः ॥ १८ ॥ मल्पः ॥ १९ ॥
मुनिसुव्रतः ॥ २० ॥ नामी ॥ २१ ॥ नेमी ॥ २२ ॥
पारसी ॥ २३ ॥ वीरवर्द्धमानः ॥ २४ ॥

इति चतुर्विंशति तीर्थचरित्रः ॥

गो ॥१॥ गजः ॥ २ ॥ अश्वः ॥ ३ ॥ केपि ॥ ४ ॥
कोका ॥ ५ ॥ कमलः ॥ ६ ॥ स्वस्तिका ॥ ७ ॥
शशी ॥ ८ ॥ मकरः ॥ ९ ॥ श्रीद्रुमः ॥ १० ॥
गंड ॥ ११ ॥ महेशः ॥ १२ ॥ कोलसः ॥ १३ ॥
धिक ॥ १४ ॥ वज्र ॥ १५ ॥ मृग ॥ १६ ॥
ज्येष्ठ ॥ १७ ॥ गर ॥ १८ ॥ कलश ॥ १९ ॥
कूर्म ॥ २० ॥ उत्पळ ॥ २१ ॥ शेश्वः ॥ २२ ॥
नागाधिगे ॥ २३ ॥ सिंहः ॥ २४ ॥

इतिलक्षणयुक्तः ॥ त्याचे ठाई ॥

उत्तम क्षमा त्याग मार्दव । सत्य शौच सयम तप आर्जव ।
अकिंचनधर्म सर्व ब्रह्मचर्य । एवं धर्मलक्षणें ॥१४९॥

जीव सजीव निर्जीव निर्जर । आश्रम वध्द मोक्षपरिकर ।
हे सप्त पदार्थ उत्तरोत्तर । प्रतिपादन ॥१५०॥

यानंतरे बोध तो भूमी मुख्य । वुध्यांत त्रिविंशति तत्वात्मक ।
रचना अशेख । प्रपंचसंमोह ॥१५१॥

दीपज्वालापरी । क्षणीक भोग भासे वेव्हारी ।
म्हणोनियां करी । संभाषण ॥१५२॥

शौर्यतांत्रिक वैभाषिक । महायानीक सौश्त्रत म्हणिजे चतुष्क ।
प्रकार होऊनि पृथक । असे निरुतें ॥१५३॥

यांनंतरे सत्यनाथ । संतोषनाथ आदिनाथ ।
अनादिनाथ अकुळीनाथ । मतंगनाथादि ॥१५४॥

मछिंद्रनाथ घटयंत्रिनाथ । गोरक्षनाथ गयनीनाथ ।
सिध्दापासूनि कल्पित । जाले प्रसिध्द ॥१५५॥

कौळव्यामळादिक । हिंसामैथुनादी अनेक ।
निषेधकर्मयुक्त पृथक । शास्त्र जाले ॥१५६॥

अभिचारकर्मजनित । व्याधिद्वारे काल मृत्य ।
रूपमारणमूर्छादि सुषुप्त । सदृशी लक्षण ॥१५७॥

मोहनस्तंभन अग्निस्तंभ । जलस्तंभ इंद्रियस्तंभ ।
खड्गस्तंभ जिव्हास्तंभ । रूपादि स्तंभलक्षण ॥१५८॥

पूर्वाश्रय सूख । संग अतिसांगिक ।
निरसनात्मक । उच्चाटण ॥१५९॥

वस्त्राभरण वाहन । वनितादि वस्तु नाना रत्न ।
शीघ्र अकोचन । निजस्थानापासूनिया ॥१६०॥

प्राणस्नेहे अन्योन्य । विरोधकरण ।
मारण विद्वेषण । हे षट्कर्मयुक्त लक्षणें ॥१६१॥

राजवश्य जनवश्य । स्त्रीवैश्यादि सकळवश्य ।
ज्वर भूत ग्रह अवस्य । चेतनालक्षणें ॥१६२॥

पादुकासिध्दी । आयुष्यसिध्दी ।
अंजनसिध्दी । रसवादसिध्यादि ॥१६३॥

यानंतरे यासि कारण । तया येकात्म्यापासून ।
वासुदेव संकर्षण । प्रद्युम्न अनिरुध्द ॥१६४॥

तयापासूनि प्रोक्त निर्धार । क्रमे शक्ति पंचरात्र ।
उभयपरी शास्त्र । उत्पन्न जालें ॥१६५॥

शक्ति म्हणो जड जडात्मक । प्रपंच परी अनेक ।
शक्तिपरिणाम अशेख । विस्तारला असें ॥१६६॥

अणीक पंचरात्र म्हणवीत । पृथ्व्यादि मानसात ।
चतुर्विंशति समस्त । तत्वावरी ॥१६७॥

गुणतत्वात्मक कारण । वासुदेवापासून ।
जगतहितार्थालागुन । संभवलें ॥१६८॥

कृष्ण अनिरुद्ध मकरध्वज । रोहिणी या म्हणोनि वाराज ।
चतुष्की उत्पत्यादि सर्व काज । संपादिलें ॥१६९॥

यानंतरे लौकीक वैदिक । अध्यात्मीक अतिमार्गिक ।
मातृकादि पंचक । शास्त्र जाले ॥१७०॥

लौकीक प्रोक्त धन्वंतरीपासुन । आयुर्वेद दंडनित्यादिकरून ।
दृष्टांतफळसाध्यसाधन । तें सांगत असें ॥१७१॥

अणीक जयमुनी अक्षपाद । कण्वादि ऋषेश्वर त्रिविध ।
तयापासूनि प्रसिध्द । क्रमें उत्पन्न जाहलें ॥१७२॥

पूर्वमिमांसीक न्याइक । वैशेषीक म्हणिजे पृथक ।
दृष्टादृष्ट फळयुक्त वैदीक । शास्त्रत्रय ॥१७३॥

पूर्वमिमांसीक । उपक्रमादी मुख्य ।
षड्विधलिंगतात्पर्यादिक । वेदवाक्यविचारें ॥१७४॥

पूर्वक होवोनि । ज्योतिष्टोमे म्हणोनि ।
यागादीक करणी । सांगत असें ॥१७५॥

न्याइक शास्त्र ते प्रमाण । प्रमय संशय प्रयोजन ।
दृष्टांत सिध्दांत वचन । अवयव तर्क ॥१७६॥

निर्णय वाद जल्प वितंडत्वाभास । स्थल जाती निग्रहस्थानासि षोडश ।
पदार्थ परि विशेष । प्रतिपादन करी ॥१७७॥

अणीक अखिल प्रपंचाते । ईश्वर कर्ता निरुतें ।
म्हणोनि यथार्थे । निश्चय करीतसें ॥१७८॥

वैशेषिक शास्त्रातें द्रव्यागुण । कर्म सामान्य ।
विशेष समवायू म्हणोन । परिक्रमें ॥१७९॥

षट्पदार्थ प्रतिपादक । प्रपंचस्वरूप पृथक ।
विभागीत मुख्य । असे निरुतें ॥१८०॥

अणीक पाताळीक पातांजळी । व्यासादि मुनीकुळी ।
अनुक्रमें निरोपिली । प्रसिध्द परी ॥१८१॥

सांख्य पातांजळ वेदांत । म्हणिजे आत्मज्ञानफळयुक्त ।
आध्यात्मीक मत्त । शास्त्रत्रय ॥१८२॥

त्याचे ठाई सांख्याचे सांगणें । नित्य निर्मळ आत्मसन्निधानें ।
गुणत्रयात्मक स्वगुणे । प्रकृतीचेनि ॥१८३॥

पंचविंशति तत्वात्मक । जगत जालें अनेक ।
संसारबंधन वेव्हारिक । म्हणे निरुतें ॥१८४॥

सत्वादि गुणत्रयाप्रती । श्लेष्मप्रकृती पित्तप्रकृती ।
आणि वातप्रकृती । इती हिया ॥१८५॥

जालें शांति क्रोध मूढ गुण । उत्तम मध्यम अधम म्हणोन ।
पुरुषत्रयादीक भिन्न । विभागीत असें ॥१८६॥

पातांजळ ते नियमादि अष्टांग योगानें । ग्रंथित्रयभेदन निश्चळ मनें ।
जीवपरमऐक्य कायाशोधने । निश्चये करीतसें ॥१८७॥

उत्तम मिमांशीक ते । उपनिषदाचेनि अर्थे ।
प्रतिपादक निरुत्तें । यथार्थे पैं ॥१८८॥

वेदांतशास्त्रें प्रपंचासी । मिथ्यत्व साधीतसें निश्चयेसीं ।
ऐक्यत्व जीवब्रह्मासी । सांगत असें ॥१८९॥

भाटीभास्कर ते मायावाद । शद्बब्रह्मवाद क्रीडाब्रह्मवाद ।
ऐसा प्रकार चतुर्विध । सांगत असें ॥१९०॥

अणीक मायातत्व विद्यातत्व । वस्य जाले संतत ।
तया त्रिरुद्रापासूनि कल्पित । जाले प्रसिध्द ॥१९१॥

पाशुपत कापाळिक । महाव्रतादिक ।
म्हणिजे अतिमार्गिक । शास्त्रत्रय ॥१९२॥

पाशुपतशास्त्रातें । मायाकर्म यथार्थें ।
पाशद्वय निर्णयातें । विभागीत असें ॥१९३॥

अणीक कापालिक । ते नरकपाळीं विशेख ।
भिक्षाटणादीक । विवरीत असे ॥१९४॥

अणीक महाव्रत । ते अस्ति संकेत ।
धारणादिक संकेत सांगत । असे निरुतें ॥१९५॥

यानंतरे परशिव प्रोक्त । जाले अतिउत्कर्ष चरित्र ।
मंत्रादि साधनयुक्त । ते मोक्षसाधन म्हणवी ॥१९६॥

क्रिया अचरिया । योगज्ञान म्हणोनिया ।
परिक्रमें अतिशया । सांगे प्रमाणसिध्द ॥१९७॥

अणीक या सकळ मत्तांतरातु । आत्मस्वरूपनिश्चयार्थु ।
करुनि असे सांगतु । तें सांगिजेल ॥१९८॥

आत्मा देहचि मुख्य । म्हणोनिया चार्वाक ।
निश्चयपूर्वक । प्रतिपादीतसें ॥१९९॥

इंद्रियेचि आत्मस्वरूप । म्हणउनि निश्चयरूप ।
करीतसें अक्षेप । चार्वाक येकदेशी ॥२००॥

प्रणवचि आत्माकारक । निश्चयपूर्वक ।
म्हणे हिरण्यगर्भ चार्वाक । येकदेशी ॥२०१॥

अणीक येक देह विलक्षण । जालियां येकात्मा आपण ।
देह प्रमाण संपूर्ण । मध्यम प्रेमप्रणामें ॥२०२॥

संकोचविकाशक । धर्मयुक्त प्रवर्तक ।
म्हणोनि नेमक । जैन प्रतिपादी ॥२०३॥

बुध्दीचि स्वतंत्र । आत्मा स्वयंसार ।
म्हणोनि साचार । बौध्द प्रतिपादी ॥२०४॥

आत्मा अनंदचि केवंळ । म्हणोनि निश्चयें त्रिकाळ ।
प्रतिपादी कौळयामळ । शाक्त्यादिक ॥२०५॥

आत्मा नाडीमध्यगत । होउनि असे संतत ।
अणुप्रमाण असे म्हणत । असे पंचरात्र ॥२०६॥

आत्मा देहपात्रादी रूपवंत । म्हणोनि असे प्रणामीत ।
धन्वंतरी आयुर्वेदादी समस्त । लौकीकमत्त ॥२०७॥

आत्मा स्वतंत्रप्रमाण । ज्ञानस्वहीत म्हणउन ।
मीमांसीक भेद आपण । म्हणे भाटभास्कर ॥२०८॥

आत्मा गगनाकार सघन । महत् परिमाण ।
जड पाषाण । ऐसा जाला तरी ॥२०९॥

मनसंयोगे संतत । असे चित्त धर्मयुक्त ।
म्हणोनि असे प्रतिपादित । न्याईक वैशेषिक ॥२१०॥

आत्मा असंख्य अविकार । चिन्मात्र निर्भर ।
म्हणोनियां निर्धार । सांख्यपातांजळीसी ॥२११॥

आत्मा निष्कळंक अरूप । ज्ञप्तिमात्र दिग्दीप ।
म्हणोनि अक्षेप । वेदांतियासी ॥२१२॥

आत्मा नित्य व्यापक । चैतन्यरूप प्रतिपादक ।
पाशुपत कापाळिक । ब्रह्मव्रत ॥२१३॥

आत्मा व्यापक नित्य । ज्ञानक्रियारूपयुक्त ।
म्हणोनि सिध्दांती मंत्रस्थित । पृथक् सांगे ॥२१४॥

अणीक सकळवादी भिन्न । मत्तांतरी प्रतिपादन ।
मोक्षविषई लक्षण । कैसे म्हणीतले तरी ॥२१५॥

देहाचे मरण । तेचि मोक्षसाधन निर्वाण ।
म्हणत आपण । चार्वाक तो ॥२१६॥

तया लौकीक शास्त्रांतु संचरण । उत्तरोत्तर गमन ।
तोचि मोक्ष जैन । म्हणत असे ॥२१७॥

सुखदुःखादीरहित । बुध्दि संततोदित ।
तोचि मोक्ष निभ्रांत । बौध्द म्हणे ॥२१८॥

आकाशगमनादि शक्ती । प्राप्त तेचि मोक्ष त्रिशुध्दी ।
म्हणोनि कौळयामळादि । निर्धारेंसी ॥२१९॥

आनंदपदप्राप्ती । तेचि मोक्षस्थिती ।
म्हणत असे शक्ती । निश्चयेसी ॥२२०॥

वासुदेवात्मक प्रकृतीआत । जाणीव लीन होय अचेत ।
तेचि मोक्षस्थिती संतत । असे पंचरात्र ॥२२१॥

इही परांत पुत्रभार्यादि संयुक्त । व्याधीदुःखक्लेशादिरहित ।
सुखरूप असणे तेचि मोक्ष सत्य । म्हणे लौकिक ॥२२२॥

स्वर्गादिक पद । प्राप्त तेचि मोक्षपद ।
म्हणत असे प्रसिध्द । पूर्वमीमांसीक ॥२२३॥

आत्मादेहइंद्रियादि येकविंशति । दुःख अत्यंत नासोनी पाषाणरिती ।
अत्मेने असणे तेचि मोक्षस्थिती । म्हणे न्याईक वैशेषिक ॥२२४॥

प्रकृतिपुरुष । विवेके अविद्यानाश ।
तेचि मोक्षवास । म्हणे सांख्य ॥२२५॥

योगाभ्यासशक्तीने मन । लयद्वारे अज्ञान ।
नाश तोचि मोक्षनिर्वाण । म्हणे पातांजळी ॥२२६॥

ब्रह्मआत्मैक्यज्ञानें । वेव्हारीक बध्द बंधनें ।
निवृत्ती तेचि मोक्ष म्हणे । वेदांतिया ॥२२७॥

ईश्वरत्व आन येकातें । देऊनि परवाहेईश्वरत्व ।
आत्मा ज्ञप्तिमात्र असणे तें । मोक्ष म्हणे पाशुपत ॥२२८॥

संसारादीक प्राप्ति कर्तृत्वानें । म्हणोनि तें त्यजणे अपण ।
ज्ञप्तिमात्र असणें । तेचि मोक्ष म्हणे कापाळीक महाव्रत ॥२२९॥

आत्मा षडध्वातीत । शिवसमानत्वें सत ।
असणे तेचि मोक्ष म्हणत । सिध्दांतिया ॥२३०॥

यानंतरें वादियामध्ये पृथक । चार्वाक जैन मिमांशिक ।
सांख्यादि मुख्य । निरीश्वर्यवादी ॥२३१॥

उरले सकळ परी । संमोह मत्तांतरी ।
ते जाणावे चतुरीं । सईश्वरवादी ॥२३२॥

अणीक तया वादियामधी । चार्वाकादी सकळ भेदवादी ।
वेदांती येक त्रिशुध्दी । अभेदवाद ॥२३३॥

अणीक इति क्रिया । विषद सांगीतलियां ।
सकळ संमोह अतिशया । शास्त्राआंतु ॥२३४॥

वेद चार वेदांगे षट्क । मिमांसीक (क) न्याईक ।
स्मृति पुराण इति चतुर्दशक । विद्या म्हणवी ॥२३५॥

तया चतुर्दशक । विद्येआंतु मुख्य ।
मिमांसीक म्हणिजे अधिक । विशिष्ट म्हणवी ॥२३६॥

विंशति अध्याय । अर्थप्रतिपादकमय ।
परि ते भाग उभय । होऊनि असे ॥२३७॥

त्याचे ठाई प्रथम भागअंश । जैमिनीसूत्ररूपे विशेष ।
अध्याय द्वादश । म्हणवी निरुतें ॥२३८॥

ते कर्मार्थनिपुण । प्रतिपादक होऊन ।
लोक वेदाधिकरण । म्हणे सर्वथां ॥२३९॥

प्रथम सहस्र येक । न्याये पूर्वमिमांसिक ।
म्हणवीतसे मुख्य । जैमिनीसूत्रें ॥२४०॥

तया सूत्रासि निर्धारें । शावर मुनेश्वरे ।
भाष्य सविस्तारें । केलें प्रसिध्द ॥२४१॥

तया मिमांसीक । शास्त्रासि भट्टाचार्य वार्तिक ।
रूपाने भाट म्हणोनि येक । मत्तांतर स्थापिलें ॥२४२॥

अणीक यानंतरें । भट्टाचार्याचेनि शिष्ये प्रभाकरें ।
शावरभाष्य सविस्तारें । प्रतिविस्तारू केला ॥२४३॥

तया नाम प्रभाकर । म्हणोनिया स्वतंतर ।
पृथक् मत्तांतर । निर्माण केलें ॥२४४॥

यानंतरे द्वितीय भागातें । व्रह्मप्रतिपादकत्वें ।
उत्तरमिमांशीक निरुतें । म्हणौनि नाम ठेउनी ॥२४५॥

व्याससूत्ररूपें अष्टध्याय । होऊनि असें भाग उभय ।
त्यामध्ये पूर्व चतुर्थ उभय अध्याय । ते ते देवताकांड म्हणवी ॥२४६॥

( त्याचे ठाई ) मंत्रवाद असे मुख्य । देवतालक्षण विशेख ।
ते बळिभद्रापासूनि प्रतिपादक । विस्तारलें ॥२४७॥

अणीक ते उत्तरमिमांशिक । अपर अध्यायचतुष्क ।
तें निजकारक । ब्रह्मकांड म्हणवी ॥२४८॥

तया शंकराचार्य । ब्रह्मण्यात्मैक्यमय ।
प्रतिपादक होऊनि अतिशय । भाष्य विस्तारिले ॥२४९॥

तया भाष्यासि विवरण । विवर्णाचार्यें केले विस्तीर्ण ।
ते विवरण आपण । वेदांतशास्त्र म्हणवी ॥२५०॥

या वेदांतशास्त्र । परी सविस्तार ।
तो कवण कैसा प्रकार । विचारें सांगिजेल ॥२५१॥

अशिर्वाद नमस्कार । वस्तुनिर्दोष म्हणिजे त्रिप्रकार ।
मंगळाचरण शास्त्र । आरंभासी ॥२५२॥

आणीक पद पदार्थ वाक्ययोजन । प्रश्न परिहर म्हणिजे व्याख्यान ।
हे पंचलक्षण । म्हणवीतसें ॥२५३॥

अणीक विशेषण । विशेष कर्ता कर्म क्रिया म्हणोन ।
अन्वयें पंचलक्षण । म्हणवी निरुतें ॥२५४॥

आणीक विषय समंध । प्रयोजन अधिकार विषद ।
हें शास्त्रासी अनुबद्ध । चतुष्टय ॥२५५॥

त्याचे ठाई हिया महाशास्त्र । विचारें साचार ।
जीवब्रह्म ऐक्यत्व निर्धार । ते विषय म्हणवी ॥२५६॥

ब्रह्मशास्त्रासी विशेष । प्रतिपाद्यप्रतिपादक ।
भाव तोचि मुख्य । समंध म्हणवी ॥२५७॥

दुःख शोक क्लेश स्थिती । सकळपरी निवृत्ती ।
नित्यानंदप्राप्ती । ते प्रयोजन म्हणवी ॥२५८॥

साधन चतुर्थ । संपन्नयुक्त ।
तोचि म्हणवीत । अधिकारी ॥२५९॥

नित्यानित्यवस्तुविवेकता । इहिमुत्रार्थफलभोगविरागता ।
सास्यादिषद्क मुमुक्षता । इति साधनचतुष्टय ॥२६०॥

चिद्रूप रूपघन । आत्मा साक्षी चैतन्य ।
विभू असंग पूर्ण । नित्य तो येक ॥२६१॥

उरला विश्वप्रपंच समस्त । मिथ्या म्हणोनि जाणावे यथार्थ ।
ते नित्यानित्यवस्तुत्व । विवेक म्हणवी ॥२६२॥

इहीपरांत उभय । वनितादि भोगविषय ।
सकळ कर्मजनित पर्याय । भोगूनियां ॥२६३॥

महाप्रयास विरहदुःखसंग । म्हणोनि मनाआंत विराग ।
ते इहमुत्रार्थ फलभोग । वैराग्य म्हणवी ॥२६४॥

शट्कसाम्यादि । विविध यथाविधी ।
सकळ सद्गुणसिद्धी । ते शम म्हणवी ॥२६५॥

सहज सायुज्यता । मोक्षवरी अपेक्षता ।
ते श्रद्धाची मुमुक्षता । म्हणवीत असें ॥२६६॥

आणि शमदमातितिक्ष उपरती । श्रध्दासमाधीप्रीती ।
म्हणिजे परिक्रमे इति । शम्यादि शट्क ॥२६७॥

अंतःकरण अंकुर । वृत्तिविवर्त व्यापार ।
निग्रह ते साचार । शमा म्हणवी ॥२६८॥

बाह्यकरण । धृतिधारण ।
निग्रहनिरोधन । ते दमा म्हणवी ॥२६९॥

सुखदुःख अकल्पित । धैर्यशौर्य समस्त ।
क्रोधादी निग्रहजित । ते तितिक्षा म्हणवी ॥२७०॥

श्रुतीचिया अनुसारें । आचार्यवाक्यपरि आदरें ।
विश्वास साचारें । ते श्रध्दा म्हणवी ॥२७१॥

गुरुउपदेश । वाक्यावरी विश्वास ।
ते दृढीकरण ( वी ) विशेष । इति समाधीकार्य म्हणवी ॥२७२॥

कोण्हीयेक साधनचतुष्टय । संपन्नयुक्त अधिकार्य ।
शिष्य सद्गुरूसी अभेदमय । जाऊनि शरणागत ॥२७३॥

विनय विज्ञापने सेवातत्पर । जाले शिष्यवर ।
ते चतुर्विध प्रकार । लक्षण असे ॥२७४॥

अस्त अंग स्थान । आणि सद्भाव म्हणोन ।
ऐसे चतुर्विध शिष्य भिन्न । परिक्रमे ॥२७५॥

सद्गुरूसी आपण । सानकूळ वृत्तीनें ।
वर्ते तो जाणणें । आप्तशिष्य ॥२७६॥

श्रीगुरूचे पादकमळ । प्रक्षाळणादी सेवा सकळ ।
तत्पर असे सर्वकाळ । तो अंगशिष्य ॥२७७॥

सद्गुरूचे गृहक्षेत्रधन । सकळ परिरक्षण ।
तो प्रिय स्थान । शिष्य म्हणवी ॥२७८॥

श्रीगुरू साक्षात्सदाशिव । म्हणोनि विश्वास तत्पर भाव ।
रत असे निरंतर स्वयमेव । तो सद्भावशिष्य ॥२७९॥

अणीक कर्मकांडी । भक्तिकांड ज्ञानकांडी ।
म्हणोनि विविध परवडी । अधिकारीत्रय ॥२८०॥

देहगृहकृत्यादि अभिमत्त । अनुक्रमें मिमांस म्हणत ।
अहंकारममतासंयुक्त । तो कर्मकांडी ॥२८१॥

सकळ क्रियाकर्म विधियुक्त । करूनियां अनाश्रित ।
करी ईश्वरी अर्पित । तो भक्तिकांडी ॥२८२॥

अखिल कर्मसंमोहातें । साक्षीक मी सत्यार्थे ।
म्हणे जो निरुतें । तो ज्ञानकांडी ॥२८३॥

यानंतरे आणीक । कर्मी मुमुक्षी अभ्यासिक ।
अनुभवी अरुढी पृथक । वरशिष्य ॥२८४॥

होऊनिया उत्तरोत्तरी । विशिष्ट जो अधिकारी ।
ते पंचविध प्रकारी । त्याचे ठाई ॥२८५॥

मूढपणें स्वजातीमात्र कृत्य । कर्म धरूनि अभिमत्त ।
स्वजाती सप्तजन्मे मुक्त । जाला तो कर्मी ॥२८६॥

जग ते संतत सत्य म्हणोनि । बाह्यकर्मनिष्ट होऊनी ।
त्रिजन्मे मुक्त जाला निदानी । मुमुक्षु ॥२८७॥

स्वप्नतुल्य प्रपंच सर्व मिथ्य । म्हणोनी अभ्यंतरी ध्यानादियुक्त ।
असोनि जन्मद्वयासि मुक्त । जाला तो अभ्यासी ॥२८८॥

वेव्हारअपेक्षा विरक्ती । विवेकतत्पर रिती ।
होउनि येकजन्में मुक्ती । पावला तो अनुभवी ॥२८९॥

विश्वविकृती किंचित । न दिसे सर्वगत ।
आत्मज्ञाने सद्योन्मुक्त । जाला तो आरूढी ॥२९०॥

अणीक हीया अखिल । जगतकंदकमळ ।
वल्लरीचे कवण मूळ । म्हणौनियां ॥२९१॥

विचारमुखे निपुण । निजगुरू पावोन ।
ब्रह्मज्ञानी होऊन । मुक्त जाला कश्चित ॥२९२॥

देहादि अनित्यत्व जाणोनी । उभयभोग अपेक्षा त्यजूनि ।
गुरुकृपे तदज्ञ होउनी । मुक्त जाला कश्चित ॥२९३॥

कश्चित स्वगुरू स्वशिष्यातें । उपदेश करिता तेथें ।
आन येक अकस्मातें । ऐकोनियां ॥२९४॥

तत्वविचारनिपुण । जाणोनि आत्मज्ञ होउन ।
शाश्वतपद निर्वाण । पावला कोणहीयेक ॥२९५॥

ऐसी विविध पध्दती । विवेकविचार दैवगती ।
मुक्त जाले इति । अधिकारित्रय ॥२९६॥

अणीक सद्गुरूसाधक । सत्शिष्यासी पृथक ।
अधिकारत्वे विशेख । बोधीत असें ॥२९७॥

ते गुरुलक्षण विविधाकारू । बोधकगुरू वेधकगुरू ।
आणी निषिद्धगुरू । काम्यगुरू तो ॥२९८॥

सूचकगुरू वाचकगुरू । कारकगुरू विहितगुरू ।
ऐसा अष्ट प्रकारू । भिन्न भिन्न ॥२९९॥

शास्त्रक्रमे संकेत । शब्दसिध्दीअर्थ ।
बोधी यथाविहित । तो बोधकगुरू ॥३००॥

विचारें तत्वात्मक । यथापरी पृथक ।
सकळदर्शिक । तो वेधकगुरू ॥३०१॥

वश्यआकर्षणें । इहलोकी सुख स्थापणें ।
परलोकीं दुःख सांगणें । सांगे तो निषिध्दगुरू ॥३०२॥

पुण्यकर्म उपदेशें । इहपरांत सरिसें ।
सुखप्रदायक विशेषें । तो काम्यगुरू ॥३०३॥

विवेकमुखे साम्यादि । सद्गूणपरिसिध्दी ।
प्रदायक सकळादि । तो सूचकगुरू ॥३०४॥

विषय मिथ्यत्वें पृथक । दर्शन दाऊनि विशेख ।
आत्मानुरागप्रदायक । तो वाचकगुरू ॥३०५॥

जिवशीवऐक्य । ज्ञानसहीते सुख ।
संप्रदायक । कारकगुरू ॥३०६॥

संशयनिवृत्तिद्वारें । नित्यमुक्तत्व विशेषात्कारें ।
प्रदायक निर्धारें । तो विहितगुरू ॥३०७॥

आणीक सद्गुरू सत्‌शिष्याआंत । वर अधिकारी कश्चित ।
तापत्रयाग्नी संतप्त । होऊनि व्याकुळचित्तें ॥३०८॥

मी कवण मज हा संसारु । किंनिमित्त्य जाला हा व्यवहारु ।
हा कवणमुखे पैं निर्धारु । निवृत्ती होय ॥३०९॥

म्हणोनि विचार पाहोनी । पत्रपुष्पफलादी समर्पणी ।
अपण घेउनी । श्रद्धापूर्वक ॥३१०॥

विद्याविनयवैराग्यासक्त । सद्गुणसकळयुक्त ।
श्री गुरुवर साक्षात । पावोनि या ॥३११॥

चैतन्यं शाश्वतं शांतं व्योमातीतं निरंजनं ।
नादबिंदुकलातीतं तस्मै श्री गुरवे नमः ॥३१२॥

इति अष्टधा मंत्रपूर्वक भावे प्रिय । पादद्वयभुजाद्वय ।
करकमळद्वय । ललाटवक्षस्थळ ॥३१३॥

साष्टांगे दंडप्रणिते । भयमत्त अनुमत्तें ।
करसंपुष्ट जोडूनि निरुत्तें । किंकरभावें ॥३१४॥

दुर्घट उपलवोनी । कार्पण्य दाउनी ।
स्तोत्राकार करूनी । अतिस्नेहें ॥३१५॥

ज्ञानवैराग्यबळ । ऐश्वर्यकीर्तिश्रीपरिमळ ।
इत्यादि सफळ । सद्‌गूणसंपन्न ॥३१६॥

हे भगवान् सद्गुरुमूर्ति । अनयासे भवबंधनिवृत्ति ।
कवण प्रकारे प्राप्ती । मज होय ॥३१७॥

म्हणउनियां कारण । शिष्यविधी वदूं संपन्न ।
श्री गुरुसी विज्ञप्ती करून । करिता जाला ॥३१८॥

मग तो सद्गुरू आपण । अति उपमासंपन्न ।
शिष्याधिकार परिक्षून । आनंदभरें ॥३१९॥

कृपावलोकने पाहुनी । अभय पुत्रा म्हणोनि ।
हस्तक मस्तकस्थानीं । न्यासिता जाला ॥३२०॥

श्रुतियुक्तीने तयाचे जडत्व । देहअनात्मबुद्धि अनित्यत्व ।
नेतिमुखें निरसूनि सत्यत्व । तूंचि आपण ॥३२१॥

परब्रह्म विशिष्ट । म्हणोनि निजतत्व येकदाट ।
दाखविले तोचि उत्कृष्ट । गुरुपदेश जाणावा ॥३२२॥

तया उपदेशकर्मासि मुख्य । उद्देशलक्षणपरिक्षक ।
म्हणोनियां पृथक । बोधपरित्रिया ॥३२३॥

त्याचे ठाई । गुरुने आपण स्वतां । अनुभविली वस्तुता ।
ते दीधली इष्टार्था । तया वस्तूसीं ॥३२४॥

सद्चिद्आनंद । नित्यपरिपूर्ण निर्बंध ।
म्हणोनि करी स्तुतिसंवाद । तें उद्देश म्हणवी ॥३२५॥

गळे युक्ति तेचि रोही आपण । ते वस्तूसी असाधारण ।
धर्म सांगे ते लक्षण । म्हणवी जाणावें ॥३२६॥

लक्षीत जालिया वस्तूतें । ते लक्षण अहेनाही निरुतें ।
म्हणोनि विचार करणे तें । परिक्षा म्हणवी ॥३२७॥

अणीक प्रत्यक्षप्रमाण । अनुमानप्रमाण ।
अर्थापत्यमान । ऐतिह्यप्रमाण जें ॥३२८॥

उपमानप्रमाण । अभावप्रमाण ।
स्वभावप्रमाण । स्वभावप्रमाण जें ॥३२९॥

एवं प्रकार विविध । वस्तूसिद्धीसी प्रसिद्ध ।
प्रमाण अष्टविध । कारण म्हणविती ॥३३०॥

त्याचे ठाई । घटादीकदर्शन । तेचि आपण ।
प्रत्यक्षप्रमाण । म्हणवीत असें ॥३३१॥

धूम्रसंयोगेकरून । अग्नीचे ज्ञान ।
तेचि अनुमान । प्रमाण म्हणवी ॥३३२॥

तया अनुमाना । प्रमाणासी प्रतिज्ञा ।
हेतुदृष्टांत म्हणोनि जाण । दृष्टांतत्रय वर्तती ॥३३३॥

त्याचे ठाई । महापर्वतस्थानीं । सर्वथा असे अग्नी ।
म्हणोनी सांगणे वचनीं । ते प्रतिज्ञा म्हणवी ॥३३४॥

धूम्रसंयुक्त । असे पै निभ्रांत ।
म्हणणे ते हेत । म्हणवी जाणिजें ॥३३५॥

महानुसंन्याये विहित । म्हणणे समीपस्थ ।
तेच्चि दृष्टांत । म्हणवी निरुतें ॥३३६॥

अणीक यथा दृष्टांतार्था वादी जाला । अप्तवचनें नदीतिरीफळा ।
दिक्सद्भाव ज्ञानकळा । ते अगमप्रमाण म्हणवी ॥३३७॥

दिवाभोजन न करी देवदत्त । देह पुष्ट देखोनी रात्री भोजन करीत ।
म्हणौनि कल्पिजे तो दृष्टांत । अर्थापत्य म्हणवी ॥३३८॥

सुखी असे देवदत्त । ते नसे गृहाआत ।
तरी स्थानांतरे कश्चित । गेला असे ॥३३९॥

गोसदृश्य रोही म्हणऊन । वाक्य श्रवणी ऐकोन ।
अरण्यस्थानीं देखोन तद्विविषयज्ञान । ते उपमानप्रमाण म्हणवी ॥३४०॥

म्हणोनी युक्ती । जाणिजे तयाची स्थिती ।
ते श्रुत्यार्थप्रती । प्रमाण म्हणवी ॥३४१॥

या भूतळात घट नास्ति म्हणऊन । घटअभावज्ञान ।
तो अभावप्रमाण । म्हणवीत असे ॥३४२॥

सहस्रसंख्येचे ठाई कारण । शतसंख्याज्ञान ।
ते सद्भावप्रमाण । म्हणे निरुतें ॥३४३॥

या वटवृक्षाचे ठाई यक्ष असे हे । म्हणोनि लोकवार्ता यक्षविषय ।
ज्ञान तेच्चि ऐतिह्य । प्रमाण म्हणवी ॥३४४॥

या प्रमाणाचे ठाई कारण । चार्वाकासी प्रत्यक्षप्रमाण ।
जैनबौद्धवैसिकालागून । अनुमानप्रमाण म्हणवी ॥३४५॥

सांख्यासि अगमप्रमाण । न्याइकांसि उपमानप्रमाण ।
प्रभाकरास धारण । अर्थापत्यप्रमाण म्हणवी ॥३४६॥

भाटवेदांतियालागून । अभावप्रमाण ।
पुराणिकांसि स्वभावप्रमाण । ऐतिह्य म्हणवी ॥३४७॥

ऐसे हे अष्टप्रमाण । मत्तांसि अभिमत्त म्हणऊन ।
विचारे विवरण । केले यथार्थे ॥३४८॥

या नंतरे दृग् दृश्यमय । म्हणिजे पदार्थद्वय ।
दृक् अशेष चिन्मय । त्याचे ठाई ॥३४९॥

स्वगतभेद । स्वजातिभेद ।
विजातिभेद म्हणोनि इति ॥३५०॥

तृतीयपरिभेद । करावया छंद ।
दृष्टांत योग्यताप्रसिद्ध । प्रमाण तो कैसा ॥३५१॥

लोकांतु प्रत्यक्ष । कवण येक रुक्ष ।
तया पत्रपुष्पफळादिक । स्वगतभेद म्हणे कीं ॥३५२॥

रुक्ष विलक्षण संतति । अंतरे विशेष असती ।
ते स्वजाती । भेद म्हणवी ॥३५३॥

पाषाणादीक जाती । जडमान अकृती ।
तेचि विजाती । भेद म्हणवी ॥३५४॥

तैं सद्रूपब्रह्म गगनापैसें । निरावेव होउनी असे ।
म्हणोनि संतासी आन येक विशेषे । सत्ता नाही ॥३५५॥

तया कारणे प्रसिद्ध । स्वगतभेद स्वजातिभेद ।
सद्ब्रह्मी हा द्विविधभेद नास्ती ॥३५६॥

परि जगत्कारण । माया असे आपण ।
विजातीभेद म्हणऊन । कैसे नास्ती म्हणावें ॥३५७॥

तरि लोकांतु चित्रक । शक्तीसी पृथक ।
भिन्न भिन्न दिसणे विशेख । म्हणतां न घडे ॥३५८॥

तैसे सन्मात्र ब्रह्म सन्यधि मायेसी । विलक्षण नाहीं सदा सर्वेशीं ।
म्हणोनि विजातिभेद ब्रह्मासी । नाही जाणावें ॥३५९॥

या अर्थासी दृष्टांत वाह्य । उभारूनी येकमेवाद्वितीय ।
ब्रह्म म्हणउनि अतिशय । श्रुतिवाक्य ॥३६०॥

येकमेवाद्वितीय । म्हणउनि पदतृतीय ।
तयासी ऐक्यस्थिती निश्चय । अवधारणें ॥३६१॥

द्वैतनिषेध । त्या कारणे अर्थ होय त्रिविध ।
म्हणोनि परिक्रमें प्रसिद्ध । ब्रह्माचे ठाई ॥३६२॥

स्वगत स्वजाती विजाती । म्हणोनि भेदत्रय नास्ति ।
हा अर्थ निश्चय स्थिती । प्रमाणप्रसिध्द ॥३६३॥

अणीक अध्यारोप अपवाद । म्हणोनि हा द्विविध ।
कल्पितमय प्रसिध्द । त्याचे ठाईं ॥३६४॥

शुध्दरजसुक्तिस्थाणुवादिक । तयासी नाहीं ते अणीक ।
अही रजत चोरमुख । कल्पीत जैसें ॥३६५॥

तैसे सद्रूपब्रह्मीं विशेख । नाहीं तें अभासक ।
मायाप्रपंचकल्पनादिक । ते अध्यारोप म्हणवी ।।३६६।।

मग हा सर्प नव्हे दोर । हे रजत नव्हे सुक्तिकाकार ।
हा चोर नव्हे स्थाणु साचार । म्हणोनियां ।।३६७।।

विचार मुखे प्रपंच । सकळ मिथ्या उंचनिंच ।
म्हणिजे ब्रह्मचि साच । तो अपवाद म्हणवी ॥३६८॥

आणि अंतर्व्यावृत्तिलक्षण । तटस्थलक्षण स्वरूपलक्षण ।
म्हणिजे दृक्‌रूपब्रह्मस्थ साक्षात्कारासि कारण । उपायत्रय ।।३६९।।

त्याचे ठाईं देहादि अनात्मवर्ग नेति । मुखे निरसूनि आत्म्याप्रती ।
जाणणे जाणिजें ते अंतर्व्यावृत्ती । लक्षण म्हणवी ।।३७०।।

शाखाग्री चंद्र असे म्हणोनियां । भूतादिजगत्कारणत्रें आत्मया ।
जाणीव जाणावी जे अतिशया । ते तटस्थलक्षण म्हणवी ॥३७१॥

प्रकृष्टप्रकाशरूप संविती । म्हणोनि आत्मयाची निजस्वरूपस्थिती ।
यथार्थ जाणीव जे अति । ते स्वरूपलक्षण म्हणवी ॥३७२॥

सद्चिदआनंद । नित्यपरिपूर्ण विषद ।
म्हणिजे इति पंचविध । आत्मस्वरूपलक्षणें ।।३७३।।

त्याचे ठाईं । नेणे जाणे न जाणीतले म्हणगे । कामादिवृत्तीचेनि गुणें ।
दिसणे न दिसणे । तया ठाईं ।।३७४।।

जाग्रदावस्थेचे ठाईं । अपणासी येक बाधा अहे नाही ।
म्हणणें तयाते ही । साक्षी ते सद्रूप म्हणवी ॥३७५॥

सर्व अवस्थाआत । विषय अनश्रुत ।
प्रत्यक्ष जाणे समस्त । ते चिद्रूप म्हणवी ।।३७६।।

परमप्रीतीकारणें । विषय होणें ।
ते म्हणवी आपण । आनंदरूप ।।३७७।।

संततोदीत । सांद्रानंद अखंडीत ।
होऊनि असे तो नित्य । स्वरूप म्हणवी ।।३७८।।

सर्वार्थसाधक होणे । सर्वसमंधित्वपणें ।
ते म्हणवी आपण । पूर्णरूप ।।३७९।।

अणीक येथे अक्षेप । सच्चिदानंद आत्मस्वरूप ।
होय तरी सद्रूप चिद्रूप । ऐसे सर्व बुद्धीसी ॥३८०॥

आनंद अभिव्यक्त । होऊनि दिसावा उदित ।
तरी यथायुक्त । नसे किंनिमित्य ॥३८१॥

तरी आनंदरूप । नव्हे आत्मस्वरूप ।
म्हणती त्यास परिहरसाक्षेप । दृष्टांतेंकरून ॥३८२॥

उष्णप्रकाशरूपदीपक । मंदिरांत विजृंभक ।
परि प्रकाशव्यापक । उष्णव्यापक कां नसे ॥३८३॥

उदकाचे ठाई विशेखें । उष्ण प्रगट असें ।
प्रकाश कां नसें । प्रगट होउनि ॥३८४॥

काष्ठाआंत सरिसे । उष्ण प्रकाश उभय असें ।
परि ते कां न दिसे । प्रकट होउनी ॥३८५॥

पाषाणाचे ठाई सद्रूपब्रह्म । अभिव्यक्त असे सम ।
चिदानंदासी क्षेम । अभिव्यक्ती कां नसे ॥३८६॥

तसे बुद्धिज्ञानमय स्फटिकनीती । तमोगुणें मूढ वृत्ती ।
रजोगुणे रागमय अति । घोर वृत्ती असें ॥३८७॥

सच्चिद्रूप उभयार्थें । अस्पृष्टत्व नाहीं निरुतें ।
आनंदासी येक चित्तें । अस्पृष्टत्व नाही ॥३८८॥

सत्वगुणें वैराग्यमय । शांतिवृत्तीनें अतिशय ।
सच्चिदानंद म्हणिजे त्रय । स्वरूपासी स्फुरण होय ॥३८९॥

म्हणोनि आनंदरूप । होय आत्मस्वरूप ।
हे निश्चयरूप । प्रसिद्ध जाणावें ॥३९०॥

अणीक अनुक्रमे विपय । पंचस्वरूपासी विविध ।
उपाधि संमंधभेद । कैसे म्हणीतलें तरी ॥३९१॥

वेव्हारीकसंत । प्रतिभासीकसंत ।
परमार्थीकसंत । म्हणोनि संतत्रय ॥३९२॥

त्याचे ठाईं । जागृतीआतु घटादिगत । संत विदेही कैवल्यपर्यंत ।
सुषुप्तीमूर्छादिअवस्थायुक्त । होऊनि असे ॥३९३॥

मग चेवोनि पाहिले तरि विशेष । प्रथम ऐसे दिसतसे मुख्य ।
त्यालागी वेव्हारिक । संत म्हणवी ॥३९४॥

शुक्तिकाकार रजताकार । स्वप्नविषय दिसत ।
ते स्वकाळीं सत्यप्रबोधी असत्य । त्या कारणें प्रतिभासीकसंत ।
म्हणवी जाणावें ॥३९५॥

समस्त कल्पनेसी अवरीक । होउनी अधिष्ठानीकारक ।
दृश्य ना अदृश्य ब्रह्म तें परमार्थीक । संत म्हणवी ॥३९६॥

अणीक जीव ईश्वर । कूटस्थब्रह्म विविधाकार ।
म्हणिजे चतुर्विधप्रकार । चित्ताचे भेद ॥३९७॥

त्याचे ठाई । जळांतु प्रतिबिंबता आकाश । घटमठअविछिन्नाकाश ।
महदाकाश । म्हणिजे इति ॥३९८॥

अनुक्रमें चतुष्कें । दृष्टांत मुखें ।
म्हणवी विशेषें । चित्तचतुर्विध ॥३९९॥

आणीक विषयानंद । ब्रह्मानंद वासनानंद ।
मुख्यानंद निजानंद । आत्मानंदादि ॥४००॥

अद्वैतानंद विद्यानंद । म्हणोनिया आनंद ।
अष्टप्रकार विषद । त्याचे ठाई ॥४०१॥

वनितादि विषय कुटुंववशें । धनसंपत्तीलाभध्यासें ।
प्रगटोनिया दिसें । तो विषयानंद ॥४०२॥

विषयइंद्रियकरण । करणांतर्गत होउनी निमग्न ।
सुषुप्तिसाक्षित्वें दिसे पूर्ण । तो ब्रह्मानंद ॥४०३॥

निजोनियां चेते । तत्क्षणी पूर्वविषयांतें ।
अतिविशेषे प्रवर्ते । तो वासनानंद ॥४०४॥

हा नोपादान नास्ती । उपेक्षा राग रती ।
बुद्धिआंतु दिसे मोद अति । तो मुख्यानंद ॥४०५॥

अष्टांगयोगअभ्यासें । बळेंकरूनि कर्मवशे ।
मनोलयांतु दिसें । तो निजानंद ॥४०६॥

प्रियवाद तो वस्तुविषई कारण । मध्ये प्रियोत्तम आपण ।
म्हणोनिया जाणणें । तो आत्मानंद ॥४०७॥

नामरूपप्रपंच मिथ्य । आपण सर्वथा सत्य ।
म्हणोनि विवेके दिसें जाणिवेआत । तो अद्वैतानंद ॥४०८॥

तत्वमस्यादि महावाक्यविचार । जनित प्रकृष्टसारांतर ।
ज्ञानसाक्षात्कार । तो विद्यानंद म्हणवी ॥४०९॥

आणीक प्राग्भाव । प्रध्वंसनभाव ।
अनन्यभाव । अत्यंभाव हें ॥४१०॥

म्हणोनी ब्रह्म नित्य । पदाआतूनि रिघत ।
अभाव चतुर्थ । त्याचे ठाई ॥४११॥

प्रथम मृत्तिकेचे ठाई । घटादीक कांहीं ।
उपाधीलेश नाही । तो प्राग्भाव म्हणवी ॥४१२॥

घटाआंतु नाहीं पट । पटाआतु नाही घट ।
म्हणोनि निर्धार बळकट । तो अनन्यभाव म्हणवी ॥४१३॥

उपजले घटकार्य । ते सकळ अनित्यमय ।
म्हणोनी निश्चय । तो प्रध्वंशनभाव म्हणवीं ॥४१४॥

या नंतरे चतुर्थ । खपुष्पवत् ।
तो अति अत्यंत । अभाव म्हणवी ॥४१५॥

अणीक काळपरिच्छेद । देशपरिच्छेद ।
वस्तुपरिच्छेद । म्हणिजे इति ॥४१६॥

ब्रह्मपरिपूर्ण । पदांतू निवृत्तिकारण ।
परिच्छेदत्रय भिन्न । त्याचे ठाई ॥४१७॥

येके काळी असें । येके काळी नसें ।
म्हणोनी सांगत असें । तो काळपरिच्छेद ॥४१८॥

येके देशी असे । येके देशीं नसे ।
म्हणोन उपलवीत असें । तो देशपरिच्छेद ॥४१९॥

ग्रेक वस्तु होय । येक वस्तु न होय ।
म्हणोनि सांगणे पर्याय । तो वस्तुपरिच्छेद ॥४२०॥

आणि पूर्वोक्त चिद्रूपभेद । जीवईश्वरादी चतुर्विध ।
तयासी अनुक्रमें नामादि विविध । वेव्हारकल्पना कैसी ॥४२१॥

प्रथम जीवतो आपण । विश्वतैजसु प्राज्ञ ।
म्हणोनि त्रिविध भिन्न । त्याचे ठाई ॥४२२॥

स्थूळशरीरवेष्टित । अभिमानी तो म्हणवीत ।
वेव्हारीक जीवबुद्धि प्रतिफळित । चैतन्यचिदाभास ॥४२३॥

विक्षेपरूपक्षेत्रीं । प्रमातृशरीरी ।
कर्तृत्वभोक्तृत्वसंसारीं । विषई पराव्यागात्मा ॥४२४॥

विज्ञानमय । त्वंपद मुख्यार्थ कार्य ।
इत्यादि पर्याय । विश्वाचे नाम ॥४२५॥

अणीक सूक्ष्मशरीरवेष्टित । अभिमानी तो म्हणवीत ।
प्रतिभाषीक जीव स्वप्नकल्पित । मिथ्याभूत ॥४२६॥

अविद्याकल्पित । मायामय भ्रांतिजनित ।
इत्यादि मायामय नामाकृत । तैजसासी ॥४२७॥

अणीक कारण देहवेष्टित । अभिमानी तो म्हणवींत ।
अविद्योपाधिरहित । अव्याकृतअंश ॥४२८॥

तो मूर्च्छाभूत अज्ञानी । कार्यउपाधीक मूढसंज्ञी ।
इत्यादि नामाभरणी । पर्याय प्राज्ञासी ॥४२९॥

अणीक जीवात्मा । आणी अंतरात्मा ।
परमात्मा । म्हणोनी आत्मत्रय ॥४३०॥

त्याचे ठाईं । इच्छा ततायुपिंडाऐसे । देहादि अधिकार समंधवशें ।
सकळवेव्हारयुक्त असे । तो जीवात्मा ॥४३१॥

कमळपत्रोदकन्याये यथार्थ । जीव संसाराआंत ।
असे लिप्त अलिप्त । तो अंतरात्मा ॥४३२॥

लोकव्यवहारासि रवीऐसे । सर्व जीवां अंतरात्मा वेव्हारा सरिसें ।
साक्षीक जाला असे । तो परमात्मा ॥४३३॥

जळगतीचेनि । संगदोषेंकरुनि ।
चांचल्यत्वतरणी । जयापरी ॥४३४॥

कां मेघकूटचळणगती । संयोगे नक्षत्रपती ।
गगनवेगें धावती । जया न्यायें ॥४३५॥

का नावेचिया संगती । नदीतीरी वृक्ष जाती ।
गगनवेगे धांवती । जया न्यायें ॥४३६॥

तैसे देहसंगे । आत्मयासी साचार । जन्ममरण संसारवेव्हार ।
जिवित्व सुखदुःख अपार । कल्पिजे निरुतें ॥४३७॥

अणीक विराट पुरुष । हिरण्यगर्भ अंतर्यामी त्रिअंश ।
होऊनि असे विशेष । ईश्वराचे देहत्रय ॥४३८॥

त्याचे ठाईं । स्थूळतनू समष्टिअभिमानी । वैश्वानरादिकरुनी ।
विराटतत्पुरूषालागुनी । पर्यायनाम ॥४३९॥

अणीक सूक्ष्मतनु समाप्तिअभिमानी । महाप्राण सूत्रात्मादिकरूनी ।
हिरण्यगर्भालागुनी । पर्यायनाम ॥४४०॥

अणीक कारणशरीर समष्टित । अभिमानी जो शक्त ।
तो अज्ञानोपहित । चैतन्य जगद्योनी ॥४४१॥

कारणोपाधीक । मायोपाधीक ।
मायाविमायाभासक । आनंदकंद ॥४४२॥

आनंदमय अव्यक्त । अक्षर अव्याकृत ।
परमपरद्वैत । सबळब्रह्म ॥४४३॥

सगुणब्रह्म तत्पद मुख्य । आदिकरूनी पृथक ।
अंतर्यामिचे विशेख । पर्यायनाम ॥४४४॥

अणीक अंतर्यामी सूत्रात्मक । विराट म्हणोनि ईश्वर मुख्य ।
म्हणोनि उपाधि नैमित्तिक । तया दृष्टांत तो कैसा ॥४४५॥

अश्वित्त चित्रपट्टसिद्ध । नसतां द्रव्यांतरसमंध ।
तरि तो यथाशुद्ध । वस्त्र म्हणवी ॥४४६॥

वरि रसाचिया । लेपनेंकरुनियां ।
तोचि आपसया । घटित म्हणवी ॥४४७॥

वरी नीळादि विचित्र । नानावर्णाकार ।
संयोगे विस्तार । लांछन म्हणवी ॥४४८॥

वरि यथायुक्त पूर्ण । योग्यता सगुण ।
प्रतिमा लक्षण । तेणे रंजीत म्हणवी ॥४४९॥

तैसे परब्रह्म आपण । प्रथम विशुद्ध निर्गुण ।
माया तत्कार्य विलक्षण । चिद्रूप म्हणवी ॥४५०॥

वरी अखिलकारण । जाहला आपण ।
मायाउपाधीकरून । अंतर्यामी म्हणवी ॥४५१॥

वरी वक्तृ जळे पंचीकृत । भूतकार्य सूक्ष्मतनूसमष्टीत ।
उपाधीने ऐसें म्हणवीत । सूत्रात्मक ॥४५२॥

वरी व्यक्त जाले पंचीकृत । भूतकार्य रूपवंत ।
स्थूळशरीरसमष्टित । उपाधीनें विराट म्हणवी ॥४५३॥

अणीक येथ येक । ब्रह्मासी विचित्रपटदृष्टांत ।
जाला तरि तें चित्र रूपवंत । कवण म्हणीतलें तरी ॥४५४॥

विरिंच्यादितृणांत । चैतन्यप्राणी समस्त ।
गिरीनद्यादि अचेत । प्राणीसंमोह ॥४५५॥

म्हणिजे जडाजडारूप जगत । ते तारतम्य चित्र म्हणवीत ।
ब्रह्म तें अखंडीत । पट्ट म्हणवी ॥४५६॥

अणीक परमार्थीक । चिद्रूपब्रह्म येक ।
त्याचे ठाई मिथ्यात्मक् । बहुविध संमेळ ॥४५७॥

चेतअचेतरूप समस्त । जगत् कैसे दि्सत ।
म्हणीतले तरि दृष्टांत । मुखें परिहार तया ॥४५८॥

जैसे चित्रांत लिहिले प्रतिमेचें । प्रावर्णयुक्त नानावर्णाचे ।
परिसतां तत्वादि् निवृत्ति साचें । करावया असमर्थ ॥४५९॥

वस्त्रअभास रंजिक । जाहला तरी सकळिक ।
पटासीतत्वादि्क । निवृत्ति होय सत्य ॥४६०॥

सत्यतंतुमात्रे संयुक्त । सदृश्य होउनि असे दि्सत ।
परि चित्र तंतुपटयुक्त । समानत्वें असामर्थ्य ॥४६१॥

तैसे चिद्रूपब्रह्माआत । भिन्नाभिन्न असे दि्सत ।
वेव्हारीक समस्त । जीवसंमोह ॥४६२॥

चित्ताचे ठाई होउनि समान । चिदाभास अखिल चेतन ।
चित्संयुक्त असोन । समान द्राखवी ॥४६३॥

मृत्तिकादि् जडरूप समस्त । चेतनात्मक जगत ।
चिद्रूपब्रह्मी कल्पित । म्हणोनि निश्चय ॥४६४॥

आणीक सर्वज्ञत्व । सर्वेश्वरेत्व ।
सर्वेनियंतृत्व । सर्वांतर्यामित्वें ॥४६५॥

सर्वात्मकत्व । सर्वे इति अधिष्ठित्व ।
मुख्यगुणशक्तत्व । कर्तृत्वादि ॥४६६॥

अणीक अकर्तृत्व । अन्यथाकर्तृत्व ।
इति ईश्वरासी प्रभुत्व । सामर्थ्यत्रय ॥४६७॥

आणि सृष्टिस्थितिसंहारनेमक । अनुप्रवेश म्हणिजे पंचक ।
ईश्वरासी विवेक । कृत निश्चयें ॥४६८॥

अणीक निर्विकारत्वे अद्वितीय । ब्रह्मस्वरूप चिन्मय ।
ईश्वर जरी होय । तरी त्याचे ठाई ॥४६९॥

सृष्ट्यादीक रचित । बहुविध कृत्य ।
कैसे जाले जनित । म्हणीतले तरी ॥४७०॥

जैसा सूर्य स्वस्थितीनें । इच्छायत्नादिकगुणें ।
विरहीत आपण । आपुलिया ॥४७१॥

वरुषकीर्णें वृष्टिरूपे उदक । करूनियां जळातु प्रत्यक्ष ।
प्रतिविंबोनि मुख्य । अपणचि दिसें ॥४७२॥

जळी प्रतिबिंब अभ्रछायेनें । अच्छादूनि हिमकीर्णें ।
ते जळ प्रतिबिंबस्थितीनें । प्रतिपाळुनी ॥४७३॥

उष्णकीर्णें ते जळ शोखून । मग तया प्रतिबिंबालागून ।
आंपणांतु निदान । ऐक्य करीं जैसे ॥४७४॥

तैसे ईश्वर स्वस्थिती स्वतां । आपुले मायाशक्तियुक्ता ।
चित्प्रधानत्वें निमित्या । कारण होउनी ॥४७५॥

जडरूपपाषाण । संयोगे उपादान ।
कारण आपण । म्हणवीतसें ॥४७६॥

बुद्धयादीककार्य त्यजुनी । जीवरूपें आपणचि प्रवेशोनी ।
कर्मशक्तीने भोक्तृत्व म्हणोनी । नेमकशक्तीनें ॥४७७॥

भोग्यभोक्ता नेमुनी । रुद्ररूपें ते कार्य संहारुनी ।
अणीक तया जिवालागुनी । श्रुत्याचार्यरूपें ॥४७८॥

अपणांत परतोनी । ऐक्यत्व करोनी ।
अपणची निदानी । असे नित्यस्वरूपें ॥४७९॥

अणीक समष्टी वेष्टी म्हणोनी । जिवाईश्वरालागुनी ।
विभागोपाधी दोन्ही । त्याचे ठाईं ॥४८०॥

अनेक वृक्षघन । संमोह मिळोन ।
येकचि वन । म्हणवी जैसे ॥४८१॥

तैसे अनेक जीवजन । आपुले अंशात्मक म्हणोन ।
ईश्वरासी अभिमान । ते समष्टिरूप म्हणवी ॥४८२॥

येकचि वनांत विशेख । भिन्नाभिन्न वृक्ष ।
नाना पृथक्पृथक । पर्यायें ॥४८३॥

तैसे भिन्न भिन्न । देहाभिमान जीवजन ।
ते व्यष्टिरूप म्हणोन । जाणिजें निरुतें ॥४८४॥

अणीक विश्वादिकरून । जीवत्रयालागून ।
अधिष्ठानकारक चैतन्य । तो अपण म्हणवी ॥४८५॥

तूर्यात्मक । स्वयंशद्बार्थ साक्षिक ।
जीव परमार्थीक । प्रत्यगात्मा ॥४८६॥

अंतर्यामी अनुसंधात्र चित्त । अविछिन्न जीव त्वंपदलक्षितार्थ ।
इत्यादि कूटस्थासि नामार्थ । प्रसिद्ध जाणावें ॥४८७॥

अणीक अंतयामी मुख्य । ईश्वर त्रयात्म जीवात्मक ।
तयासी अधिष्ठानकारक । तो म्हणवी आपण ॥४८८॥

परब्रह्म परमात्मा परतत्व । विशुद्ध चित्त सर्वाधिष्ठात्र ।
तत्पदलक्षितार्थ । इत्यादि ब्रह्मासि नामें ॥४८९॥

अणीक मृत्तिका येक । नाना रूपे अनेक ।
बहुभेद घटादिक । जयापरी ॥४९०॥

सुवर्ण येक शुध्द । वाचारंभे नाना भेद ।
अळंकार विविध । जया प्रकारें ॥४९१॥

जळाब्धी येक निर्भर । वायुवशे नानाकार ।
फेणतरंगादी अपार । संमोह जैसा ॥४९२॥

दीप येक । घट रंध्रे विशेख ।
बहुरूपे अनेक । प्रकाशी जैसा ॥४९३॥

मरुत येक निर्धारे । पांवानागसररंध्रें ।
मधुर नादादीक विस्तारे । भिन्न जैसे ॥४९४॥

स्वर येक गायक । करणें वृत्तीने अनेक ।
नाना रागरचनादिक । जया प्रकारें ॥४९५॥

निळारंभगगन येक । घटमठादी अनेक ।
सकळ परि व्यापक । जया न्यायें ॥४९६॥

ध्वनी येक वाद्य । भेदसंयोगे विविध ।
भेरी मृदंग बहुविध । नाना जैसें ॥४९७॥

नभ येक कर्दळीदळ । खंडरंध्रपरिकुळ ।
करी तरंगादी बहुमेळ । विचित्र जैसें ॥४९८॥

रवि शशी येक । जळकुंभत्वादिक ।
संयोगे अनेक । बहुबिंब जैसें ॥४९९॥

येकडा येक बिंदूचेनि । संमंधेकरुनि ।
शतसहस्रक्षोणी । संख्या जैसी ॥५००॥

तैसेचि ते येक स्वत । तया चित्ताचे ठाई पूर्वोक्त ।
जीवईश्वरादि भेद वेव्हारत । असती म्हणोनि जाणावें ॥५०१॥

इति दृष्टीविवेक वोळखावें । आणीक या नंतर ।
अनादि जैसा चंद्र । कळंकचंद्र सेजार । असूनियां ॥५०२॥

चंद्रासरिसा वर्तत । परि चंद्रा न आछादित ।
आणि असे प्रकाशत । चंद्रप्रभेनेचि ॥५०३॥

तैसे मी मज नेणे म्हणोनि । लोकप्रसिद्ध व्यवहारवाणी ।
आतमया सेजार असूनि । आतमयासी ॥५०४॥

सरसी मिळोनी । आतमयाने अछादुनी ।
आणि आतमप्रभेचेनि । ज़ाणोनि घेत असें ॥५०५॥

अग्निदाहक शक्ती जैसे । स्तंभन म्हणीमंत्रप्रयोगवशें ।
अग्नीचे ठाई दिसें । न दिसे अग्निरहित ॥५०६॥

स्फटिकादि कार्य जैसें । गम्य होउनियां असें ।
तैसे ब्रह्मस्वरूपेसी दिसे । न दिसे विलक्षण माया ॥५०७॥

वेदादी कार्य गम्य होऊन । असामर्थ्यत्वें अघटीत घटोन ।
सर्व अनर्थासी कारण । तेचि दृश्यरूप माया ॥५०८॥

अणीक असत । जड दुःख अनित्य खंडित ।
म्हणोनि माया पंचलक्षणयुक्त । त्याचे ठाई ॥५०९॥

शशविषाणाशृंगादिक । ते अत्यंतरूप माइक ।
पाषाणादि अचेत अशेख । ते जडरूप ॥५१०॥

रजतम(म)मयबुध्दी । घोर मूढवृत्ति समंधी ।
ते सकळादि । बुध्दिरूप ॥५११॥

दिसोनियां अत्यंत । देहादि प्रपंचपदार्थ ।
नासोनि जाय समस्त । तें अनित्यरूप ॥५१२॥

कालपरिछेद । लक्षण विषद ।
तो म्हणवी प्रसिध्द । अखंडीतरूप ॥५१३॥

अणीक भिन्न । आणि अभिन्न ।
भिन्नाभिन्न । म्हणोनि त्रय ॥५१४॥

संत असंत । सदसत् ।
म्हणोनी वर्तत । प्रकारत्रय ॥५१५॥

सावयव निरावयव । आणि सावेव ।
निरावेव । म्हणोनि त्रय ॥५१६॥

म्हणिजे नवप्रकार इति । नव्हे परि अभासती ।
म्हणोनि मायेसि वेदांती । अनिर्वचनत्व ॥५१७॥

अणीक ते मायेसी श्रुतिसमंध ज्ञान । युक्तसमंध ज्ञान ।
लोकसमंध ज्ञान । म्हणोनि ज्ञानत्रय क्रमें ॥५१८॥

त्याचे ठांई खपुष्पवत् । तुच्छ म्हणवीत ।
श्रुतिसमंध अभिमत्त । ज्ञानविचारें ॥५१९॥

शुक्तिकाकार रजत । मृगजळवत ।
अनिर्वचनीय म्हणवीत । युक्तसमंध ज्ञाने ॥५२०॥

आत्मवत । नित्य म्हणवीत ।
लोकसमंध मत्त । ज्ञानविचारें ॥५२१॥

अणीक तामस माया मोहक । अविद्या अनृतात्मक ।
म्हणोनिया मायापंचक । त्याचे ठाईं ॥५२२॥

जीवचैतन्यासी । अछादुनी असे शरीरासी ।
म्हणोनी आपणासी । तामस म्हणवी ॥५२३॥

जगद्रूप होऊनि आपण । अन्यथा दृश्यासी कारण ।
होय सर्वथा म्हणोन । माया म्हणवी ॥५२४॥

त्या दृश्य जगाचे ठाईं अत्यंत । शुक्तकारजतादीं विपरीत ।
ज्ञान असे उपजवीत । त्या लागी मोह म्हणवी ॥५२५॥

सुविद्येचा प्रकाश । प्रवळे करीत हराश ।
अपण प्रवर्ते विशेष । म्हणोनि अविद्या म्हणवी ॥५२६॥

सद्रूपसत् तेथे । नेमीत असे निरुतें ।
तया कारण तें । अनृत म्हणवी ॥५२७॥

अणीक संकोच विकाश । म्हणोनि मायेस ।
धर्मद्वय विशेष । त्याचे ठाईं ॥५२८॥

जैसा चित्रपट आपण । आपुलिया प्रसारण ।
चित्र नानाकार लक्षण । अनेक दाखवी ॥५२९॥

वरी संकोचेकरुनी । तया चित्रसंमोहालागुनी ।
आपणांत घालुनी । लपवी जैसें ॥५३०॥

तैसे माया आपुलियां । विकाशधर्मेंकरुनियां ।
जगत्प्रपंच अतिशया । अनेक दाखवि ॥५३१॥

वरी संकोचधर्मेंकरुनी । जगत्प्रपंच मांडणी ।
अखिल गर्भीं करुनी । आपणांतु लपवी ॥५३२॥

अणीक स्वतंत्र । आस्वतंत्र ।
म्हणोनि द्विप्रकार । मायागुण ॥५३३॥

त्याचे ठाई । माया मिथ्याचि आपण ।
ते सद्रूपचैतन्य । विरहीत न दिसे त्या कारण ॥ अस्वतंत्र म्हणवी ॥५३४॥

अणीक येथे माया मिथ्या । म्हणीतले तरी यथा ।
गगनकूश्मांड ऐसे सर्वथां । शून्यसत्य ॥५३५॥

साक्षभूत आत्मसंयोगेकरून । जिवादि प्रपंच बहुविध भिन्न ।
दाखवी म्हणोन । स्वतंत्र म्हणवी ॥५३६॥

म्हणोनी स्वप्न इंद्र । जाला ऐसा प्रकार ।
कां गंधर्वनगर । न्यायेपरी ॥५३७॥

कां स्वप्नीं गजादीक दोषें । देखोनी भयबाधा विशेषें ।
ते प्रबोधें भय नासें । तैसी माया मिथ्या ॥५३८॥

अणीक विशुध्द सद्रूप । मायामळीन सत्वरूप ।
अविद्यातम प्रधानरूप । प्रकृती आपण ॥५३९॥

म्हणोनि माया । देवीचिया ।
वृत्ति तृतीया । त्याचे ठाई ॥५४०॥

माया देवी सुप्त । लयसमयीं परब्रह्मसंयुक्त ।
अध्यासे ऐकत । होऊनि असें ॥५४१॥

सृष्टी जागरणाचे ठाई समस्त । समस्त होऊनि इति भेद अवस्थायुक्त ।
परब्रह्म चैतन्यआंत । प्रतिफळीत होउनी ॥५४२॥

सर्वज्ञत्वादि गूण । विशिष्ट चैतन्य ।
होऊनियां आपण । ईश्वर म्हणवी ॥५४३॥

त्या कारणे प्रतिपदार्थ । अपण असे म्हणवीत ।
आणि स्वतां प्रेरकत्व । म्हणवी जाणावें ॥५४४॥

म्हणऊनि ईश्वरालागून । ते माया उपाधिवशेकरून ।
अमोहकरणी म्हणउन । म्हणवी जाणिजे ॥५४५॥

अणीक ते अविद्यानानात्व परिनें । भोक्तत्व पशुपदा जाला आपण ।
त्या जिवासी उपाधीनें । वश्य करूनि मोहीतसें ॥५४६॥

अणीक ते प्रकृती । भोग्यआत्मकत्वशक्ती ।
होउनिया अती । पाशपदार्थ ॥५४७॥

गुणत्रय समान । अवस्थेने असोन ।
मग तें अविद्येत प्रतिबिंबोन । आपण असें ॥५४८॥

जिवाचे भोगार्था निमित्य । सकळ कार्य पदार्थ ।
होआवयालागि निर्मित । ईश्वराचे सन्यधाने ॥५४९॥

क्षणमात्रे विकारोनि । प्रथम काळतत्व पावोनी ।
वरी काळतत्वावशे परिणामोनी । महत्तत्व म्हणवी ॥५५०॥

ते महत्तत्व म्हणिजें । जरी म्हणीतलें कैसे जाणिजे ।
तरी दृष्टांते सहजें । सांगिजेल ॥५५१॥

बीज उदकाचेनि वशें । अंकुर न रिघता जैसें ।
पाहतां प्रथम ऐसे हीनसें । मध्यउल्बणावस्था ॥५५२॥

पावलिया बीजरिती । नव्हे कारण ही प्रकृती ।
ना करणे अहंकारस्थिती । ते ही नव्हें ॥५५३॥

मिथ्या ज्ञानाचेनि अटोपे । विकृतीमयरूपें ।
निर्विकल्पस्वरूपें । मध्यअवस्था म्हणवी ॥५५४॥

मग तया महत्तत्वाचेनि । गुणभेद पावोनि ।
मिथ्याज्ञानेकरूनी । सविकल्प ॥५५५॥

स्वरूप होउनी । अहमिति प्रथम म्हणोनी ।
मूळ अहंकार चमकोनी । उदीत जाला ॥५५६॥

तेथ सत्वगूण । रजोगुण तमोगूण ।
म्हणोनियां त्रिगुण । त्रयक्रमे ॥५५७॥

प्रकाशन प्रवर्तन । मोहन म्हणोन ।
सत्वादिगूण । रूपत्रय ॥५५८॥

विकारिक राजस भूतादिक । म्हणोनियां पृथक ।
सत्वादि गुण मुख्य । नामेसीं प्रकटलें ॥५५९॥

त्याचे ठाई । सत्वगुणापासोनियां । मनसादि करणचतुष्टया ।
श्रोतादि ज्ञानइंद्रियां । पंचका जन्म जाला ॥५६०॥

रजोगुणापासाव मुख्य । वागादि कर्मेंद्रियपंचक ।
प्राणादि पंचवायू अशेख । उत्पन्न जालें ॥५६१॥

तमोगुणापासूनीं । आकाशादि धरणी ।
भूतपंचक क्रमेक्रमेंकरूनी । उदीत जालें ॥५६२॥

रजोगुणापासाव मुख्य । अणीक तया भूत पंचीकृत येकत्र ।
कर्दम ब्रह्मांडभुवनशरीर । घटादीक विषय आकार । उदीत जाला ॥५६३॥

तेथे ज्ञातृत्व अधिमुख्य । कारणपंचक ।
तयासी अनुक्रमे विशेख । विषयांकुर ॥५६४॥

संकल्प विकल्प निश्चय । अनुसंधान अहंकार हिय ।
परिक्रमें विषय । व्यापारपंचक ॥५६५॥

विष्णू चंद्र चतुर्मुख । नारायण त्रिपुरांतक ।
म्हणिजे अधिदेवतापंचक । हृदयगोळस्थान ॥५६६॥

अणीक श्रोत्रादि पंचविध । ज्ञानेंद्रियासी विविध ।
शब्द स्पर्श रूप रस गंध । हे विषयव्यापार ॥५६७॥

दिक मरुत मित्र वरुण । अश्विनी अधिदेवताकारण ।
करणगोळकस्थान । तया लागुनी ॥५६८॥

अणीक श्रोत्रादि ज्ञानेंद्रिंई आपण । जाणती बाह्य शब्दादी जाणणें ।
अंतरी क्रमे तेणें । जाणत असती ॥५६९॥

कर्णद्वारें अंगोळिनें । अछादिली स्थानें ।
प्राणवायू जठराग्नीचेने । शब्दघ्राण ॥५७०॥

ऊष्णशीतादि तें स्पर्शघ्राण । अछादिलीया लोचन ।
अंतरी तमोगूण । ते रूपघ्राणाचें ॥५७१॥

अन्नउदक । स्विकारिलिया प्रत्यक्ष ।
संतोष सूख । ते रसघ्राण ॥५७२॥

उद्गारेकरून । अंतरी गंधघ्राण ।
इति अंतरंगी हृदयालागुन । शब्दादि विषयपंचक ॥५७३॥

अणीक वागादिकरून । कर्मेंद्रियालागून
अनुक्रमें चळण । वेव्हार तया ॥५७४॥

बोलणें धरणे चालणें । आनंद भोग भोगणें ।
आणि विसर्जन करणें । म्हणिजे व्यापार ॥५७५॥

अग्नि इंद्र पद्मोद्भव प्रजापती । मृत्यु म्हणिजे इति ।
अधिदेवता पध्दती । मुखगोळकस्थान ॥५७६॥

अणीक त्याचे ठाईं । अंतकरणचतुष्टय ज्ञानेंद्रिय कर्मेंद्रिय ।
म्हणिजे चतुर्दश हिय । अध्यात्मक ॥५७७॥

अणीक तयाचियें । ठाईचे विषय ।
म्हणविती तियें । अधिभौतिक ॥५७८॥

तयाचे ठाईं मुख्य । इंद्रादि देवतात्मक ।
ते अधिदैविक । म्हणविती जाणावें ॥५७९॥

आणि इंद्रियसंमोहता । इंद्रादी सकळ देवता ।
तिये इंद्रिये सर्वथां । विराट् पुरुषांचीं ॥५८०॥

ते इंद्रियस्थोम । हिरण्यगर्भाचे सूक्ष्म ।
शरीरादीक धर्म । ते सर्व तमोरुपें ॥५८१॥

अंतर्यामासी आवरण । होऊनी असे आपण ।
ते अव्याकृतकारण । शरीर म्हणवी ॥५८२॥

आणीक प्राणवायू आपण । हृदयस्थानी असोन ।
श्वासोश्वासप्रवर्तन । करीत असे ॥५८३॥

अपानपवन । गुदस्थानी असोन ।
मळमूत्रविसर्जन । करीत असे ॥५८४॥

समानवायू नाभिदेशी । असोनिया अन्नासी ।
विभागूनी सर्वांगासी । देत असे ॥५८५॥

उदानवायू कंठी । वसोनियां नेहटी ।
लिंगी उलटीं । करीतसे ॥५८६॥

व्यानवायू सर्वसंधी । असोनी देहादी ।
धरुनि चळणविधी । करीत असें ॥५८७॥

नागवायू विनय । उपचार जांभय ।
अंगमोडे व्यापर हे । करीतसें ॥५८८॥

कृकवायू आपण । शिंक खोकला भ्रमण ।
व्यापारी प्रवर्तोन । करीतसें ॥५८९॥

कूर्मवायू विशेषात्कार । उचकी ढेंकर ।
प्रवर्तोनी व्यापार । करीत असें ॥५९०॥

देवदत्तवायू आपण । बोलणे हस्यकरण ।
विनोद संभाषण । करीतसें ॥५९१॥

धनंजयवायू विशेख । शोकरोगादिक ।
व्यापार अनेक । करीतसें ॥५९२॥

तो धनंजयवायू आपण । जालिया देहमरण ।
वरी दिनपंच असोन । देह त्यजूनि जाय ॥५९३॥

अणीक ते नागादिवायूपंचक । म्हणविती बाह्य वायू मुख्य ।
वागादिकर्मेंद्रियासी चेष्टक । होउनी असती ॥५९४॥

प्रणादी अंतरवायूतें । श्रोत्रादिज्ञानेंद्रियातें ।
चेष्ट करूनि निरुतें । होउनी असती ॥५९५॥

अणीक वैरभ मुख्य प्रभंजन । अंतर्यामी महाप्राण
हिये म्हणविती आपण । जीवसमंधवायू ॥५९६॥

ज्ञातृत्वादि कारण । पंचकासी चेष्टमान ।
होउनियां आपण । असती निरुतें ॥५९७॥

अणीक पृथ्व्यादिपंचभूतां । गुणकर्मधर्मअधिदेवता ।
कवण म्हणीतले तरि यथा । सांगिजेल ॥५९८॥

धारण पिंडीकरण । पंचन व्यूहन ।
अवकाश म्हणऊन । इति कर्म ॥५९९॥

कठीण द्रव्यदाहक । चंचळ स्वछादिक ।
म्हणोनियां मुख्य । इति धर्म ॥६००॥

पीत श्वेत हरित । कृष्ण आणी रक्त ।
म्हणिजे पंचभूत । वर्णादिक ॥६०१॥

शब्द स्पर्श । रूप रस ।
गंध म्हणिजे गुणेश । पंचक इति ॥६०२॥

ब्रह्मा विष्णु रुद्र ईश्वर । सदाशिव म्हणोनि वर ।
पंचप्रकार । अधिदेवता ॥६०३॥

अणीक त्या भूतगुणाचे ठाई विशेषी । पृथ्वीसी पंचगुण द्विगुण वायुसी ।
तेजासी चतुर्गुण आपासी । नभासी येक गुण ॥६०४॥

त्याचे ठाई । नभासी प्रतिध्वनी शब्दगूण ।
शब्दस्पर्शगुण वायूलागुन । शब्दस्पर्शरूप म्हणोन । त्रिगुण तेजासी ॥६०५॥

शब्दस्पर्श । रूपरस ।
म्हणोनी चतुर्गुणास । उदकासी ॥६०६॥

शब्दस्पर्शरूपरसगंध । म्हणोनियां पंचविध ।
गुणप्रसिद्ध । पृथ्वियेसी ॥६०७॥

आणीक ज्ञातृ ज्ञान । यज्ञ म्हणोनी ।
यां त्रिपुटी आपण । त्याचे ठाई ॥६०८॥

मूळ अहंकारकारण । प्रतिफळीत होउन ।
जीवचैतन्य । ते ज्ञातृत्व म्हणवी ॥६०९॥

आणि मनांतु । प्रतिफळितु ।
चैतन्य चित्तु । ते ज्ञान म्हणवी ॥६१०॥

भूतभौतिक । विषयादिक ।
ते ज्ञेय मुख्य । म्हणवीतसे ॥६११॥

अणीक येथे तत्वमिति । मन ते आपणाप्रति ।
चतुर्विंशती । तत्वे म्हणवी ॥६१२॥

मूळ अहंकार । पंचविंशतितत्वाकार ।
आपणापें निर्धार । म्हणवीतसें ॥६१३॥

अहंकारांत । चिदाभास जीवगत ।
तो सप्तविंशतितत्वयथार्थ । म्हणवीतसें ॥६१४॥

माया उपाधीक । ईश्वर तो मुख्य ।
तो सप्तविंशतितत्वात्मक । म्हणवी निरुता ॥६१५॥

अहंकार जिवालागून । कूटस्थ अधिष्ठान ।
तो म्हणवी आपण । अष्टविंशतितत्वें ॥६१६॥

माया ईश्वरातें । अधिष्ठात्र ब्रह्म तें ।
म्हणवी निरुतें । नवविंशतितत्वें ॥६१७॥

अणीक प्रकृतीचेनी । कार्यउभारणी ।
उत्पन्न जाली म्हणोनी । निरोपिले तरी ॥६१८॥

येकी सृष्टी अनुक्रमे जनित । येक सृष्टी युगपत ।
म्हणोनि प्रकार द्वैत । होउनी असे कीं ॥६१९॥

त्याचे ठाई । मूळ प्रकृतीपासाव । महत्तत्वासी उद्भव ।
गुणीं प्रगुणमय । कूटस्थ ॥६२०॥

महदअहंकार मुख्य । गुणसाम्यं तन्मात्रपंचक ।
म्हणिजे सप्तक । प्रकृतिमेळा ॥६२१॥

तयापासाव पंचभूत । जाले जनित ।
पंचाभूताचे निर्मित । ब्रह्मांडदेह ॥६२२॥

घटादीक विषय । प्रपंचकार्य ।
जाले उदय । ते क्रमसृष्टी म्हणवी ॥६२३॥

अणीक निस्तरंग समुद्राआंत । वायूचेनि वशें उदित ।
येकेचि वेळा समस्त । विचित्र संमोह ॥६२४॥

फेणतरंग परी । बुद्बुदलहरी ।
जाले विशेषात्कारी । तेणे न्यायें ॥६२५॥

तैसे सच्चिदानंदात्मक । ब्रह्मी माया वसे ते अनेक ।
नामरूप प्रसारण अविद्यक । ते युगपत सृष्टी म्हणवीं ॥६२६॥

ऐसे उभय प्रकार । सृष्टिरचनाविस्तार ।
श्रुतिसन्मत्तें निर्धार । प्रसिध्द जाणावें ॥६२७॥

अणीक येथें अक्षेपी । अतिरोहीत ब्रह्मस्वरूपीं ।
अविकार ईश्वर आटोपी । जडप्रकृतीचे ठाईं ॥६२८॥

कार्य परी समस्त । कैसे जाले निर्मित ।
म्हणीतले तरी दृष्टांत । मुख्य परिहर तया ॥६२९॥

इच्छादीविरहीत आदित्य । यत्नादिरहीत सूर्यकांत ।
उभयांसंगे वन्हि प्रज्वळित । उद्भवे जेवीं ॥६३०॥

तैसे परी शिवसंयोगाचेनि । प्रकृतीचे ठाईं महदादिकरुनी ।
कार्य उत्पन्न होआवयालागुनी । विरोध नाही ॥६३१॥

अणीक वृत्ती परिणाम अरंभक । विवर्त म्हणउनि पृथक ।
कार्य उदय चतुष्क । प्रकार त्याचे ठाईं ॥६३२॥

पटकुटी भावकर । क्षीर दध्याकार ।
तंतुपटन्याये विचार । रज्जुसर्प भ्रमरूप ॥६३३॥

म्हणोनि कार्य । उदयासी होय ।
दृष्टांतचतुष्टय । अनुक्रमें ॥६३४॥

आणि रज्जुसर्प स्थाणुचोर । स्वप्नीं इंद्रजाला गंधर्वनगर ।
शुक्तिकारजत नभनीळवर्णाकार । मरीचीकाजळ ॥६३५॥

म्हणोनि सद्रूप । वस्तूचे ठाईचे मिथ्यारूप ।
वस्तुकल्पित स्वरूप । तया दृष्टांत प्रसिध्द ॥६३६॥

अणीक येथे अक्षेप । निर्विकार अरूप ।
अद्वितीय अरूप आत्मस्वरूप । त्याचे ठाई ॥६३७॥

मिथ्या वस्तुभूत । कल्पीत समस्त ।
कैश्या पै निर्मित । जालिया तया ॥६३८॥

प्रथम कश्चित्पुरुपासीं । भ्रांति अभासली कैसी ।
म्हणीतले तरि दृष्टांतेसीं । परिहार तया ॥६३९॥

यतेश्वरासी सिकवणी येक । स्वप्नीं सतिपती रतिकांक्ष ।
म्हणिजे त्रिविधरूप सांख्य । येकेचि काळीं अभासली ॥६४०॥

तरि तया देवदत्तालागुनी । तया अभासे निदानी ।
कवणी येकी हाणी । नाही जैसी ॥६४१॥

तैसीरिती साक्षक । आत्मयांत गुणत्रयात्मक ।
प्रकृती अतिविशेख । भ्रांतिरूपें ॥६४२॥

भ्रांति ज्ञातृ भ्रांतिज्ञान । भ्रांति विषयज्ञ म्हणोन ।
त्रिपुटीमय प्रपंच आन । येकीयेचि काळी ॥६४३॥

कल्पीत जालिया तयाचेनी । आत्मयासी कवणी येकि हाणी ।
सर्वथा नाहीं म्हणोनी । सुस्थीर सत्पद ॥६४४॥

अणीक ईश्वरापासाव कार्य । सृष्ट्यादिमायामय ।
व्योमादिप्रपंचउदय । जाला तरी ॥६४५॥

आपण जैसा तैसा स्वरूपें । आपुलीया निजरूपें ।
येकाकारें आपणपें । आसतूचि असें ॥६४६॥

तयाचिये ठाई प्रती । जीवनबुद्धी वृष्टि कल्पिती ।
जाल्यावरी रती । त्या भिन्नभोग्यत्व येकरूप ॥६४७॥

ते प्रीतीविषय द्वेषविषय । आणि उपेक्षाविषय ।
म्हणोनि त्रिविधविषय । विरक्तासी म्हणवी ॥६४८॥

व्याघ्रसर्प बहुवसु । दुष्टदुर्जन पक्षीपशू ।
मृगादीक ते द्वेषु । विषय म्हणवी ॥६४९॥

वनितादि नाना पदार्थ । वस्त्रअळंकारभूषित ।
शर्कराचंदन ते प्रीत । विषय म्हणवी ॥६५०॥

पृथ्वी तृणादिक । कुवस्तू विशेख ।
ते विषयउपेक्ष । म्हणवीती ॥६५१॥

तया विषयपदार्थ । येकाचे ठाईं विशेख ।
जाला ईश्वरनिर्मित । येकाकार ॥६५२॥

जीवकल्पित । अनेकाकार विपरीत ।
होउनी असे दृष्टांत । न्याये तो कैसा ॥६५३॥

ईश्वरनिर्मित । वररत्नादिक वस्त ।
येकेचि प्रकारे आसन । असतां पुढें ॥६५४॥

भोक्तृत्वाचिये बुद्धि । वृत्ती कल्पिता नानात्वादि ।
रत्न जया पढिये संमंधी । तया प्रीतिविषय ॥६५५॥

अणीक ईश्वर । निर्मिता जाला वर ।
वस्तुरूप तें येकचि प्रकार । होउनि असें ॥६५६॥

जया न पढिये । तया द्वेषविषय ।
उपेक्षविषय । विरक्तासी म्हणवी ॥६५७॥

तयासी जीवकल्पित । भोग्यत्वाकाराचें ठाईं अर्त ।
नानात्वं प्रकारत्व । होउनि असे ॥६५८॥

तया अभिव्यक्त । करावया कारण यथार्थ ।
आन येक दृष्टांत । सांगिजेल ॥६५९॥

पितृपासावजनित । वनिता कश्चित ।
समानरूपे व्यक्त । ते येकचि आपण ॥६६०॥

तये स्त्रियेसी प्रीति । भोक्तृत्वेचि बुद्धिवृत्ती ।
कल्पितां ते सती । पतीस म्हणवी ॥६६१॥

कन्या पितियासी । माता कुमरासी ।
श्वशुरयासी । सून म्हणवी ॥६६२॥

ऐसे बहुविध । होऊनि असे विविध ।
ते आपण सिद्ध । येकचि रूप ॥६६३॥

सर्व विषई ईश्वर । निर्मित येकाकार ।
जीवकल्पित अनेकाकार । भेद होऊनि असें ॥६६४॥

तयाआंतु ईश्वर निर्माण । प्रपंच तो नव्हे बाधक त्या कारण ।
गुरुरूपें मोक्षासी साधन । होउनी असे ॥६६५॥

अपणचि आपणासी । आपलिया सुटकेसी ।
शक्य नव्हे त्यालागि ऐसी । हे असो गोष्टी ॥६६६॥

अणीक जीवकल्पित । प्रपंच जाला निर्मित ।
बोधकरूप सत्य । तया कारण ॥६६७॥

मुमुक्ष सुटकेयोग्य जाला निर्वाणी । तरि तयासी शास्त्रप्रपंच म्हणोनि ।
अशास्त्रप्रपंच म्हणोनि । द्विविध प्रकार असें ॥६६८॥

तयाआंत अशास्त्र । प्रपंच तो तीव्र ।
म्हणोनि विभेदाकार । होऊनि असे ॥६६९॥

वर.विशेषात्कार । । आत्मब्रह्मविचार ।
तो म्हणवी शास्त्र । प्रपंच निरुता ॥६७०॥

कामक्रोधादीक विशेख । तो तीव्रप्रपंच म्हणवी मुख्य ।
मनोकल्पित राजसकर्मादिक । तो मदप्रपंच म्हणवी ॥६७१॥

इति जीवकल्पित । त्रिविध प्रपंचाआंत ।
शास्त्रप्रपंच तो अभिमत्त । ज्ञानादिसाधनें ॥६७२॥

आत्मसाक्षात्कार । जालियानंतर ।
वरि विशेंषें सादर । सूटिकेसी योग्य ॥६७३॥

अशास्त्ररूप तीव्रमद । म्हणिजे प्रपंच द्विविध ।
आत्मसाक्षात्कारासी विध । होउनि असें ॥६७४॥

म्हणोनि तयाकारणें । ज्ञानाभ्यासासी अक्षेपानें ।
प्रथम अनादरणें । त्यजावया योग्य ॥६७५॥

अणीक ते इतर । आत्मसाक्षात्कार ।
जालियानंतर । मोक्षवरी विशेष ॥६७६॥

सिध्यर्थ होउनी । सुटिकेलागूनी ।
योग्य म्हणऊनी । रहस्यार्थ जाणिजे ॥६७७॥

यानंतरें अविछिन्नोपाधी । प्रतिबिंबोपाधी ।
आध्यासोपाधी । म्हणोनी उपाधीत्रय ॥६७८॥

त्याचे ठाईं प्रत्यगात्मायातें । सुषुप्तिरूप अविद्येतें ।
म्हणउनि निरुतें । अविछिन्नोपाधी ॥६७९॥

तत्कार्य बुद्धीआंतु । आत्मा प्रतिप्रवळितु ।
तोची म्हणवितु । प्रतिबिंबोपाधी ॥६८०॥

तया बुद्धिगतें । सुखदुःख आत्मयातें ।
आरोपणे तें । अध्यासोपाधि म्हणवीं ॥६८१॥

ते नव्हे तरी आणिक । तयाचे ठाई विशेख ।
अस्तिबुद्धि मुख्य । तेचि आपण ॥६८३॥

मिथ्याध्यास इतरध्यास । इतरेइतरध्यास ।
आणि इतरध्यास । म्हणोनि चतुर्विध असें ॥६८४॥

त्याचे ठाई । अग्नीचेनि संयोगेकरूनी ।
उदकालागूनी । उष्णत्वे जैसें ॥६८५॥

तेसे प्रत्यगात्मासन्निधानें । चेतनाअनुक्रमानें ।
गमनागमन देखणें । अठग्रनाठव ॥६८६॥

जाणीवशक्ति विशेख । असे स्थूळशरीरास ।
म्हणोनि तोचि मिथ्याध्यास । म्हणवीत असें ॥६८७॥

इंद्रियेवर परिकर । सकळ संमोहविस्तार ।
तो आपण इतर । अध्यास म्हणवी ॥६८८॥

अंतःकरण संमोह वृत्यांकु । तो अध्यास म्हणवी इतरेंइतर ।
मूळ अहंकार । तो सत्याध्यास म्हणवी ॥६८९॥

अणीक अहंप्रथमध्यासे मुख्य । प्रत्यगात्म्यासि अहंकार विशेख ।
रज्जुसर्पन्यायें निरोपाधिक । अध्यास म्हणवी ॥६९०॥

अहंकर्ता म्हणवीत तेणें । अहंकारधर्म आत्मयाकारणें ।
रक्तस्फटिकन्यायानें । सोपाधीक म्हणवी ॥६९१॥

इच्छा काम्य अहं म्हणवी आपण । म्हणऊनि तया कारण ।
अंतःकरण । धर्म आत्मयासी ॥६९२॥

प्रवाहरूपमय । जिवनांत पतित सूर्य ।
प्रतिबिंबन्याय । तद्धर्मतध्यास म्हणवी ॥६९३॥

कुटुंबवाल्य अहं म्हणवी म्हणोनी । आत्मा पुत्रादिकालागुनी ।
मैत्रस्त वेव्हारन्यायेकरूनी । समंधमात्राध्यास म्हणवी ॥६९४॥

इति अध्यासे निर्विकार । आत्मयासी संसार ।
कल्पित साचार । निश्चये जाणिजें ॥६९५॥

अणीक जागृती । स्वप्न सुषुप्ती ।
तूर्या तूर्यातीत इति । पंचवस्था ॥६९६॥

त्याचे ठाईं । पृथ्वीआदि पंचभौतिक ।
दशेंद्रिये प्राणपंचक । अंतःकरणचतुष्क । म्हणिजे इति ॥६९७॥

चतुर्विंशति तत्वात्मिक । संमोह मिळोनि असेख ।
म्हणवी स्थूळदेहकंचुक । आत्मसन्निधानें ॥६९८॥

स्थूळशरींरीं अवस्था जागृती । विष्णु अभिमानी नेत्रस्थानस्थिती ।
युक्तभोग क्रियाशक्ती । रजोगुणें ॥६९९॥

ब्रह्मा अधिपती । अकारमातृका इति ।
हृत्कमळ दक्षिण गती । विराट संज्ञा ॥७००॥

अनादिईश्वरसंयोगें । वनितादीविषयभोगें ।
सकळ करणयोगें । सामग्रीसहित ॥७०१॥

असे अनुभवीत रती । तो जीवात्मा परमिति ।
अवस्था जागृती । म्हणवीतसें ॥७०२॥

अणीक इंद्रियदशक । मनोअहंकार प्राणपंचक ।
मिळोनि सप्तदशक । सूक्ष्मशरीर म्हणवी ॥७०३॥

लिंगदेह अवस्था स्वप्न । तेजसू अभिमानी कंठस्थान ।
परि युक्तभोग सत्वगुण । इच्छाशक्ती ॥७०४॥

विष्णू अधिदेवता मातृका उकार । हृदयकमळकर्णिकांतर ।
गती उतरे निरंतर । हिरण्यगर्भ संज्ञा ॥७०५॥

ईश्वरसंयोगें जाग्रदादि वासना । परि विरक्त भोगरचना ।
मन तेचि आपणा । कारण होउनी ॥७०६॥

अनुभवीत असें । तो अंतरात्मा उपाधिवशें ।
म्हणऊनि विशेषें स्वप्नावस्था ॥७०७॥

अणीक जैसे चरणयुगुळ । पक्षियां आपुलिया सकळ ।
सहकुटुंबेसी संमेळ । पसरोनि चरें ॥७०८॥

मग तो कुटुंब पदार्थु । संमोह आपुलिया पक्षांतु ।
अछादूनि निवांतु । निद्रा करी ॥७०९॥

तैसे स्थूळशरीर । करणे व्यापार ।
विषवृत्तीअंकुर । अवरणसहित ॥७१०॥

लिंगशरीर पर्यायें । भ्रांतिजनित कार्यें ।
विक्षेपसहीत विषय । सकळ गर्भीं करूनी ॥७११॥

अंतःकर्णीं होय लीन । अंतःकर्ण तामस गहन ।
आत्मसंयोगेकरून । कारणशरीर म्हणवी ॥७१२॥

कारणशरीरअवस्था सुषुप्ती । प्राज्ञ अभिमानी हृदयस्थानस्थिती ।
आनंदभोग द्रव्यशक्ती । तमोगूण ॥७१३॥

रुद्र अधिदैवत । मकार मातृका इति अर्थ ।
अंतकरण अंतर्गत । अव्यक्त संज्ञा ॥७१४॥

ईश्वरसंयुक्तें । आनंद विषयभोगातें ।
मायावृत्तीअनुमत्तें । अनुभवीत असें ॥७१५॥

गुहांतरपुरुषस्थिती । गौप्य परमात्मा अति ।
ते अवस्था सुषुप्ती । म्हणवीतसें ॥७१६॥

अणीक शरीरत्रय । अवस्थात्रय जीवत्रय ।
धामत्रय भोगत्रय । शक्तित्रय हें ॥७१७॥

गुणत्रय अक्षरत्रय । पुरुषत्रय आत्मत्रय ।
भावत्वयादि तत्वकार्य । सकळ मिती ॥७१८॥

संमोह गर्भीं करून । व्यापकत्वे मनोव्यापारविहिन ।
असे संततोदित महाकारण । शरीर म्हणवी ॥७१९॥

महाकारणतनूअवस्था तूर्या । प्रत्यगात्मा अभिमानियां ।
मूर्धनिस्थान अतिशाया । भोगानंद अवस्था ॥७२०॥

ज्ञानशक्ति शुद्ध सत्वगुण । ओंकार मातृका ईश्वर अधिष्ठान ।
गति ऊर्ध्वे प्रकाशन । बिंदु संज्ञा ॥७२१॥

सर्वसाक्षीक ईश्वरसंयुक्ते । अनुभवीत असें आनंदातें ।
तो संत निर्मळात्मा निरुतें । तूर्यावस्था म्हणवी ॥७२२॥

अणीक लक्षणलक्ष । सबळ शुद्ध पक्ष ।
वाच्य लक्षितादिक । अंश विलक्षण ॥७२३॥

द्वैताद्वैत क्षराक्षर । प्रवृत्तीनिवृत्ती जीवईश्वर ।
साकारनिराकार । विलक्षण ॥७२४॥

मायाअविद्य । त्वंपदतत्पद ।
अखिल भेद । विलक्षणादि ॥७२५॥

मनोवाचा अज्ञ अप्रवेश । अहंकार निजरहस्य ।
ते तूर्यातीत अशेष । परब्रह्म सत्य ॥७२६॥

आणिया अवस्थेचे ठाई भिन्नता । स्थावरासी सुषुप्तावस्था ।
पशूसी सर्वथा । स्वप्नसुषुप्ति ॥७२७॥

अवस्थात्रय मानवासी । जागरणअवस्था देवतासीं ।
तूर्यावस्था विशेषी । अजान देवतातें ॥७२८॥

चरयोगीजन महंत । तयासी अवस्था तूर्यातीत ।
असें प्रकाशत । त्याचे ठाई ॥७२९॥

प्रथम मनुष्याप्रती । आपेंआप जागृत्स्वप्नसुषुप्ती ।
दिसे म्हणोनि संसाररती । आत्मक होउनी असें ॥७३०॥

तूर्यातीत । असे वर योगाभ्यासजनित ।
तिया मुक्तीसी साधनहेत । कारण होऊनि असती ॥७३१॥

अणीक तया अवस्था विशेखी । येक सारिखी ।
नाही येकी । प्रगट नाहीं ॥७३२॥

म्हणोनी कालदेश । नैस्यनैमक दृश्य ।
नाही तो अभास । तया कारणें ॥७३३॥

मिथ्याभूत पदार्थ । त्याचा ठाई वस्तु सत्य ।
चिन्मय अखंडीत । आदिमध्यअंत ॥७३४॥

सांद्रानंद निजतूर्यात्मक । आत्मा स्फूरद्रूपे अशेख ।
तो आत्मा अपरोक्ष । साक्षात्कारी सत्य ॥७३५॥

अणीक येथे अक्षेपेकरूनी । जागरणीं आणि स्वप्नीं ।
जाणीव असे म्हणोनी । जगत्प्रसिद्ध ॥७३६॥

सुषुप्तिअवस्थादशें । जाणीव कैसी असें ।
तया कवण प्रमाण ऐसें । म्हणीतले तरी ॥७३७॥

चेतना जालियानंतरें । मी काहीं नेणें सुखभरें ।
निद्रिस्त होता ही उरें । स्मरणद्वय ॥७३८॥

अनुभव जरी नाही नेणें । तरि सांगावया नुपजे बोलणें ।
म्हणोनि अर्थापत्यप्रमाणें । आत्मा जाणे ते सुषुप्ती ॥७३९॥

जैसे गुहांतरतमीं पुरुष असें । तया इंद्रियाकरण सरिसें ।
परि दृश्यानुभूती नसें । जाणीव काहीं ॥७४०॥

इंद्रियकरण अपेक्षारहित । स्वप्रकाशें वेद्यत्वें आपणाआंत ।
असे आनंद अनुभवित । तमदृष्टत्वें ॥७४१॥

तैसा आत्मा देहादि कार्य समस्त । व्यापकत्वें करूनि गर्भीकृत ।
तमचक्षुन्यायें जाणत । असे सुषुप्तीसी ॥७४२॥

चंचळतरुपल्लवांत विशेषें । चंद्रकीर्ण पल्लवोपाधीसरिसें ।
प्रकाशे झळकत दिसें । जयापरी ॥७४३॥

तैसे अविद्येचिये । सूक्ष्मवृत्ती ठाईं अतिशयें ।
निजस्वरूप चिन्मय । विराजत असे ॥७४४॥

करण सामग्री अपेक्षा नसें । परि आनंदांश विशेषें ।
अनुभवीत असें । हे स्वानुभवसिद्ध ॥७४५॥

म्हणोनी जाग्रत्स्वप्नसुषुप्ती । सकळ अवस्थानुभूती ।
जाणे जाणीवरूप ज्ञप्ती । तूर्याआत्मा ॥७४६॥

आणीक काही नेणे किंच्चित । सुखे होतो निद्रिस्त ।
तयासी अनुक्रमें यथार्थ । विषयादीक ॥७४७॥

नाही ज्ञान विशेख । संसार सुखदुःख ।
निवृत्ती अशेख । नाहीं तेथ ॥७४८॥

सर्वथा सुषुप्तिआंतु मुख्य । जाला असे अविद्येसी साक्षीक ।
आनंदमय नादात्मक । म्हणीतलें तरी ॥७४९॥

कश्चित्पुरुषें विशेषें । तेथ सर्वथां देखिले ऐसें ।
कवण प्रमाण असें । तयालागी ॥७५०॥

कोणी येक इष्टार्थ वस्तू । लागि बुडाला कूपोदकांतु ।
तया वस्तूसी हातवसलियां परि मांतु । वरी सांगतां न घडे ॥७५१॥

बाहीर निघालिया । वांचूनियां ।
वृत्तांतु सांगावया । योग्य नाहीं ॥७५२॥

तैसे सुषुप्तीभीतरी । जाणीव असली तरी ।
काळकर्मवशे परी । चेतोनियां ॥७५३॥

करण साकारी सावेव । संयुक्तें तेथील जाणीव ।
जाणीतला अनुभव । सांगावयां घडें ॥७५४॥

म्हणौनि सर्वावस्थासी साक्षिकत्व । जालियां आत्मयासी सत्यत्व ।
सच्चिदानंद प्रकाशरूपत्व । अनुभवसिद्ध ॥७५५॥

अणीक अन्नमय । प्राणमय मनोमय ।
विज्ञानमय आनंदमय । म्हणोनी पंचकोश ॥७५६॥

त्याचे ठाईं पितृमातेचिया शुक्रशोणितें । जनीत स्थूळशरीर तें ।
अन्नमय निरुतें । कोश म्हणवी ॥७५७॥

सूक्ष्मशरीरस्थानि । वायुपंचक प्राणादिकरूनी ।
वागादि कर्मेंद्रिय म्हणोनि । प्राणमय कोश ॥७५८॥

मनज्ञानइंद्रियांदिक । मिळोनी मोह अशेख ।
तें मनोमय मुख्य । कोश म्हणवी ॥७५९॥

प्रत्यगात्मा चैतन्य । चित्छायासंयोगेकरून ।
लोहकुंतन । न्याये अकार ॥७६०॥

ज्ञानेंद्रियाचेनि । स्वाभिमानेकरूनी ।
विज्ञानमय निदानीं । कोश म्हणवी ॥७६१॥

कारणदेहस्वरूप । अगिट्यासंयोगें समीप ।
जागृतीआंतु वनितादि रूप । इष्टार्थदर्शनें ॥७६२॥

उदीत अनुक्रमे विषद । प्रियमोहप्रमोद ।
इत्यादि मिळोनियां आनंद । मयकोश म्हणवी ॥७६३॥

अणीक येथे विज्ञान । मयकोश आपण ।
अहंकार तो शून्य । आत्मनात्म विवेक ॥७६४॥

तो अहंभावाचेनि । साभिमानें करूनी ।
अहमात्मा म्हणोनी । निश्चय करीत असें ॥७६५॥

नीळोत्पळपुष्प तेथे । नीळगूण विशेष अभिमत्तें ।
विशेषनाम नीळोत्पळ तेथें । सार्थक होय ॥७६६॥

तैसे कृशोहंभाव स्थूळदेहसंयोगें । श्रोताअहंभाव इंद्रियाआंगे ।
ध्याताहंभाव प्रसंगें । अंतःकरणसमंधे ॥७६७॥

प्रत्यगात्म्यासी निर्धार । अंहकार वेद्य साचार ।
म्हणोनी अहंकार । आत्मा सत्य ॥७६८॥

आणी ऐसे जाले तरी । चेतना जालियावरी ।
अहंकार बाह्यविषय परी । जाणावया तो समर्थ कैसा ॥७६९॥

जैसे चुंबकाचेनि । सन्निधानेकरूनी ।
जड लोहालागूनी । चेष्टा होय ॥७७०॥

कां दर्पणाचेनिवशें । सूर्यप्रकाश विशेषें ।
गृहांतरी प्रवेशें । जया न्यायें ॥७७१॥

तैसें प्रत्यगात्मासन्निधानत्वें । तत्चैतन्य प्रतिबिंबत्वें ।
अहंकारांत असे सत्यत्वें । तया कारण ॥७७२॥

जडरूप अहंकार । तो बाह्यविषय साचार ।
जागृत्स्वप्नांतु असूनिया संचार । सुषुप्तीआंतु लीन होय ॥७७३॥

तरी तत्प्रपंचासी । उपमा ते कैसी ।
म्हणीतले तरी तयासी । परिहार अनुभवें ॥७७४॥

अहंकार लया । अवस्थात्मक जालिया ।
सुषुप्तीआंतु अतिशया । अविद्या म्हणवी ॥७७५॥

अंधकार गृहाआंतु कोनी । बद्ध निद्राकपाट देउनी ।
निष्कंपदीपरूप होऊनी । प्रकाशमान ॥७७६॥

आपेआप अत्यंत । असे प्रकाशत ।
तो प्रत्यगात्मा संततोदित । ज्योति म्हणवी ॥७७७॥

मग काळकर्मसमीरण । प्रेरणावशेंकरून ।
तामस म्हणिजे निद्राअछादन । कपाट उघडुनी ॥७७८॥

अणीक अविद्या प्रथम अविद्यात्मक । महत्तत्व म्हणिजे मध्यकारण येक ।
गुहांबरवटक । स्थानावरी येउनी ॥७७९॥

अहंकार तो सात्वीक । म्हणिजे मणीस्फटिक ।
प्रत्यगात्मा प्रदीपक । प्रतिबिंबासी ॥७८०॥

गर्भीकृत करूनी । प्रथम ऐसे जीव होउनी ।
स्वप्नावस्थात्मक मध्यस्थानी । गृहांतु प्रवेशे ॥७८१॥

वरि इंद्रियगवाक्षरंध्राचेनि । बाहीर प्रकाश करूनी ।
जाग्रदावस्था म्हणिजे बाह्यांगणी । प्रकाशत असें ॥७८२॥

अणीक तें काळकर्मसमीरण । प्रेरणवशेकरून ।
निद्रा म्हणिजे अछादन । कपाट दिधलियावरी ॥७८३॥

अहंकार म्हणिजे स्फटिकमणी । तो तद्युक्त होऊनी ।
कारण अविद्यांतरस्थानीं । लपविलियां ॥७८४॥

जागृत्स्वप्न म्हणिजे इतर । अंगणमध्य घर ।
अंतरी अंधकार । मय होय ॥७८५॥

अहंकारमणी आंतु । होउनियां प्रतिफळितु ।
चिद्दीप प्रकाशवंतु । तो आपणासी ॥७८६॥

जाला बीजभूत । प्रत्यगात्मा चिद्दीपांत ।
येकत्व तद्युक्त । होऊनि असे ॥७८७॥

ऐसे जागृदादी सर्व । अवस्थात्रयाचे ठाई उद्भव ।
अहंकार भावाभाव । ते सकळ परी ॥७८८॥

जाणे अविकारी आत्मा येक । तो असे होऊनिया पृथक ।
त्यागी अहमात्मा साक्षिक । म्हणे श्रुति सिद्ध ॥७८९॥

आणि बाह्यविषयस्छोमा । प्रवर्ते होऊनिया आत्मा ।
ते जाणे प्रत्यगात्मा । वेद्यत्वें म्हणऊनी ॥७९०॥

जडाजडस्वरूपकारक । दर्पणाचे पाठी पोट विशेख ।
तैसे प्रकाशअप्रकाशात्मक । असे तया ॥७९१॥

अहंकारासी देहाची छाया । प्रत्यगात्मा म्हणिजे यया ।
तृतीयसंयोगे अतिशया । समंध असे तरी ॥७९२॥

त्याचे ठाई । अहं जरामी म्हणवीत । असे तयानिमित्य ।
चिद्दीपबिंबयुक्त । अहंकारसमंधे ॥७९३॥

स्थूळदेहासी उष्णादिकरून । जाणणे अनुसंधान ।
ते कर्मजनित होऊन । कर्मज म्हणवी ॥७९४॥

अणीक अहं जानामि आपण । म्हणवी तया कारण ।
चित्छाया अहंकारालागून । समंध तो ॥७९५॥

सृष्ट्यादीकरून । मोक्ष अवसान ।
पर्यंत हराशन । न होता सहज म्हणवी ॥७९६॥

अणीक अहंकर्ता इति । म्हणवी त्यालागी असा ज्ञती ।
प्रत्यगात्मा अहंकारसमंधे भ्रांती । जन्य म्हणवी ॥७९७॥

इति सकळ दृश्यअपरोक्षविवरण । जाणावेया नंतरें ज्ञान ।
अवरणविक्षेप परोक्षविवेकज्ञान । म्हणोनियां ॥७९८॥

शोकनिवृत्ती । निरांकुशतृप्ती ।
म्हणिजे इति । जीवसप्तावस्था ॥७९९॥

त्याचे ठाई संसार असक्तपणें । चिदाभास जीव आपण ।
श्रुतिविचार संभाषण । पाहूनि प्रथम ॥८००॥

आपुले निजस्वरूप । स्वयंप्रकाशरूप ।
नेणोनि असे प्रत्यगात्माप्रदीप । ते अज्ञान म्हणवी ॥८०१॥

आणीक कवणे येकेकाळी अपैसें । चिदात्मा असे ।
प्रत्यगात्मा नसें । प्रत्यगात्मा अहे ॥८०२॥

या उभयालागून । भीतरी अज्ञान ।
कार्यआवर्ण । ते अवरण म्हणवी ॥८०३॥

अणीक मी कर्मकर्तु । मी कर्मफळभोक्तृ ।
म्हणोनी अन्यत्रु । आरोपण ॥८०४॥

देहअभिमान । वशेकरून ।
चिदाभास जीव आपण । विक्षेप म्हणवी ॥८०५॥

अणीक आत्मअस्त्यत्व बोलणे सौरसें । श्रुत्याचार्यवाक्यविशेषें ।
प्रत्यगात्मा असें । म्हणोनि जाणणें ॥८०६॥

ते असत्यावरण । विवर्तके आपण ।
परोक्षज्ञान । म्हणवी निरुतें ॥८०७॥

अणीक तूचि परब्रह्म येक । म्हणोनि सांगे वेद्वाक्य ।
ते विचारें परिपाक । निजगुरुमुखें ॥८०८॥

प्रत्यगात्मा आपण म्हणोन । जाणणे तें अभावआवरण ।
द्वितीय निरशन । अपरोक्षज्ञान म्हणवी ॥८०९॥

आणीक आत्मसाक्षात्कारु । जालियावरी मी कर्मकर्तु ।
मी कर्मभोक्तु । म्हणोनि कर्म इति ॥८१०॥

जीवरूप दुःख । कारक समंधपक्ष ।
परित्यागांत शोक । निवृत्ती म्हणवी ॥८११॥

अणीक करावया योग्य कृत्य । ते करूनियां निवडिले विरहित ।
पावावया योग्य फळ अत्यंत । ते पावोनि निवडिले ॥८१२॥

म्हणोनि सहज उल्हासें । परितुष्टी विशेषें ।
पावणे ते निरांकुशे । तृप्ती म्हणवी ॥८१३॥

एवं शोकनिवृत्ती निरांकुशतृप्ती । म्हणिजे उभयअवस्थाप्रती ।
अपरोक्षफळ म्हणविती । प्रसिद्ध जाणावें ॥८१४॥

अणीक स्वयंप्रकाश । चिद्रूपआत्मा विशेष ।
नित्यपरोक्षत्व तयास । असे तरी ॥८१५॥

तयासी आज्ञादिकरून । सप्तअवस्था अघटमान ।
म्हणोनि तया कारण । दृष्टांत तो कैसा ॥८१६॥

कश्चित् दशमपुरुष पूर्वी । उतरोनियां जान्हवी ।
वरी आपणासी स्वभावीं । विचारू ठेले ॥८१७॥

ते समई क्रमेकरूनी । नवसंख्यपुरुष मेळऊनी ।
अपणासी विचारोनि निदानी । ते अज्ञान म्हणवीं ॥८१८॥

अणीक दशमवर जाला काय । नाहीं न दिसे उभय ।
भ्रांतीते अज्ञानकार्य । अवरण म्हणवी ॥८१९॥

दशमपुरुष नदीआंत । पावला जळमृत्य ।
म्हणोनि दुःखक्रांत । ते विक्षेप म्हणवी ॥८२०॥

अणीक येक अप्तवाक्य धैर्य । दशमपुरुषीं आहे ।
म्हणोनियां निश्चयें । ते परोक्षज्ञान म्हणवी ॥८२१॥

वरी नवसंख्यानर । मेळऊनियां दशमपुरुषवर ।
तूचि म्हणोनि साक्षात्कार । अपरोक्षज्ञान म्हणवीं ॥८२२॥

अणीक दशमपुरुष । तयाचे मृत्युदुःख ।
निरशन तें शोक । निवृत्ती म्हणवीं ॥८२३॥

वरी स्वबोधस्थिती । सुखें असणे आत्मरती ।
ते निरंकुशतृप्ती । म्हणवी जाणिजें ॥८२४॥

अणीक वेदवाक्य । विचार विशेख ।
असे पृथक । होऊनियां ॥८२५॥

विधिवाक्य । आणि निषेधवाक्य ।
सिद्धार्थभोगवाक्य । त्रय त्याचे ठाई ॥८२६॥

यज्ञादि सत्कर्म करणे मुख्य । ते म्हणवी विधिवाक्य ।
सुरापानादि अभक्षभक्षणादिक । तें निषेधवाक्य ॥८२७॥

विधिनिषेध परित्यागत्व । ब्रह्मआत्मैकरूपत्व ।
वस्तुमात्रबोधकत्व । ते सिद्धार्थबोधक वाक्य ॥८२८॥

आणीक ऋग्यजूसाम । अथर्वेण म्हणिजे चतुर्निगम ।
त्याचे ठाई अनुक्रम । प्रतिपाद्य योग ॥८२९॥

प्रज्ञान ब्रह्म अहं ब्रह्मास्मि तत्वमसी । अहमात्मा ब्रह्म म्हणोनी ऐसी ।
सिद्धार्थबोधक विशेषीं । चतुर्विध महावाक्य ॥८३०॥

तयामध्ये जाले मुख्य । तत्वमसी म्हणीजे महावाक्य ।
तयासी पृथक । ते तत्वमसी ॥८३१॥

म्हणिजे पदत्रय । जीवशिव उभयां ऐक्यमय ।
म्हणोनि परिक्रमे अर्थत्रितय । असे निरुता ॥८३२॥

अणीक पदार्थ । तयाचा वाक्यार्थ ।
तयासी यथायुक्त । समानाधिकरणसंमंध ॥८३३॥

विशेषणविशेषसंमंध । लक्षलक्षणसंमंध ।
म्हणिजे अनुक्रमे त्रिविध । तृतीय संमंध ॥८३४॥

आणि त्या पदत्रयासी विहित । वाच्यार्थ मुख्यार्थ ।
म्हणोनि पदार्थ । द्वय त्याचे ठाईं ॥८३५॥

पूर्वोक्त स्थूळादि तनुत्रय । समष्टिरूप अतिशय ।
विराटपुरुष हिरण्यगर्भमय । गर्भव्याकृत ॥८३६॥

ईश्वर ब्रह्म संयुक्तसरिसें । तप्तायुपिंडाऐसें ।
येकाकार दिसें । होऊनियां ॥८३७॥

ते तत्पदासि वाच्यार्थ । आणि मुख्यार्थ ।
म्हणउनि अभिधार्थ । म्हणवीत असें ॥८३८॥

अणीक स्थूळादि सर्व । देहत्रयावेच ।
व्यष्टिरूप विश्व । तेजस्तु प्राज्ञ ॥८३९॥

प्रत्यगात्मा संयुक्तसरिसें । तप्तायुपिंडाऐसें ।
येकाकार दिसे । होऊनियां ॥८४०॥

ते त्वंपदासी वाच्यार्थ । आणि मुख्यार्थ ।
म्हणवीत असे ॥८४१॥

अणीक विराटपुरुषादि । निरसूनियां उपाधी ।
उरे निष्कळंक उपलब्धी । निरोधीक ब्रह्म ॥८४२॥

ते त्वंपदालागूनी । लक्षितार्थ निदानी ।
शोधक म्हणऊनि । शुद्ध तत्पदार्थ म्हणवी ॥८४३॥

आणि विश्वादीकरुनी पृथक । उरे प्रत्यगात्मा निरोपाधीक ।
शुद्ध त्वंपदार्थ येक । शुद्ध त्वंपदार्थ म्हणवी ॥८४४॥

अणीक जहर्लक्षण । अजहर्लक्षण ।
जहदाजहर्लक्षण । म्हणोनी लक्षणत्रय ॥८४५॥

त्याचे ठाईं । गंगायां घोष प्रतिविंशति ।
कुतः प्रतिवसन्ति । सोहं देवदत्त म्हणोनि इति । उदाहरणत्रय ॥८४६॥

त्याचे ठाई । गंगायां घोष.शब्दार्थे । प्रवाहरूप जळ वर्ते ।
आपुला मुख्यार्थ स्वानुभवमतें । शोधक म्हणविजें ॥८४७॥

गंगाजळाभीतरी । नाही सर्वथा नगरी ।
असे गंगेचे तिरीं । हे जहल्लक्षण ॥८४८॥

कुशब्द ते सदृश । कुतः प्रवेश नव्हे मनुष्य ।
योगे कुतः प्रवेश । हे अजहल्लक्षण ॥८४९॥

आणीक सोहं शब्द ते भूत । काळदेशवयें विशिष्टत्व ।
सांगे सत्यार्थ । देवदत्तासी ॥८५०॥

अयं शब्द ते वर्तमान । काळदेशवयो विशिष्टपण ।
पावेल देवदत्त म्हणोन । सांगत असें ॥८५१॥

इति हे उभयतां । विरोधधर्मयुक्त पदार्थी ।
ऐक्यार्थ सर्वथां । घडे तरी ॥८५२॥

ते उभयपदार्थगतविरुद्ध । धर्म त्यजूनि अविरोध ।
धर्मसमान देवदत्त शुद्ध । मात्रा स्विकारुनी ॥८५३॥

मग तोचि हा हाचि तो म्हणउनी । ऐसे तादात्म्य उभयालागुनी ।
घडे हे जहदाजहल्लक्षणी । म्हणोनी नाम ॥८५४॥

अर्धलक्षण । भागत्यागलक्षण ।
म्हणोनि परिभिन्न । नाम होऊनि असें ॥८५५॥

तत्वमसी म्हणिजे महावाक्यातें । उदाहरण निरुतें ।
सांगावयातें । योग्य ते कैसें ॥८५६॥

तत्पदवाच्यार्थ सर्व । सर्वज्ञत्वादी षड्गुणविशिष्टभाव ।
परोक्षत्व शिव । स्वरूप सांगे ॥८५७॥

त्वंपदवाच्यार्थ किंचिज्ञत्व । आदिहीन गुणविशिष्टत्व ।
परोक्ष चिदाभास जीवत्व । स्वरूप सांगे ॥८५८॥

इति हे उभयत्व । असे विरोधधर्मत्व ।
पदार्थासी ऐक्यत्व । कैसे घडे म्हणीतलें तरी ॥८५९॥

उभयपदार्थगत । परोक्षत्वअपरोक्षत्वसहित ।
विरोधधर्म समस्त । असमत्त त्यजुनी ॥८६०॥

अविरोधधर्म । चैतन्यमात्रसम ।
लक्षार्थब्रह्म । कूटस्थ स्विकारुनी ॥८६१॥

तोचि हा आपण । हाचि तो म्हणऊन ।
तादात्म्य निश्चयानें । घडे सत्य ॥८६२॥

अणीक असीपद । म्हणिजे उभयविषद ।
लक्षार्थ शुद्ध । त्याचे ठाईं ॥८६३॥

परोक्षत्वअपरोक्षत्वादि । अविद्याकल्पित उपाधी ।
म्हणोनी बोधसिद्धी । सफळ होय ॥८६४॥

आत्मा अखंडैक्यरस । बोधमात्रा सिद्धस्वयंप्रकाश ।
म्हणोनियां सौरस । वाक्यार्थ स्यात्पदा ॥८६५॥

अगीक तया तत्वमसी । म्हणिजे महावाक्यार्थैसी ।
प्रत्यगात्मा परमात्मा उभयांसी । ऐक्यत्व जाले तरी ॥८६६॥

तें ऐक्यत्व निश्चय सत्य । म्हणोनि यथार्थ ।
तया कारण दृष्टांत । कवण म्हणीतला तरी ॥८६७॥

घटादि उपाधि नेति । मुखे निरसूनि अद्विती ।
येक गगन अंतीं । तेणे न्यायें ॥८६८॥

रघुनाथासी साचारें । तूं मनुष्य नव्हेसी साचार ।
विष्णूअवतार साक्षात्कार । म्हणोनि तैसें ॥८६९॥

कर्णासी व्याधभाव अभिमत्त । निरसूनि साक्षात ।
तूं कुंतीपुत्र सत्य । म्हणोनि तैसें ॥८७०॥

दशमपुरुषाचे मरण । दुःखभाव निरसून ।
तूचि दशमपुरुष आपण । तैसे सत्य स्वभावसिद्ध ॥८७१॥

ना तरी येक पुष्पे तुजलागुनी । स्वर्ग होईल म्हणोनि ।
मोक्षअपेक्षा उपजवी मनीं । अर्थवादाऐसे ॥८७२॥

प्रतिमादीक मूर्तिमंत । करूनि देवताकृत्य ।
अतिश्रद्धायुक्त । उपासनापराऐसें ॥८७३॥

मनुष्यासी अती । देवेंद्र रिति ।
उपमा स्थिती । पराऐसें ॥८७४॥

कारकालागुनी । राजेंद्र म्हणऊनी ।
उपचार वाणी । वाक्याऐसें ॥८७५॥

अग्नीमाणिक्य । समान वाक्य ।
गूणविशेख । सदृश्याऐसें ॥८७६॥

गोसमान रोही व्यक्तपर । नव्हे साचार ।
क्षीरदध्याकार । विकार परी नव्हे ॥८७७॥

इति दृष्टांत अशेख । सांगीतले निरार्थीक ।
पूर्वोक्त समान मुख्य । सार्थीक नव्हती ॥८७८॥

अणीक येक । दृष्टांत सर्वार्थिक ।
वारीकणा ऐक्य । स्वभावसिद्ध तैसें ॥८७९॥

अणीक बिंबप्रतिबिंबवाद । म्हणोनि बहुविध भेद ।
परिकल्पीत विषद । सांगीतले तरी ॥८८०॥

हो निरोध स्तुतीसी । कारण आत्मब्रह्मासी ।
सर्वदा सर्वैसी । निजऐक्य सत्य ॥८८१॥

आणीक सकळ प्रपंचजाती । तयासी मिथ्यत्व सांगे वेदांति ।
तया श्रुतिविचारें सत्य कैसी निजयुक्ती । घडे म्हणितले तरी ॥८८२॥

भ्रांतिस्वप्नवेशेकरुनी । वनितादि संभोगाचेनि ।
वीर्यस्खलित स्वप्नीं । होय सत्य ॥८८३॥

कल्पित शिवभैरवादि । देवतामंत्र भजनविधी ।
सत्यसंपादन सिद्धी । होय निरुती ॥८८४॥

यथार्थ नव्हे दर्पणाआत । प्रतिबिंब सत्य ।
मुख्यलावण्य अत्यंत । सदृश्य होय ॥८८५॥

तैसे परी शिवात्मक श्रुतिमत्त । विचार जालिया परमार्थ ।
वरी परब्रह्मयुक्त । सत्य स्वभावसिद्ध ॥८८६॥

अणीक अज्ञान संशय । विपरीत म्हणोनि होय ।
मुक्तीसी विघ्नत्रय । त्याचे ठाई ॥८८७॥

मी ब्रह्म आपण । सर्वथा नव्हे म्हणोन ।
बुद्धीसी धारण । ते अज्ञान म्हणवीं ॥८८८॥

मीं ब्रह्म होय न होय । म्हणोनि उभय ।
बुद्धिते संशय । म्हणवी जाणिजें ॥८८९॥

श्रुतियुक्तीनें मी जरी होय ब्रह्म । तरी माझा जीवभाव प्रथम ।
गेला नाही म्हणोनि बुद्धि विषम । ते विपरीत म्हणवी ॥८९०॥

अणीक श्रवण मनन । निजध्यास म्हणोन ।
परिक्रमें तया अज्ञान । विषई विरोधत्रय ॥८९१॥

त्याचे ठाईं । श्रुतिविचार सूतकासी । दृढवुद्धि जैसी ।
तैसा प्रत्यगात्मा ब्रह्मासी । ऐक्य म्हणउनी ॥८९२॥

उपनिषधवाक्यविचारणा । तात्पर्यार्थअवधारणा ।
तेचिया श्रवणा । म्हणवी निरुतां ॥८९३॥

तया श्रुतीचिया । अर्थयुक्तीकरूनियां ।
चिंतनयुक्त अतिशयां । ते मनन म्हणवी ॥८९४॥

तया श्रवणमननाआंत । निश्चितार्थैसी कृतार्थ ।
निश्चळ होउनि असणे निवांत । निजध्यास म्हणवी ॥८९५॥

अणीक येथे श्रवण । मनन उभयाकरून ।
उद्दीत ज्ञान । होय निरुतें ॥८९६॥

तया ज्ञाने साचार । होय आत्मसाक्षात्कार ।
श्रवण मुख्य म्हणोनि वर । गोही म्हणवी ॥८९७॥

मनन निजध्यासातें । साहकारी होय निरुतें ।
त्या कारण मुख्य नव्हे परि तें । अंग होयं ॥८९८॥

तो कैसा पै अर्थ । म्हणिजे तरी यथार्थ ।
परिहार दृष्टांत । मुखे तया ॥८९९॥

प्रकाशकरूप जालिया दीपकार्थ । चंचळ अवस्था जरि वर्तत ।
परि कार्य सर्वार्थ । समर्थ नव्हे ॥९००॥

तया कारण पवन । संचारालागुन ।
असे बांधला अछादुन । जयापरी ॥९०१॥

मनन ते तैसें । वाति सारूनि जसें ।
प्रज्वलीत करणिया ऐसें । निजध्यास म्हणवी ॥९०२॥

अणीक येथे श्रवण उपक्रम संहारता । अभ्यास अपूर्वता ।
फळ अर्थवाद तथा । उपरती ॥९०३॥

म्हणोनी विशद । श्रवणादि षड्विध ।
लिंगतात्पर्य संमंध । त्याचे ठाई ॥९०४॥

प्रथम सृष्टीतें । सकळ जगातें ।
सद्रूप ब्रह्म तें । असे म्हणउनी ॥९०५॥

त्या ब्रह्माचे स्वगत भेदत्रय । निरसूनि अखंडैकरसमय ।
प्रतिपादक निश्चय । ते उपक्रम म्हणवी ॥९०६॥

नामरूपात्मक जगत । ते लीन स्थानीं ब्रह्माआंत ।
प्रत्यगात्मा ब्रह्मसंयुक्त । येकत्व बोधी ॥९०७॥

परब्रह्म अंती । येका अद्विती ।
म्हणोनी सारी श्रुती । ते उपसंहार म्हणवी ॥९०८॥

उपक्रम म्हणोनी । उपसंहार म्हणवोनी ।
उभय मिळोनी । येक लिंग म्हणवी ॥९०९॥

प्रत्यगात्मयासी यथार्थ । प्रत्यक्षादि प्रमाणाआंत ।
सांगणे तत्वनिश्चयार्थ । ते अपूर्वता म्हणवी ॥९१०॥

प्रत्यगात्मा आपण । तेचि ब्रह्म म्हणोन ।
सांगणे ते पुनः पुनः । ते अभ्यास म्हणवी ॥९११॥

आत्मा येक जाणावया योग्यता । तो जाणत असे सर्व पदार्था ।
म्हणोनी सांगणे ते यथा । ते फळ म्हणवी ॥९१२॥

अणीक प्रत्यगात्मरूप । निर्विकार स्वरूप ।
त्यासि स्थिति सांगती इति निश्चयार्थरूप । न्याये असे म्हणोनि ॥९१३॥

जगत्वाचे सृष्टयादि अनुक्रमे प्रवेशत । जाले जे पंचीकृत ।
कर्तृत्व सांगणे ते भूत । अर्थवाद म्हणवी ॥९१४॥

मूर्तिका घटातें । ऊर्ण नाभी तंतूतें ।
निमित्त निरुतें । म्हणवी जैसें ॥९१५॥

तैसें ब्रह्मतें आपण । जगत्वासी कारण ।
म्हणोनि सांगणे निर्वचन । ते दृष्टांत म्हणवी ॥९१६॥

आणीक युक्ति तर्क । अनुमान म्हणोनी पृथक ।
मननासी मुख्य । साहंकारी त्रय ॥९१७॥

त्याचे ठाई । आत्मा अनेक होउनी । व्यापक म्हणोनी ।
सांख्यादिकरुनी । मत्तवादियां ॥९१८॥

समस्त आत्म्यासी । प्रत्यक् शरीरेसीं ।
असे संमंध तयासी । तया कारण ॥९१९॥

हियासी हे शरीर भोगसाधन । आन येकासी नव्हे म्हणोन ।
सांगणे भोगस्थितिमान । तें अघटीत ॥९२०॥

अणीक कवण येक । प्रकारें विशेख ।
निमित्य सुकृतादिक । सामग्रीचेनि ॥९२१॥

संपादने करुनी । हें शरीर याचिलागुनी ।
आन येकासी नाही म्हणोनी । म्हणीतले तरी ॥९२२॥

ते सुकृतादिक कारण । सामग्री संपादन ।
सकळ आत्म्यालागून । काय नसें ॥९२३॥

आणीक याचिया पूर्वसंचित । देहाभिमाने योग्य करावया सुकृत ।
जाले असे अनुमित । म्हणीतले तरी ॥९२४॥

तो देहाभिमान । पूर्वदेहीं असोन ।
अनेक आत्म्यालागून । काय नसें ॥९२५॥

इतुके सर्वशांकार्य । अवस्था दूषणमय ।
विचारावया निश्चय । शक्य ते कैसें ॥९२६॥

सर्वात्मा अनादसिद्ध । असती त्या कारणसाद्य ।
आन येक विशद । आत्मपक्षीं ॥९२७॥

भोगवेवस्था न होय अशक्य । म्हणोनि नानात्मक पक्ष ।
असूनि परि पृथक । भोगस्थिती न घडे ॥९२८॥

अणीक इया । मत्तांतु उभया ।
सांख्य म्हणिजे तया । समाधान ते कैसें ॥९२९॥

येक आत्मपक्षातु अतिशय । बिंबप्रतिबिंबन्याय ।
अंतःकरण उपाधियुक्तमय । तयापासाव ॥९३०॥

कंपकळुआदिक । नानात्व दर्शने अनेक ।
भोगस्थिती पृथक । म्हणिजे युक्त म्हणवी ॥९३१॥

अनेक तर्क अनुमान । जाले तरी तदलक्षण ।
हर्षमिश्राचार्यापासाव खंडण । होय प्रसिद्ध ॥९३२॥

ग्रंथ बहु विस्तीर्ण । होईल म्हणऊन ।
मितीने प्रतिपादन । केला साक्षेप मात्रें ॥९३३॥

आणीक मंत्रयोग स्पर्शयोग । भावयोग अभावयोग ।
महायोग म्हणिजे निजध्यासनयोग । पंचकरूप त्याचे ठाई ॥९३४॥

प्रणवादी मंत्रानुसंधानोपायें । परमात्म्याचियें ।
ठाई मनलय होय । तो मंत्र म्हणवी ॥९३५॥

तया मंत्रयोगेकरुनी । मनपवन येकवटुनी ।
मूळाधारीं प्रवेशोनी । सुषुम्नाडिमार्गें ॥९३६॥

शिरोमध्यगत । परमात्मादिदीप्त ।
मनोलय होय तयाआंत । तो स्पर्शयोग म्हणवी ॥९३७॥

प्रथम स्वर्ग ते साचार । मुग्धी दिशाते श्रोत्र ।
चंद्र अर्क नेत्र । अग्नीते मुख ॥९३८॥

अंतरिक्ष नाभि भूमी पाद । ईश्वराचे अगाध ।
विराट पुरुष प्रसिद्ध । स्मरोनियां ॥९३९॥

ना तरी पंचवक्त्र । दशभुजा नाना वस्त्र ।
आभरण नंदीश्वर । सहीत दिव्यमूर्ति ॥९४०॥

यथाव्यक्ती परिभाउनी । मग तयाचे परतोनी ।
येक येक त्यजूनि । आवयव ॥९४१॥

उरले निरावेव मात्र । सद्रूप ब्रह्म अविकार ।
मनोलय होय तदाकार । तो भावयोग म्हणवी ॥९४२॥

जगउदयो प्रळयाचे ठाई । जाणने नेणने समई ।
आपणासी कवण येकही । बाधा नसतां ॥९४३॥

एकचि प्रकारें असणें । प्रत्यगात्मा ब्रह्मस्वरूपीं धरणें ।
मनोलय होय तेणें । तो महायोग म्हणवी ॥९४४॥

इति निजध्यास पंचलक्षण । आणि भूतप्रतिबंधन ।
वर्तमानप्रतिबंध जाण । जाणिजे इति ॥९४५॥

त्याचे ठाई । मोक्षापेक्षेने सर्वसंग । करूनियां परित्याग ।
श्रीगुरु पावोनि चांग । तयाचेनि मुखे ॥९४६॥

श्रवण जरी जालें । परि प्रथम ग्रहाश्रमी संमेळें ।
वनितादि वस्तुरूप स्विकारिलें । यौवनशृंगारादि ॥९४७॥

षड्गुण अनुभवाची गोडी । संस्कारबळे पुनःपुना अवडी ।
येउनि मनासी पवाडी । वासनारूपें ॥९४८॥

निमिष्य निमिष्यासी असे प्रेरित । आत्मसाक्षात्कार प्राप्त ।
होऊ नेदी ते भूत । प्रतिबंध म्हणवी ॥९४९॥

आणि जडबुद्धीस न संगरती । अति विषयअसक्ती ।
कुतर्क अभिमान चपळमती । व्याकुळता उपजउनी ॥९५०॥

तत्वविचारासी असे विघ्न करित । आत्मसाक्षात्कार प्राप्त ।
घडों नेदी तो वृत । मान प्रतिबंध म्हणवी ॥९५१॥

अणक पुढें कितीयेक अन्यत्र । न सरे जन्मांतर ।
प्रारंब्ध विशेषात्कार । म्हणोनियां ॥९५२॥

ब्रह्मादीक लोक वांछित । दोषद्व्यायुक्त ।
होऊनि असे वेदार्थ । जाणीतला तरी ॥९५३॥

आत्मसाक्षात्कारप्राप्ती । घडो नेदी सर्वार्थी ।
तो अगम्य प्रति । बंध म्हणवी ॥९५४॥

अणीक ते प्रतिबंधत्रय । जिंतावया उपाय ।
असे ज्ञानवैराग्य । उपरती म्हणीजे ॥९५५॥

मुख्य साधन अतिशया । अभ्यास करावया ।
लागूनि कारणस्वरूपकार्या । म्हणउनी ॥९५६॥

त्रयत्रयलक्षण । अनुक्रमेकरून ।
विविध भिन्नाभिन्न । सांगिजेल ॥९५७॥

ज्ञानासि मुख्य । श्रवणादिक ।
आपण विशेख । कारण म्हणवी ॥९५८॥

आत्मअहंकारअमिमत्त । अध्यासऐकत्व ।
भिन्नामिन्न करूनि दाखवीत । ते स्वरूप म्हणवी ॥९५९॥

अहंकारगत । संसारासी साक्षित्व ।
ते कार्य म्हणवीत । असें निरुतें ॥९६०॥

अणीक वैराग्यातें । वनितादी विषय अभिमत्तें ।
अनित्यत्व दर्शन ते । कारण म्हणवी ॥९६१॥

उपरिकवण । येक उपायेकरून ।
अहंकारनिरशन । ते स्वरूप म्हणवी ॥९६२॥

अणीक ते विषय । संगे सोय विपरितन्यायें ।
लंपट न होय । ते कार्य म्हणवी ॥९६३॥

उपरतीलागून । यमनियमादिकरून ।
अष्टांगयोगाचरण । ते कारण म्हणवी ॥९६४॥

चित्तअभ्यंतर । मुखे परतोनियां स्थीर ।
असणे येकाग्र । ते स्वरूप म्हणवी ॥९६५॥

अणीक बाहीर । कर्मावरी अनादर ।
वासना न होय तदाकार । ते कार्य म्हणवी ॥९६६॥

त्याचे ठाई आणीक । देहआत्मभाव अध्यासे जैसे ।
ब्रह्म आपण म्हणवी तैसे । दृढबुद्धीभाव अध्यास विशेषें ।
ते ज्ञानावधी म्हणवी ॥९६७॥

इहलोकादि समस्त । ब्रह्मलोकपर्यंत ।
सकळ तृणीकृत । ते वैराग्यावधी म्हणवी ॥९६८॥

सुषुप्ती ऐसिये रिती । सकळ कार्यजाती ।
विस्मरण उपरती । अवधी म्हणवी ॥९६९॥

अणीक तयामध्ये ज्ञान । वैराग्य उपरती म्हणोन ।
तृतीयलक्षण निपुण । असिले तरी ॥९७०॥

तया पुरुषासी अन्यंत । महातपाचे अनाश्रित ।
फळ जाणावे सत्यार्थ । ते तैसें असे ॥९७१॥

वैराग्य उपरती उभय । असिले जरि पूर्णमय ।
ज्ञान येक नाही तरी निश्चय । मुक्ती न घडें ॥९७२॥

परि महासूख । स्थान ऊर्ध्वलोक ।
प्राप्त विषेख । होय तयासीं ॥९७३॥

ज्ञान येक असोनी । वैराग्य उपरती दोन्ही ।
नाही तरी त्या पुरुषालागुनी । जेणे न्यायें ॥९७४॥

रुक्षाग्री वळघलियां पुरुषा । रुक्षशाखा भंगलिया जैसा ।
मध्ये निराधारसरिसा । वोळंवत असें ॥९७५॥

पतनासी अनिछा परी । पडेल साचोकारीं ।
तैसे देहवासना नसे तरी । मुक्ति निश्चयें ॥९७६॥

प्रारब्धजनित । दुःखानुभव संमत्त ।
जववरी देह वर्तत । तववरी सत्य ॥९७७॥

अणीक शुभइच्छा विचारणी । तनमनसंशक्ति सत्वाप्रती पदार्थभावनीं ।
तूर्यागमी म्हणोनी । ज्ञानभूमिका सत्य ॥९७८॥

त्याचे ठाई । मीं अतिमूढ होऊनी । असे वरदेह पावोनी ।
हे कवण कारण म्हणोनी । चेतोनी आत्मविषई ॥९७९॥

श्रीगुरुवाक्यसन्मत्ते । आपुलिया निजस्वरूपाते ।
जाणावया बुद्धि प्रवर्ते । ते शुभइच्छा म्हणवी ॥९८०॥

वरी श्रीगुरुशास्त्र प्रमाणकरून । जनित किंचित वैराग्यसाधन ।
सत्यसदाचारप्रवर्तन । ते विचारणा म्हणवी ॥९८१॥

ते शुभइच्छा विचारण । उभयवळेकरून ।
विषयासक्तिनिरशन । ते तनुमानस म्हणवी ॥९८२॥

वरी भूमिकात्रयाचेनि । अभ्याससामर्थ्यकरूनी ।
जगत्प्रपंच उभारणी । सकळ जडाजड ॥९८३॥

स्वप्नतुल्य म्हणोन । जाणोनि आपण ।
वरि आत्मसन्मात्र संनिधान । ते सत्वापती म्हणवी ॥९८४॥

सकळ दृश्यजाती । प्रपंचाचे ठाई विरती ।
सुषुप्त्यात्मक जेणे स्थिती । तेणें न्यायें ॥९८५॥

आत्मा सच्चिन्मात्र । विशेषतत्वीं तत्पर ।
रत असे निरंतर । तें संशक्ति म्हणवीं ॥९८६॥

सर्व वासनाहरासें । अनंदांतु गाढ निद्रिस्ताऐसें ।
सुलीन असगें आत्मसमरसें । ते पदार्थभावनी म्हणवीं ॥९८७॥

न उपजतां अस्तिनास्ती । अहंकृति निराहंकृती ।
विरहीत केवळ ज्ञप्ती । स्वरूप अद्वैतपदी ॥९८८॥

चिदाकाश अंतर्बाह्य । व्यापूनि अचळ अक्षय ।
होउनि असणें शून्यमय । ते तूर्यागमी म्हणवी ॥९८९॥

अणीक तें । उपरती तें ।
अनुकूळ निरुतें । जाली असें ॥९९०॥

दृश्यानुवेध शब्दानुवेध । सविकल्प निर्विकल्प विषद ।
बाह्य अंतर होऊनी भेद । असे षड्विधसमाधी ॥९९१॥

त्याचे ठाईं । घटादीक विषयजातीआंत ।
जाले सहज अथवा कृत्य । कवण येक त्या निमित्य । नामरूप ॥९९२॥

निरसूनियां मायाअंश अभय । यामध्ये अस्तिभातिप्रिय ।
म्हणिजे सच्चिदानंदत्रय । ब्रह्मअंश ॥९९३॥

घेऊनि करणे अनुसंधान । ते बाह्यदशा घेउन ।
वेध सविकल्प आपण । समाधी म्हणवी ॥९९४॥

अखंड सच्चिदानंद अद्वय । ब्रह्मस्वरूप रसमय ।
म्हणोनि प्रेमप्रिय । ध्यान (?)णेजें ॥९९५॥

ते बाह्यदृश्यानुवेधक । सविकल्पक ।
समाधि मुख्य । म्हणावीत असें ॥९९६॥

वरि समाधिद्वयाचेनि । अभ्यासबळेकरुनी ।
ब्रह्मानंदध्यानी । मन मग्न होऊनियां ॥९९७॥

निस्तरंगसागरन्यायें । निश्चळात्मा होऊनि स्वये ।
असणे तेचि बाह्य । निर्विकल्पसमाधी म्हणवी ॥९९८॥

अणीक मनोगतकारक । कामसंकल्पादीक ।
तयासी अपण साक्षिक । म्हणोनिया ॥९९९॥

अखंड अनुसंधान । ते अभ्यंतरदृश्यपण ।
वेध सविकल्प आपण । समाधी म्हणवी ॥१०००॥

असंग सच्चिदानंद । स्वप्रकाश अद्वय निर्द्वंद ।
स्वरूपनिजबोध । ते मी म्हणोनी ॥१००१॥

अखंड वृत्तीधारण । ते अभ्यंतरदृश्यपण ।
वेध सविकल्प आपण । समाधी म्हणवी ॥१००२॥

स्वानुभूतीप्रवेशाचेनि । दृश्यशब्द उभय निरसूनी ।
निवांत स्थानी । दीपकन्यायें ॥१००३॥

निस्पंद स्वरूप । होऊनि असणे आपेआप ।
ते अभ्यंतरनिर्विकल्प । समाधी म्हणवी ॥१००४॥

इति षट्समाधियुक्त । योगेश्वर सर्वगत ।
काळकर्म विचरत । असे निरुता ॥१००५॥

तयाचे मन जेथ जेथ । जाय तेथ तेथ ।
तयासी समस्त । समाधिस्थिती ॥१००६॥

अणीक दुःखअभात्व । सर्वकामातीत्व कृतकृत्यत्व ।
प्राप्यप्राप्यत्व । म्हणोनि ज्ञानफळ चतुर्विध ॥१००७॥

त्याचे ठाईं । दुःखाभाव म्हणिजे हिय । परलोक उभय ।
तयांतु विभेदमय । होऊनि असें ॥१००८॥

तयामध्यें स्थूळदेहासी विशेषत्व । कुरूपत्व दुर्गंधत्व ।
व्याधादिक बाधकत्व । अनेकविध ॥१००९॥

सूक्ष्मतनूसी बाधक । दिसे कामक्रोधादिक ।
शोकमोहादि अनेक । वासनामय ॥१०१०॥

कारणतनूसी सांगत । आधिव्याधिबीजभूत ।
जाला अतिबळिवंत । संस्कार म्हणिजें ॥१०११॥

ऐसा हा त्रिविधसंतापकारक । इहलोक दुःखदायक ।
होऊनि असे मुख्य । त्याचे ठाई ॥१०१२॥

मिथ्यात्मक मायाकार्य । जाले शरिरादि ज्ञेय ।
तयासि विलक्षण अद्वय । प्रत्यगात्मा ॥१०१३॥

त्यासी ज्ञानप्राप्तीवरि सांग । जाहला परमार्थसंग ।
तया कारण भोग्यभोक्ता नव्हे ॥१०१४॥

म्हणोनि ज्ञानियासी ते दुःख । त्रयसमंध काही येक ।
नसे तया कारण इहलोक । दुःखभाव म्हणवी ॥१०१५॥

अणीक पुण्य कैसेनि साधें । पाप कैसेनि छेदें ।
म्हणोनि उभय चिंतासमंधे । परलोकी दुःख होय ॥१०१६॥

तेथे सम्यक् ज्ञानसुख । जाले म्हणोनी विशेख ।
पद्मपत्रोदक । संगन्यायें ॥१०१७॥

ज्ञानी आपण । कर्मद्वयालागून ।
अलिप्त होऊन । असे असंशय ॥१०१८॥

जैसा काष्टांत वन्ही वसें । परी ते वन्हीआंतु काष्ठ नसे ।
तंसे कर्मद्वय वेव्हारी असें । विवेकिया ॥१०१९॥

परि तो वेव्हार । तयातु साचार ।
नसे लेशमात्र । सर्वथैव ॥१०२०॥

जैसा दावाग्नी अवरला पर्वत । तयासी मृगपक्षी नाश्रित ।
तैसे नातळे सुकृत दुष्कृत । ज्ञानाग्निदग्धपुरुषा ॥१०२१॥

त्या कारणें चिंतातूर विशेख । लेशमात्र काही येक ।
नाही ते परलोक दुःख । अभाव म्हणवी ॥१०२२॥

अणीक सकळ ऐश्वर्यसपन्नादि । सर्वभोग्यादि ।
हिरण्यगर्भांतु पर्दीं । उत्तरोत्तर ॥१०२३॥

योग्य होउनि वांछेसी । असे शतगुणोत्तर विशेषीं ।
तो सकळानंद निस्पृह विवेकियासी । असे म्हणोनि ॥१०२४॥

अखिलानंद ज्ञानियां । जाणणे प्रगटलें अतिशया ।
ब्रह्मअंश म्हणोनियां । तयालागी ॥१०२५॥

तयासी संततोदित । अनंदसिद्धी अखंडित ।
जाहली आपणआंत अनुमित । ते सर्वकामाप्ती म्हणवी ॥१०२६॥

अणीक अवेकिया तत्वप्राप्ती । विना प्रथम इहलोकस्थिती ।
समंध अनिष्टनिवृत्ती । इष्टकामाप्तीकारणें ॥१०२७॥

कृषिवाणिज्यादिक । स्वर्गादीक सुख ।
भोगसिद्धिदायक । कारण योग उपासना ॥१०२८॥

वरी मोक्षसाधन । अनर्घ्यज्ञान ।
सिद्धिकारण । श्रवणादिक ॥

म्हणिजे त्रिविध । कर्तव्य विषद ।
मुख्य होऊनी प्रसिद्ध । असे निरुतें ॥१०२९॥

तत्वज्ञान जालियावरि विशेख । संसारिक फळभोगइच्छा मुख्य ।
नसे म्हणोनी कृशादिक । व्यापार नाहीं ॥१०३०॥

गवाक्षगत । रविकीर्णांत ।
दिसे परमाणु तेथ । नभप्रकाशीं न दिसें ॥१०३१॥

अल्पज्ञानियासी तैसें । विषयकर्म सरिसें ।
सम्यक् ज्ञानामध्यें न दिसें । म्हणोनियां ॥१०३२॥

अनुष्टानातें । योग्य नव्हे निरुते ।
योगादीक वांछातें । नसे तयांसीं ॥१०३३॥

अणीक ब्रह्मानंद । साक्षात्कारें बोध ।
जाला साध्य । म्हणोनियां ॥१०३४॥

श्रवणादीक समस्त । सकळ कृतकृत्य ।
अभिप्राये सत्य । ते कृतकृत्य म्हणवीं ॥१०३५॥

आणि अपणासी मुख्य । विशिष्ट पुण्यपरिपाक ।
मुमुक्षत्व गुरुउपास्तिक्य । शास्त्रश्रवण ॥१०३६॥

आत्मानात्मविवेक । निवृत्ती अज्ञानादिक ।
आत्मसाक्षात्कारें संसारदुःख । निरशन सकळ ॥१०३७॥

श्रुत्यार्थनिश्चय । महावाक्यविश्वासप्रिय ।
निजानंदसिद्धी अतिशय । ते प्राप्तप्राप्य म्हणवी ॥१०३८॥

अणीक जीवन्मुक्त विदेह । कैवल्य म्हणोनि मोक्षद्वय ।
विद्याअश्रय । त्याचे ठाई ॥१०३९॥

विवेकियासीं । अहमात्मा भावियासी ।
अन्योन्य उभयासी । समंध लक्षण ॥१०४०॥

हृदयग्रंथी । पावोनी शीतळार्थी ।
वरी शरीररिती । स्वशरीरीं ॥१०४१॥

दृढ अभिमान नसें । अनुभव सम्यक् जाला असें ।
म्हणोनि प्रारब्धदशें । भोगसाक्षा ॥१०४२॥

सुषुती का बाळक । तयापरी मदानुसंधानपूर्वक ।
होय तयालागी देहादिक । निराभिमानें ॥१०४३॥

घटाप्रति वरि चक्रभ्रमण । तैसे प्रारब्धवासना जाण ।
वसे विचरत असे तो जीवन । मुक्त म्हणवी ॥१०४४॥

अणीक ब्रह्मज्ञानउदय । जालियां ज्ञानोदय ।
उत्तम सूर्योदय निःसंशय । मयवृत्तिन्यायें ॥१०४५॥

अज्ञानसंयुक्त तत्कार्य । शरीरादिक निरशनमय ।
केवि देह दैव्य होय । निश्चयेसीं ॥१०४६॥

परि मध्ये जीवन्मुक्त । कल्पना कैसी वर्तत ।
तयासी कवण दृष्टांत । म्हणीतलें तरी ॥१०४७॥

विवेके रज्जूचे ठाई सर्प । भ्रांति निरसलियां अरोप ।
असे नावेक भुविकंप । जयापरी ॥१०४८॥

तैसे ज्ञानाचेनि अज्ञानक्षय । परि तयाचे कार्य ।
देहस्थिती किंचितमय । असे म्हणोनि ॥१०४९॥

ब्रह्मविद्याउत्पत्तीकाळीं तत्क्षणात । निःशेषे अज्ञानसंयुक्त ।
होआवा देहपात । म्हणीतलं तरी ॥१०५०॥

ब्रह्मविद्येचिया । ज्ञानसंप्रदाया ।
लोप होईल म्हणोनियां । समंध असें ॥१०५१॥

ते तैसे जाले तरी आणी येक । परशिवसंप्रदाई शिवादिक ।
शिवसंप्रदायक । ईश्वरादि ॥१०५२॥

ईश्वरसंप्रदाई रुद्रादिक । रुद्रसंप्रदाई विष्णवादिक ।
विष्णुसंप्रदायक । ब्रह्मादि ॥१०५३॥

ब्रह्मापासाव संप्रदायक । प्राजापत्यादिक ।
प्रजापतिसंप्रदायक । ऋषेश्वरादि ॥१०५४॥

ऋषीपासाव मनुसंप्रदाई । मनूपासाव राजेश्वर सर्वेही ।
षोडश महाराज्य.पासाव प्रवाही । ब्रह्मविद्या प्रगटली ॥१०५५॥

हे ब्रह्मविद्यासंप्रदाय । सांगीतले पर्याय ।
छंदोग्निस्रुतीसी विरोधमय । तया कारण ॥१०५६॥

तत्वता यालागूनियां । जीवन्मुक्तिसिद्धी होआवयां ।
कारण होऊनिया । प्रारब्धकर्मवासना ॥१०५७॥

अज्ञान लेशमात्र । सद्भाव अंगिकार ।
करूनियां शरीर । स्थिती असे ॥१०५८॥

ते कवण कृत्य । म्हणीतले तरि सत्यार्थ ।
शिष्य उपदेशानिमित्त्य । सिद्ध होऊनि असे ॥१०५९॥

अणीक जीवन्मुक्ताचे संचित । कर्म तें ज्ञानाग्नीनें भस्मीभूत ।
होय जैसे तृणाहुत । परि जाणावें ॥

प्रारब्धकर्म ते सरे भोगुन । अगम्यकर्म तें अनधिकारी होउन ।
ना विरूढ तया कारण । कर्मे सांगीतलें ॥१०६०॥

आणि ज्ञानाग्नीदग्ध । जाले कर्म जे प्रारब्ध ।
संयोगे भोगदायक सिद्ध । म्हणीतले तरी ॥१०६१॥

पुढे देहउत्पत्ती । होईल जरी म्हणती ।
तरि तयासि निवृत्ती । कारण दृष्टांत ॥१०६२॥

भाजिले कणवट भोग्य । मंत्रासीच योग्य ।
परी अंकुरोत्पत्ती प्रयोग । कारण नाही ॥१०६३॥

जैसे ज्ञानाग्नीदग्ध कर्मसंगात । प्रारब्धभोग तव न सरे सत्य ।
परि जन्मांतरासी नव्हे हेत । म्हणोनि जाणावें ॥१०६४॥

अणीक तें प्रारब्धकर्म असे परिलोक । अस्मादीक नरासी येक ।
देहांतु भोग न सरें ॥१०६५॥

लोकत्रयांतु अधिकारी कृत्य । जाले मनुव्यासादि महंत ।
पुरुषासी दशसंख्या देहांत । भोग न सरे म्हणती तरी ॥१०६६॥

ज्ञानीयांसी तिलोधन । शक्ति नाही म्हणोन ।
बाळकौमारादि लक्षण । भेद असें ॥१०६७॥

म्हणोनि नरासी जैसे देह येक । तैसेचि व्यासादिका दशसंख्य ।
देह येका देहापेसे मुख्य । यालागी सांगीतलें ॥१०६८॥

अणीक सकळ विषयत्व । तयासी साधीतसे मिथत्व ।
ज्ञानासी विषयासी सत्यत्व । संपादिले तरी ॥१०६९॥

प्रारब्धभोगासी अन्योन्य । विरोध असे म्हणोन ।
ज्ञानियासी कैसी भोगसिद्धि घटमान । म्हणीतले तरी ॥१०७०॥

मिथ्यात्मक स्वप्न । इंद्रजाळी क्रमेकरून ।
वनितादी स्वर्गभुवन । भोग अभासें ॥१०७१॥

मैथुनादी विषय । क्रीडा आनंदमय ।
अतिभोगस्थिती होय । तया प्रकारें ॥१०७२॥

वेव्हारीक प्रारब्धभोगातें । विषयातें सत्यत्वें ।
दर्शन होय न होय यथार्थें । हा नेम नाही ॥१०७३॥

प्रारब्धभोगांसीं । आणि विषयांसीं ।
अन्योन्य उभयासीं । विरोध नाही ॥१०७४॥

तया कारणे ज्ञानियालागुन । प्रारब्धकर्म भोगणें ।
असे म्हणोन । विहितासी सत्यार्थ ॥१०७५॥

अणीक येथें भ्रांती । नासतां तत्क्षणांत शक्ती ।
रजतस्वरूपासी निवृत्ती । होय तैसें ॥१०७६॥

ज्ञानेकरूनी । अज्ञान नासलें ततक्षणीं ।
जगत्प्रपंच नयनीं । दिसणे नाहीं ॥१०७७॥

विवेकियासि अपैसें । प्रारब्धभोग विशेषें ।
कैसा होत असें । म्हणीतले तरी ॥१०७८॥

शुक्तिका रजत म्हणिजें । निरोपाधीक सहजें ।
भ्रम होय विराजें । तया कारणें ॥१०७९॥

जाणीतले तत्क्षणासी । रजत स्वरूपासी ।
निवृत्ती अपैसी । होय अत्यंत ॥१०८०॥

तैसे उपाधीक । भ्रमाऐसें नव्हे पूर्वक ।
तरि ते कैसें अणीक । म्हणीतलें तरी ॥१०८१॥

सरोवरातिरीं । मनुष्य जळाभीतरीं ।
अधोमुखाकारी । होउनि दिसे ॥१०८२॥

म्हणोनि तटाकतिरी राहोनी । पाहिलें बुद्धिपूर्वक होऊनि ।
तरी ते अधोमुखरूप नयनीं । दिसत असें ॥१०८३॥

तैसे अहंकारसमंधी जीव । भावादीक ते मिथ्या सर्व ।
प्रत्यगात्मा स्वयमेव । आपण म्हणोनी ॥१०८४॥

वोळखिले जरि यथार्थ । तरि जीवादीक हेत ।
प्रपंच असे दिसत । तया कारणें ॥१०८५॥

जीवन्मुक्तासी प्रारब्ध । भोग वेव्हारसमंध ।
अंगिकार सहजसिद्ध । म्हणोनि जाणावें ॥१०८६॥

आणीक तया जीवन्मुक्तालागुन । मैत्रीकरून ।
उदित अपेक्षा म्हणोन । सद्‌गुण चतुर्विध ॥१०८७॥

त्याचे ठाई । सत्पुरुषसंयोगे अति । स्नेहे विश्वास प्रीति ।
तादात्म्य तद्युक्त रती । ते मैत्री म्हणावी ॥१०८८॥

दुःखात्मक समस्त । जिवाचे ठाई कृपाहितार्थ ।
गुणदोष न देखे किंचित । हे करुणा म्हणावी ॥१०८९॥

पुण्याधिकारी विशेषें । तया देखोनी विशेष हर्षें ।
आनंदती संतोषें । ते मुदीत म्हणवी ॥१०९०॥

पापात्मक सर्वेही । देखोनि त्याचे ठाईं ।
रागद्वेष म्हणे नाही । ते उपेक्षा म्हणवी ॥१०९१॥

अणीक त्या जीवन्मुक्तासि पढियें । ज्ञानरक्षक तपश्चर्यें ।
सर्वसंवाद दुःखसंक्षय । सुखाविर्भाव ॥१०९२॥

म्हणोनि क्रमेकरून । पंचप्रयोजन ।
असे कारण । त्याचे ठाईं ॥१०९३॥

वासनाक्षयो मनोवास । अंतःकर्णस्फूर्ति निरास ।
अहंकार निःशेष । गळीतमान ॥१०९४॥

चित्त निर्मळ प्रकाशें । बुद्धि स्वछ विकाशें ।
संततोदीत होऊनि असे । ते ज्ञानरक्षक म्हणवी ॥१०९५॥

तत्सन्निधा इंद्रियप्रधान । मन तयासी निग्रह इंद्रिया मन ।
स्वरूपीं येकाग्रधारण । ते तपश्चर्या म्हणवीं ॥१०९६॥

तपोनिष्ट जीवन्मुक्त । तयासी अवाळपंडिताआंत ।
सकळ येउनी वंदित । योगेश्वर म्हणउनी ॥१०९७॥

स्तुती नमस्कार । सेवा पूजोपचार ।
वहुमान आदर । ते सर्वसंवाद म्हणवीं ॥१०९८॥

अस्मिन् इत्यादि मुख्य । क्लेशपंचक ।
निरशने ते दुःख । संक्षय म्हणवी ॥१०९९॥

हिया साधनेंकरूनि काही । आपणासी येकही ।
प्रतिबंध नाहीं । मुखाविर्भाव म्हणवी ॥११००॥

अणीक क्रोधवैराग्यत्व । आणि जितेंद्रियत्व ।
दमक्षमाजनप्रियत्व । अलोभ दाता ॥११०१॥

अभयनिर्वंध । म्हणिजे विषद ।
ज्ञानियासी विविध । चिन्ह असे ॥११०२॥

आणीक त्या जीवन्मुक्तापासुनी । शिष्य भक्तीदास्येकरूनी ।
पापिष्टादि चर्तुर्विध जनालागुनी । अनुग्रह होय ॥११०३॥

त्याचे ठाई । तो जीवन्मुक्त कृपावशें । तत्वोपदेश करीतसें ।
त्याचे ठाई शिष्यासि विश्वासें । मुक्ति लाभें ॥११०४॥

तयाचे अनुरागे विहित । करी आराधन यथाशक्त ।
तयाचे भक्तासी सुकृत । अतिशयें लाभें ॥११०५॥

तयाची स्वचरित्रस्थिती । देखोनी उदासीन करिती ।
तयासी पुण्याकृती । अभिरती लाभें ॥११०६॥

तयाचेनि दर्शनें । स्पर्शनेकरून ।
पापियाचे दारुण । पाप क्षय पावे ॥११०७॥

आणीक येथे कर्तृत्वादि मुख्य । कर्म नसे किंचित येक ।
जीवन्मुक्तासी विशेख । वेदवाक्य ॥११०८॥

शक्ति तात्पर्य अनुकुळ तर्क । दृष्टांतयत्नपूर्वक ।
ब्रह्मोपदेशादिक । कैसे घडे म्हणीतले तरी ॥११०९॥

श्रुति रोहितमय । ब्रह्मस्वरूप होय ।
त्यालागि रागद्वेषादि द्वय । विरहीत ईश्वरासी ॥१११०॥

अनुगृह्य निगृह्य अपैसें । जनाचे सुकृतदुष्कृतवशें ।
अनुग्रहनिग्रह जैसें । चेष्टा घडत असें ॥११११॥

तैसे साधकाचेनि । सुकृतप्रभावेकरूनी ।
जना उपदेश होय म्हणोनी । निश्चयसिद्ध ॥१११२॥

अणीक येथे जीवन्मुक्तालागुन । इतके सांगीतले लक्षण ।
पूर्वक असावें तरि तें वहुभिन्न । असे म्हणीतले तरी ॥१११३॥

प्रारब्धकर्मसंसार तो आपण । तीव्र मद मध्य सुषुप्ती म्हणोन ।
चतुर्विध प्रकार होउन । असे त्याचे ठाई ॥१११४॥

सम्यक्ज्ञानवर । जाला तरी विशेषात्कार ।
परि भोगाचे ठाई तत्पर । पूर्वक होउनी ॥१११५॥

पशुन्यायें साचार । आत्माप्रीति मात्र ।
असे तो तीव्र । संस्कार म्हणवी ॥१११६॥

भोगाचे ठाई मुख्यत्व । प्रवर्तला तरी सावधत्व ।
आपण आत्मतत्व । रत होवोनी ॥१११७॥

बाळकापरी लक्षण । असंशयपण ।
विनोदार्थ असे आपण । तो मध्यसंस्कार म्हणवी ॥१११८॥

सकळ भोगोपचार । परित्यागूनि असार ।
निजतत्वीं तत्पर । होऊनि असें ॥१११९॥

सुरतसूख । मैथुनाऐसे विशेख ।
निजानंदी असे पूर्वक । तो मदसंस्कार म्हणवी ॥११२०॥

सकळ व्यापार । परित्यागूनि निर्विकार ।
पणे निरोपाधीक वर । आत्म्याचे ठाईं ॥११२१॥

होऊनियां तत्पर । परि मुक्ताऐसे अपार ।
परमसुखे असे स्थीर । तो सुप्तसंस्कार म्हणवी ॥११२२॥

आणीक इति चतुर्थ प्रकार । प्रारब्धकर्मसंस्कार ।
वसे जीवन्मुक्तासी विचित्र । वर्तणूक असिली तरी ॥११२३॥

रज्जू कुटीळ गतीऐसे । नदीसमुद्रगाम्यत्व जैसे ।
तैसे अनादिअंती समरसें । ब्रह्मस्वरूप होउनी ॥११२४॥

निजमुक्तात्मक । अपणा पै येक ।
प्रकारे असती सुख । स्वरूप सत्य ॥११२५॥

अणीक इच्छाप्रारब्ध । अनिच्छाप्रारब्ध ।
प्रयिच्छाप्रारब्ध । म्हणोनियां ॥११२६॥

प्रारब्धतृतीया । दैवतादिकासी निवारावया ।
अशक्य न जाय आया । त्याचे ठाईं ॥११२७॥

अपत्यसेवनादिक । आपणासी जे लभ्यार्थ ।
काही येक येणार ते मुख्य । वोळखिले तरी ॥११२८॥

बुद्धिपूर्वक विशेषे । व्यापार समरसें ।
आचरत असें । तो इच्छाप्रारब्ध म्हणवी ॥११२९॥

मी न करी म्हणीतले तरी । हिंसादीक धर्म राजाज्ञे परी ।
करवी बळात्कारी । तें अनिच्छाप्रारब्ध म्हणवी ॥११३०॥

अपणासी इच्छाअनिच्छा । नाही तरी परापेक्षा ।
संयोगे भोगवी सुखदुःखा । ते परइच्छाप्रारब्ध म्हणवी ॥११३१॥

हिया त्रिविधप्रारब्धाचेनि । जीवन्मुक्तालागुनी ।
विचित्रप्रारब्ध म्हणोनी । निश्चयसिद्ध ॥११३२॥

अणीक यथार्थ सनक जनक । भग्थ याज्ञवल्की शूक ।
वामदेव प्र्ऱ्हादादिक । गौतम वसिष्ठ ॥११३३॥

विश्वामित्र दुर्वास दधीची । नारदादिकाची ।
वर्तणूक तया सकळाची । भेदे भिन्न भिन्न असें ॥११३४॥

आणीक येथे ज्ञानिया आपण । प्रारब्धभोग अंगिकारुन ।
असे म्हणोन । तया कारणें ॥११३५॥

अज्ञानियासी । आणि ज्ञानियांसी ।
कवण भेद उभयांसी । असे म्हणीतले तरी ॥११३६॥

ज्ञात्याश्रोतिया प्रसंगें । वेदाध्ययनपरित्यागें ।
वेदाध्ययनसंयोगें । करूनि तयासीचि भेद ॥११३७॥

नाहीं तरी अहार । निद्राव्यापार ।
विभेद साचार । नाहीं तयांसी ॥११३८॥

तैसे अज्ञानी । अणीक ज्ञानी ।
उभयालागूनी । हृदयग्रंथी ॥११३९॥

संबध्यसंबंध्याचेनि । विभेदावाचूनी ।
भोगस्थिती विभेद नाही म्हणोनी । समता त्यासीं ॥११४०॥

अणीक येथे तत्वज्ञानें । ब्रह्मप्राप्त जालियानें ।
व्याघ्रदर्शनन्यायानें । जीवित्वासी ॥११४१॥

नास होय यथार्थे । म्हणोनि आपुलिया नासातें ।
कैसे जिवित्व प्रवर्तें । म्हणीतले तरी ॥११४२॥

इहलोकांतु देवतादिक । अभिवांछेने अनेक ।
भृग्वाग्नीगंगाप्रवेशादिक । प्रयाग वर्तत ॥११४३॥

करमरियादि पतन विचित्र । परित्यागा शरीर ।
पुरुष अंगिकार । करीत असती ॥११४४॥

तैसा प्रत्यगात्मा आपण । ब्रह्मस्वरूप निर्वाण ।
असावया कारण । जिवित्वादिक ॥११४५॥

निजज्ञाने आपण आपलिया । नाशा प्रवर्तोनियां ।
अंगिकारिलें म्हणोनियां । प्रसिद्ध जाणावें ॥११४६॥

अणीक व्यासादिकाऐसें । पाशानुग्रह जया असे ।
तोचि तत्वज्ञानी येरां नसें । म्हणीतले तरी ॥११४७॥

तें सामर्थ्य तपाचें । फळ वाचूनि तत्वज्ञानाचें ।
फळ नव्हे म्हणोनि साचें । निश्चयें जाणावें ॥११४८॥

अणीक ते तैसे जाले तरी । तत्वज्ञानातें साहकारी ।
तपस्याची साचारीं । म्हणोनि श्रुति असे ॥११४९॥

तया कारण । तपोहीनालागुन ।
कैचे तत्वज्ञान । म्हणीतले तरी ॥११५०॥

शापादीक कारण । जाले सकामतपेकरून ।
निष्काम तें होय ज्ञान । म्हणोनी परमार्थ सत्य ॥११५१॥

अणीक व्यासादिकासी परिख्यात । तत्वज्ञानसामर्थ्य ।
उभयतपसिद्धार्थ । असे म्हणीतले तरी ॥११५२॥

तयासी द्विविधतप असे । म्हणोनि ज्ञानसामर्थ्य प्रबळ असें ।
सबळवंत्त असे । विशेषे द्विविधप्रकारें ॥११५३॥

अणीक तपश्चर्या । आचरला तरि तया ।
येक सिद्धी तया । विरोध नाही ॥११५४॥

अणीक शापादिक सामर्थ्य नास्ती । तरि विधिशून्य तत्वज्ञा अति ।
क्रियानष्ट सकळ निंदिति । म्हणीतलें तरी ॥११५५॥

तया क्रियानिष्ठासि विषयरत । पामर असे निंदित ।
त्यालागि निंदास्तुति समान सत्य । संशयो नाहीं ॥११५६॥

तया विषयलंपटाचेनि । दूषण क्रियानिष्ठालागुनी ।
कवण येकि हाणी । नाहीं जैसी ॥११५७॥

ऐसे देहात्मवादी । बुद्धियुक्तक्रियासमंधी ।
नैष्ठिकाचेनि दूषणविधी । ज्ञानियासी ॥११५८॥

नाही हाणि कवण । ज्ञानासि तरी दूषण ।
लेश नाही म्हणोन । यथार्थ निश्चय ॥११५९॥

अणीक तो जीवन्मुक्त । लौकिकाऐसा विदित ।
अविदित अवस्थेआंत । असिला तरी ॥११६०॥

श्रुतअश्रुतमारुतवशें । मेघपटळीं गगनाऐसें ।
निर्मळ असें । सत्यार्थ जाणावें ॥११६१॥

अणीक अदृष्ट परिचारकें । युक्त जाला परितर्यासि विशेखें ।
शर्कराचंदनादिकें । भोग स्विकारिले तरी ॥११६२॥

निजभर्तृचेनि संगे । सुरतक्रीडानंद भोगें ।
असणे वधूसी प्रसंगे । तैसें स्वभावसिद्ध ॥११६३॥

अणीक मूढाऐसी स्थिती । कां काळाभिज्ञता ऐसी रिती ।
ना तरी मौन्यपरी अवदंति । असिला तरी ॥११६४॥

मानअपमान समता । कल्पितअकल्पिता ।
अखिल वृत्तांता । समानत्वें ॥११६५॥

द्वैतअद्वैत परिश्रुत । वाक्यवैखरी विषयाआंत ।
समानपणें असे सत्य । अचळत्वें ॥११६६॥

आणीक परस्तुती न जाणें । वहुभाषिकाऐसे आपण ।
कवण येक वोलणें । वोलिला तरी ॥११६७॥

ते गूढाभिप्राय गर्भीकृत । अक्षराऐसे शुद्ध अद्वैत ।
निष्ठा ज्ञानियाचें वचन सत्य । वेदागम अभिप्रायें ॥११६८॥

आणीक आचार्याऐसे विहित । शिष्यासी जरी उपदेशित ।
असिला तरि आत्मा नित्यमुक्त । असे तया कारण ॥११६९॥

वोध्यबोधकत्वादिक । ते माया रचनात्मक ।
म्हणोनि पूर्वक । कृतनिश्चयें वोधी ॥११७०॥

गगनमणीऐसे । गुरुत्वपण ग्रासें ।
अभिमानरहीत असें । बोलतां विशेष जाला तरी ॥११७१॥

तरि तयाचे द्वैत । भाव नासोनि अत्यंत ।
आत्माराम स्वत । जाला म्हणोनि ॥११७२॥

सुरततांत्या समयांत । जाली अतिकामासक्त ।
मैथुनवाक्याऐसे सत्य । अनाभि विषयतो ॥११७३॥

अणीक पिशाचग्रहासिविष्ट । तैसा गलगला वोलिला उद्धट ।
तरी पुनरैक्य स्वभावनिष्ठ । होय तया कारण ॥११७४॥

विरही पुरुषाचियें । गती ऐसिया न्यायें ।
अप्राप्य अनुसंधान होय । हा निश्चयार्थ ॥११७५॥

अणीक पुत्रवियोगअनुभवयुक्त । ग्राम्यजनकाऐसे विहित ।
शोकादि करित । असिला तरी ॥११७६॥

सर्वेंद्रियें ब्रह्मांश म्हणोनि । न करिता अवलंबनी ।
कल्पित साधकजनीं । अवस्थेआंतु ॥११७७॥

दंडण समस्त । इंद्रियधर्मासी करिती नित्य ।
निमित्य विषय उद्भवला सत्य । करणरस ते ॥११७८॥

अणीक विकृत बहुवेश । दर्शनत्वें विशेष ।
विनोद अतिहास्य । केले तरी ॥११७९॥

विचित्र पुण्यपापादिक । वेव्हार प्रतिपादी मिमांशिक ।
आदि दर्शनाविषई मुख्य । प्रयास करी सत्य ॥११८०॥

आणीक विराटपुरुषा । ऐसा गुह्यानंदसुखा ।
स्त्रीलंपटा होऊनि अशेखा । असिला तरी ॥११८१॥

पुनर्नैस्यस्वभावे असे नटत । म्हणोनि निजानंदभरित ।
अनुभवसुखे कृतार्थ । कैवल्य होऊनि असें ॥११८२॥

अणीक शत्रूचिया परि । कवणासी तरी ।
आपुलिया उत्तरीं । शापिले होय ॥११८३॥

तरी क्षेत्रदाहक अग्नीऐसे विशेख । विशिष्टफळ संप्राप्तीदायक ।
म्हणोनि निश्चयात्मक । विश्वासे जाणावें ॥११८४॥

यानंतरे विशेषीं । कवण येके काळीं कवण येके देशीं ।
कवण येक देहाचा अपणासीं । बाधा नसतां ॥११८५॥

सच्चिदानंदघन । ब्रह्मस्वरूपीं मग्न ।
होउनी असे सुलीन । तोचि विदेह कैवल्य म्हणवीं ॥११८६॥

आणीक ते विदेह परम । कैवल्यपद पावावया कर्म ।
तैसा अनुक्रम । म्हणीतले तरी ॥११८७॥

कवण येक मुमुक्षातें । नित्यकर्माचेनि अनुमत्तें ।
अनुष्ठानादीक सामर्थ्यें । धर्मोत्पत्ति होय ॥११८८॥

ते धर्मोत्पत्तीपासाव । पापनिवृत्ती सर्व ।
पापनिवृत्तीने स्वभाव । चित्तशुद्धी होय ॥११८९॥

ते चित्तशुद्धीकरून । संसारदोषनिदर्शन ।
संसारदोषाचे निदर्शनें । विषयविरक्ती ॥११९०॥
ते विषयविरक्तीप्रभावें । मोक्षापेक्षा उद्भवें ।
मोक्षापेक्षेने स्वभावें । बाह्यकर्मपरित्याग ॥११९१॥
बाह्यकर्मपरित्यागे अपैसें । योगाभ्यास प्रवेशें ।
योगाभ्यासाचेनि वशें । प्रत्यगात्मा अभिरती ॥११९२॥
प्रत्यगात्माअभिरतीकरून । तत्वमस्यादी लक्षण ।
कारणविवरण । विचार असो ॥११९३॥
तत्वमत्स्यादि महावाक्यविचारें । अद्वैतज्ञान लाभें साचारें ।
अद्वैतज्ञानें विशेषात्कारें । अविद्या नासें ॥११९४॥
अविद्याहरासें । द्वैतभ्रांति नष्टे अपैसें ।
द्वैतभ्रांतिनष्टाचेनि विशेषे । शुभाशुभबुद्धिपरित्याग ॥११९५॥
शुभाशुभबुद्धीचेनि । परित्यागेकरूनी ।
रागद्वेषा हाणी । समूळ होय ॥११९६॥
रागद्वेषहराशनें । जालिया विधिनिषेधनिरशनें ।
विधिनिषेधाचेनि नाशनें । पुण्यपापादिक्षय ॥११९७॥
पुण्यपापक्षयाने अती । देहभाव वांछिती ।
देहभाववांच्छेने समस्ती । पाशविमोचन ॥११९८॥
सकळ पाश । विमोचने अशेष ।
सर्वोत्कर्ष । निजवस्तू लाभे ॥११९९॥
पुनरावृत्तिरहित । सकळ शास्त्राचा गुह्यार्थ ।
अतिविशेष परम संत । अपण होय ॥१२००॥
नाम जाती क्रिया । वासने अशक्त रिघावया ।
मनोवाचा उभया । श्रुत्याचार्यप्रसादें अगोचर ॥१२०१॥
इत्यानंदस्वरूप विदेह । कैवल्य जाला म्हणोनि निश्चय ।
श्रुत्याचार्यप्रसादे होय । सिद्ध सत्य ॥१२०२॥
निजगुणाचेनि योगेश्वरें । जें साक्षात् शंभूच्या पुत्रें ।
तयाचे चरित्र अपारें । सांगीतले असें ॥१२०३॥
तयाचिये युक्तीवरीं । मी प्राकृत भाषा बोलिलो वैखरीं ।
ते प्रीति पावो सर्वेश्वरीं । श्रीशंभोनीळकंठी ॥१२०४॥

इति श्रीविवेकचिंतामणौ वेदांत सकळ शास्त्रनिर्णय
प्रथम परिच्छेदः समाप्तिमगमत् ॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥

## द्वितीय परिच्छेद

श्रीगणेशाय नमः । श्रीसच्चिदानंदाय नमः । श्रीशंभूनीळकंठाय नमः ॥

चैतन्यं शाश्वतं शांत व्योमातीतं निरंजनं ।
नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरुवे नमः ॥

इति सकळवेदशास्त्रार्थ । मुख्य निरोपिला प्राकृत ।
अधिकारि यासि क्लृप्त । होय तैसा ॥१॥

आतां परांतपरतर अति । उत्कर्षशि( व ) सिद्धांतपद्धती ।
ते निरोपीन सकळाप्रती । पढिये ऐसे ॥२॥

वरि साधकासि संप्राप्त । आनंद संतत ।
होय उदित । या शास्त्रविचारे ॥३॥

ते कैसे म्हणीतले तरी । तया सिद्धांतशास्त्राभीतरी ।
लोकासि प्रत्यक्ष फळ परि । असे म्हणौनि ॥४॥

विश्वास घटावयाकारणे । तयालागि विज्ञान ।
केवळ म्हणौन । उभय आत्मवर्गातु ॥५॥

ते ते नामध्यायने । उक्त जाले अस्तित्वपणे ।
ते कैसें किं लक्षणें । म्हणीतलें तरी ॥६॥

गारुड दक्षिण । वाम भूत म्हणऊन ।
चतुष्ट तंत्रविधान । त्याचे ठाई ॥७॥

तत्पुरुष अघोर । वामदेव सद्योजातकर ।
म्हणिजे चतुर्थ प्रकार । ब्रह्ममूर्ति उपासना ॥८॥

सर्पचिकित्सा शत्रुजयत्व । रसवाद ग्रह उच्चाटणत्व ।
तयालागूनि अस्तित्व । अनुक्रमे ॥९॥

गारुड मारणवाद । मंत्र औषध ।
इत्यादि प्रयोग सामर्थ्यसिद्ध । होऊनि असे ॥१०॥

आणीक ते विषद । सिद्धांत परिभेद ।
कवण कैसा प्रसिद्ध । म्हणीतले तरी ॥११॥

कामकागमः ॥१॥ योगजागमः ॥२॥ चिंत्यागमः ॥३॥
कारणागमः ॥४॥ अजितागमः ॥५॥ दीप्तागमः ॥६॥
सूक्ष्मागमः ॥७॥ सहस्त्रागमः ॥८॥ अंशमानागमः ॥९॥
सुप्रभेदागमः ॥१०॥ विजयागमः ॥११॥ विश्वागमः ॥१२॥
स्वयंभुवागमः ॥१३॥ अनळागम ॥१४॥ वीरागमः ॥१५॥
रौरवागमः ॥१६॥ मुगुटागमः ॥१७॥ विमळागमः ॥१८॥
चंद्रज्ञानागमः ॥१९॥ विंबागमः ॥२०॥ प्रोद्गीतागमः ॥२१॥
ललितागमः ॥२२॥ सिद्धागमः ॥२३॥ भूतागमः ॥२४॥
सर्वोत्कामागमः ॥२५॥ परमेश्वरागमः ॥२६॥ किरणागमः ॥२७॥
वातुळागमः ॥२८॥ इति अष्टविंशति दिव्यागमसख्यः ॥

पूर्वोक्त कामिकादिकरुन । सदाशिवाच्या मुखापासून ।
अनुक्रमे उत्पन्न । जाले अगम ॥१२॥

सद्योजातमुखी पंचक । वासुदेवमुखी पंचक ।
अघोरमुखी पंचक । मुखी पंचक तत्पुरुष ॥१३॥

ईशानमुख । तयापासून अष्टक ।
जनीत जालें मुख्य । त्याचे ठाई ॥१४॥

कामिकादि सुप्रभेदाआंत । दशअगमयुक्त ।
शिवभेद म्हणवीत । असती निरुते ॥१५॥

उरले परि समस्त । विजयादि वातुळांत ।
अष्टदशागम म्हणवीत । असती रुद्रभेद ॥१६॥

शिवरुद्रापासाव । अगमउद्भव ।
कैसे जाले सर्व । म्हणीतले तरी ॥१७॥

सद्योजातमुखी कामिकागम । तो प्रणव वुझिला प्रथम ।
तयांपासूनि त्रिकाळासी गम्य । तयामुखे हरासि लाभला ॥१८॥

योगजागम तो प्रथम शुद्धस्थ । तयापासूनि वहूनेम मुख्य ।
तया मुखे विशेख । विभुवे जाणीतला ॥१९॥

कारणागम तो कारणस्थानी प्रथम । त्यापासूनि सकळासि कळला धर्म ।
तयापासूनि वर्म । प्रजापती कळले ॥२०॥

चिंत्यागम तो प्रथम दीप्त । तयापासूनि योगव्हत प्राप्त ।
तयामुखे सिद्धांत । अंबिकेने जाणीतला ॥२१॥

अजितागम तो प्रथम शिव । तयापासूनि सुशिव ।
वरि तयापासाव । अच्युता प्राप्त जाला ॥२२॥

अणीक वामदेवसुखी दीप्तागम । तो ईशे ऐकिला प्रथम ।
तया पासूनि परिक्रम । त्रिमूर्ति कळले ॥२३॥

तयाचिया मुखे । हुताशने विशेषे ।
जाणीतले निके । अगमधर्म ॥२४॥

सूक्ष्मागम व्याख्यान । ते प्रथम सूक्ष्मे तया मुखे वैश्रवण ।
तयापासूनि सुप्रभंजन । बूझिला वर्म ॥२५॥

सहस्रागम तो प्रथम काळरुद्र । तरि तयापासूनि भीमरुद्र ।
तयामुखे धर्मविचारे । जाणीतला ॥२६॥

औंशमानागम तो प्रथम । अंबूपासूनि उग्रासि गम्य ।
तयामुखे अगमधर्म । औरंसा प्राप्त जाला ॥२७॥

सुप्रभेदागम तो प्रथम विचारे । अशेख ऐकिला तयासुखे विघ्नेश्वरे ।
वरि तयापासूनि अद्रे । शेषाने जाणीतला ॥२८॥

इति दशअगम शिवाख्यभेद म्हणवी ॥ आणि अघोरमुखी प्रथम विजया ।
अगम तो रुद्रे ऐकिला तयापासूनियां ।
अनादि अनादि मुखें करूनिया । परमेश्वरा कळला ॥२९॥

विश्वासागम । तो उदयाने बुझिला प्रथम ।
तया मुखे तद्धर्म । गिरिजेने जाणीतला ॥३०॥

स्वयंभू अगम । तो निधनेषु बुझिला प्रथम ।
तया मुखे सप्रेम । स्वयंभू लाभले ॥३१॥

अनळागम । तो प्रथम बुझिला व्योम ।
तयापासूनि अगमधर्म । हुताशने जाणीतला ॥३२॥

वीरागम तो विशेष । प्रथम बुझिला तेजस ।
वरि तयामुखें सौरस । प्रजापती लाभला ॥३३॥

आणीक तत्पुरुषमुखी । रौरवागम तो प्रथम विशेखी ।
ब्रह्मणेश तयापासूनि शेखी । नंदीश्वरे जाणीतला ॥३४॥

मुगुटगम्य तो मुखे । प्रथम बुझिला शशांक ।
तयापासूनि विशेख । महादेव लाभला ॥३५॥

विमळागम तो श्रद्धापूर्वक । प्रथम ऐकिला सर्वात्मके ।
वरी तयाचिया मुखे । वीरभद्रे जाणीतला ॥३६॥

चंद्रज्ञानागम । तो अनंते ऐकिला प्रथम ।
तयापासूनि परिक्रम । बृहस्पतीने जाणीतला ॥३७॥

बिंबागम तो प्रथम । प्रशांते बुझिला तद्धर्म ।
परितया मुखे परिक्रम । दधीचीने जाणीतला ॥३८॥

आणि ईशानमुखी प्रोद्गीतागम । तो शिवलीने ऐकिला प्रथम ।
वरि तया मुखे तद्धर्म । कवचाख्या लाभला ॥३९॥

ललितागमातें । प्रथम लय बुझिला निरुते ।
वरि तया मुखे ललिते । जागीतला ॥४०॥

सिद्धागम तो शताभारे । प्रथम ऐकिला इंद्रे ।
वरि तयापासूनि चंडेश्वरे । जाणीतला ॥४१॥

संतानागम तो संचला । प्रथम वशिष्ठे ऐकिला ।
वरि तयापासूनि जाणीतला । सौपायने ॥४२॥

सर्वोक्तागम तो प्रथम । बुझला अपण सोम ।
वरि तया मुखे तद्धर्म । नारसिंहे जाणीतला ॥४३॥

परमेश्वरागम तो आदरे । प्रथम ऐकिला परमेश्वरे ।
वरि तयापासूनि विचारे । देवीने जाणीतला ॥४४॥

किराणागम तो यथा । प्रथम बुझिला देवसखापिता ।
वरि तयापासूनि सर्वथा । सर्वार्थके जाणीतला ॥४५॥

वातुळागम तो संचारला । प्रथम शिवरुद्रे ऐकिला ।
वरि तयापासूनि महाकाळा । प्राप्ति जाला ॥४६॥

इति अष्टदशअगम अष्टदश रुद्रभेद म्हणवी ।
अणीक अष्टविंशति अगम मुख्य । सर्व येकत्र ग्रंथीसंख्य ।
द्विशंख पद्म येक । येकार्बुद ॥४७॥

कोटि नवदश । लक्ष अडतीस
सहस्रचवेताळीस । संख्या होउनी असे ॥४८॥

अणीक येकशे । शाण्णव भेद होउनी असे ।
ते कवण कैसे । म्हणीतले तरी ॥४९॥

उत्तर भैरवोत्तर । नारसिंह म्हणिजे त्रिप्रकार ।
कामिकागमाचा विषधाकार । भेदत्रय ॥५०॥

वीणाशिखोत्तर तारातंत्र सौत्यागम । आणी संतानागम ।
आत्मयोग म्हणौनि योगजागम । तयाचे पंचभेद ॥५१॥

सुचिंत्यागम सुभगागम । वामतंत्र पापनाशक सारोद्भव अमृतागम ।
म्हणउनि चित्त्वागम । तयाचे षट्‌भेद ॥५२॥

कारणतंत्र । यावजतंत्र ।
दौर्घ्यतंत्र । महेंद्रतंत्र हे ॥५३॥

भिमतंत्र मारणतंत्र । भेदांत कारणतंत्र ईशान्यतंत्र ।
म्हणोनि सप्तप्रकार । कारणागमाचा भेद ॥५४॥

प्रभूतागम परोद्भूतागम । तथा पार्वतीतंत्र पद्मागम ।
सहिता म्हणऊनि अजितागम । अगमाचे चतुर्थभेद ॥५५॥

अहीअगम अप्रमत्तागम । आशागम आख्यागम ।
अप्रीतौजसागम । आनंदागम तो ॥५६॥

मध्वोद्भूतागम । अद्भूतागम अमृतागम ।
म्हणोनि दीप्तागम । तयाचे नवभेद ॥५७॥

सूक्ष्मसंहिता । म्हणोनि ग्रंथा ।
सूक्ष्मांगाचा निरुता । येक भेद ॥५८॥

जितागम अमळागम । शुद्धागम अप्रमेयागम ।
जातिमानागम । प्रबुद्धागमादि ॥५९॥

विबुधागम हस्तागम । अळंकारागम सुबोधागम ।
म्हणोनि सहस्त्रागम । तयाचे दशभेद ॥६०॥

विद्यापुराण भास्वरागम नीललोहिततंत्र । प्रकर्णागम भूततंत्र ।
आत्माळंकार । कश्यपागम गौतमागमः ॥६१॥

महेंद्रागम ब्रह्मागम । ईशान्योत्तर वशिष्टागम ।
म्हणौनि अंशमानागम । तयाचे द्वादशभेद ॥६२॥

विजयतंत्र उद्भवतंत्र । सौम्यतंत्र अघोरतंत्र ।
मृत्युनासतंत्र । कुबेरतंत्रादि ॥६३॥

विमळतंत्र । महाघोरतंत्र ।
म्हणोनि अष्टप्रकार । विजयागमाचे भेद ॥६४॥

आणि निश्वास । उत्तराजिज्ञास ।
निश्वासमुखोदय निश्वास । नयनादि ॥६५॥

निश्वासकारक । घोरसंहिता सुसौख्य ।
गुह्य म्हणौनि मुख्य । निश्वासागर्माचे अष्टमेद ॥६६॥

स्वयंभूत । प्रज्ञाप्रतिमंत ।
पद्मतंत्र म्हणौनि युक्त । स्वयंभू अगमाचे त्रिभेद ॥६७॥

अग्निध म्हणऊन । अनिळअगमालागून ।
असे कारण । येक भेद ॥६८॥

ईश्वरतंत्र प्रस्फुरतंत्र । प्रबोधतंत्र बोधतंत्र ।
बोधकातंत्र । अमोहतंत्रादि ॥६९॥

मोहसमयतंत्र । संकटतंत्र ।
साकटीयतंत्र । हळतंत्रादि ॥७०॥

नीळेश्वरतंत्र भद्रतंत्र । वीरतंत्र ।
म्हणऊनी त्रयतंत्र । त्रयोदशप्रकारे वीरागमाचे भेद ॥७१॥

काळदाहागम रौरवोत्तर कौमारागम । काळ महाकाळ इंद्रागम ।
म्हणौनि रौरवागम । तयाचे षट्भेद ॥७२॥

मुकुट मुकुटोत्तर । म्हणऊनि विभेदाकार ।
उभय प्रकार । मुकुटागमाचे भेद ॥७३॥

अनंतभोगागम । आक्रांतागम ।
हृदयासागम । अविकृतागमादि ॥७४॥

अद्भूतागम । मारणतंत्रवर्म ।
म्हणौनि विमळागम । तयाचे षट्भेद ॥७५॥

स्थीरसंहिता स्थानसंहिता । महासंहिता नदीसंहिता ।
नंदिकेश्वरसंहिता । येकपादपुराण ॥७६॥

शंकरागम वीरभद्रतंत्र शिवभद्रागम । काळभेदागम ।
श्रीमुखागम । शिवशासनागमादि ॥७७॥

शिवसस्वरागम । देवीमतागम म्हणऊनि ।
चंद्रज्ञानागम । तयाचे चतुर्दशभेद ॥७८॥

चतुर्मुखातंत्र । वर्गशेखर मलयतंत्र ।
महायोगसार । स्वस्थवागम ॥७९॥

प्रतिबिंबागम । अर्घाळंकार
वायुतंत्र कौमुदीतंत्र । कुतुटिनीकर । तुळावृत्त ॥८०॥

तुळायोग कुटिमतंत्र । वर्गशेखर महाविद्या महासुर ।
म्हणौनि पंचदशप्रकार । बिंबागमाचे भेद ॥८१॥

क्रौंचागम वहतंत्र । पिंगळामत्त पाशबंधसहित ।
दंडधारतंत्र कुशातंत्र । धनुर्धारिणी ॥८२॥

शिवज्ञान । आणि विज्ञान ।
त्रिकाळज्ञान । आयुर्वेद ॥८३॥

धनुर्वेद सर्वदोष्ठाविभेद । संगिता भरत अतोद्य ।
म्हणोनि षोडशभेद । प्रोद्गीतागमाचे ॥८४॥

ललित ललित्तोत्तर । कौमारीतंत्र विघ्नेश्वर ।
अगम म्हणौनि चतुर्थप्रकार । ललितागमाचे भेद ॥८५॥

शागोत्तर दैविशोक्त शाळाभेद । शशिमंडळ म्हणोनि विषद ।
चतुर्विधभेद । सिद्धागमासी ॥८६॥

लिंगाध्यक्ष सुराध्यक्ष शंकरतंत्र । महेश्वरागम असंख्यतंत्र ।
अनळागम द्वंद्वागम म्हणौनि सप्तप्रकार । संतानागमाचे भेद ॥८७॥

मातांगतंत्र यक्षिणीशास्त्र । पद्मा सुप्रयोग पौष्कर ।
हंसागम सामान्यागम म्हणौनि परमेश्वर । अगमाचे सप्तभेद ॥८८॥

गारुडागम नैऋत्यागम । नीळतंत्र सूक्ष्मागम ।
आणि भानागम । वैक्रमागमादि ॥८९॥

काळतंत्र वुधागम । प्रवुद्धारअगम ।
म्हणौनि किरणागम । तयाचे नवभेद ॥९०॥

आणीक वातुळ । उतवातुळ ।
काळज्ञान प्रवळ । प्रळोचिता ॥९१॥

सर्वागम सर्वष्टागम । आणी श्रेष्टागम ।
नित्यागम । श्रद्धागमादि ॥९२॥

महानागांकागम । विश्वात्मागम ।
म्हणौनि वातुळागम । तयाचे द्वादशभेद ॥९३॥

सर्वागमातु क्रियापाद । चर्यापाद योगपाद ।
आणि ज्ञानपाद । म्हणौनि चतुर्थपाद हे ॥९४॥

पति कुंडलिनी माया । पशु पाश दीक्षा म्हणौनियां ।
षट्पदार्थनिर्णय गुरुचिया । मुखे होय तें ज्ञान म्हणवी ॥९५॥

प्रत्यक्षादिपदार्थरूप म्हणवी ज्ञान । लिंगार्चन लक्षण म्हणवी अनुष्ठान ।
भस्मधारणात्मक आपण । अधिकृत्य म्हणवी ॥९६॥

शिवमंत्ररूप तें म्हणवी साधन । आणी शिवसामान ।
मुक्तरूप सलक्षण । ते साध्य म्हणवी ॥९७॥

इति षट्पदार्थ प्रतिपाद्य म्हणिजे त्याचे ठाई । प्रथम क्रियापादांतं विषयत्व ।
आत्म्याचे पशुत्व क्षयत्व शिवत्व । अभिव्यक्ति ॥९८॥

नित्यादीक कारण । कर्मअधिकारत्वनिपुण ।
ते अधिकारसंपन्न । लक्षण म्हणवी ॥९९॥

शिवक्रियाशक्तिरूप ते । दीक्षा म्हणवी निरुते ।
ते दीक्षाविशेषयुक्ते जाले शैव ते । कवण म्हणीतले तरी ॥१००॥

अनादिशैव आदिशैव । आणि महाशैव ।
अनुभवशैव । अवतारशैवादि ॥१०१॥

प्रवरशैव । आणि अंतरशैव ।
म्हणीजे सप्तशैव । त्याचे ठाई ॥१०२॥

शिव तो अनादिशैव । शिवाच्या पंचमुखापासाव ।
दीक्षीत जाले कौशिकादि ऋषी सर्व । ते आदिशैव म्हणविती ॥१०३॥

ते ऋषिवंशदीक्षित । जाले परविख्यात ।
द्विजकुळ समस्त । ते महाशैव ॥१०४॥

शिवसंस्कारी मानव । क्षेत्री ते अनुभवशैव ।
शैवदीक्षासंपन्न शूद्र सर्व । ते अवतारशैव म्हणवी ॥१०५॥

शिवदीक्षायुक्त । जाले कृतनिश्चयव्रत ।
अंवष्टकुल्लाळादि समस्त । ते म्हणविती यथार्थ अंतरशैव ॥१०६॥

शिवदीक्षान्वित । जाले विशेष जाति समस्त ।
ते म्हणविती यथार्थ । प्रवरशैव ॥१०७॥

अणीक तया शैवाआंत । वाम दक्षिण मिश्र सिद्धांत ।
म्हणऊनिया चतुर्थ । प्रकार होऊनि असे ॥१०८॥

त्याचे ठाई शक्तितत्पर ते । वाम म्हणवी निरुते ।
भैरवतत्परे । दक्षिण म्हणवीति ॥१०९॥

सप्तमातृकासप्तस्वर । ते मिश्र म्हणविती साचार ।
परशिवतत्पर । ते सिद्धांत म्हणविती ॥११०॥

अणीक हिया समस्त । शैवाचे ठाई युक्त ।
मुख्य जाले कृत्य । निश्चयशैव ॥१११॥

सामान्यशैव मिश्रशैव । शुद्धशैव वीरशैव ।
म्हणोनि चतुर्विध शैव । त्याचे ठाई ॥११२॥

कोणी येक श्रीमद्विभूतिधारण । मात्रे शुद्धात्मा होऊन ।
स्वयंभुलिंग ना तरी आन । देवदानव ॥११३॥

ऋषीमानवादिक । प्रतिष्टालिंग प्रत्यक्ष ।
देखता नमस्कारपूर्वक । प्रदक्षिणेसि ॥११४॥

पूजाविधान करी यथाशक्ती । शिवभक्तजनासी अतिप्रीति ।
शिवावधानरती । शिवार्चना ॥११५॥

शिवार्थव्यापार । शिवकथाश्रवण इष्टादर ।
शिवध्यानतत्पर । शिवानुकूल होऊनी ॥११६॥

परम सात्विके संतत । अष्टविधभक्तियुक्त ।
होऊनि असे रत । तो सामान्यशैव म्हणवी ॥११७॥

आणीक पीठाचेनि शिवलिंगपूजन । विष्णु उमा षण्मुख ।
विघ्नेश्वर सूर्य इत्यादि मुख्य । पंचायतनपूजा ॥११८॥

ब्रह्मइंद्रादि देवताआराधन । ते ते मंत्रजपध्यान ।
शिव सर्वात्मक म्हणौन । समताबुद्धि ॥११९॥

सकळ देवता विष्णु आदिकरून । भावना शिवभक्त म्हणौन ।
असे समान भक्तियुक्त होऊन । तो मिश्रशैव म्हणवी ॥१२०॥

अणीक जो अनादिशैव । अपण सदाशिव ।
तयाच्या पंचमुखापासाव । दीक्षीत जाले ॥१२१॥

कौशीक कश्यप भारद्वाज मुनी । अत्रीगौतमादिकरुनी ।
शैवगोत्र संभव होउनी । जे महाशैव म्हणविती ॥१२२॥

तेचि शुद्धशैव वेदागमपुराण । इतिहाससूत्रभाष्यादिकरून ।
सकळशास्त्रसंपन्न । युक्त होऊनी ॥१२३॥

सूळ सूक्ष्म कारण । म्हणिजे शिवलक्षण ।
शुद्ध मिश्र संकीर्ण । म्हणिजे शिवस्वरूप ॥१२४॥

शिवआकर्षणादि मुख्य । सकळ देवताआकर्षणादिक ।
लिंगप्रतिष्ठा सकळीक । देवप्रतिष्ठा ॥१२५॥

लिंगस्थापनादि सर्व । देवतास्थापना नित्योत्सव ।
मासोत्सव रथोत्सव । इत्यादि सत्क्रियायुक्त ॥१२६॥

पुष्प गंध मधु युक्षुप मेळऊन । नारिकेळी क्षर रजनीचूर्ण ।
सर्पि तैल जळ वन । आदिकरून ॥१२७॥

शिवाचे येकदशक । विधि उत्साह सकळ सांगिक ।
विचारे शिवार्चनीक । तत्पर सर्वदा ॥१२८॥

अणीक येथे सूर्याचंने अरोग्य । इंद्रार्चने सौभाग्य ।
अग्निअर्चने ऐश्वर्यभोग । यमार्चने पितृयान ॥१२९॥

वायुअर्चन बळ होय । दुर्गार्चने विजय ।
सरस्वतीअर्चने निश्चय । वाचासिद्धि ॥१३०॥

लक्ष्मीअर्चने संपदावृद्धि । षण्मुखअर्चने इष्टसिद्धी ।
चंद्रार्चने चित्तशुद्धी । कीर्ति प्रवळ ॥१३१॥

ब्रह्मार्चने ब्राह्मण । शांति आदि सद्गुण ।
विष्णुअर्चने देवायन । मुमुक्षत्व ॥१३२॥

विघ्नेश्वरअर्चने कार्यसिद्धि । गुरुभक्तिविषयी वृद्धी ।
श्रीगुरुअर्चने श्रवणादि । ज्ञानसाधन ॥१३३॥

श्रीपार्वत्यार्चने संपदादि विवेक । श्रीशिवार्चने अनेक ।
भोगज्ञानमोक्षादि मुख्य । सकळ सिद्धी ॥१३४॥

सकाम निष्काम क्रिया । भेदेकरूनिया ।
सिद्धि होय म्हणउनिया । निश्चये जाणावे ॥१३५॥

अणीक ते समस्त शैवक्रियेसि कारण । श्री मद्विभूतिधारण ।
मुख्य असे तद्विधान । येक शुद्धशैव जाणावे ॥१३६॥

सद्योजातादि ब्रह्मपंचक । पृथ्वीआदि भूतपंचक ।
निवृत्तिआदि कळापंचक । अनुक्रमे ॥१३७॥

नंदि ते कपिलवर्ण । भद्री ते कृष्ण सुरभी ते रक्तवर्ण ।
सुशील श्वेतवर्णविचित्र सुमन । म्हणऊनी परिक्षुनी ॥१३८॥

कृषांगादि दोषरहित । सकळलक्षणयुक्त ।
पंचगौपासाव जनित । जाले ते ॥१३९॥

निर्मळ गोमय दुर्गंधादिक । दोषविरहित पूर्वक ।
गोमय मुख्य । आणूनीया ॥१४०॥

प्रणवपूर्वक । सद्योजातादि पंचक ।
ब्रह्ममंत्रे विशेख । अनुक्रमे ॥१४१॥

ग्रहाण कवलन । शोषण दाहन ।
शोधन म्हणऊन । पंचक्रियेने ॥१४२॥

विभूति भूति । भस्मीत भस्म रक्षा म्हणऊन इति ।
पंचविध विभूति । क्रमे ऊदीत जाली ॥१४३॥

ते कारण शैव सर्व ऐश्वर्याते । सर्वावभासकत्वाते ।
सर्व अवघ्याते । भक्षणत्वासी ॥१४४॥

अपद्गारक्षणत्वासी । भूतप्रेत विध्वंसी ।
भीतरक्षणत्वासी । ते ते नाम प्रकटले ॥१४५॥

सकळ जगात । तयासि हितार्थ ।
होऊनि असे सर्व भसित । तरी येथे ॥१४६॥

कल्प अनुकल्प । उपकल्प अकल्प ।
म्हणौनि चतुर्विध प्रतिरूप । असे त्याचे ठाई ॥१४७॥

ब्राह्मण क्षत्री वैश्य इती । त्रय वर्गासि सन्मत्तयुक्ती ।
अग्निहोत्रज विभूति । योग्य होउनी असे ॥१४८॥

ग्रहस्ताश्रमयाते । विराजेनळाग्नीजपासनाग्नीने निरुते ।
उदीत जाले भस्म ते । योग्य असे ॥१४९॥

ब्रह्मचर्यासि विहित । संमिताग्नीने उदित ।
जाले भसित । योग्य असे ॥१५०॥

शूद्रासि श्रोत्रियाचे । गार्हपत्य पंचाग्नीचे ।
उदीत जाले भस्म साचे । योग्य असे ॥१५१॥

उरलीया समस्त जाती । शुद्धाग्नीने उदिती ।
जाले भसिती । योग्य असे ॥१५२॥

यतीसि सकळा ठाईचे । भस्म योग्य असे साचे ।
अंत्याश्रमियासि स्मशानीचे । भस्म योग्य असे ॥१५३॥

आणीक ते विभूतिलागूनि । स्नानउद्धूळणी ।
धारण म्हणौनी । त्रिविधीने अचरावे ॥१५४॥

लोकमात्र समस्ता । तयासि विहिता ।
शिवाल्याच्या भसिता । योग्य असे ॥१५५॥

प्रथम हस्तपादमुख । करूनि प्रक्षाळणादिक ।
शुचिस्थानी स्वस्थानी पूर्वक । बैसोनिया ॥१५६॥

प्राणायामंत्रय करून । वरि भस्मस्नान ।
करितो म्हणऊन । संकल्पावे ॥१५७॥

वरि दृढरूप विल्वच्युत । अशोकशीळवस्त्ररचित ।
आधारी आत सुस्थित । होऊनि असे ॥१५८॥

तो श्रीमद्विभूति । कुरंगमुद्रायुक्ती ।
सद्योजातादि पंचब्रह्ममूर्ति । मंत्रपूर्वके काढिजे ॥१५९॥

वरि वामहस्ती घेऊनी । नमस्कार मंत्र उच्चारूनी ।
मग तयावरी अच्छादुनी । दक्षिणकर ॥१६०॥

दक्षिण मांडीवरी ठेऊनी । मूळमंत्रे सप्तवेळा मंत्रुनी ।
ना तरि अग्निरितिभस्म म्हणौनि । या मंत्रे मंत्रिजे ॥१६१॥

मग मानस्तोकेति मंत्र । उचलूनिया शिरमुख ।
हृदयगुह्यपाद सर्वांगैक । म्हणिजे हिया षडस्थानी ॥१६२॥

ते ते मंत्रानुसंधान । करीत उच्चारण ।
अनुक्रमे ईशानादि कारण । पंचब्रह्मप्रणवमंत्रे ॥१६३॥

सृष्टिस्थितिसंहार परि । क्रमे जाणूनि मंत्राभीतरी ।
संप्रोक्षण करूनि द्यावे वरि । ते स्नान म्हणवी ॥१६४॥

अणीकशिरसादिकरूनी । षोडशस्थान स्थानी ।
ते ते मंत्र उच्चारुनी । अनुक्रमे ॥१६५॥

पंचवेळा चतुर्थवेळा । अष्टवेळा त्रयोदशवेळा ।
पुनः अष्टवेळा येकवेळा । अभिमंत्रावे ॥१६६॥

अनुलेपन करणे । इही लक्षण ।
उद्धूळण । म्हणवी निरुते ॥१६७॥

अणीक येथे । ब्राह्मणाते ।
चतुर्थाश्रमीयाते । सर्वांग उद्धूलन योग्य ॥१६८॥

क्षेत्रियालागूनी । मुख मात्र सोडुनी ।
सर्वांगस्थानी । उद्धूलन योग्य ॥१६९॥

वैश्यासि ललाट मात्र । उद्धूलन करू ये साचार ।
शूद्रासि धारण मात्र । करावया योग्य ॥१७०॥

अणीक सुशीतळ मंत्रोदक । मिश्रित केलिया विभूतिसि मुख्य ।
मूळ मंत्र त्रियायुष त्र्यंबक । मंत्रे उच्चारूनी ॥१७१॥

शिवमूर्तिध्यानयुक्त होऊन । करावे त्रिपुंड्रधारण ।
तिये स्थानी कवण कवण । म्हणीतले तरी ॥१७२॥

मूर्धनि ललाट कर्णद्वय । नेत्रद्वय घ्राण मुख बाहुद्वय ।
भुजाद्वय मणिबंधद्वय । स्थानद्वय ॥१७३॥

व उदर पार्श्वद्वय । नाभि भेद पायु पृष्ठि उदरद्वय ।
जानुद्वय जंघद्वय । इति छतीस स्थाने ॥१७४॥

आणि शिरस भाळ कर्णयुग्म । अणीक वोष्ट्रयुग्म ।
कंठयुग्म बाहुयुग्म । भुजायुग्म ॥१७५॥

मणिबंधद्वय हृदय । अपर नाभि इती हिय ।
म्हणविती निश्चय । षोडश स्थाने ॥१७६॥

अणीक मस्तक ललाट ग्रीव स्थळ । बाहुद्वय हृदय नाभिकमळ ।
पृष्ठी म्हणिजे अष्ट कुळ । स्थान म्हणवी ॥१७७॥

त्याचे ठाई । शिरस ललाट श्रोत्रद्वय कंठ । भुजाद्वय वक्ष पृष्ठ ।
नाभि स्कंद इति येकादश श्रेष्ठ । स्थाने मुख्य होऊनि असती ॥१७८॥

त्याचे ठाई । शीतपद्मासन शुद्ध । स्फटिक संन्निभ कंदर्प ।
चंद्रकळा प्रसन्नवदन मोदनीळग्रीवा ॥१७९॥

क्षौमांवर सर्पाभरण । श्रृंगीटिंकपराभयपाण ।
होऊनि सकळ लक्षण संपूर्ण । यथायुक्त ॥१८०॥

परमात्मा शिवमहेश्वर । रुद्र श्रीकंठ नाभीश्वर ।
महादेव पशुपती शंकर । वृषभध्वज रुद्र म्हणिजे ॥१८१॥

शिरसादि येकादश स्थान । तेथे अनुक्रमे स्मरोन ।
करावे त्रिपुंड्रधारण । हे विभूतिधारण म्हणवी ॥१८२॥

अणीक तया ललाटी कारण । त्रिपुंड्रधारण ।
करावया लक्षण । विहीत ते कैसे ॥१८३॥

दक्षणकराची मध्यमानामिक । अंगुष्ठ म्हणिजे मुख्य ।
सिद्धांत अगुलित्रयाने पूर्वक । अलोमविलोम धरावे ॥१८४॥

यावरी अनामिका ते अकार । मध्यमा ते उकार ।
तर्जनी ते मकार । म्हणऊनि हिया ॥१८५॥

भावे निःसंदेह । मध्यमा अंगुळित्रय ।
संयोगे कृतनिश्चय । अवश्य वरावे ॥१८६॥

अग्नित्रय अक्षरत्रय । गुणत्रय लोकत्रय ।
आत्मत्रय वेदत्रय । सकळत्रय हें ॥१८७॥

रुद्र ईश्वर सदाशिव । म्हणिजे देव ।
त्रयात्मक सर्व । म्हणऊनिया ॥१८८॥

अनुसंधान । पूर्वक होऊन ।
त्रिरेखा षडंगुळ प्रमाण । समता रूपे ॥१८९॥

नेत्रयुग्म प्रमाण । नितीने स्थितीने ।
करावे धारण । ललाटाआतु ॥१९०॥

तरि ते कठिण मळीन वक्र । छिन्न विजातीमिश्र ।
अशुद्ध म्हणिजे षट्प्रकार । दोषरहित ॥१९१॥

नयन शुभ्र समान । साई समीप भिन्न ।
म्हणिजे षट्लक्षण । युक्त धरावे येथ ॥१९२॥

ब्राह्मणासि षडांगुळप्रमाण । क्षेत्रियासि चतुरांगुळ जाण ।
वैश्यासि द्विअंगुळप्रमाण । शूद्रासि येकांगुळप्रमाण जे ॥१९३॥

या विचारे ये रिती । धारणक्रम स्थिती ।
ते निरुती विभूति । धारण म्हणवी ॥१९४॥

आणीक येक येथे । ग्रहस्तासि स्त्रियेते ।
त्रिकाळ जळमिश्रिते । विभूति धरू ये ॥१९५॥

इतरासि सर्वकाळ । मिश्रित रहितजळ ।
विभूतिधारणा केवळ । करावया योग्य ॥१९६॥

वानप्रस्थ कुमारादि दीक्षासहित । तयासि मध्यान्हपर्यंत ।
उदकमिश्रित । करूनि धरूंये ॥१९७॥

अस्तमानपर्यंत उपरांति । प्रयोजन प्रीती ।
प्रयोजन प्रीति । महानिशीची विभूती धरावया योग्य ॥१९८॥

अणीक इतुके स्थान । उद्धूळण धारण ।
अनुक्रमेकरून । विधियुक्त मार्गे ॥१९९॥
श्रीमद्विभूतिधारण । ते शिरोव्रत म्हणऊन ।
पाशुपतव्रत म्हणोन । नाम पढोनि असे ॥२००॥
दोषरागादिक । सर्वासि निवृत्तिकारण येक ।
अंति भोग मोक्षप्रदायक । होऊनि असे ॥२०१॥

म्हणौनि वेदागमपुराणी । असे प्रसिद्ध होऊनी ।
तयाकारण जनी । सकळ लोक ॥२०२॥

मनूमनी देवता सकळ । विभूति विशिष्ट केवळ ।
म्हणौनी सर्वजनी सर्वकाळ । केले धारण ॥२०३॥

सकळरक्षणार्थ । मंगळशुभार्थ ।
पवित्रार्थ शिवार्थ । कारणत्वे ॥२०४॥

ब्राह्मणादि वर्ण सकळ । ब्रह्मचर्यादि अश्रम अखिळ ।
सांख्यादि मत्ताभिमानी केवळ । सर्वथा सर्व ॥२०५॥

श्रद्धापूर्वक प्रीति । श्रीमद्विभूती ।
धारण जे करीती । हा विश्वासु सत्य ॥२०६॥

अणीक इति भसित । धारणानंतरे विहित ।
रुद्राक्षधारणा सत्य । कर्तव्य होऊनि असे ॥२०७॥

तया कारण । शुद्धशैवें आपण ।
निपुणतद्विधान । जाणावे येथे ॥२०८॥

त्रिपुर दाहोनि लीलासमई । ईश्वराचे चंद्रार्काग्निरूपनेत्रत्रयि ।
जळबिंदूचे ठाई । प्रगटले अनुक्रमे ॥२०९॥

शुभ्रवर्ण जाहला षोडशविध । रक्तवर्ण जाहला द्वादशविध ।
कृष्णवर्ण जाहला द्वादशविध । इति रुद्राक्षक्रम ॥२१०॥

तयाचे नामोच्चारण । दर्शन स्पर्शन धारण ।
मंत्रे उत्तरोत्तर अधिक पुण्य । फळद येक म्हणवीतसे ॥२११॥

सकळ लोकासि हित । उपहारानिमित्य ।
रुद्राक्ष जाले जनित । त्याचे ठाई ॥२१२॥

माळ करावया परिक्षक । न्यूनस्थान ते पृष्ठ नवस्थान ते मुख ।
येथे मुखगणना जाणावी रेख । तेचि मुख मणीसि ॥२१३॥

मूळ ब्रह्मा विष्णू नाळ । मुख्य रुद्र क्षेत्र सकळ ।
देवतासंमेळ । म्हणौनि निरक्षुनी ॥२१४॥

लक्षण परिक्षूनी । वरी प्रक्षाळण विधीने मळिका करून ।
मग करूनिया स्नान । शुचि असनी बैसोनिया ॥२१५॥

समस्त पापक्षयार्थें । शिवज्ञानसिध्यर्थें ।
धरितो म्हणौनि सत्यार्थें । संकल्पाने ॥२१६॥

मग शिखास्थानी येक मुख । मणी धरावया येक ।
शिरसी द्विमुख । मणी तथा ॥२१७॥

त्रिमुख दशमुख । एकादशमुख ।
मणी बत्तीसमुख । धारण करावे ॥२१८॥

कर्णासि पंचका सप्तक । देश ना तरी येक येक ।
अथवा षट्कषट्क । कुंडले करावे ॥२१९॥

कंठी अष्टमुखमणी बत्तिस । उरी चतुर्दशमुखमणी पन्नास ।
बाहुद्वयासि त्रयोदश । मुखमणी षोडशादि ॥२२०॥

मणिबंधयुग्मासि नवमुख । मणि द्वादशक द्वादशक ।
यज्ञोपवीतासि चतुर्दशमुख । मणि अष्टोत्तरशत्त ॥२२१॥

उदरबंधासि हर येक । मुखमणी पन्नासवरी चतुष्क ।
या क्रमे मणी पूर्वक । धारण करावे ॥२२२॥

जरि न साधती मणि क्रमेंकरुनी । तरी हे येकमुखाचे मणी ।
तेथ तेथ स्थानस्थानी । अवश्य करावे ॥२२३॥

अणीक येथे येकमुख । मणी तो परशिव प्रत्यक्ष ।
वासुकी ब्रह्महत्यादि पातक । सर्वसिद्धिप्रद ॥२२४॥

द्विमुखमणी आपण । तो ईश्वर ईशान ।
गोहत्यादि महादारुण । पातक निवारी ॥२२५॥

त्रितियमुखमणी । तो साक्षांत अग्नी ।
स्त्रीहत्येलागुनी । परिहार करी ॥२२६॥

चतुर्थमुख । मणी तो प्रत्यक्ष ।
पुरुषहत्यादिक । पातक निवारी ॥२२७॥

पंचमुखमणी सर्वथैव । अपण सदाशिव ।
अभक्षभक्षणादीक सर्व । दोष निवारी ॥२२८॥

षण्मुखमणी तो षण्मुख । ब्रह्महत्यादीक ।
अखिळ पातक । निवारी निरुते ॥२२९॥

सप्तमुख तो अनंत । गोहत्यादीक समस्त ।
व्याधिदुःख क्लेशदुःख होत । क्षय करी ॥२३०॥

अष्टमुखमणी तो विघ्नेश्वर । भस्म करूनि पापडोंगर ।
निवारुनी विघ्नभार । परमपददायकु ॥२३१॥

नवमुखमणी तो भैरव । सकल कल्मषभव ।
निवारुनी सुखदुःखानुभव । भक्तिमुक्तिदायकु ॥२३२॥

दशमुखमणी तो माधव आपण । भूतवेताळ मारी गण ।
ब्रह्मराक्षस पन्नगादिकरुन । भय निवारी ॥२३३॥

येकादश मुख । मणी तो येकादश रुद्र मुख्य ।
अश्वमेधादीक । पुण्यदायक फळप्रद ॥२३४॥

द्वादशमुख । मणी तो द्वादशादित्य प्रत्यक्ष ।
अग्नि ( चोर ) व्याघ्र खड्गादिक । दिग्बंध निवारी ॥२३५॥

वेव्हारीक सिद्धी । नानारत्न सुवर्णादि ।
सकळ पळ समृद्धि । साध्य करी ॥२३६॥

त्रयोदशमुख । मणी तो महेश्वरकारक ।
मातृपितृहत्यादिक । दुष्कृत्य निवारी ॥२३७॥

रसरसायणवाद । वश्यआकर्षणादि साध्य ।
सकळप्राप्ती इच्छापद । फळदायक तो ॥२३८॥

चतुर्दशमुख । मणी तो मनु प्रत्यक्ष ।
सर्वदेवतापूज्य दायक । म्हणोनि जाणावे ॥२३९॥

येकमुखमणी आदिकरुनी । चतुर्दशमुखमणी ।
तया सकळालागुनी । मंत्र अनुक्रमे ॥२४०॥
ओंऱ्हां. लां. ओंऱ्हीं. हं. ऱ्हौं. श्रीं ह्रू. मं. वं. क्षें. क्षें ऊं ॥ इति ॥
म्हणऊनिया मुख्य । हिया अनुक्रमे पूर्वक ।
मंत्रसंयोगे रुद्राक्ष । धरावे स्थानस्थानी ॥२४१॥

ब्राह्मणा सकळासि संध्यावंदन । क्रियेचे ठाई रुद्राक्षधारण ।
सर्वदा असे म्हणऊन । निश्चयसिद्ध ॥२४२॥

इति भसितरुद्राक्षधारण । नैष्ठिक जालिया शुद्धशैवे कारण ।
पंचाक्षरादीक मंत्रजपविधान । जाणावे येथे ॥२४३॥

प्रथम सिद्ध । साध्य सुसिद्ध ।
अरी म्हणऊनी प्रसिद्ध । मंत्रसिद्धीसी सुचना म्हणवी ॥२४४॥

मातृकाचक्रोद्धारण । कूर्मचक्रोद्धारण ।
सर्वमंत्रात्मक लिंगोद्धारण । म्हणौनिया ॥२४५॥

मंत्रजननस्थान । महाचक्रोध्दारण ।
मंत्रार्चनादिकारण । यत्रोद्धारणादि ॥२४६॥

मंत्रअनुसंधान । आश्रयो जाले घटोद्धारण ।
इति यथालक्षण । परिक्षुनी ॥२४७॥

अणीक पंचाक्षरीमंत्रचक्रोद्धारण शुद्धप्रसाद ।
मूळप्रसाद तत्वप्रसाद आदिप्रसाद ।
आत्मप्रसाद म्हणौनि पंचविध । श्रृष्टिरूप शिवमंत्र ॥२४८॥

मोक्ष आणि वृद्धी काम्यादिक । शांतिक पौष्टिक ।
म्हणौनि सदाशिवपंचक । स्थितिमंत्र ॥२४९॥

सृष्टिस्थितिसंहार । म्हणौनि महेश्वर ।
रूपत्रिविधप्रकार । संहारमंत्र ॥२५०॥

शाकव्यप्रणव शांभवप्रणव । सांख्यप्रणव शावास्यप्रणव ।
सायुज्यप्रणव । म्हणोनि पंचप्रणव हे ॥२५१॥

मूळपंचाक्षरी स्थूळपंचाक्षरी । सूक्ष्मपंचाक्षरी मायापंचाक्षरी ।
आणी प्रसादपंचाक्षरी । म्हणोनी पंचपंचाक्षरी ह्या ॥२५२॥

शिवास्त्र स्छुरिकास्त्र । आणि पाशुपतास्त्र ।
व्योमास्त्र अघोरास्त्र । म्हणोनि पंचअस्त्रे ॥२५३॥

सद्योजातकर । वामदेव अघोर ।
तत्पुरुष ईशान म्हणौनि पंचप्रकार । ब्रह्ममंत्र ॥२५४॥

गायत्री मृत्युंजय । दक्षिणामूर्ति शुद्धमय ।
नीळकंठ विग्रह । शरभ वीरभद्र ॥२५५॥

विघ्नेश्वर । विशाखा विद्येश्वर ।
ब्रह्मा विष्णू दिनकर । भैरवादि महामंत्रस्थोम ॥२५६॥

दुर्गा लक्ष्मी शारदा गौरी । अन्नपूर्णा भुवनेश्वरी ।
अश्वारूढ त्रिपुरांबिकापुरी । महाशक्तिमंत्र ॥२५७॥

सिद्धशावंर शक्तिशाबर मेरुमंत्र । शाकिनीतंत्र डाकिनीतंत्र ।
कुमारीतंत्र शाल्वतंत्र । सिद्धमंत्रादि संमोह ॥२५८॥

अंद्रद्राविड लौकिक । देशभाषा मंत्रादिक ।
भिन्न भिन्न पृथकपृथक । विवेकूनि पाहिजे ॥२५९॥

अणीक मंत्राचे हृदयशिर । शिखाकवच नेत्र ।
अस्त्र म्हणिजे षडंगविचार । अनुक्रमे ॥२६०॥

नमः स्वाहावषट् । हूंफट् वौषट् फट् ।
म्हणोनि षट् । पल्लव योजावे ॥२६१॥

शुभ्र पीत रक्तवर्ण । स्फटिक शाम कृष्ण म्हणऊन ।
अनुक्रमे अंगवर्ण । हृदयादि ॥२६२॥

पंचांगमंत्रासि भावे । नेत्रपल्लव त्यजावे ।
अंगवर्ण मंत्रासि भावे । अंगकल्पना हा निश्चय ॥२६३॥

अणीक त्या मंत्रषट्पल्लवाभीतरी । कार्यार्थ परी ।
कोपशांतिपुजेसि साचारी । हृदयपल्लव ॥२६४॥

मोहनवश्यादिकाते । शिरपल्लव निरुते ।
लाभालाभाते । शिखापल्लव ॥२६५॥

छेदन मारण । प्रीति विध्वंसन ।
तयासि कारण । कवचपल्लव ॥२६६॥

मोहनोद्दीपन । पुष्टिविजयालागून ।
तयासि कारण । नेत्रपल्लव ॥२६७॥

विघ्नग्रहा उच्चाटणादिक । तयासि अस्त्रपल्लव कारक ।
मंत्राअंती प्रयोगावे मुख्य । हे विधीने निश्चये ॥२६८॥

अणीक वातुळ शारदातिलक । मंत्रदेवता प्रकाशक ।
प्रपंचसारादिक । मंत्र शास्त्रोक्त ॥२६९॥

महाचक्रगत कारण । मातृका घेऊन ।
मंत्रोद्धारणाचे जनन । सांगिजेल ॥२७०॥

तया मंत्राक्षराचेनि । प्रणव अंतर्हेतुक करूनी ।
जपानुसंधानी । जीवन म्हणिजे ॥२७१॥

अणीक ते मंत्र मेळऊन । भिन्न भिन्न वर्ण ।
चंद्रोदके वायूव्यान । पुढे वात म्हणौनी ॥२७२॥

अणीक तया मंत्राक्षर । गणना ठेऊनी रक्ताकार ।
पुष्प वायव्यमुखी ठेऊनी उच्चार । बोधन म्हणिजे ॥२७३॥

अणीक त्या मंत्राक्षराची संख्या ठेउनी । अश्वत्थपल्लवे मंत्राक्षरालागूनी ।
मंत्रोदकेकरुनी । अभिषेक कीजे ॥२७४॥

अणीक ते मंत्र मनात । स्मरोनि तारा व्योमाग्नीत ।
मनायकदंडीज्योतिर्मत्त । म्हणौनी ग्रंथार्थी ॥२७५॥

ज्योतिर्मय मंत्रेकरुनी । शिवमंत्र सोडूनी ।
शेषमंत्राचे करण मळत्रयदहनी । ते मळीकरण म्हणवी ॥२७६॥

तया ज्योतिर्मय मंत्राने । मंत्रीत जालिया कुशोदकाने ।
मंत्राक्षर प्रत्यकू संप्रोक्षण करणे । ते अप्यायन म्हणवी ॥२७७॥

आणीक तया मंत्रार्थे । मंत्रोदके निरुते ।
तर्पण तेणे ते । तर्पण म्हणवी ॥२७८॥

आणीक तारमायाते । रमा मनोदीपनमुच्यते ।
म्हणोनी ग्रंथार्थे देणे ते । दीपन म्हणवी ॥२७९॥

वरी जयावया योग्य इष्ट । मंत्र तो न करा प्रकट ।
गोप्याने मंत्राचे षष्ठ । दशसंस्कार विचारावे ॥२८०॥

आणीक विशेष समस्त । संमोहमंत्राआत ।
मुख्य जाला विख्यात । प्रणव जो ॥२८१॥

तो परप्रणव म्हणऊनी । अपरप्रणव म्हणौनी ।
द्विविधप्रकार होऊनी । असे त्याचे ठाई ॥२८२॥

परप्रणव असाधारण । अवाच्य सत्य ज्ञानादि लक्षण ।
संयुक्ते आपण । परब्रह्म म्हणवी ॥२८३॥

आणीक अपरप्रणव । तो वाचकशब्दरूप होऊनि सर्व ।
ब्रह्मा विष्णु रुद्र ईश्वर सदाशिव । आदि देवता ॥२८४॥

रक्त शुक्ल कृष्ण । ज्योति स्फटिक म्हणौन ।
पंचप्रकारे वर्ण । अनुक्रमे ॥२८५॥

अकार उकार मकार । तथा ओंकार ।
बिंदुनाद म्हणिजे पंचाक्षर । आत्मकत्वे ॥२८६॥

तारक दंडक कुंडलाकार । अर्धवैश्यप्रकार ।
दर्पणाकार ज्योतिआकार । म्हणिजे षट्रूपे ॥२८७॥

ओंकार म्हणौनि । ब्रह्मज्ञान म्हणवोनि ।
शिवात्मक जाणोनि । सर्वात्मा म्हणवी ॥२८८॥

सर्वविद्यावीज म्हणौन । तेजोवीज म्हणौन ।
मुक्तिवीज जाणोन । निश्चळ म्हणौनिया ॥२८९॥

नाद म्हणौनी नादादि म्हणौनी । हृन्नाद म्हणौनि वेदादि म्हणऊनी ।
वेदभूमिका जाणोनी । मंत्रप्राण म्हणविजे ॥२९०॥

ब्रह्ममूर्ती म्हणऊनी । आत्ममंत्र म्हणौनी ।
इत्यादि नामेकरुनी । शोभिवंत असे ॥२९१॥

अणीक तया मंत्रसिध्यर्थांकारण । जपप्रारंभाचे ठाईं स्नान ।
आदि विधियुक्त होऊन । ब्रह्मारण्य नदीतटाक ॥२९२॥

ब्रह्मरूक्ष अथुनी । प्राङ्मुखोदयमुख होऊनी ।
बैसोनिया स्वस्थानी । प्राणायमत्रय करूनिया ॥२९३॥

वरी तया मंत्रासि । ब्रह्म तो ऋषी ।
देवीगायत्रीछंद विशेषी । परशिव देवता ॥२९४॥

अं बीजं ॐ शक्ती । मं कीलकं मोक्षार्थे जपे विनियोगा इति ।
प्रथम स्मरोनी उपरांति । मंत्रे करन्यास करावा ॥२९५॥

करद्वयाच्या अंगुष्टादि कनिष्टांत । अंगुळीचे अद्य मध्य अंत ।
पर्वाचे ठाई समस्त । प्रत्यक् बिंदुयुक्ते ॥२९६॥

प्रथम अकार । आणि उकार ।
मकारादि प्रकार । न्यास करावा ॥२९७॥

आणि बिंदुयुक्त । प्रणवन्यास समस्त ।
अंगुळीचे ठाई विहित । न्यास करूनि ॥२९८॥

वरि प्रणवेचि करूनि । करतळकरपृष्ठाभ्यां नमः म्हणौनी ।
करशुद्धि या प्रकारे करुनी । करन्यास जाला ॥२९९॥

वरि आपुलिये । ठाई नाभि हृदय ।
मूर्द्धनी हिय । अनुक्रमे ॥३००॥

बिंदुसंयुक्ते साचार । अकार उकार ।
आणि तथा मकार । हा न्यास करावा ॥३०१॥

वरि मूर्द्धनी । आदि पादांत धरुनी ।
बिंदुयुक्त प्रणवन्यास करुनी । ऐसा देहन्यास जाल्यानंतरे ॥३०२॥

वरि ओं भू ज्ञानात्मने हृदयायनमः म्हणौनी ।
दक्षिणकराचे चतुरांगुळिनें हृदय स्पर्शोनि ।
हृदयस्थित मंत्रदेवता ते स्थानी । नमस्कारिजे ॥३०३॥

वरि ओं भुवः वायव्यात्मने शिरसे स्वाहा म्हणौन ।
दक्षिणकराचे चतुरांगुळिने ।
शिरसि मंत्रदेवता स्पर्शोन। चंद्रामृते परम निजमूळाग्नी प्रकाशिजे॥३०४॥

वरि ओं स्वः सूर्यात्मने शिखायै वषट् म्हणोनी ।
शिखामध्यवशे ऊर्ध्वज्वलनस्वभावचैतन्यी ।
ऊर्ध्वअंगुष्ठे मुष्ठि करुनी । स्पर्शन करूनिया ॥३०५॥

वरि ओं महः ब्रह्मात्मने कवचाय हुं म्हणऊनिया ।
अधोमुख जीवचैतन्य अपुलिया ।
ठाई विजृभ्य तैसे ॥३०६॥

उभयपाणी । तर्जनीचेनि ।
वज्रकवचेकरुनी । निरोधिजे ॥३०७॥

वरि ओं जनः ज्ञानात्मने नेत्रतयाय वौषट् म्हणऊनी ।
दक्षिणकर मध्यस्थानी ।
अंगुळीत्रय करुनी । नेत्रस्पर्शन ॥३०८॥

परमशिव चैतन्य । तो सर्वत्र स्पुरे आपण ।
तैसेनि पूर्ण । अभिव्यक्ती करुनिया ॥३०९॥

वरि ओंतपः सत्यात्मने अस्त्राय फट् म्हणोनी । नासुळी अंगुळी तर्जनीचेनी ।
ध्वनी होय तैसे संख्येनें कर्णी । अस्त्र कीजे ॥३१०॥

आणि पूर्वादि दशदिशा समस्त । ते ते ठाई अभिमत्त ।
रक्षणानिमित्त । अस्त्रेकरुनी ॥३११॥

परमशिव चैतन्य । रूपात्मक इंद्रियेकरुन ।
लोकपाळ स्थापून । अस्तांता ठाई ॥३१२॥

वरि अस्त्राय फट् म्हणऊन । तया त्रिकाळिकासि अन्योन्य ।
संबंध करणे हे कारण । षडंगपल्लवार्थ ॥३१३॥

परिक्रमें समस्त । मंत्रासि होय यन्मत्त ।
हे ब्रह्मकवच विख्यात । म्हणवी निरुते ॥३१४॥

हे ब्रह्मकवच धरी अखंड । तयासि ब्रह्मास्त्र ब्रह्मदंड ।
काळादीकदंड । वज्रायुधादिकासि ॥३१५॥

अभेद्य सर्वैथैव । म्हणौनी सर्वैथैव सुरनरगंधर्व ।
तयासि पूज्यमान होय । म्हणौनिया ॥३१६॥

अणीक या कर्मे विशेषे । करन्यासदेहन्यासे ।
अणीक अंगन्यास । केलियानंतरे ॥३१७॥

जगन्मंत्र सकळ विशेषे । तत्तपिंडा ऐसे ।
प्रणवज्योति व्यापक असे । म्हणौनि अनुसंधानावे तरी ॥३१८॥

कां तरी आपुले मूळाधार । आदि सकळ चक्र ।
असे भेदिले साचार । म्हणौनिया ॥३१९॥

सुषुम्नानाडी मध्यगत । बिंदुलेस्वात्मक विजृंभक ।
बिंदुचिंतने युक्त । होऊनि तरी ॥३२०॥

ना तरी हृत्कमळ । कर्णिकाग्रीचे सोमसूर्यमंडळ ।
तयातु महेश्वर ध्यानानुकूळ । युक्त होऊनि तरी ॥३२१॥

दशलक्ष जप आदरे । पुरश्चरण केलियानंतरे ।
वरि तो प्रणवमंत्र साचारे । सिद्धि जालिया ॥३२२॥

मग सकळपापक्षय । षट्कर्मसिद्धि अष्टमहदैश्वर्य ।
सर्व विद्यासंपन्न यथेष्ट फळ होय । म्हणोनी सत्य जाणावे ॥३२३॥

या नंतरे या मंत्रातु सिद्ध । आत्मप्रसाद ।
म्हणौनी प्रसिद्ध । सर्वात्मकाचे ठाई ॥३२४॥

रेचक पूरक । म्हणिजे प्राणापान रूपक ।
रविशशीयुक्ते मुख्य । संचरत असे ॥३२५॥

हंसः सोहं म्हणिजे द्विभेद होऊन । जीवमंत्र हंसमंत्र म्हणौन ।
अजपागायत्री म्हणऊन । नाम पढोनि असे ॥३२६॥

त्यालागी प्राणायाम परी । मंत्रपूर्वक करुनी वरी ।
मंत्रासि हंसऋषी अव्यक्त गायत्री । छद प(?) मंत्रदेवता ॥३२७॥

हंबीजं स्वाहा शक्तिः । सोहं कीलकस्थिती ।
परमहंसप्रीत्यर्थ जपे विनियोग म्हणौनि इति । स्मरोनिया ॥३२८॥

अणीक हंसां सूर्यात्मने अंगुष्ठाभ्यांन्नमः ।
हंसी सोमात्मने तर्जनीभ्यां नमः ।

हंसूं निरंजनात्मने मध्यमाभ्यां नमः ।
हंसः अतनुसूक्ष्मात्मने करतळकरपृष्ठाभ्यां नमः ॥३२९॥

म्हणोनी करन्यास करावे ॥ वरि ह्र्यादि करांत । षडंगन्यास तेथ ।
ते ते पल्लवयुक्त । अंगन्यास कीजे ॥३३०॥

मग हृत्कमळकर्णिका सद्य । श्वेतवर्णाने शुद्ध ।
फरशमृगवरद । अभययुक्त ॥३३१॥

करचतुष्टे शोभत । सर्वलक्षणे संपन्नयुक्त ।
उमापतीध्यानरत । होऊनिया ॥३३२॥

श्रीगुरूचिया । उपदेशेकरूनिया ।
अरुणोदय समया । जप करावा ॥३३३॥

तया मंत्रजपासि सिद्धी मिती । सूर्योदयादि सूर्यास्तु अंती ।
एकविंशति । सहस्रषद्शत जप ॥३३४॥

तयामध्ये मूळ । आधारादि ब्रह्मरंध्रांत सकळ ।
सप्तचक्रकमळ । अनुक्रमे असे ॥३३५॥

तयासि श्री गणपतीसि षट्शते ।
षट्सहस्र विष्णूते । उमामहेश्वरा षट्सहस्र ॥३३६॥

येकसहस्र जिवात्मियासि । येकसहस्र परमात्मियासि ।
येकसहस्र श्री गुरूसी । अजपाजप गायत्री ॥३३७॥

मंत्र जपमा नीवेद्यामी म्हणौनि । ऐसिये परी संकल्पुनी ।
मग जप करी तयाचि नासोनि । जाती सर्व पातकें ॥३३८॥

वरि आयुरारोग्यादिक । भोगमोक्षादि मुख्य ।
सर्वसिद्धिप्रदायक । म्हणौनी जाणावे ॥३३९॥

अगीक तया सकळीक । मंत्राभीतरी येक ।
मूळ पंचाक्षरी म्हणिजे मुख्य । होऊनि असे ॥३४०॥

विद्या म्हणौनि । शिव म्हणौनी ।
शैव म्हणवोनी । शिवहृदय म्हणोनिया ॥३४१॥

सूत्र म्हणौनी । परिनाम पावोनी ।
वेदागमपुराणी । प्रसिद्ध म्हणोनिया ॥३४२॥

सूक्ष्ममंत्र जाला तरी । महाअर्थ तयाभीतरी ।
असे वटबीजपरी । तयाकारण ॥३४३॥

समस्तासी भक्त । जनासि विहित ।
जपावया कृत्य । योग्य म्हणवी ॥३४४॥

प्रणवपूर्वक । भूतादि सकळीक ।
पंचवर्णात्मक । नकारादि ॥३४५॥

यकारांत विशेषे । षडक्षर निष्प्रयासे ।
कारण होऊनि असे । भुक्तिमुक्तिप्रदायक ॥३४६॥

तो पंचाक्षरीमंत्र । प्रथम गुरुमुखे विचार ।
अर्थसहीत विवर । जाणोनिया ॥३४७॥

यथाशक्ती गुरुदक्षिणा देऊनी । मग तया गुरूचे अज्ञेकरूनी ।
मंत्रसिध्यर्थ होऊनी । प्रारंभावे ॥३४८॥

येथे पुढे सागों शुभमासविधी विवेकुनी ।
आणि जळस्नान भस्मस्नानादि करुनी ।

आपुलिया शरीरशक्ति जाणोनी ।
शाखामूळ फळ क्षीर सेऊनी मिति आहारत्वे ॥३४९॥

अणीक अक्षरासि येकेक । लक्षमितीने षट्लक्ष ।
दिन येक त्रिद्वादशाक । सहस्रजप करावा ॥३५०॥

क्षीर घृत नातरी पालाशकुसुम । तयाने येकसहस्र होम ।
लक्षतर्पणक्रम । करावे पुराणोक्त ॥३५१॥

नातरी कल्पोक्ती । प्रमाणे चतुर्विंशति ।
लक्षजप मिति । पूर्वोक्त यथासंख्या क्रमें ॥३५२॥

होमतर्पण । विशेषे करावे निपुण ।
ऐसे पुरश्चरण । केलियावरी ॥३५३॥

दिन येकासि अष्टोत्तरशत । ना तरी द्विशतार्थ कां त्रिशत ।
अथवा पंचशत । ना तरी सहस्र ॥३५४॥

अथवा द्वादशक । सहस्रसंखेनें विशेख ।
नित्य जप करणे पूर्वक । हे विधी म्हणवी ॥३५५॥

संख्याहीन जपफळ । ते राक्षसकुळ ।
परिहरती सकळ । म्हणौनी जाणावे ॥३५६॥

अणीक येथे पुनश्चरणरहित । संख्यानेमे देहांतपर्यंत ।
जप करणे नित्यकृत । ते कनिष्ट म्हणवी ॥३५७॥

पुरश्चरणविधाने । करूनि यथोपलक्षणे ।
वरि मंत्रे त्याग करणे । ते मध्यम म्हणवी ॥३५८॥

पुरश्चरण समाप्त । करूनि वरि नित्य कृत ।
संख्यानेमे देहांत । जप करणे ॥३५९॥

तो पुरणपूर्वक । नित्य जप विशेख ।
उत्तम म्हणवी मुख्य । म्हणोनि जाणावे ॥३६०॥

उपरि मंत्रजपाचिया । प्रारंभसमया ।
प्राणायामंत्रया । करूनी ॥३६१॥

अणीक तया मंत्रासि । वामदेवऋषी ।
पंक्तिछंद सदाशिव विशेषी । आदि देवता ॥३६२॥

प्रणव बीज उमा शक्ति । उदातश्वेत वर्णस्थिती ।
भोगमोक्षप्रीत्यर्थें जपे विनियोग । म्हणौनि इति स्मरोनिया ॥३६३॥

वरि पिंडब्रह्मांडाचे ठाई मुख्य । भूम्यादि आत्माषट्चक्र क्रमपूर्वक ।
नकारादि प्रणवांत अक्षरात्मक । अनुसंधाने ॥३६४॥

अणीक त्या मंत्राने करन्यासविधी । करावया करद्वयांगुष्ठादि ।
कनिष्ठिकांत यकारादि । नकरांत ॥३६५॥

प्रत्यक् बिंदुसंयुक्ते । मंत्रबीज येकयेकाते ।
बिंदुसन्मत्ते । प्रणवद्वये ॥३६६॥

आदिअंती मेळउनी । अंगुळीआदि करुनी ।
अंगपर्यंत करणे या लक्षणी । तो सृष्टिन्यास म्हणवी ॥३६७॥

अणीक कनिष्ठिकादि अंगुष्ठांत । नकारादि यकारांत ।
वर्णानुक्रमे अंगुष्ठादि वर्णपर्यंत । करणे तो संहारन्यास म्हणवी ॥३६८॥

अणीक मध्यांगुळी आदि तर्जन्यांत । शिकारादि मकार पर्यंत ।
अक्षरे यथार्थ । परिक्रमे ॥३६९॥

अंगुळी मध्यस्थान । आदि अग्रस्थान ।
पर्यंत करूनी इही लक्षण । तो स्थितीन्यास म्हणवी ॥३७०॥

अणीक अंगुळीचिया । पर्वाचे ठाई विवेकुनिया ।
मंत्राक्षरे त्या प्रकारे भेद जाणोनिया । न्यास करावा ॥३७१॥

अणीक प्रत्येक । अंगुळीचे ठाई प्रत्येक विशेख ।
संपुष्ट जोडूनि पूर्वक । प्रवणन्यास करावा ॥३७२॥

अणीक तया करद्वया । चतुरांगुळीसी तया तया ।
अंगुष्ठेकरूनिया । तर्जन्यादि न्यास करावे ॥३७३॥

अणीक करतळद्वयासि विचारे । बिंदुयुक्त प्रणवत्रये वामकरे ।
दक्षणकर वामकरे । करतळद्वय ॥३७४॥

अलोमकरशुद्धी । करणे इही विधी ।
तो न्यास समधी । सृष्टिन्यास म्हणवी ॥३७५॥

विलोमकर । शुद्धि करणें साचार ।
तो संहार । न्यास म्हणवी ॥३७७॥

हिया प्रकारे । करन्यास केलियानंतरे ।
देहन्यास प्रकार । देहन्यासाचे ठाई ॥३७८॥

मूर्धनी मुख कंठ हृदय । गुह्य पादाचिये ।
ठाई पर्याय । क्रमेकरुनी ॥३७९॥

प्रणवादि यकारांत प्रत्येक । विंदुसमेत मंत्राक्षर विंदुयुक्त पूर्वक ।
प्रणवद्वयसंपुटीकरण मुख्य । तो सृष्टिन्यास म्हणवी ॥३८०॥

अणीक परिक्रमे पादादि मूर्ध्निपर्यंत । प्रणवादि यकारांत ।
करणे यथायुक्त । तो संव्हारन्यास म्हणवी ॥३८१॥

अणीक हृदय गुह्य । मूर्ध्नि मुख पादद्वय ।
कंठाचिये पर्याय । क्रमेकरुनी ॥३८२॥

प्रणवादि यकारांत । करणे यथार्थ ।
तो म्हणवीत । स्थितिन्यास ॥३८३॥

अणीक सर्व मंत्राचेनि । शिरसांदि करूनी ।
सर्वांग विवेकुनी । न्यास करावे ॥३८४॥

अणीक त्यास सर्वांग न्यासाचिये । ठाई कनिष्टांगुष्टादि योगे हृदय ।
अनाभिकांगुष्ठवुभय । योगे मूर्ध्नि ॥३८५॥

मध्यमांगुष्टयोगे शिखा । करद्वयतर्जनीयोगे कवचमुखा ।
दक्षणहस्तका मध्यमांगुळीत्रया नेत्र ॥३८६॥

दक्षणकर । चतुरांगुळी येकत्र ।
संयोगे अस्त्र । वामकरावरी ॥३८७॥

प्रणवादि यकारांत । मंत्राक्षरपूर्वोक्त ते पल्लवार्थ ।
जाणोनि करणे यथास्थित । तो सृष्टिन्यास म्हणवी ॥३८८॥

अणीक मंत्र वर्णभेदरहित । अस्त्रादि हृदयांत ।
करणे तो यथार्थ । संहारन्यास म्हणवी ॥३८९॥

अणीक यथार्थ । कवचादि शिखांत ।
करणे तो सत्य । स्थितिन्यास म्हणवी ॥३९०॥

अणीक ईशानादि सद्योजात । सद्योजातादि ईशानांत ।
संहारपद्धती अघोरादि तत्पुरुषांत ।
करणे तो स्थितिन्यास म्हणवी ॥३९१॥

इति पंचप्रकार । ब्रह्मन्यास कर ।
देहअंगत्रयाचे ठाई विचार । पूर्वक करावे ॥३९२॥

वरि पूर्वादि ऊर्ध्वांत । पंचदिशाचे ठाई करकारादि नकारांत ।
अक्षरे यथायुक्त । अनुक्रमे स्थापावी ॥३९३॥

अणीक अंगुष्टतर्जनी उभया । योगे ध्वनि होआवया ।
तैसे इंद्रादि दिशाचिया । अस्त्रपल्लवे प्रयोगावे ॥३९४॥

अणीक यकारादि नकारांत । तो सृष्टिमंत्र म्हणवी विख्यात ।
नकारादि यकारांत । तो संहारमंत्र म्हणवी ॥३९५॥

आणि आदि शिकार । अंत मकार ।
तो स्थितिमंत्र । म्हणवी निरुता ॥३९६॥

अणीक त्या मंत्राचे ठाई स्त्रीशूद्र । तयासि प्रणवरहित साचार ।
नमः अंतस्थितीमंत्र । जप करू ये ॥३९७॥

सांब शिव । अथवा सदाशिव ।
ना तरी तांडवावेव । ध्यान करूनी जप करावा ॥३९८॥

अणीक ह्या पुरश्चरण केलियावीण । मूळ पंचाक्षरीमंत्रपुरश्चरण ।
मंत्रजपविधान । सांगीक नव्हे ॥३९९॥

त्यालागी बिल्ववृक्ष अश्रूनि येक । दिवस जप केलिया सकळिक ।
मंत्रासि पुरश्चरण मुख्य । होय म्हणऊनी ॥४००॥

ईश्वरगीतादि करून । सांगतसे त्यालागुन ।
पुरश्चरणसिद्धि जाली कारण । पंचाक्षरीमंत्र ॥४०१॥

तो पर्वताग्री लक्ष येका । जप केलिया आयुर्वृद्धिदायका ।
महानदीतिरी द्वादशका । लक्षजप केल्या आयुर्वृद्धि ॥४०२॥

दुर्वा तिळगूळ वेळा कर्दम । करूनि दशसहस्त्रवटिका नेम ।
अतिमंत्रासि केलिया होम । आयुर्वृद्धी ॥४०३॥

अश्वत्थवृक्ष । तयातळी द्विलक्ष ।
जपे केलिया प्रत्यक्ष । अपमृत्यु नासे ॥४०४॥

प्रतिशनिवारी । अश्वत्थवृक्ष धरूनी दोही करी ।
अष्टोत्तरशतजप केलिया साचारी । अपमृत्यु नासे ॥४०५॥

आदित्याभिमुख होऊनी येक । लक्षजप केलियावरी अर्के ।
पुष्पे अष्टोत्तरशत होम केलीया साचारी अशेख । व्याधि नासे ॥४०६॥

प्रतिदिनी येकमासपर्यंत । उदयसमयी अष्टोत्तरशत ।
जप केलिया समस्त । कुक्षव्याधी नासती ॥४०७॥

पालाशकुसुम । तयाने दशसहस्त्र नेम ।
जपयुक्त केलिया होम । सर्व व्याधी नासती ॥४०८॥

नदीकावोहळोदकेंकरुनी । पूर्ण कुंभ भरुनी ।
हस्तकमळे धरुनी । दाहासहस्त्र ॥४०९॥

केलिया जपविधान । वरितया जळेकरुन ।
केलिया स्नान । सर्वव्याधी नासत्ती ॥४१०॥

चंद्रसूर्यग्रहणी । नदी समुद्रगामिनी ।
तयेआत उपवास शुची होऊनी । बैसोनिया ॥४११॥

ग्रहणादि ग्रहणांतपर्यंत । ब्राह्मीरस अष्टोत्तरशत ।
वेळा जपोनि सेविलिया इहलोकात । सर्वशृतिपारंगत होय ॥४१२॥

प्रातःकाळी स्नान करुनी । नित्य क्रियासंपन्न होऊनी ।
पालशपत्री विभूति करुनी । ना तरी घृत ॥४१३॥

अथवा पंचगव्य भरुनी । करकमळी धरुनी ।
अष्टसहस्त्रजप केलिया जनी । सर्वविद्यापारंगत होये ॥४१४॥

विल्वछाया अश्रूनि दशसहस्त्र । जप करूनि वरिते विल्वफळपत्र ।
पुष्पे केलिया होम अष्टदशसहस्त्र । सकळैश्वर्यसमृद्धि होये ॥४१५॥

छिद्ररहित पालाशकुसुम । तयाने दशसहस्त्र होम ।
केलिया सर्वलक्षणसंपन्नोत्तम । पुत्र होये ॥४१६॥

तया पालाशकुसुमे येक । सहस्त्रअष्टक ।
होम केलिया नक्षत्रग्रहादिक । पिडा निवारे ॥४१७॥

स्नान करूनी दशसहस्त्र । जप संपादुनी अष्टोत्तर ।
शतहोम केलिया साचार । स्वप्नशांति होयें ॥४१८॥

चंद्रसूर्यग्रहणी । शिवलिंगपुजा विधियुक्त करुनी ।
दशसहस्त्रजप लिंगसन्निधानि । केल्या सर्व कामात्ति सिद्धि लाभे ॥४१९॥

एकादशवेळा प्रतिदिनी । अन्न प्रथम मंत्रूनी ।
सेविलियापरकुजंत्र करणी । सकळ निवारी ॥४२०॥

तया मंत्रे अष्टोत्तरशत । जप केलिया नित्य ।
कर्मलोप विषद अनुचित । अन्नदोष निवारे ॥४२१॥

दशसहस्त्रादिके । लक्षजपे विशेषे ।
महापातके । नाश पावती ॥४२२॥

पंचावन्नसहस्त्र मिति । जप केलिया समस्ती ।
पातके परिहरती । निश्चयाने ॥४२३॥

सप्तविंशति सहस्त्रपंचशत । जप केलिया समस्त ।
उपपातके अमित्य । परिहरती ॥४२४॥

दशसहस्त्र । जप केलिया साचार ।
अतिपातका संहार । होय अत्यंत ॥४२५॥

तत्वासि येक येक लक्षजप । संखेने पंचविंशतिलक्षजप ।
केलिया पंचविंशति तत्वरूप । पार उतरे ॥४२६॥

पंचशतलक्षजप । जपाने अखिळकारक ।
अनादि ईश्वरत्व मुख्य । प्राप्ति होय ॥४२७॥

शतलक्षजपे प्राप्ति रुद्रत्व । ऐसीलक्षजपे प्राप्ति विष्णुत्व ।
साटिलक्षजपे ब्रह्मत्व । प्राप्त होय ॥४२८॥

चतुर्विंशतिजप लक्ष मिति ।
जपाने विराटत्व होय प्राप्ति ॥४२९॥

लक्षजपें साहादि । षट्कर्मैं मारणादि ।
प्राप्त होय सिद्धी । म्हणोनि जाणावे ॥४३०॥

अणीक तो पंचाक्षरीमंत्र । वायु जित होऊनि भर ।
मध्यरात्री जपसहस्त्र । केल्या नादसिद्धी होय ॥४३१॥

तया दशसहस्त्र । संख्याजपे साचार ।
प्राप्त होय अपार । ब्रह्मसिद्धी ॥४३२॥

अलस्यरहित । होऊनिया वायू जित ।
मौने मध्यरात्री अश्रुत । लक्षजप ॥४३३॥

केलिया सकळकारक । सर्वआधारक ।
निवृत्यात्मक । बिंदुदर्शन होय ॥४३४॥

मध्यरात्री वायु जित । होऊनिया लक्षजप समाप्त ।
केलिया समाप्त । सिद्धि प्राप्त होये ॥४३५॥

तयाकारणे इत्यादि । विधाने मंत्रसिद्धी ।
संपादने सकळसिद्धी । होय म्हणौनी जाणावे ॥४३६॥

या नंतरे सर्व मंत्र पंचाक्षरादि । पुरश्चरणारंभी अधी ।
शुभमासादि विधी । परिक्रमे विचरावे ॥४३७॥

त्याचे ठाई । चैत्रमासी दुःखक्रांत । वैशाखी आत्मलाभ जेष्ठी मृत्य ।
आषाढमासी घात । बंधुजनासी ॥४३८॥

श्रावणमासी पूर्णायुष्य । भाद्रपदी प्रजानास ।
अश्वीनमासी सुखसंतोष । कार्तिकी सर्व सिद्धी ॥४३९॥

मार्गेश्वरी मंगळपुष्पहाणि । माघमासी बुद्धिवृद्धि फाल्गुणी ।
सर्व सिद्धी म्हणौनी । मास जाणावे ॥४४०॥

अणीक मेषादि मीनात । द्वादशरासी समस्त ।
तयामध्ये सर्वकृत्य । शुभ जाणावे ॥४४१॥

मेष मिथुन । सिंह तूळ धन ।
कुंभ म्हणोनि जाण । षद्राशी अशुभा ॥४४२॥

उरलिया षट्राशी । शुभदायका विशेषी ।
म्हणौनि निश्चयेसीं । अंगिकार करावया ॥४४३॥

अणीक पांडवाचतुर्थी । षष्ठी अष्टमी नवमी चतुर्दशी तिथी ।
पौर्णिमा अमावाश्यादि ईती । अष्ट अशुभा ॥४४४॥

उरलिया समस्त । तिथी शुभ अत्यंत ।
म्हणोनि कार्यार्थ । अवलंबाव्या ॥४४५॥

आदित्यवार । मंगळवार ।
आणि शनिवार । त्रय अशुभा ॥४४६॥

उरले वार । चतुर्थ शुभकर ।
म्हणौनि अगिकार । करावा तयाचा ॥४४७॥

अणीक अश्विन्यादि समस्ती । सप्तविंशती ।
नक्षत्रांतु अती । उत्तमकारक ॥४४८॥

मघा मृगशिर हस्त स्वाती । मूळानुराधा रोहिणी रेवती ।
उत्तराषाढा उत्तराभाद्रपदादि इती । एकादश शुभ नक्षत्रें ॥४४९॥

उरली नक्षत्रे । सकळ अशुभकरे ।
म्हणौनि अनादरे । उपेक्षावी ॥४५०॥

अणीक विष्कंभादि समस्ति । योग सप्तविंशति ।
तयाआंतु अती । अशुभकर ॥४५१॥

विष्कंभशूळ गंज अतिव्याघात । व्रज धृति धृक वैधृति व्यतिपात ।
परिघ म्हणिजे अनुचित । येकादशयोग ॥४५२॥

उरले षोडश योग । शुभ म्हणोनी ते योग्य ।
तया कारण तत्संग । अंगिकारावा ॥४५३॥

अणीक शकुनी आदि भद्रांत । येकादश करणे समस्त ।
तयाआतु अनुचित । अशुभ करणे ॥४५४॥

शकुनी चतुष्क म्हणौन । नाग किंस्तुघ्न ।
वणिज भद्रा म्हणिजे जेष्ठकरण । अशुभकर ॥४५५॥

उरले पंचकरण । शुभकर म्हणौन ।
यथा परिलक्षुन । अंगिकार करावे ॥४५६॥

अणीक येथे शुभ तिथीने श्रीप्रिय । शुभवारे आयुष्य होय ।
शुभनक्षत्रे क्षय । पाप सकळ ॥४५७॥

शुभयोगे रोगनिवृत्ति । शुभकरणे कार्यसिद्धी प्राप्ती ।
होय तया कारणे यिती । मंत्र जप ॥४५८॥

प्रारंभाचे ठाई विचारे । सकळ जाणोनि निर्धारे ।
मग सर्वथा आदरे । अंगिकारावे ॥४५९॥

अणीक त्या मंत्रजपासि कारण । प्रथम करावे माळा साधन ।
उत्तरोत्तर विशिष्ट गुण । तया माळिकेत ॥४६०॥

स्वहस्ताचिया । ठाई मध्यमांगुळिचिया ।
अनामिकाद्वया । कारे दशरेखा अंगुष्ठाग्रे ॥४६१॥

स्पर्शस्पर्शोनि कर । करणे मंत्रोच्चार ।
ते नित्य कर्मप्रकार । उत्तम म्हणवी ॥४६२॥

शंखमणीमाळिकेने विशेष ऐश्वर्याधिक । स्फटिकमणिमाळिकेने मोक्ष ।
पद्माक्षमणिमाळिकेने विशेष । पुष्टिलक्ष्मी ॥४६३॥

ज्या माळिकेने पुत्रादि । पशुधान्यादीक अभिवृद्धि ।
प्रवाळमणिमाळिकेने वश्यादि । धनसौभाग्यमुक्ती ॥४६४॥

युक्तमणिमाळिकेने विशेष । सकळव्याधित्वरास ।
माणिक्यमणिमाळिकेने वश्य । स्त्रीवैश्यादिक ॥४६५॥

मरगजमाळिकेने शत्रुजय । कुशगंधमणिमाळिकेने अतिशय ।
सकळपापक्षय । विद्यावृद्धी ॥४६६॥

रजतादिक । मळिमाळिकेने अधिक्य ।
स्त्रीकामादिक । कर्सलाभ ॥४६७॥

मातृकाक्षरमाळिकेने वाचासिद्धि । रसमणिमाळिकेने पूर्वोक्त आदि ।
सकळकार्यसिद्धी । प्राप्ती होय ॥४६८॥

रुद्राक्षमणीमाळ । की ते भोगमोक्षफळ ।
दायक म्हणोनी केवळ । विश्वासात्रें ॥४६९॥

आणि ते रुद्राक्षमाळिका । मेरूरहित येकादशसंख्या ।
मणिमाळिकेने येका । दशरुद्रप्राप्ती ॥४७०॥

पंचदशमणिमाळिकेने मिति । अभिचारक्रियाप्राप्ती ।
पंचविंशति । मणिमाळिका मुक्तिप्रद ॥४७१॥

षड्विंशतिमणिमाळ । तयाने धनवृद्धि केवळ ।
सप्तविंशतिमणिमाळिकेने सकळ । अर्थसिद्धी ॥४७२॥

अष्टविंशती । मणिमाळिकेने पुष्टि अति ।
त्रिंशत्मणिमाळिकेने प्राप्ती । अर्थलाभ ॥४७३॥

बत्तीसमणिमाळिका मिति । तयाने जयलक्ष्मीप्राप्ती ।
पन्नासमणिमाळिकेने अति । काम्यकर्मप्रवृद्धी ॥४७४॥

छपन्नमणिमाळिकेने सर्वसिद्धी । शतमणिमाळिकेने कार्यप्रसिद्धी ।
शतपंचोत्तरशतमणिमाळिकेने चित्रशुद्धी । भोगमोक्ष ॥४७५॥

शतअष्टोत्तर मिती । मणिमाळिकेंने भुक्तिमुक्ति ।
म्हणोनि परम प्रीति । विश्वासावें ॥४७६॥

अणीक ते माळिकेसी अमळक । प्रमाण मणी ते उत्तम मुख्य ।
बद्रिकाप्रमाण विशेख । ते मध्यम ॥४७७॥

चणकाप्रमाण मणी । ते अधम म्हणोनी ।
विचारें जाणोनी । अंगिकारावे ॥४७८॥

अतिस्थूळ अतिसूक्ष्म भिन्न । लघुवर्ण कंटकजीर्ण ।
पूर्वादीकधारण । इति दोषरहित ॥४७९॥

दृढव्रत सुवर्ण । दृष्टिप्रति आदिकरुन ।
मणी सुलक्षण । माळिकेसी ॥४८०॥

सुवर्ण रजत ताम्रादिक । सिसे लोह इति पंचक ।
वर्णसूत्रे वोवूनि विशेख । जपमाळिका करावी ॥४८१॥

ना तरी पट्टसुतें । अथवा कार्पासतंते ।
दोरा विधियुक्तें । करूनियां ॥४८२॥

मृदु पवित्र सूक्ष्म । सप्तविंशति पदर करूनि सम ।
त्रिपदर मेळउनि वोविजे उत्तम । माळिका म्हणवी ॥४८३॥

एकविंशतितंतू समानें। त्रिपदर करूनि मेळवणें।
वरी मणी वोवणें। ते मध्यममाळिका ॥४८४॥

पंचदशतंतू समान करुनी। तृतीय पदर मेळउनि।
वरी वोविजे मणी ते। कनिष्ठमाळिका ॥४८५॥

इति जाणोनि सूत्रे सकळ। उपरि सूत्र धरिजे ते मूळ।
दोरिया घालिजे पीळ। ते अग्र जाणोनि ॥४८६॥

सुगंधादि लेपनें संस्कारूनि विधानें।
वरी प्रक्षाळणें। परिशुद्धी करावी ॥४८७॥

सूत्रामुळी स्थूळमणी। सूक्ष्ममणी तो अग्रस्थानीं।
गोपुछाकारऐसे वोवुनी। मुखमुखासी संयोगें ॥४८८॥

मणीमणीसी स्पर्शन। नव्हे तैसे द्विवेष्टी रुद्रगाठी देउनि।
वरी मूळाग्र येक करून। तेथें संख्यारहीत मणी ४८९॥

मेरू म्हणउनि कल्पुनी। तयावरी द्विगाठी देउनी।
या विचारे करुनी। जपमाळिका ॥४९०॥

अणीक श्रीगुरुहस्तें। पंचगव्यपंचामृतें।
अभिषेक माळिकेतें। करुनी वरी ॥४९१॥

जळस्नानादि गंधधूपादि करूनी। प्रत्यक् प्रत्यक् मणी स्पर्शस्पर्शोनी।
समंत्रक अर्चुनी। दंडनमस्कारें ॥४९२॥

दक्षिणादि विधानें। गुरुपदेशे माळिकादि पावणें।
मग जपअनुष्ठान करणें। नित्यकाळ ॥४९३॥

प्रथम जपमाळिकें। जळपुष्पादिकें।
अग्निसुत्तिमुद्रेने विशेखें। मंत्रासहीत दीजें ॥४९४॥

अणीक तें जपमाळिकेनें। स्थूळादि सूक्ष्मांत क्रमानें।
मंत्रजपविधान करणें। ते उत्पत्तिस्थिती ॥४९५॥

सूक्ष्मादि स्थूळांत। करणे मंत्रजपकृत्य।
ते संहार म्हणोनी अर्थ। जाणोनि ॥४९६॥

परदृष्टीसी नव्हे अगोचर। तैसे रिती मंद ना शीघ्र।
रहीत प्रत्यक्मणीसी मंत्र। येक उच्चारणें ॥४९७॥

जपतां प्रमादवशेकरुन। माळिका जरी जाली पतन।
तरी मंत्रासी हाणि म्हणोन। तया कारणें ॥४९८॥

पुनः प्रथम ऐसे प्रारंभुनी । मेरु नुलंघितां प्रदक्षणा करुनी ।
नमस्कारूनि प्रथम ऐसे संकल्पुनी । आपुला नेम ॥४९९॥

परि संपूर्ण करुनी । वरि ते माळिकेलागुनी ।
अर्घ्य देऊनी । मग ते ठेवावी ॥५००॥

जपमाळिके न लाविता वामपाणी । कंठी न धरितां जपकाळी जप करुनी ।
सदा ठेवावी शुचिस्थानी । ऐसा अंगिकार करावा ॥५०१॥

आणीक ग्रह गोठणी नदीतीर । समुद्रतटाक गिरी पुण्याश्रम क्षेत्र ।
देवाल्या उत्तरोत्तर । स्थान म्हणोनी जाणावें ॥५०२॥

उदकसन्निधी । आणि दीपसन्निधी ।
शिवलिंगसन्निधी । म्हणोनि मंत्रजप ॥५०३॥

विधानासी उत्तरोत्तर । विशिष्ट सन्निधीवर ।
त्यालागी अंगिकार । करावा विश्वासें ॥५०४॥

आणि पूर्वादि मुखवश्यादि । अग्न्यादि मुखे व्याधि ।
आणि दक्षिणाभिमुखे सिद्धी । अभिचारक्रिया ॥५०५॥

नैऋत्याभिमुखें दोषादिक । पश्चिमाभिमुखी धनलाभ अधिक ।
वायव्याभिमुखे अशेख । आकर्षण ॥५०६॥

उत्तराभिमुखे शांतिसौख्य । ईशान्याभि मुखे मोक्ष ।
सिद्धी होय म्हणोनि पूर्वक । दिशा विचारिजे ॥५०७॥

आणीक वंशासने दारिद्रे । पाषाणासने व्याधिभर ।
भूमिआसने मंत्र । हाणि दुःखादिक ॥५०८॥

दुर्भाग्य व्याधिकाष्ठासने । यशोहाणि तृणासनें ।
आणि पल्लवासनें । चित्तविभ्रम ॥५०९॥

कृष्णांजनासनें ज्ञानाधिक्य । व्याघ्रचर्मासनें लक्ष्मीमोक्ष ।
कंबळासने सौख्य । वस्त्रासने व्याधिप्राप्ती ॥५१०॥

कृष्णवस्त्रासन । अभिचारक्रियेसी कारण ।
रक्तवस्त्रासने । वश्यादीक क्रियेसी ॥५११॥

शुभ्रवस्त्रासनें शांत्यादि वृद्धी । चित्रकंबळासनें सर्वार्थसिद्धी ।
होय म्हणोनी समंधी । पीठ करावयासी योग्य ॥५१२॥

आणीक चौरयांसी आसनें । तयांतु सिद्धासन पद्मासन ।
स्वस्तिकासन वीरासन । गोमुखासनादि ॥५१३॥

सुखासनादि करुनी । इति आसने जपकर्मालागुनी ।
योग्य होउनी असती तये आसनी । सुस्थीर वैसोनियां ॥५१४॥

आणीक वाहनपंचक । हिंडतां देहीं वस्त्रकंचुक ।
दिगंबरमुक्तकेशादिक । अशुचित्व ॥५१५॥

बहुभाष जांभई शिंक । पेंग कनिष्ठ वासनादिक ।
नीचप्राणीदर्शन शोक । क्रोध व्याकूळता ॥५१६॥

इत्यादि होउनि विलक्षण । निर्विकाराते मौन्य ।
कामीक होऊन । समग्रीव शिरेखा ॥५१७॥

जपउत्थापन सुषुप्तीसी होउन । विलक्षण मनोदृष्टि येकाग्रध्यान ।
मुद्रासमन्वित होउन । स्थीर वैसावें ॥५१८॥

वरी भस्मोद्धूळण । रुद्राक्षआभरण ।
गुरूपाद स्मरण । पूर्वक होउनी ॥५१९॥

उपरि कनिष्ठा अनामिकांगुष्ट । अंगुळीत्रयानेयेकवट ।
वामदक्षिण नासापुट । धरूनियां ॥५२०॥

वरि ब्रह्मयादी देवता कारण । प्रणवादी चरण ।
अकार चिंतूनि इडा पवन । शक्त्यानुसारें पूजिजें ॥५२१॥

वरी विष्णू अधिदेवता । प्रणवामध्ये बीज उकार ध्यानिता ।
पुढिला तो पवन मागुता । विचारे कुंभिजे ॥५२२॥

वरि रुद्रादि देवतात्मक प्रणवाद्यंत । मकारोनी कुंभि लावायोस्वत ।
पिंगळेचि ठाई रेचोनी यथार्थ । वरि ते मंत्रक्रम धरावें ॥५२३॥

मागुता पिंगळ्याचे ठाई पुरुनी । तयाचे ठाई कुंभोनी ।
वरि हळु रेचुनी । असे प्राणायामत्रय ॥५२४॥

केलियावरी सकळ मंत्रासी । साधारण जाला ऋषी ।
छंद विशेषी । देवता वीज ॥५२५॥

शक्ती कीलक स्वर । वर्ण स्थान अक्षर ।
कळा तत्व अर्थ विचार । चिंतनादी म्हणिजे ॥५२६॥

सकळ अंगातु जाले मुख्य । मंत्रासी प्रथमकारक ।
रुद्रऋषी तो मस्तक । स्थानी निरुता ॥५२७॥

मंत्र अक्षर रूपकर्ता । छंद तो मुखी निरुता ।
मंत्रवाचक आदि देवता । ते हृदयस्थानी ॥५२८॥

मंत्रदेवता नाम वर्णादि । विशेष बीज तें नाभि मंत्रसिद्धी ।
प्रदायक कुंडलिन्यादि । शक्ती ते गुह्य स्थानी ॥५२९॥

मंत्ररक्षक कारण । जाली उमा विल्वेश्वर आपण ।
तिथे अनुक्रमे वामदक्षिण । भुजस्थानी ॥५३०॥

ऋषये नमः म्हणोन । परिक्रमें चतुर्थ नमस्कार करुन ।
ते ते स्थानक शिवोन । स्मरण पूर्वक ॥५३१॥

अणीक त्या मंत्राने करन्यास । आणि देहन्यास ।
अंगन्यास । म्हणिजे न्यासत्रय ॥५३२॥

उत्पत्ति स्थिति संहार । पूर्वोक्त भेद विचार ।
परिक्रमें जाणोनि अंगिकार । करावा त्याचें ठाई ॥५३३॥

ग्रहस्तासी सुवासिनीसी । आणि विधवेसी ।
इत्यादि स्त्रीपुरुषासी । स्थितिन्यास योग्य ॥५३४॥

ब्रह्मचारियासी उत्पत्ति । न्यास योग्य वानप्रस्थ इति ।
तयासी संसारन्यास योग इती । जाणोनी अवधारावें ॥५३५॥

अणीक अनुष्ठाने मोक्ष । तर्जनीने शत्रुजयादिक ।
मध्यमेने विशेख । अर्थसिद्धी ॥५३६॥

अनामिकेने शांती । कनिष्ठिकेने अति ।
होय रक्षण स्थिती । त्याचे ठाई ॥५३७॥
मध्यमांगुष्ठ योगेकरुन । माळिका धरुन ।

करणे जपसंप्रदान । ते कनिष्ठ म्हणवी ॥५३८॥

तर्जन्यंगुष्ठयोगेकरून । ते मध्यम म्हणवी आपण ।
अनामिकांगुष्ठ योगें जप करणें । ते उत्तम म्हणवी ॥५३९॥

अणीक येथ । मध्यमांगुष्ठयोगेविहित ।
भाष्य जपकृत्य । संपादु ये ॥५४०॥

तर्जन्यंगुष्ठयोगें । उपोष्यजप करु ये प्रसंगे ।
अनामिकांगुष्ठ मध्यमासंयोगें । मानसजप करूं ये ॥५४१॥

त्याचे ठाई परश्रुति विशेख । आणि गोचरादिक ।
होय वाचक म्हणवी निरुतें ॥५४२॥

होय स्वश्रुति गोचर । वोष्पद मात्र ।
उच्चार मंत्र । ते उपास्य म्हणवी ॥५४३॥

त्याचे ठाई । वाचकजप तो शूद्रकार्यातें ।
उपांशजप तो सर्वसिद्धीतें । मानसजप तो सत्यार्थें मोक्ष विषई ॥५४४॥

अणीक तया मंत्राचे मुख्य । वाच्यवाचक ।
संबंधि विशेख । जाणोनियां ॥५४५॥

वरि पंचब्रह्म षडंगतें । प्रथमआवरण निरुते ।
अनंतादि अष्ट विद्येते । द्वितीयआवरण ॥५४६॥

उमा चंडीश्वर नंदीश्वर । महाकाय भृंगि रिट गणेश्वर ।
वृषभ षण्मुखेश्वर । म्हणिजे तृतीयआवरण ॥५४७॥

इंद्रादिक लोक । पाळ अष्टक ।
ब्रह्मा विष्णू ते चतुष्क । अवरण निरूतें ॥५४८॥

वज्रादि पद्मचक्रस्थोम । म्हणिजे दशम ।
अयुध ते पंचम । अवरण जाणावे ॥५४९॥

ब्रह्मा आदि करून । सप्तमातृकाचे षडावरण ।
अष्टवसू तें आपण । अवरण सातवें ॥५५०॥

एकादश रूद्र ते अष्टमावरण तें ।
आदित्यादि ग्रहातें । नवमावरण जाणावे ॥५५१॥

पंचाक्षरादि मंत्राक्षर देवता सहित । होऊनियां तरि अवरणयुक्त ।
अथवा दशावरण तरि ध्यानित । जपावे त्याचे ठाई ॥५५२॥

अभिचार ग्रहउच्चाटणादिक । तयासि कृष्णवर्णरूपाने पूर्वक ।
वश्यादिक कर्मासी मुख्य । रक्तवर्ण रूपाने ॥५५३॥

मुक्त्यादिकं प्रयत्ने । तयासी कारण ।
शुक्लादि वर्ण । रूप ध्यानें ॥५५४॥

अणीक ते ध्यान । अनुक्रमे विधी करुन ।
करावया अवलंबन । मंत्रदेवतासी ॥५५५॥

अघोरादि इति । थोर थोर मूर्ति ।
म्हणोनि त्रिविध स्फूर्ती । असती त्याचे ठाई ॥५५६॥

त्याचा ठाई । अघोरमूर्तिध्यान शीघ्र । पापरोगरिपुसंहार ।
मिश्रमूर्तिध्यानी चिर । काळी सर्वसिद्धी ॥५५७॥

शांतिमूर्तिध्याने सिद्ध चिर । काळरहित सुविचार ।
शांतिप्रज्ञादि आचार । होय म्हणोनी जाणावें ॥५५८।

ध्यानरहित तो अगर्भजप । ध्यानयुक्त अशेप ।
तो सगर्भ जप । तयांआंतु ॥५५९॥

अगर्भजपातें । सगर्भजपातें ।
कोटि कोटि अंतर निरुतें । म्हणोनि जाणावें ॥५६०॥

अणीक तया मंत्रासी आत्मगर्भ । शिवगर्भ शक्तिगर्भ ।
म्हणोनियां गर्भ । त्रय छंद त्याचे ॥५६१॥

आत्मगर्भ तो समर्थ फलदायक । शिवगर्भ तो नपुंसक ।
शक्तिगर्भ तो मुक्तिदायक । म्हणोनि क्रमे जाणावें ॥५६२॥

जप करावा विधियुक्त । जप जालिया समाप्त ।
वरि पूर्वोक्त । विधीची विपरीत ॥५६३॥

प्राणायामत्रयाने । प्रथम ऐश्या लक्षणें ।
छंदऋषीदेवतादि स्मरणें । हे विधी म्हणती ॥५६४॥

अणीक इति मंत्रादि क्रिया समस्त । श्री गुरूपदेशें अभ्यासरत ।
तयासी सकळार्थ । सिद्धि होय ॥५६५॥

ना तरी संयुक्त अनुसारें । शास्त्रबळविचारे ।
अनुष्ठान करू नये साचारें । म्हणोनी निश्चय ॥५६६॥

इति भसित रुद्राक्ष । पंचाक्षरी विधान सिद्धिपूर्वक ।
जालियानें शुद्धशैवाची शिवार्चन मुख्य । कर्तव्य होऊनि असें ॥५६७॥

त्याचे ठाई । जैसा मूळाभिषेके रुक्ष । शाखादि उपशाख ।
सकळासी चेतनासुख । प्रतिफळित होय ॥५६८॥

प्राणापानअहारलेशें । सकळ संमोह इंद्रियतोषें ।
चेतनानंद परितोषें । जयापरी ॥५६९॥

तैसे येक शिवार्चनमात्रे । सकळ देवता उत्तरोत्तरें ।
संतुष्ट होती साचारें । तया कारणें ॥५७०॥

चंद्रार्कमंडळवन्हि गंगातिरी । सकळ पुस्तकभरी ।
शालिग्रामादि पूजाभीतरीं । अधिष्ठान ॥५७१॥

तेही विषरत्नमुख । म्हणोनि देवतादि अखिल लोक ।
शिवलिंगपूजक । जाणावे येथें ॥५७२॥

ते कैसे म्हणीतले तरी । कीटक मनुष्याभीतरी ।
तया तया परी । सकळ वर्ग ॥५७३॥

स्वयंभुलिंग बाणलिंग । चळलिंग संकीर्गलिंग ।
अणीक प्राणलिंग । म्हणोनि लिंगपंचक ॥५७४॥

आपआपुल्या शक्त्यानुसार । लिंगार्चनी तत्पर ।
म्हणोनी असती अंगिकार । करावा सद्भावें ॥५७५॥

अणीक तें शिवपूजन । विधानासी देशकाळस्थान ।
द्रव्यादीक म्हणोन । इति प्रयोजनादिक ॥५७६॥

तांत्रीक वैदिक । म्हणोनि द्विविध पूजा पृथक ।
अंतशौचादिक । बाह्यशुची ॥५७७॥

म्हणोनियां भिन्न । द्विविध शुचीभेदलक्षण ।
शोषण दाहन । प्लवनादि क्रियां ॥५७८॥

आत्मशुद्धि स्थानशुद्धि । द्रव्यशुद्धी लिंगशुद्धी ।
मंत्रशुद्धी म्हणोनि पंचविधशुद्धी । विस्तारावें ॥५७९॥

त्याचे ठाई । शौचाचमनस्थान । भस्मरुद्राक्षधारण ।
कवचमंत्रकळान्यासध्यान । आदि करुनी ॥५८०॥

विस्तार समस्त । परिक्रमें रचित ।
करणे यथार्थ । तो आत्मशुद्धी म्हणवी ॥५८१॥

संमार्जनअनुलेपनवर्णक । गंधपुष्पधूपदीपक ।
निर्मळोपकरणे भरिजे चौक । ते स्थानशुद्धी म्हणवी ॥५८२॥

जळगंधतांबूलपुष्पानें । निरक्षूनि भस्म मंत्राने ।
संप्रोक्षण करणें । ते स्थानशुद्धी म्हणवी ॥५८३॥

अनामिकामध्यमामध्यस्थानी । निर्मळ कुसुमे धरुनी ।
अंगुष्ठ आणि तर्जनी । तयाने प्रथम ॥५८४॥

निर्माल्य त्यजणें । लिंगपीठ तया पुष्पानें ।
प्रक्षाळण करणें । ते लिंगशुद्धी म्हणवी ॥५८५॥

सकळ पूजार्थ करुनी । ओं नम शिवाय स्वाहाया वचनी ।
उच्चारणें ते मंत्रशुद्धी म्हणोनी । जाणावे निरुतें ॥५८६॥

अणीक तें अस्त्रमुद्रा । चक्रमुद्रा महामुद्रा ।
शोधनमुद्रा संहारमुद्रा । इति पंचकअस्त्रे मुख्य ॥५८७॥

सुरभिमुद्रा द्रव्यमुद्रा । मुकुलिकमुद्रा पद्ममुद्रा ।
शशकर्णमुद्रा शक्तिमुद्रा । बीजमुद्रादि ॥५८८॥

शांतिमुद्रा अवसानमुद्रा । आणि मनोहरमुद्रा ।
गायत्रीमुद्रा कळकंठमुद्रा । म्हणोनी ॥५८९॥

शूळमुद्रा नमस्कारमुद्रा । योनिमुद्रा विछोटणमुद्रा ।
आणि अच्छादनमुद्रा । संहारमुद्रादि ॥५९०॥

म्हणोनि इति सकळ मुद्राचें । लक्षण जाणोनि साचें ।
तया तया योगक्रियेचे । ठाई प्रयोगावें ॥५९१॥

अणीक कूर्म अनंत सिंह पद्म । विमळ योगादि स्थोम ।
पीठिकेचे ठाई उत्तम । मुख्य जाहले सिंहासन ॥५९२॥

श्वेतरक्तपीत । शामवर्णसहित ।
सिंहाकार परियुक्त । रचित जाले ॥५९३॥

धर्मज्ञानवैराग्यऐश्वर्यादिक । म्हणोनि परिक्रमे चतुष्क ।
अग्नि आदि अधिक । पादचतुष्टय ॥५९४॥

राजाव्रत प्रभारूपे अधर्म अज्ञान । अवैराग्य अनैश्वर्य म्हणोन ।
परिक्रमे पूर्वादि करुन । पादचतुर्थ ॥५९५॥

पूर्वोक्तादि चतुष्क । पूर्वादि दिशादशक ।
अष्ट परिदिक । तयाचे दळ ॥५९६॥

वामादि भूताचे अनंत । जाले रुद्र तेथ तेथ ।
पूर्वादि समस्त । अष्टदिशाचे केसर ॥५९७॥

वैराग्य ते मध्यकर्णिका स्थिती । वामादि मनोन्मनीआंतु नवविधशक्ति ।
पूर्वादि मध्यअंती । कर्णिकाबीज ॥५९८॥

अणीक तयावरी अग्निमंडळ । आणि रविमंडळ ।
शशिमंडळ । म्हणवी मंडळत्रय ॥५९९॥

तयावरि तमरजसात्विक । गुणत्रयादि विशेख ।
जीवात्मा अंतरात्मा परमात्मैक्य । आत्मत्रय ॥६००॥

तयावरी आत्मतत्त्व । आणि विद्यातत्त्व ।
शिवतत्त्व । इति परिक्रमे ॥६०१॥

सिंहासन उभारणी । तथा परिकल्पोनी ।
ते सिंहासन अग्रस्थानी । शिवलिंगासी ॥६०२॥

आवाहन स्थापन । सन्निधापन सन्निरोधन ।
आणि संमुखीकरण । म्हणिजे क्रिय जें ॥६०३॥

अगीक ते पूजन । आदि करुन ।
पूजाविधान । संपूर्णपर्यंत ॥६०४॥

क्षळपानजळ पुनः पुनः । स्पर्शस्पर्शोन आपण ।
सकळ क्रिया ईश्वरार्पण । म्हणोनि जाणावें ॥६०५॥

आगीक नदीतटाक । कूपाचे ठाईं विशेख ।
स्वादमिश्रलवणादिक । अनुक्रमें ॥६०६॥

उत्तम मध्यम कनिष्ठ म्हणोन । पूजना योग्य होऊन ।
असे परिजीवन । तया भेदें ॥६०७॥

शुभ्रराई कुसुमादिक । दुर्वा कोष्टळा मंच कर्पूरादिक ।
म्हणिजे तया षट्क । पाद्यद्रव्यें ॥६०८॥

कुशाग्र नीळ राई शुभ्र । जवसाळी क्षीर ।
म्हणिजे षट्प्रकार । अर्घ्यद्रव्यें ॥६०९॥

फळ खर्जूर । कोष्ठ कुंकुम येळा कर्पूर ।
म्हणिजे षट्प्रकार । आचमनद्रव्यें ॥६१०॥

पंचगव्य पंचामृतादिक । गोधूमचूर्ण मुद्गचूर्णक ।
गंधादि विशेख । उद्वर्तनद्रव्यें ॥६११॥

मदपरिमय । उष्णादीकमय ।
म्हणिजे उभय । वरि स्नानें ॥६१२॥

गंधोदक पुष्पोदक । सुवर्णोदक रत्नोदक ।
मंत्रोदकादि मुख्य । महास्नानविधानें ॥६१३॥

मृदु शुभ्र गुणयुक्त भाषित मात्रें ।
पट देवांग शुभ्र चित्रादि वस्त्रें ॥६१४॥

सुवर्ण रजतपट छत्र । यज्ञोपवित्र । कंठादि आभरणें ॥६१५॥

चंदन अगर कस्तुर । कर्पूर पत्रज केशर ।
वाळा कोष्ट म्हणिजे अष्ट प्रकार । गंधद्रव्ये ॥६१६॥

जव शुभ्र राई तीळ । तंदुळ मुक्ताफळ ।
म्हणिजे सकळ । अक्षतानें ॥६१७॥

शुभ्र रक्त कृष्ण वर्णानुक्रमे नदी । अवर्त कमळ नीळोत्पळादि ।
सात्वीक राजस तामस वृद्धी । पुष्प जातीनें ॥६१८॥

दुर्वा आणि तुळसी । बिल्वादीक विशेषी ।
नाना जाती शशी । पत्रद्रव्यानें ॥६१९॥

कृष्णागर श्वेतागर । गुग्गुल श्रीगंध कुंकुमागर ।
बिल्वफळ घृत मधुगाळ कर्पूर । म्हणिजे दशगंधधूप ॥६२०॥

तैलादिक । आणि घृतादिक ।
कर्पूरदिपक । साधनानें ॥६२१॥

हरिद्रान्न सारान्न मुद्रान्न । कुशरान्न दध्यान्न गुडान्न ।
म्हणिजे षड्विध अन्न । नैवेद्यानें ॥६२२॥

पूग पर्ण चूर्ण । कर्पूर तांबूलादि करुन ।
द्रव्याने भिन्न भिन्न । संपादन कीजे ॥६२३॥

अणीक इति परम पवित्र । सकळ परी मनोहर ।
द्रव्याने उपचार । केलिया मध्यें ॥६२४॥

त्रिविध उपचार । पंचउपचार ।
अष्टउपचार । दशोपचारादि ॥६२५॥

षोडशोपचार । चतुर्विंशति उपचार ।
द्वित्रिंशति उपचार । असती त्याचे ठाई ॥६२६॥

वाहन आसन । पाद्य अर्घ्याचमन स्नान ।
वस्त्र यज्ञोपवीत भूषण । गंधाक्षता ॥६२७॥

पुष्प धूप दीप नैवेद्य मुख वासन । नीराजन दर्पण फळार्पण ।
तांबूल प्रदक्षण । नमस्कारादि ॥६२८॥

स्तोत्र पुराणपठण । छत्र चामर योजना सैन्य ।
संगीत नृत्य वाद्य आत्मार्पण । म्हणिजे इति ॥६२९॥

द्वित्रिंशति । उपचार समस्ती ।
मांत्रीक होउनी श्रद्धाप्रीती । सकळ करावें ॥६३०॥

अणीक इति सकळ । पूजाद्रव्य नाही अनकूळ ।
तरि जळ मंत्र पुष्प मंत्रोदके केवळ । अर्चन करावें ॥६३१॥

ते सकळ सांगीक करुनि निरुतें । जालिया अर्चनातें ।
समान होय सत्यार्थे । तया कारणें ॥६३२॥

पुजकासी श्रद्धाभक्ती । ते मुख्य होउनी असे निरुती ।
ते भक्ती परम चित्ति । ईश्वराचे ठाई ॥६३३॥

श्रवण कीर्तन स्मरण । पादसेवन पूजन वंदन ।
दास्य सख्य आत्मार्पण । म्हणिजे इति ॥६३४॥

नवविधाभक्ति संयोग । जाणोनि पीठस्थ लिंग ।
बाह्यपूजांग । पूजा विस्तारावी ॥६३५॥

अणीक इहलोकी फळइच्छक । जाला ना परलोक ।
फळकामी विशेख । जालातरी ॥६३६॥

अथवा सकळीक । परी जनलोक ।
तयासी हितचिंतक । जालातरी ॥६३७॥

सकल बाह्यद्रव्यानें । शिवलिंगपूजाविधाने ।
कृतनिश्चयें करणें । म्हणोनी जाणावें ॥६३८॥

आणि निष्कामें केली तरी । मोक्षाधिकारी यामि साचारी ।
मुख्य ज्ञानमय अभ्यंतरी । पूजा कर्तव्य असे ॥६३९॥

तया पूजोपचारांत उपचार । तो उपचार देवतामय गुणाकार ।
अरोपूनि विस्तार । करावया योग्य ॥६४०॥

ते कैसे म्हणीतले तरी । प्रथम अंतरंगाभीतरी ।
अनुसंधानाचे परि । रचनारंभ ॥६४१॥

शिवधर्म तो कंद सज्ञान ते नाळ । अष्टमहदैश्वर्य ते दळ ।
रुद्र ईश्वरादिक केशर सकळ । वैराग्य ते कर्णिका ॥६४२॥

चंद्रप्रभामय होऊनी । मिरवे स्वतेज प्रभेचेनि ।
हृत्कमळिचे सोमसूर्याग्नी । मंडळत्रयमध्यांतु ॥६४३॥

सत् म्हणिजे दिव्यमूर्ति । सद म्हणिजे कायाकांती ।
आनंद म्हणिजे अति । लावण्यानें ॥६४४॥

तत्त्व परिकल्पित । आभरणादीक मुख्यत्व ।
सर्व अळंकृत । होऊनियां ॥६४५॥

स्फटिकघटांतू दीपकन्यायें । बाह्यांतरी प्रभामय ।
असे ईश्वरविग्रह । तयासी परिभावावें ॥६४६॥

अणीक सर्वाधार ईश्वर कारण । म्हणोनि बुद्धि ते आसन ।
परमात्मापूर्ण म्हणोन । ते आवाहन ॥६४७॥

जगत नास्ति शिवसमान म्हणोनि । शिवाचे श्रीपाद जाणोनि ।
निश्चळ भाव जाणिवेचेनि । तें पाद्य ॥६४८॥

सुखांबुधीसमान । श्रीशंभू म्हणोन ।
अनुसंधान । तेचि अर्घ्य ॥६४९॥

परमपवित्रस्वरूप म्हणोन । सद्भाव जाणीव तेचि आगमन ।
नित्यनिर्मळ ईश्वर आपण । म्हणोनि उपलब्धी ते स्नान ॥६५०॥

जगत्सर्व अतिक्रमुन । शुद्धविद्या तें वस्त्रप्रावर्ण ।
त्रिगुणातीत सज्ञान । ते यज्ञोपवीत ॥६५१॥

चैतन्य ते जगातें । अळंकार निरुतें ।
ह्मणोनि प्रतिभासतें । आभरण ॥६५२॥

शुद्ध चित्शक्ती ते अनुलेपनता । कारुण्य त्या अक्षता ।
प्रणवात्मक सत्या । वचन ते पुष्प ॥६५३॥

विषयवासना विलक्षण तो धूप । जगद्विवर्तरूप ।
धरूनि प्रज्वलित स्वरूप । परंज्योति तो दीपक ॥६५४॥

अखिल जगत । ते अंतर्गर्भीकृत ।
करूनि असे आत्मा तो नित्यतृप्त । तृप्ती म्हणिजें ॥६५५॥

संविती ते नवदान । त्रिगुण अंतर घेऊन ।
असे ज्ञप्तिमात्र आपण । ते तांबूल ॥६५६॥

सोहंभाव ते प्रदक्षणा । सकळ तत्वे अधिक्रमूनि जाणा ।
रहणीसम समान । तो निज नमस्कार ॥६५७॥

ऐसी ऐक्यस्थिती । ते विसर्जन म्हणोनि इति ।
उपचारे पूजा अति । अंतरी विस्तारावी ॥६५८॥

अणीक ऐसे शिवार्चन । हृत्कमळकर्णिकासमाधान ।
गुरूने दीधलें इष्टलिंग कारण । ते सिंहासनाचे ठाई ॥६५९॥

पूजाविधाने यथार्थ । करावी आत्मार्थ ।
ते पूजेसी विधियुक्त । भेदादीक ॥६६०॥

ग्रामा नदीतीरीं । क्षेत्राचे ठाई तरी ।
अथवा देवदानवमानवादि परी । तयापासून ॥६६१॥

प्रतिष्ठितलिंगसन्निधी । करणे ते परमार्थ पूजाविधी ।
न उबगत स्वसंमंधी । अचंरत असतां ॥६६२॥

ते परमार्थपुजेआंतु ईश्वर । अवरण जाले वृषभ भास्कर वीरभद्र ।
मातृका स्कंद क्षेत्रपाळ ब्रह्मा विष्णु रुद्र । म्हणिजे देवता ॥६६३॥

तया तयाचे स्थानक्रम जाणोनि भिन्न । स्थापितात्मक आराधन ।
विष्णवादि देवताचे भजन । त्यजूनियां ॥६६४॥

आपुले पुजात्रे इष्टलिंग । ते चोरादि कश्चिद्वियोग ।
जालियां ते अले ते चांग । न साधे तरी ॥६६५॥

येकलक्ष अघोरजप करुनी । शुद्धात्मा होउनी ।
वरी आचार्यापासुनी । विधियुक्तक्रमे ॥६६६॥

पुनः पावोनियां इष्टलिंग । व्रत नेमादीक भंग ।
लोपवी वियोग । न होय तैसे ॥६६७॥

अष्टोत्तरशतवरी । अक्षेपे गायत्री ।
जपमात्रे परी । शुद्धि पावोनी ॥६६८॥

अगीक परमपवित्र । जाले मुख्य विशेषात्कार ।
शिवपादोदकस्विकार । शिवप्रसादअन्नसेवन ॥६६९॥

शिवप्रसादअंबुपान । शिवनिर्माल्यदळकुशाधारण ।
शिवार्पण सेवन । तांबूलादीक ॥६७०॥

तोचि सद्ब्राह्मण । अग्रजासी कारण ।
विशिष्ट आपण । कर्ता म्हणवी ॥६७१॥

ना तरी आन पापात्मियासी । आणि पाखांडियासी ।
शापदग्धियासी । शिवसंस्कारहीना ॥६७२॥

नास्तीक जनातें । वेदबाह्यजातें ।
शिवप्रसाद योग्य नव्हे सत्यार्थे । म्हणोनी जाणावे ॥६७३॥

इति सकळ सक्रियेने बुद्ध । निर्मळ अंतःकरण विशुद्ध ।
होउनि असे तो शुद्ध । शैव म्हणवी ॥६७४॥

अणीक परमेश्वरे विख्यात । निर्मित केला जगाआंत ।
चर्मशरीरी असोनि सकळ शैवांत । अतिविशिष्ट म्हणवी ॥६७५॥

इतर शैवाऐसे सर्वथा । क्रिया बहू अल्पफळ न पवतां ।
अल्पक्रियेने अनंता । फळ पावणें ॥६७६॥

म्हणऊनियां आदरे । शिवदीक्षेसी निर्धारे ।
विश्वासोनि श्रद्धाभरें । नैष्टिक्यपणें ॥६७७॥

स्नान भोजन निद्रा जागरण । मळमूत्रादि विसर्जना ।
काळी अशौचभावना । मनातु नसतां ॥६७८॥

सदासर्वदा लिंगांग । समंध करुनि लिंगभोग ।
उपभोगी होउनियां स्वइष्टलिंग । त्याचे ठाई ॥६७९॥

आवाहन विसर्जन । क्रियेसी अकर्ता होउन ।
त्रिकाळी लिंगार्चनी सावधान । आसक्तपणें ॥६८०॥

लिंगलोप व्रतलोपादिक । तेथे प्राणत्याग ना तरी आनयेक ।
प्रायश्चितासी अश्रद्धिक । होऊनि असे ॥६८१॥

गुरुनिंदा शिवनंदा । जंगमनिंदा प्रसादनिंदा ।
पादोदकनिंदा भस्मधारणादि निंदा । म्हणोनिया ॥६८२॥

शिवागम शिवक्षेत्र । शिवजन शिवाचार ।
निंदालेशमात्र । न शिणावें ॥६८३॥

विद्यादि देवताजन । सकळ अलक्ष करून ।
बाह्यशिवलिंग लांछन । नसे तया भक्तियुक्त ॥६८४॥

येकासन शैन यान । संपर्क सहभोजन ।
न करिता सन्निधान । असंगी होऊनि असे ॥ ६८५॥

अमृत अस्थीरवाक्य । वचन पंक्तिभेद उदासक ।
निर्दया मणिजे इति षट्क । अंतर्भाव त्यजुनी ॥६८६॥

शिवमहेश्वरादिक । देखना उठोनि सन्मुख ।
होऊनियां पूर्वक । तयासंगे ॥६८७॥

संचारण प्रियवचन । स्वआसनी बैसऊन ।
अन्नपान संपूर्ण । युक्त होऊनि वर्ते ॥६८८॥

इति मुक्तिसोपान । सप्तकप्रयोजन ।
कर्मयुक्त होउन । असे निरुता ॥६८९॥

जातिसूतक जनसूतक । प्रेतसूतक उच्छिष्टसूतक ।
राजसूतक म्हणिजे पंचक । सूतकाविरहीत ॥६९०॥

लिंगाचार सदाचार । भृत्याचार शिवाचार ।
गणाचार म्हणिजे पंचाचार । नैष्टिक्य होऊनी ॥६९१॥

दास्य दास्यत्व । भृत्य वीरभृत्यत्व ।
समाचारत्व । सकळ दोषत्वादि ॥६९२॥

म्हणिजे इति । षड्विधजनसंगती ।
परियुक्त अती । होऊनि असे ॥६९३॥

देशकालकल्पितादिक । आचार लंघूनि लौकिक ।
शीळयुक्त होउनि पृथक । स्वतंत्र विचरे ॥६९४॥

शिवात्मकसंयोगे यथार्थ । होउनि भेदभ्रांतिरहित ।
उपनिषद्वाक्यजनित । विद्येचे ठाई ॥६९५॥

असती शैव अतिरत । त्यालागी होउनियां तत्संज्ञायुक्त ।
असे जो पूज्यत्वे विख्यात । तो वीरशैव निरुता ॥६९६॥

आणीक तया वीरशैवाचेनि । क्रियाभेदेकरुनि ।
सामान्यवीरशैव म्हणोनी । असे तेथें ॥६९७॥

निराभासीवीरशैव म्हणोनी । विशेषे वीरशैव जाणोनी ।
त्रिविधप्रकारे होउनी । असे त्याचे ठाई ॥६९८॥

श्री गुरुचिया कृपालेशें । हस्तकमस्तकादि संयोगवशे ।
विभूतिपट्ट शिवमंत्रोपदेशें । लिंगांगसंगी होउनी ॥६९९॥

हस्तक मस्तक कंठ वक्ष । आणि वक्षस्थळादिक ।
तये त्रयशिवलिंगधारक । होउनियां ॥७००॥

येककाळपूजन । अथवा त्रिकाळ निपुण ।
करी शिवार्चन । यथायुक्त ॥७०१॥

गुरुलिंग जंगम भसित । त्याचे ठाई भक्तियुक्त ।
होउनि असे तो विख्यात । सामान्यवीरशैव म्हणवी ॥७०२॥

यानंतरे शांतिदांत्यादि करुनी । साधनसंपन्न होउनी ।
श्रीगुरुचे चरणी । नमन साष्टांगी ॥७०३॥

शुद्धात्मा वरशिष्य । शुभ काळ देश ।
परिक्षूनि विशेष । शिष्य होआवया ॥७०४॥

वरि आचार्यसंप्रदाय सिद्ध । सकळसद्गुणयुक्त विबुध ।
तया श्रीगुरुचे पाद । सन्निध होउनिया ॥७०५॥

मग तया श्रीगुरूचियां । अनुमत्ते करूनियां ।
शिवलिंग पुजावया । तत्परायण जाला ॥७०६॥

कीर्तिमय जे चतुर्विध ऋत्विजगण । तया स्नानधवलांबराभरण ।
गंधपुष्पादि करून । अळंकृत ॥७०७॥

वरि तया श्रीगुरूचे अज्ञेकरुनी । येकरात्रि क्षीरआहारे असोनी ।
वरी प्रातसमई करुनी । दंतधावन ॥७०८॥

सारूनि मंगळस्नान । करूनि धवलांबरपरिधान ।
भसितउद्धुलन । अवधारुनी ॥७०९॥

त्रिपुंड्रधारण विस्तारुनी । रुद्राक्षमाळिका धरुनी ।
भूषण करुनी । सुवर्णालंकार ॥७१०॥

मग येउनी आचार्या जवळिके । भय भक्ति इष्टमंत्रपूर्वके ।
विनययुक्तभावे येकें । सुवर्णपुष्पादि ॥७११॥

वित्तानुसार उपचारें । श्रीगुरूचि सविस्तारें ।
पूजा प्रेमप्रीतिभरें । करूनियां ॥७१२॥

करी गंधपुष्पादिकें ऋत्विजपूजनी । मग श्रीमुख्य करुनी ।
शिवमहेश्वर वंदने समर्पुनी । विभूति विडा ॥७१३॥

आणीक खनन दाहन । शोधन संप्रोक्षण ।
मर्दन लेपन । म्हणिजे षट्क्रमें ॥७१४॥

तारणी कारणी ताट तोरण । कुसुम पल्लवादि तोरण ।
नानापुष्प संकीर्ण । कर्दळिस्तंभ फळावळि ॥७१५॥

दीक्षामंडप उभारुनी । धूपधूम्र समर्पूनी ।
परिशोभन करुनी । त्या मनोहर मंडपातु ॥७१६॥

गोचर्ममात्र भूचौक सविस्तार । भरूनि गोचरघृत गोक्षीर ।
गोदुधी म्हणिजे षट्प्रकार । सामर्जनादि करुनी ॥७१७॥

आणीक तया चौकामध्ये प्रवाळ मौक्तिक ।
शुभ्रपाषाण सुवर्ण सिसे तांम्रक ।
तंडुलादि चूर्णाने पूर्वक । अष्टदळकमळ रचूनी ॥७१८॥

वरि तयासी आवरण शंख चक्र । शूल डमरू परशु घंटा छत्र ।
चामरें वृषभचरणादी विचित्र । वर्णाने भरिजे ॥७१९॥

तयावरी तीळ । जिरे गोधूम तंडुल ।
माषादि पंचधान्ये का तंदुळ । विशेष अणुनी ॥७२०॥

बत्तीसअंगुळप्रमाण । चतुर्थदिकी समान ।
भागे पसरून । तयावरी ॥७२१॥

तीर्थांबु भरुनी पूर्ण । सुवर्णादि नूतन ।
पंचकळस पूर्व दक्षिण । पश्चिमोत्तर मध्यक्रमें ॥७२२॥

आचार्य स्थापून । तया सकळासी भिन्न भिन्न ।
वस्त्रादिके नूतन । वेष्टूनियां ॥७२३॥

नवपंचतंतू करूनी । कळसा परीवेष्टुनी ।
तयांतु घालूनी । सुवर्णादिक ॥७२४॥

अणीक च्युतपल्लव तोमर । पूग पुष्प दूर्वांकूर ।
नागवेलीदळे सविस्तार । अळंकारुनी ॥७२५॥

वरी पूर्वादि दिशापंचक । स्थापीत कळसादिक ।
त्याचे ठाई विशेख । अनुक्रमें ॥७२६॥

सद्योजात वामदेव अघोर तत्पुरुष । ईशानादि पंचब्रह्मात्मक ।
म्हणोनी असे पूर्वक । परिभाउनी ॥७.७॥

अणीक तया कळसांतु परशिव भजोनी ।
वरी अग्रासनी पूर्वाभिमुख होउनी ।

परशिवेश्वर आसनीं । बैसला आचार्या ॥७२८॥

मध्यकळस येक सोडुनी । वरी पूर्वादि करुनी ।
चतुर्थकळसस्थानी । अनुक्रमें ॥७२९॥

रेवणसिद्ध मराळसिद्ध । येकोराम पंडिताराध्य ।
आचार्यसंप्रदाय शुद्ध । तयालागून ॥७३०॥

आणि भिन्न भिन्न । मठ पीठ आसन ।
लक्षित लक्षण । तया ऋत्विजगणासी ॥७३१॥

बैसऊनि अर्घ्यगंधादिके । पुष्पाक्षताने विशेखे ।
श्रीमत्पंचाक्षरीमंत्रपूर्वके । भजोनियां ॥७३२॥

यानंतरें देहअर्थप्राण । श्रीगुरुसी करूनि समर्पण ।
साष्टांगप्रणीत होऊन । शिष्य गुरुचे अग्रे ॥७३३॥

होउनियां उत्तराभिमुख । श्रीगुरुचे दक्षिणभागे चौक ।
सन्निधी स्वस्तिक । मंडळावरी ॥७३४॥

अमळशरीरी होउनी । नासाग्री ध्यान धरुनी ।
करकमळ जोडूनी । पद्मासनी बैसावें ॥७३५॥

शिवमंत्रउच्चारण । शिवध्यान धरून ।
लक्षणयुक्त होऊन । बैसला तो शिष्य ॥७३६॥

मग तया श्रीगुरुनें । आपुलेनि करणें ।
कृपामय दृष्टीनें । अवलोकिलें ॥७३७॥

वरी सकळ महेश्वरानीं । अशिर्वाद देउनी ।
मंगळस्वरुपध्वनी । उच्चारण करी ते काळीं ॥७३८॥

आचार्यादि मुख्य । ऋत्विजगणी कळसादिक ।
आपुले आपुले पृथक । अनुक्रमे उचलुनी ॥७३९॥

वरी ते कळसोदक । गुरुआदि आचार्यादि चतुष्क ।
सकळानी शिष्याचे मस्तक । स्थानी संप्रोक्षुनी ॥७४०॥

उपरि मागुतेंनी । स्थानस्थानी ।
सकळ स्थापुनी । प्रथम ऐसें ॥७४१॥

पुनः त्याचि क्रमें उचलुनी । कळसोदक दूर्वांकुरे करूनी ।
प्रथम ऐसे सिंपुनी । शिष्याचे मस्तकी ॥७४२॥

ऐसे त्रिविध वेळा अघमर्षण  करूनियां स्नान ।
वरि तया श्रीगुरुनें आपण । तया शिष्याचें ॥७४३॥

ललाट स्थानस्थानी । शिवमंत्रे अभिमंत्रुनी ।
श्रीमद्विभूतिधारण धरूनी । विधिलिखित परिहरिलें ॥७४३॥

कायाशुद्धी । आत्मशुद्धी ।
करूनी निष्कळशुद्धी । शुद्धात्मा केला ॥७४५॥

वरी तो श्रीगुरूनाथ । आपुला दक्षिणहस्त ।
गंधपुष्पअक्षतासहित । शिवमंत्रे अर्चुनी ॥७४६॥

तेजोन्मय शिवहस्तक । तया शिष्याचे मस्तक ।
स्थानी मूळमंत्रोच्चारपूर्वक । नेमस्त करूनी ॥७४७॥

शिष्याचे मस्तकीं अधिष्ठाय स्वरूपक । क्रियाशक्त्यात्मक ।
बिंदु म्हणिजे पीठयुक्त पूर्वक । लिंगलक्षण ॥७४८॥

चित्शक्ती म्हणिजे का कारण । युक्ती अधिष्ठान ।
अपण तो परशिव अव्हानुन । संयोग करावा ॥७४ ॥

लिंगप्रतिष्ठायुक्त । करूनी वरी पूर्वोक्त ।
मानसपूजा यथार्थ । विस्तारावी ॥७५०॥

उपरि आचार्याने दोन्हीं । आपुले करसंपुष्ट जोडुनी ।
शिष्या सदां असावे संयोग करूनी । कृतनिश्चये ॥७५१॥

ईश्वर करूनियां भिन्न । कदां न ठेविजे अन्योन्य ।
भावे असिजे म्हणोनि निरोपण । ते देहदीक्षा म्हणत्री ॥७५२॥

आणीक प्रणवपंचाक्षरी । मंत्र शिष्याच्या श्रवणांतरी ।
संज्ञामात्रें उच्चारूनि वरी । तया मंत्राचें ॥७५३॥

ऋषि छंद अधिदेवता अंगादिक । सकल विचारपूर्वक ।
निरोपण सांगीक । ते मंत्रदीक्षा म्हणवी ॥७५४॥

अणीक मंत्रानुसाधानपूर्वक । होऊनियां असे तया या शिष्याचे मस्तक ।
स्थानीं ज्ञानक्रियात्मक । शिवलिंग ॥७५५॥

ते श्रीगुरुनाथें । यथाक्रमें निरुतें ।
निजात्मवस्तूतें । आकर्षुनी ॥७५६॥

दृष्टिगोचरादिपूर्वक । अणिले ते स्फुटिक ।
सुवर्णशिळारत्नादि मुख्य । लिंगाचे ठाई ॥७५७॥

लिंगअधिक्यरूप । जाले तरी मृत्युसमीप ।
शक्तिअधिक्य स्वरूप । तरी दरिद्रता ॥७५८॥

लिंगशक्ति समानत्व । भागे भोग मोक्ष ।
लाभे म्हणोनि बुद्धित्व । जाणावें लिंगाचे ठाई ॥७५९॥

लिंगाचे वृत्त प्रदक्षणाकार । भगवंते नेमूनियां सूत्र ।
ते सूत्र गोमुखाचे अग्र । लिंगाचे मस्तक प ॥७६०॥

पर्यंत नेमितां । अणिली समता ।
परि मागुतेनि यथा । क्रमे सूत्र ॥७६१॥

शक्ति अर्द्धपीठ उमाणुनी । ऊर्ध्वे अर्धपीठ लिंगाचे मस्तक नेमुनी ।
वरि गोसूत्रार्द्धे गोमुख प्रमाणुनी । समान जाले तरी ॥७६२॥

ते पंचसूत्रात्मक । कांति मय जातिशिळादिक ।
पीठ लिंगांतु म्हणवी मुख्य । ते लिंगस्थळ ॥७६३॥

तीर्थांवु पंचगव्य भसित । करोनिया मिश्रित ।
उदकें पूर्णभरित । त्रयकुंभ भरूनी ॥७६४॥

प्रत्यक् येक येक रात्री । लिंग ठेवावे त्रिविधलिंग भीतरीं ।
अष्टोत्तरशत जपोनी पंचाक्षरीं । वरी अघमर्षण करावें ॥७६५॥

वरी चौथे रात्रीं पंचकलश स्थापुनी । तयाचे उत्तर दिशेसी धरणी ।
परिशुद्ध करूनी । अष्टदळकमळ करावें ॥७६६॥

आणीक सप्तहस्त सूक्ष्मवस्त्र अणुनी । तया कमळावरी हस्तयेक विस्तारुनी ।
तयावरी पसरूनी । सदां ठेवावें ॥७६७॥

तयावरी नलिनी रचुनी । वरी वस्त्र अच्छादुनी ।
तयावरी पसरुनी । तीळ विशेष ॥७६८॥

वरी अष्टदळपद्म लेहोनी । वरी वस्त्र विस्तारूनी ।
तयावरी पसरुनी । गोधूम समान ॥७६९॥

वरी अष्टदळवारिज निर्मुनी । वरी वस्त्र आच्छादुनीं ।
तयावरी पसरूनी । व्रीही पूर्ण ॥७७०॥

वरी अष्टदळकमळ रचूनि । वरी वस्त्र विस्तारुनी ।
तयावरी तंदुळ पसरुनी । वरी वस्त्र विस्तारिजें ॥७७१॥

तयावरी च्युत बिल्वादिक । अपामार्ग अमळक ।
कुश पंचपक्षी विशेख । विस्तारिजें ॥७७२॥

वरी पसरुनियां वस्त्र । ऐसे सप्त अंतर ।
पूर्वक आधार । परि कल्पिजे ॥७७३॥

तयावरी लिंगस्थापना करुनी । गोमुख उत्तरभागे ठेवुनी ।
सत्क्रियेने संस्कारुनी । वरि यानंतरे ॥७७४॥

प्राणायाम करूनी सहस्त्र । येक पूर्वक मूळ पंचमंत्र ।
करूनि उच्चार । वरि या लिंगस्थळासी ॥७७५॥

मातृकान्यास । कळान्यास मंत्रन्यास ।
विधाने विशेष । प्राणप्रतिष्ठा करावी ॥७७६॥

उपरि कलशोदकें करून । करावे जळस्नान ।
वरी अष्टविधार्चन । समर्पावें ॥७७७॥

या प्रकारे परिशुद्धमय । जालिया लिंगासी आचार्य ।
वामकरतळी आपुलियें । घेउनियां ॥७७८॥

उपरी पूर्वोक्त । अनुक्रमे दृष्टिस्थित ।
शिवकल्प प्रतिष्ठित । करूनि निकी ॥७७९॥

वरि तया शिष्यालागुनी । अयं मे हस्ते भगवान्ह्मणोनी ।
श्रुतिसिद्धवचनी । वामकरतळांतु ॥७८०॥

गोमुख वामभाग । करूनी शिवलिंग ।
स्थापूनी करणे संयोग । ते क्रियादीक्षा म्हणवी ॥७८१॥

अणीक तो श्रीगुरुनाथ । स्वशिष्यासी बैसउनी समीपस्थ ।
अरे पुत्रा तुझा प्राण सत्य । हेचि आपण ॥७८२॥

तत्वातीत परवस्तुसमान । हरिब्रह्मादिकालागुन ।
अभेद निजतत्वधन । ते हेचि आपण पै ॥७८३॥

हे तुवा निमिष्यार्द्ध कदांचित । तुझिया शरीरापासाव विरहित ।
वियोग नव्हे तैंसे अखंडित । सावधान धरावें ॥७८४॥

त्रिकाळ अर्चन । न चुके तैसे कीजे निपुण ।
लिंगार्पित विलक्षण । येकही न स्विकारावे ॥७८५॥

भोगादीक समस्त । वर मोक्षसहित ।
तुज बंदीजन सत्य । म्हणोनि विश्वासावें ॥७८६॥

सकळ फळाशा त्यजुनी । नित्यसुखी होउनी ।
सत्य हेचि म्हणोनि । दृढ धरावें ॥७८७॥

इति सकळ शैवस्थोम । क्रियेआतु उपदेशिले उत्तम ।
हे वीरशैवदीक्षाक्रम । म्हणोनी जाणावें ॥७८८॥

आणीक आज्ञादीक्षा । उपमादीक्षा ।
स्वस्तिकरोहण कलशाभिषेका । विभूतिपट्टा ॥७८९॥

लिंगायित । आणि लिंगसाहित्य ।
म्हणिजे सप्त । विध होउनि असे ॥७९०॥

त्याचे ठाई । श्रीगुरु तो आपण । आपुली अज्ञा शिष्यालागून ।
करी प्रतिपादन । ते अग्निदीक्षा म्हणवी ॥७९१॥

पुरातनाचेनि मत्तें । समाचार सन्मत्तें ।
सदृश्य होउनि करणे तें । उपमादीक्षा म्हणवी ॥७९२॥

स्वस्तीक म्हणजे मंडळावरी । शिष्य वैसउनि उपरी ।
मंत्रन्यासादिके करणे तत्र शरीरीं । ते स्वस्तिरोहण म्हणवी ॥७९३॥

पंचकलशोदके करून । तया शिष्यालागुन ।
करविजे स्नान । ते कलशाभिषेक म्हणवी ॥७९४॥

आगमोक्त स्थानस्थान । ते ते मंत्र उच्चारुन ।
करणे विभूतिधारण । ते विभूतीपट्ट म्हणवी ॥७९५॥

आचार्याने आपण शिष्याते । द्यावया योग्य शिवलिंगातें ।
अर्चूनि शिष्यासी धारण तें । लिंगाईत म्हणवी ॥७९६॥

तया श्रीगुरुनाथानें । दिल्हे लिंग शिष्यानें ।
सावधानें उत्तमअंगस्थानी धरणें । ते लिंगसाहित्या म्हणवी ॥७९७॥

इति शास्त्रोक्त क्रमाने । सांगीक शिवलिंगदीक्षाविधाने ।
लिंगांगसमंधी जाला आपण । विशेषवीरशैव ॥७९८॥

तो शिवलिंगपूजा करी । ते कैसे म्हणीतले तरी ।
सांगिजेल परी । अनुक्रमेंकरूनी ॥७९९॥

श्रेष्ठ गुरु जे विधि आचरती । तेचि आचारण इतर करिती ।
तो म्हणोनि जगासी हितोपदेशप्राप्ती । फळ पावावया निमित्य ॥८००॥

अपण असे नित्य निर्मळ । परि मंत्रन्यासादीक सकळ ।
करी सांगीक सकळ केवळ । शिवलिंगार्चन ॥८०१॥

त्याचे ठाई । ओं हां अनंत शक्ती । धाम्ने ज्योतिरूपायेति ।
शिवस्त्राय फट् म्हणोनि इति । येणे मंत्रे शुद्धि आचरोनि ॥८०२॥

आणीक आपमंत्रेकरून । अभिमंत्रूनि जीवन ।
करचरणमुखसंप्रक्षाळण । करूनी ॥८०३॥

सर्वज्ञाय नमः म्हणोनी । हा मंत्र उच्चारीत वदनी ।
पूजाग्रहस्थानी । प्रवेशावें ॥८०४॥

आणीक ओं ऱ्हीं पृथिव्यात्मने नमः । नित्रृत्तिकलात्मने नमः ।
म्हणोनिया मंत्रे उत्तम । स्थानशुद्धी कीजें ॥८०५॥

वरि श्रियाय स्वाहा म्हणोनी । हा मंत्रोच्चार करूनी ।
पूर्वोत्तरमुख तरी होउनी । सुखासनी बैसावें ॥८०६॥

वरी औं ऱ्हौं ईशानाय नमः म्हणोनि । हिया मंत्रेकरूनी ।
दक्षिणकराचेनि । मध्यमांगुळी ॥८०७॥

तृतीय संयोग करूनी । श्रीमद्विभूति अधरी आंतुनी ।
अनामिकांगुष्ठाचेनि । घेउनियां ।

वरी वामहस्तांत । अंगुष्ठादि अंगुळीने यकारादि नकारांत ।
पंचाक्षरी उच्चारून यथायुक्त । ते विभूती ठेवावी ॥८०८॥

वरी पुनाति य ज़गत्सर्वं । त्रिपुंड्रात्मा सदाशिव ।
ऐश्वर्यप्रतिवीजाय तस्मै । श्रीभस्मने नमः ॥८०९॥

म्हणोनि हिया । मंत्रे करूनियां ।
नमस्कारूनियां । भसितासी ॥८१०॥

वरी दक्षिणकरे अच्छादुनी । दक्षिणमांडीवरी ठेउनी ।
ओं नमः शिवाय म्हणोनी । मूळ मंत्रोनि येकादशवेळा ॥८११॥

अणीक अग्निरिति भस्म । वायुरिति भस्म ॥८१२॥

जळमिति भस्म । स्थळरिति भस्म ।
व्योमेति भस्म । सर्वं हवाइदं भस्म ॥८१३॥

मन एतानि । चक्षुषं भस्मानि ।
म्हणउनि । या मंत्रे तरी ॥८१४॥

अणीक मानस्तोक म्हणउन ।
या मंत्रे हस्त । उचलुनी ॥८१५॥

मग ते विभूती ओं ऱ्हौं यां शिरसि । ओं ऱ्हौं वां म्हणोनि गुह्यस्थानी ।
ओं ऱ्हूं नं सद्यः म्हणोनि पादस्थानी । सर्वांगी संप्रोक्षुनीयां ॥८१६॥

अणीक आचमन करूनि । पुन्हः विभूती घेउनी ।
मूळ मंत्रे येकादशवेळा मंत्रुनी । तया भसितानें ॥८१७॥

ओ ऱ्हौं ईशान म्हणोनि चतुर्थवेळा मुखी ।
ओ ऱ्हौं अघोर म्हणोन अष्टवेळा हृदयी ॥८१८॥

ओं ऱ्हू वामदेव म्हणून त्रयोदशवेळा गुह्यप्रदेशी ।
ओं ऱ्हीं सद्यो। म्हणून अष्टवेळा। पादादिसर्वांग उद्धूलन करावें ॥८१९॥

अणीक भसित । जळमिश्रित ।
करूनि पूर्वोक्त । मूर्द्धनी ॥८२०॥

ललाटादि स्थानी । त्र्यायुषमंत्रेकरूनी ।
धरावया योग्य । मंत्र म्हणोनी ॥८२१॥

म्हणोनिया त्र्यंवक । मंत्र उच्चारित पूर्वक ।
विभूतिधारणात्मक । करावे सर्वथा ॥८२२॥

ओं ईशानः शशिन्यै नमः मूर्ध्नि । ओं ईश्वरः अंगदायै नमः पूर्वमूर्ध्नि । ओं ब्रह्माणः ज्येष्ठाय नमः दक्षिणमूर्ध्नि । ओं शिवः मरीच्यै नमः वाममूर्ध्नि ॥ ओं सदाशिवः ज्वलिन्यै नमः पश्चिममूर्ध्नि। ओं तत्पुरुषशांत्यै नमः पूर्ववक्त्रे। ओं महाय। विद्यायै नमः दक्षिणवक्त्रे । ओं तद्रुद्रः प्रतिष्ठाय नमः वाम वक्त्रे । ओ प्रचेतसः निवृत्यै नमः पश्चिमवक्त्रे । ओ ईशान वक्त्राय नमः। ऊर्ध्ववक्त्रे। ओ नमसे नमः हृदये। ओ मोहाय नमः कंठे। ओं अक्षयाय नमः दक्षिणांशे। कनिष्ठायै नमः।

वामांशे । ओ सर्वेसर्वेमृत्यवेनमः । नाभौ । ओं सर्वे मायायै जठरे। ओ नमस्ते अभयाय नमः पृष्ठे। ओं रूपेभ्यः ज्वराय नमः वक्षसि। ओ वामदेवरजाय नमः गुह्ये। ओ ज्येष्ठरक्षायै नमः। लिंगे । ओं रुद्रः रत्यै नमः। दक्षिणोरौ । ओं काल । पाल्यायै नमः। वामोरौ । ओ कलाय कामायै नमः । दक्षजानुनि। ओं विकरणसंयमिने नमः । वामजानुनि । ओं बलाय क्रियायै नमः दक्षिणजंघायां । ओ विकरणे बुध्येनमः वाम जंघायां । ओं बलकार्याय नमः दक्षिणस्फिजी । प्रमथाय धात्र्यै नमः । वामस्फिजी । ओ सर्वभूतग्रामण्यै नमः कृत्यां । ओ मनोमोहिन्यै नमः दक्षपार्श्वे । ओ उन्मनाय नमो तमो महायै नमः वामपार्श्वे । ओ सद्यः सिध्यै नमः दक्षपादे । ओ सद्यः इध्यै नमः वामपादें । ओ भवे द्युतयै नमः दक्षकरे । ओ भवे लक्ष्म्यै नमः । वामकरे । ओ नादिभवे मेधायै नमः घ्राणे । ओं भवकांत्यै नमः । शिरसे । ओ भवः स्वधायै नमः। दक्षबाहवे । ओ उद्भववहृद्यै नमः । वामबाहौ । म्हणोनि इति कलान्यास विस्तारूनि अणिक । ओ ऱ्हां सर्वज्ञ शक्ति धाम्ने हृदयाय नमः ओं ऱ्हीं नित्यतृप्तिशक्तिधाम्ने शिरसे स्वाहा । ओ ऱ्हूं अनादि बोधशक्तिधाम्ने शिखायै वषट् । ओं ऱ्हैं स्वतंत्रशक्तिधाम्ने कवचाय हुं । ओ ऱ्हौं अलुप्तशक्तिधाम्ने नेत्रयाय वौषट् । ओ ऱ्हः अनंतशक्तिधाम्ने अस्त्राय फट् म्हणोनी षडंगन्यास करावा अणीक । औं ऱ्हौं ईशानाय नमः । म्हणोनी शिरसि। ओ ऱ्हैं तत्पुरुष म्हणोनि मुखी। ओ ऱ्हूं अघो म्हणोनि हृदये। ओ ऱ्ही वामदेव म्हणोनि गुह्यस्थानीं । ओ ऱ्हां सद्यः म्हणोनि पादस्थानी इति पंचब्रह्मन्यास करूनि वरि मूर्घ्नि ललाट कंठ हृदय नाभि अनुक्रमे यकारादि नकारांत पंचाक्षरिन्यास करावा। यानंतरें रुद्राक्षस्फुंज स्वच्छ वस्त्रांत ठेउनी । ओ हं श्रं रूत्रंरुं रुंमपि स्त्री मं क्षां क्षमपि क्षौ हं नमः । म्हणोनिया मंत्रे नमस्कारूनि आणीक शिखा शिरस मूर्घ्नि कर्णद्वय कंठ उदर बाहुद्वय मणिबंधद्वय यज्ञोसूत्र वक्षस्थळी अनुक्रमें । ओ श्रीसदाशिवाय नमः । ओ वन्हिसूर्यसोमादिपतये नमः । ओं षट्त्रिंशतत्वात्मकाय परशिवाय नमः। ओं सोमाय नमः । ओ त्र्यंबक कालात्मने श्रीकंठाय नमः ओं श्री कंठादि मूर्त्यात्मकाय श्रीसर्वज्ञाय नमः । ओ सुरवासनादि

षोडशमूर्त्यात्मकाय श्रीकंठाय नमः । ओं श्रीसोमकलात्म
काय श्रीसोमनाथाय नमः । ओं द्वादशादित्याधिष्ठिताय श्री
महादेवाय नमः । ओ केशवादित्याधिपतये उमापतये नमः ।
ओं शतरूद्रविग्रहेश्वरात्मकाय श्रीविश्वेश्वराय नमः । ओं
चतुःषष्टिकलात्मकाय नमः । ओं ऱ्हीं जननस्थानभूतये
सर्वात्मने सर्वकळारूपाय उमापतये नमः । म्हणोनिया मंत्रे
पूर्वोक्तसंख्या अनुक्रमें रूद्राक्षमाळिका धरूनि अणीक ॥
शिवाय नमः रुद्राय नमः पशुपतये नमः नीलकंठाय नमः ।
महेश्वराय नमः हरिकेशाय नमः विरुपाक्षाय नमः । पिनाकिने
नमः । त्रिपुरांतकाय नमः । शंभवे नमः शूळपाणये नमः ।
महादेवाय नमः म्हणोनि द्वादशमंत्रोच्चरणे पुष्पांजली देऊनि
अणीक परशिव तो आपण । नित्य निर्मळ निर्गुण । जाला
तरी हितार्थालागून घृतकठिणन्यायें ॥८२३॥

मूर्तिरूपें उपचार भोग । द्यावयालागि योग्य ।
म्हणऊनियां कारण लिंग । मुळस्थानी पाद ॥८२४॥

लिंग अग्रस्थानी मुख । लिंग पार्श्विभुजादिक ।
लिंग माथापृष्टि म्हणऊनि मुख्य । परिभाऊनी ॥८२५॥

आणीक । ओ ऱ्हीं तत्पुरुषाय नमः म्हणोनि ।
या मंत्रे स्वाभिमुख होऊनी । वरि तया लिंगासी ॥८२६॥

ओं ऱ्हां सद्यः म्हणोनि पाद्यं स्वाहा । ओ ऱ्हीं वामदेव आचमनीयं स्वाहा ।
ओं ऱ्हूं अघोर अर्घ्यं स्वाहा । म्हणोनिया मंत्रे पाद्यादि देऊनि वरी ॥८२७॥

ओं ऱ्हां सद्यः । गोमुत्रं स्वाहा ओं ऱ्ही वामदेवाय नमः ।
गोमयं स्वाहा । ओं ऱ्हूं अघोराय क्षीरं स्वाहा ।

ओं ऱ्हैं तत्पुरुषाय दधि स्वाहा । ओं ऱ्हौं ईशानाय घृतं स्वाहा ।
म्हणोनिया मंत्रे लिंगासी । पंचगव्याभिषेक करूनि वरी ॥८२८॥

अपयस्य मंत्रे म्हणोनि क्षीरेण स्नापयामि । म्हणोनि क्षीरस्नान करुनि ।
वरी सद्यमंत्रे जळस्नान करूनि अणीक ॥८२९॥

दधिमंत्रे करुन ओ दधिं स्नापयामि म्हणोनि दधिस्नान करूनि ।
वरी वाममंत्रे जळस्नान करूनि आणिक ॥८३०॥

शुक्रमसिमंत्रेकरूनि घृतेन स्नापयामि ।
म्हणोनि घृतस्नान करूनि वरी । अघमंत्रे जळस्नान करूनि आणिक ।
मधुमंत्रेकरूनि मधु स्नापयामि म्हणोनि मधुस्नान करूनि वरी ॥८३१॥

तत्मंत्रे जळस्नान करूनि आणिक । शर्करामंत्रे करूनि ।
ओं शर्करां स्नापयामि म्हणोनि शर्करास्नान करूनि वरि ॥८३२॥

ईशमंत्रे जळस्नान करूनि वरी अणीक । पंचामृतअभिषेका नंतरे गोधूमचूर्णे उद्वर्त करून लिंगासि उष्णोदकें स्नान करावें । अणीक । ओं र्‍हौं ईशान म्हणोन गंधोदक देऊनि ओं र्‍हैं तत्पुरुषाय नमः म्हणोनि पुष्पोदक घालूनि । ओं र्‍हूं अघोर मंत्र म्हणोनि सुवर्णोदक समर्पूनि । ओं र्‍हीं वामदेव म्हणोनि रत्नोदक घालूनि । ओं र्‍हां सद्योमंत्र म्हणोनि मूळमंत्रोदक समर्पुनी । ओं र्‍हां र्‍हीं र्‍हूं र्‍हैं र्‍हौं र्‍हः ।

म्हणोनि शिवागममंत्रानें तिलोदकअभिषेक
करून वरि तीर्थोदक घालिजे ॥८३३॥

अणीक तया तीर्थोदके श्रीरूद्र पंचब्रह्म पुरूषसूक्त मूळमंत्रादिके महास्नान की जे । अणीक ओं र्‍हां हृदयाय नमः । म्हणोनिया मंत्रे पाद्याचमन अर्घ्य देऊनि अणीक । अंगुष्ठ अनामिकायोगें विभूति काढून मंत्रोदके कालउनि । ओं र्‍हीं तत्पुरूष म्हणोनिया मंत्रे विभूति लिंगासि धरूनि वरि । ओं र्‍हां हृदयाय नमः वस्त्रं स्वाहा । ओ र्‍हैं कवचाय हुं उपवीतं स्वाहा । ओं र्‍हीं देवाय नमः गंधं स्वाहा। ओं नमः शिवाय नमः पुष्पं स्वाहा । म्हणउनि तया मंत्रे तें द्रव्य समर्पूनि । अणीक । पुष्पाने अंगुष्ठमध्यमाअनामिकाचेनि हराय नमः। पादौ पूजयामि । शंभवे नमः गुल्फौ पूजयामि। शुभाय नमः जानुं पूजयामि । सर्वनिवासाय नमः। ऊरूं पूजयामि। सर्वाश्रयाय नमः कटिं पूजयामि। सर्वरक्षाय नमः। जघनं पूजयामि । दिग्वाससे नमः । मध्यं पूजयामि । नक्षत्रमालिने नमः नाभिं पूजयामि । सर्वेश्वराय नमः कुक्षिं पूजयामि । उमाकांताय नमः । वक्षस्थलं पूजयामि ।

नीलकंठाय नमः। कंठं पूजयामि। त्रिपुरसंहर्ताय नमः। बाहू पूजयामि। शंकराय नमः। करान् पूजयामि। वृषाय नमः। बाह्यकंठं पूजयामि। ऋतुफलदाय नमः मुखं पूजयामि। नागहराय नमः। नासिकं पूजयामि। इंद्वर्कवन्हिनेत्राय नमः। नेत्रं पूजयामि। कपर्दिने नमः। ललाटं पूजयामि। फणि कौटिल्याय नमः कर्णौ पूजयामि। गंगाधराय नमः। जटान्पूजयामि। सोमभूषणाय नमः कपर्ध्वे पूजयामि। सुमेदाय नमः। सर्वांगं पूजयामि। म्हणोनि लिंगाचे अवयवपुजा विस्तारूनि यानंतरे। ओं न्हां हृदयाय नमः ओं न्हीं शिरसे स्वाहा। ओं न्हुं शिखायै वषट्। औ न्हैं कवचाय हुं। ओ न्हौं नेत्रत्रयाय वौषट्। ओं न्हः अस्त्राय फट्। म्हणोनि षडंग न्यास मंत्रः। ओं न्हां न्हीं न्हू न्हैं न्हौंः। म्हणोनि शिवागम मंत्रः। न्हौं न्हं न्हां न्हं न्हः। म्हणोनी पंचप्रसादमंत्रः। नमः शिवाय म्हणोनि पंचाक्षरीमंत्रः। ओं नमः शिवाय सूळ पंचाक्षरीमंत्र। ओं न्हां न्हीं न्हूं नमः शिवाय नमः म्हणोनि स्थूळपंचाक्षरीमंत्रः। ओं न्हीं न्हूं नमः शिवाय म्हणिजे मायापंचाक्षरीमंत्रः। ओं न्हां न्हीं न्हूं न्हौं नमः शिवाय म्हणिजे प्रसादपंचाक्षरीमंत्रः। ओं हं अनंतशक्तिधाम्ने ज्योतिरूपायशिवास्त्राय फट्र म्हणिजे शिवास्त्रमंत्रः। ओं ई ऊं व्योमव्यापिनी व्योमास्त्राय फट म्हणिजे व्योमास्त्र मंत्रः। ओं पशु फट् म्हणिजे पाशुपतास्त्रमंत्रः। ओं चित् शिखिविच्यादि क्षुकृत-भूरिकास्त्राय फट् म्हणिजे क्षुरिकास्त्र मंत्रः। ओं प्रस्फुर प्रस्फुर घोरघोर तरमतनुरूप चट चट प्रचट प्रचट कहकह वमवम वंध बंध घातय घातय हुं फट् म्हणिजे अघोरास्त्रमंत्रः। लिंगध्यानातु अनुसंधानात्। आणीक अकार उकार आकार उभयमूर्ध्नि ललाट। इकार ईकार उभय दक्षिणवाम नेत्रे। उकार ऊकार उभय दक्षिण वामश्रोत्रे। ऋकार ऋकार उभय दक्षिणवाम कपोले। ऌकार ॡकार उभय दक्षिणवाम नासापुटे। एकार ऐकार उभय उर्ध्व अधरोष्ट्रे। ओकार औंकार उभय ऊर्ध्व अधोदंत पंक्तिः। अकार अःकार। उभय दंतहिरडिया। ककारादि पंचाक्षर ते दक्षिण पंचहस्त। चकारादि पंचाक्षर ते वाम पंचहस्त। टादि पंचाक्षरतादी पंचाक्षर ते दक्षिणवाम पादे। पकार ते उदर। फकार वकार। उभय दक्षिणवाम पार्श्वे। भकार ते

स्कंद । मकार ते हृदय । यकारादि सकारांत शं षं अक्षर ते त्वचादि सप्तधातुः । हंकार तो आत्मा । क्षकार तो पूजकाचे जन्मादिरिपु विषय क्रोध भस्म करी । म्हणोनि लिंगध्यानी कळान्यास ब्रह्मन्यास करूनि उपरी । ओं ऱ्हां नेत्रत्रयाय वौषट् गंधं स्वाहा म्हणोनिया मंत्रे धूप समर्पुनि ओं ऱ्हैं कवचाय हुं । दीपं स्वाहा म्हणोनिया मंत्रे नीराजन करूनि । ओं शिवाय नमः म्हणोनि परमान्नैनवेद्य पदताकमुद्रेने समर्पुनी वरी । ओं नमः शिवाय पानीयं स्वाहा । ओं ऱ्हां हृदयाय नमः । आचमनीयं स्वाहा । नमः शिवाय अनुलेपनं स्वाहा । ओ हैं तत्पुरुषाय नमः । तांबूलं स्वाहा । हं ऱ्हौं हं ऱ्हां हं सः आभरणं स्वाहा । म्हणोनि तया तया मंत्रे तया तया वस्तु समर्पुनी । अणीक ओं नमः शिवाय दर्पणाय स्वाहा । म्हणोनि दर्पणादि छत्रचामरयजनादि समर्पुनिः अणिक । लौकिक वैदिकादि स्तोत्र करूनी । भवाय देवाय नमः शर्वाय देवाय नमः रुद्राय देवाय नमः । सहाय विहमते देवाय नमः । पशुपतये देवाय नमः उग्राय देवाय नमः । भीमाय देवाय नमः । ईशानाय देवायनमः । म्हणोनि अष्ट मंत्रे अष्टपुष्पे समर्पावी । आणीक पूर्वोक्त शिवाय नमः । म्हणोनि इत्यादि द्वादशमंत्रे पुष्पांजळी देऊनि वरी । त्रंबके मंत्रपुष्प समर्पुनी । अणिक दक्षणकरांगुलि पुष्पोदक देउनि चतुरांगुलीने अकोचन करुनी पूजांतर्पयामि । म्हणोनि तया पुष्पोदके आपलिया पादमूलासमीप कनिष्ठांगुलिने देऊनि पूजा समाप्त करूनि उठावें अणीक तोचि विशेषवीरशैव ।

तयासी गुरुपासाव ।
उपदेश अनुभव । सिद्ध जाला ॥८२४॥

निगम पुराण । अगमसार पुरातन ।
मार्ग सत्कर्ष कारण । षट्क्रमे स्थूळांतु ॥८२५॥

भक्ति कर्मक्षय । निर्मळ मती विचार दर्पमंक्षय ।
समज्ञान म्हणोनि इति हें । षट्क्रमे फळयुक्त ॥८२६॥

भक्ति महेश्वर प्रसादिक । लिंगी शरण ऐक्य ।
म्हणिजे षट्स्थळ ॥८२७॥

पृथ्वी जळ हुताशन । मारुत आणी गगन ।
आत्मा म्हणऊन । षडांगे ॥८२८॥

चित्त मन । बुद्धि अहंकार ज्ञान ।
भाव म्हणोन । षद्हस्त ॥८२९॥

कर्मसदाख्य कर्तुसदाख्य । मूर्तिसदाख्य अमूर्तिसदाख्य ।
शिवसदाख्य महासदाख्य । म्हणिजे षद्सदाख्य ॥८३०॥

क्रियाशक्ति इच्छाशक्ती । ज्ञानशक्ति आदिशक्ती ।
पराशक्ती चित्‌शक्ती । षद्शक्ती म्हणिजे ॥८३१॥

आचार्यलिंग गुरुलिंग । शिवलिंग जंगमलिंग ।
प्रासादलिंग महालिंग । म्हणिजे षद्लिंगे ॥८३२॥

निवृत्तिकळा प्रतिष्ठाकळा । विद्याकळा शांतिकळा ।
शांत्यातीतकळा स्थितिकळा । म्हणिजे कळाषड्विध ॥८३३॥

घ्राण जिव्हा नेत्र । अणीक त्वक श्रोत्र ।
हृदय म्हणिजे षद्प्रकार । मुखादिक ॥८३४॥

गंध रस । रूप स्पर्श ।
शब्द परिणाम म्हणिजे विशेष । षद्पदार्थ ॥८३५॥

श्रद्धाभक्ती नैष्ठिक्यभक्ति । अवधानभक्ति अनुभवभक्ती ।
आनंदभक्ती रमरसभक्ती । म्हणिजे षड्विधभक्ती ॥८३६॥

या परी असे अचरण विख्यातु । त्याचे ठाई प्रथम भक्तीस्थळांतु ।
आचारादि षड्विधलिंगातु । येक येक क्रियाभेदे ॥८३७॥

त्रयत्रय होउनी विशेषें । अष्टदश होऊनी असें ।
ते कवण प्रकार कैसें । म्हणीतले तरी ॥८३८॥

सदाचार नीताचार । आणि गणाचार ।
म्हणोनि या आचार । लिंग त्रिविधभेदें ॥८३९॥

त्याचे ठाई । कोण्ही येक स्वसन्मार्गाचिये ।
ठाई सकळ शरणासी संतोष होय ।
तैसी रहणी निश्चळमय । तो सदाचार म्हणवी ॥८४०॥

भक्तीने आपण । धरिले आचरण ।
प्राणांत चालवी निपुण । ते नीताचार म्हणवी ॥८४१॥

शिवमहेश्वराचे । करुणाकटाक्षे त्याचे ।
शिष्यासी विश्वास साचें । तो गणाचार म्हणवी ॥८४२॥

अणीक दीक्षा म्हणऊनी । शिक्षा म्हणोनि ।
अनुभव म्हणोनी । गुरुलिंग त्रिविध ॥८४३॥

त्याचे ठाईं आगमोक्त विधानें । कुंडमंडपादि विचारानें ।
षडध्वशुद्धि करणें । ते दीक्षा म्हणवी ॥८४४॥

जंगम तोचि आपण । लिंग सत्य म्हणऊन ।
विश्वासे धारण । निश्चयेसी ॥८४५॥

प्रथम सम्यक्‌ज्ञान । उपनिषद्‌पुरुषापासून ।
वस्तुगति जाणो निपुण । ते शीक्षा म्हणवी ॥८४६॥

पूर्वजन्मसंस्कारबळे विशेख । वैराग्यभक्तिज्ञानादिक ।
आपेआप दिसे प्रत्यक्ष । ते स्वानुभव म्हणवी ॥८४७॥

आणीक इष्टलिंग । म्हणोनि शिवलिंग ।
प्राणलिंग प्रीतिलिंग । विविध भेद ॥८४८॥

त्याचे ठाईं । आगमोक्तविधानें श्रीगुरुने आपण । शिवदीक्षाविधाने ।
दीधले कृपेकरुन । ते इष्टलिंग म्हणवी ॥८४९॥
देह गुणव्याप्त त्यजूनिया समस्त । शिवलिंग सस्वरूपांत ।
मन निमग्न होऊनि असणे अखंडित । ते प्राणलिंग म्हणवी ॥८५०॥

सकळ अवस्थाचियें । ठाईं शिवलिंगयुक्तमय ।
अन्योन्यभाव निःसंशय । ते तृप्तिलिंग म्हणवी ॥८५१॥

अणीक स्वयंभुलिंग । चरलिंग परलिंग ।
म्हणोनी जंगमलिंग । त्रिविध त्याचे ठाईं ॥८५२॥

शिवलांछन धरूनी । आपणचि शिवलिंग म्हणऊनी ।
निश्चये जाणोनी । बाह्यकर्म ॥८५३॥

परित्याग साक्षेपे । सदासर्वदा अनंदरूपें ।
असणे आपआपणापें । ते स्वयेंलिंग म्हणवी ॥८५४॥

शिवलिंगयुक्त समस्त । इंद्रिये मग्न होउनि अखंडित ।
भेदभ्रांति किंचित । न उपजतां ॥८५५॥

निजानंदे भरित बाह्यांतरे । आपुलेनी इच्छामात्रें ।
स्वतंत्र इच्छा विचरें । ते चरलिंग म्हणवी ॥८५६॥

स्थावरजंगमादि । अखिल उपाधि ।
अपण अधिष्ठात्रा उपलब्धी । जाला तो परलिंग सत्य ॥८५७॥

आणीक शुद्ध । सिद्ध प्रसिद्ध ।
म्हणोनि प्रसादलिंग त्रिविध । त्याचे ठाई ॥८५८॥

गुरुभुक्तशेष तें म्हणीतले शुद्ध । लिंगभुक्तशेष ते म्हणवी सिद्ध ।
जंगमभुक्त ते प्रसिद्ध । प्रसाद म्हणवी ॥८५९॥

नातरी अणीक येक प्रसंगे । पूर्ण सकळकर्मे गुणपरित्यागें ।
कामरहित असणें अकल्पित भोगें । ते शुद्ध म्हणवी ॥८६०॥

शिवज्ञानोदयानें । प्रकाशत्व पूर्णपणें ।
तृप्तिरूप असणें । ते सिद्ध म्हणवी ॥८६१॥

सोहंभाव अखंडीत । सकळ कल्पनेविरहीत ।
असणे निश्चळ अखंडित अलंकृत । ते प्रसिद्ध म्हणवी ॥८६२॥

अणीक पिंडजलिंग अंडजलिंग । बिंदाकाशलिंग ।
म्हणऊनि महालिंग । त्रिविध त्याचे ठाई ॥८६३॥

देह तेचि देउळ । आत्मा तेचि लिंग केवळ ।
म्हणोनि भाव तोचि निश्चळ । ते पिंडजलिंग म्हणवी ॥८६४॥

भूतेचि पीठ आकाश तेचि लिंग सत्य । म्हणउनि विकल्परहित ।
दृढ भावना अखंडीत । ते अंडजलिंग म्हणवी ॥८६५॥

आकाश तें आपणातुं आपण । आकाशांतु आपण ।
व्यक्त होऊनि समाधान । बिंदाकाशलिंग म्हणवी ॥८६६॥

अणीक भक्तीचिया विषद । आचारादि षड्विध ।
लिंगाचे ठाई त्रिविध । वर्तणे भेदें ॥८६७॥

षट् होऊनियां विशेषें । छत्तीस प्रकार होऊनियां असें ।
ते कवण कैसे म्हणीतले तरी ॥८६८॥

आचारलिंगमोहित । आचारलिंगकृत ।
आचारलिंगभूलिंगभक्त । पूजक ॥८६९॥

आचारलिंग वीरआचार । लिंगप्रभादी आचार ।
लिंगप्राणी म्हणोनी आचार । लिंगसमाधी षट्प्रकारें ॥८७०॥

त्याचे ठाई । आचारहीन पूर्वाश्रित । स्त्रीपुत्रादि त्यजूनि समस्त ।
निर्मोही म्हणऊनि संतत । तो आचारलिंगमोही ॥८७१॥

शिवाचारासि विरोध । जाला आपुला पूर्वसमंध ।
त्यजूनि असे तो सिद्ध । आचारलिंगासक्त ॥८७२॥

आनदैवतभजन । त्यजूनियां निपुण ।
लिंगार्चनी अवधान । तो आचारलिंगपूर्वक ॥८७३॥

आपण धरिला आचार । प्राणांत जालिया साचार ।
तरी न सोडी निर्धार । तो आचारलिंगवीर म्हणवी ॥८७४॥

शुचित्व अशुचित्वादि समस्त । संकल्पविकल्परहित ।
होऊनिया असे कृतार्थ । तो आचारलिंगप्रसादी ॥८७५॥

शिव महेश्वर । तयाची निंदा लेशमात्र ।
न साहे तो आचार । लिंगप्राणी म्हणवी ॥८७६॥

अणीक मातृपित्रेचे । मोहादिक सोडूनि गुरुचे ।
ठाई अति प्रीति नेसाचें । तो गुरुलिंगमोही ॥८७७॥

बंधुजनाचे उपकार सकळ । त्यजूनि गुरुसंगे अनकूळ ।
होऊनि असे सर्वकाळ । तो गुरुलिंगभक्तु ॥८७८॥

भिन्न येकही पुजा न करी । गुरुभजने निरंतरी ।
असे सर्व प्रकारी । तो गुरुलिंगपूजकमोही ॥८७९॥

आनमार्गउपरती । करूनियां भक्ति ।
सन्मार्गवर्ती । ते गुरुलिंगवीर ॥८८०॥

गुरुअज्ञे अनुसंधानी । सदासर्वदां होऊनी ।
असे निश्चळ रहणी । तो गुरुलिंगप्रासादी ॥८८१॥

आनसेवा उपचारु । परित्यागूनि सद्गुरु ।
सेवेसि सर्वदा तत्परु । तो गुरुलिंगप्राणी म्हणवी ॥८८२॥

आणीक आन समस्त । साकार साभास पदार्थ ।
तो हो विरहित । तो शिवलिंगमोही ॥८८३॥

अन्यत्र सकळ । दैवतादी संमेळ ।
निरसूनिया निश्चळ । तो शिवलिंगभक्तु ॥८८४॥

आन येक देवताध्ययन । होऊनियां आपण ।
न करी कदां भजन । तो शिवलिंगपूजकु ॥८८५॥

भिन्न पुण्यक्षत्रतीर्थ । यात्रापर्वकाळादि समस्त ।
अपण न प्रवर्तें तेथ । तो शिवलिंगवीर ॥८८६॥

अकल्पीत गुण । दोषादिक बंधन ।
सुखदुःखा शरण । तो शिवलिंगप्रसादी ॥८८७॥

लावण्यगुणयुक्त । यवनस्त्रियादी संगात ।
संभोगादि विरहित । तो शिवलिंगप्राणी म्हणवी ॥८८८॥

अणीक आपुला । पूर्वाश्रित पडिला ।
आचार निषेधिला । तो जंगमलिंगमोही ॥८८९॥

जातिकुळादिक । अभिमान विशेष ।
त्यजिला तो पूर्वक । जंगमलिंगभक्त ॥८९०॥

आन येक आचार । तयावरी अनादर ।
न करी अंगिकार । तो जंगमलिंगपूजक ॥८९१॥

देहअर्थप्राण । जंगमासी समर्पण ।
करूनि न मोहे संपूर्ण । तो जंगमलिंगवीर ॥८९२॥

जंगमासी समर्पण । सकळ द्रव्यें केल्याविण ।
न स्विकारी आपण । तो जंगमलिंगप्रसादी ॥८९३॥

जंगम तोची सर्वथैव । साक्षांत आपण शिव ।
म्हणोनी विश्वासे दृढ भाव । तो जंगमलिंगप्राणी म्हणवी ॥८९४॥

अणीक भिन्न येक । रुचिस्वादादिक ।
नेणे तो पूर्वक । प्रासादलिंगमोही ॥८९५॥

पूर्वहंकार । त्यजूनि निश्चळाकार ।
जाला तो साचार । प्रसादलिंगभक्त ॥८९६॥

आन बहुजन । संगे स्नेहसंभाषण ।
दानप्रतिग्रहादि विलक्षण । तो प्रासादलिंगपूर्वक ॥८९७॥

आन द्रव्यादिके । न स्पर्शे हस्तके ।
तो आपण विशेखे । प्रासादलिंगवीर ॥८९८॥

जीवहिंसादिक । न करी आपण किंचित येक ।
अथवा न करी विमुख । तो प्रसादलिंग म्हणवी ॥८९९॥

आणीक लोक प्राणी समस्त । तयाचा वृत्तांत ।
नाठवी कदांचित । तो महालिंगमोही ॥९००॥

पूर्वभक्त्यादि गुण । कदां अनुसंधान ।
न करी तो आपण । महालिंगभक्त ॥९०१॥

अज्ञानी बहुभक्तभजन । संयोगे संगसंभाषण ।
न करी तो आपण । महालिंगपूजक ॥९०२॥

उत्पत्ति स्थिति । संहार इति ।
कदां न चिंती । तो महालिंगवीर ॥९०३॥

पंक्ति संयोग । भोजनप्रयोग ।
न करी तो महालिंग । प्रसादी म्हणवी ॥९०४॥

अणीक इति षट्स्थूळ । भेदोपभेद सकळ ।
विचारे जणिजे केवळ । वर्तणूकेचे ठाई ॥९०५॥

वाह्यार्चन वाह्यार्पण । न करिता आपण ।
असत्य अंतरी क्रियानिष्ट होउन । तो महालिंगप्राणी म्हणवी ॥९०६॥

पिंडादि ज्ञानशून्यांत । येकोत्तरशत ।
स्थूळ परिक्रमे सिश्रित । होऊनि असे ॥९०७॥

तया येकोत्तरस्थूळ । आंत प्रथम अंगस्थळ चवेताळ ।
म्हणवी वरि अंगस्थळ । सत्तावन्न म्हणवी ॥९०८॥

तयातु अंगस्थूळ । चवेताळीसशते अंगस्थळ ।
षट् ते यासी परिक्रमें सकळ । विभाग होऊनि असें ॥९०९॥

अणीक ते लिंगस्थळ पन्नास वरी सप्त । ते आचारादि महालिंगात ।
षट्लिंगस्थळादि परिक्रमें समस्त । विभाग होऊनि असें ॥९१०॥

या अनुक्रयें भक्त्यादि ऐक्यातु । षट्अंगस्थळ तनूत्रयांत वर्तत ।
ते लिंगत्रयानुगुण्य होऊनि प्रवर्त । असे निरुतें ॥९११॥

म्हणऊनि इति । लिंगांगस्थूळ कुळादि पद्धति ।
समंध जाणोनि समस्ती । विचारमुखें ॥९१२॥

गुरुलिंगजंगमासी तनुमनधन । वचनेसी विलक्षण होऊन ।
सकळ सदाचारसंपन्न । प्राज्ञासहित ॥९१३॥

भक्तिस्थूळ अंगिकार । करूनि असे निरंतर ।
तो विशेषवीर । शैव म्हणवी ॥९१४॥

आणीक गृहादीक मुख्य । अखिल विभवादिक ।
संसारसुख । परिग्रह त्यजुनी ॥९१५॥

विद्या ते सतीसहित । संतोष तो सुत ।
विराग तो बंधू संतत । क्षमा ते परिचारिका ॥९१६॥

शांति ते सखी भक्ति ते माता । आचार तो पिता ।
सत्य ते सती पुत्र वनिता । ते श्रद्धा जाणिजें ॥९१७॥

मैत्रादि सद्गुण ते पौत्र । ज्ञान ते देह विचार ते क्षेत्र ।
अहिंसादिक ते साचार । दासादिक ॥९१८॥

अस्ति ते शेवकजन । धर्म ते वाहन ।
दम तो आचार्य आपण । मुक्ति ते देश ॥९१९॥

इत्यादि परमार्थिक । कुटुंबधारी होऊनि पूर्वक ।
वरि कंथादंडकमंडलादिक । भिक्षापात्रभस्मधारी ॥९२०॥

पंचप्रकार । मुद्रा बाहिर ।
तया मंत्र । पूर्वके धरूनी ॥९२१॥

या नंतरे अंतरंग समता ते कंथा । ज्ञान तो दंड दमयता ।
तो कमंडलु वैराग्य ते भिक्षापात्रा । क्षमा ते भस्मधारण ॥९२२॥

शिखाजटा मंडिताकार । अजिन वल्कल दिगंबर ।
इत्यादि विचित्र । शिववेश स्विकारूनी ॥९२३॥

यथायोग्य भिक्षाहार घेऊन । भस्मोद्धूळण त्रिपुंड्रधारण ।
शिवलिंगार्चन शिवध्यान । शिवमंत्रजप ॥९२४॥

स्थूळकूळविचारण । लिंगांगसंयोगादि ज्ञान ।
क्रियादीक संपन्न । होऊनियां ॥९२५॥

रसरसायनवाद वश्य ज्योतिष । गारुडादि क्रिया बहुवस ।
लौकीक वेव्हार निःशेष । क्रिया त्यजुनी ॥९२६॥

वनितादि समस्त । विषय पदार्थ ।
तयासी विरक्त । होऊनि असे ॥९२७॥

या भवारण्यांत सर्वथां । लोभ म्हणिजे पंकांतूनि रिघतां ।
इंद्रिये म्हणिजे रिपू नपुंसकता । मोह म्हणिजे ॥९२८॥

पिशाच्यभय न घेतां । क्रोध म्हणिजे व्याघ्राने गिवसिता ।
समता म्हणिजें सर्पा न भितां । मन्मथ म्हणिजें ॥९२९॥

चोरासि वश्य न होतां । मद म्हणिजे अंधकारी न बुडतां ।
तापत्रय म्हणिजे खुडो रान पडतां । विषय म्हणिजे ॥९३०॥

कंटकावरी पाद न ठेवितां । असूया म्हणिजे विषलते न गुंफतां ।
अहंकार म्हणिजे डोही न बुडतां । सर्वावधानी होउनियां ॥९३१॥

जंगमस्थळ अंगिकारी । होऊनि जगाभीतरी ।
विचरत असे तो निराकारी । तो वीरशैव म्हणवी ॥९३२॥

अणीक हे षडस्थूळ । ज्ञानी जाला निष्कळ ।
वीरशैव तो सर्वोत्कर्ष केवळ । म्हणोनी जाणावें येथें ॥९३३॥

क्रिमि कीटक पतंग जात्यादिक । तयाह्वूनि पशु आधिक ।
पशूपरीस अधिक विशेख । मनुष्यजाती ॥९३४॥

मनुष्याह्वूनि द्विजाधिक्य । तया द्विजापरीस विप्र विशेख ।
तया विप्राह्वूनि क्रतुवुध्यादिक । आधिक्य म्हणवी ॥९३५॥

तया क्रतुवुध्यापरीस । कर्तार अतिविशेष ।
तया कर्ताराह्वूनि सन्यास । अधिक्य म्हणवी ॥९३६॥

तया सन्यासियाह्वूनि । अधिक्य म्हणिजे ज्ञानी ।
तया ज्ञानियां द्विगुणी । शिवार्चक आधिक्य ॥९३७॥

तया शिवार्चकापरीस । लिंगांगसंयोगी विशेष ।
तया लिंगांगसंयोगाह्वूनि उत्कर्ष । षड्स्थळज्ञानी ॥९३८॥

तया षडस्थळा ज्ञानियासमान । त्रैलोक्यात आन कवण ।
येक ही नाही म्हणउन । तया कारण ॥९३९॥

मुमुक्षत्वे षडस्थळ । असमज्ञानी केवळ ।
जाला वीरशैव तो सकळ । वंद्य पूज्ययोग्य ॥९४०॥

म्हणोनि जाणावे निरंत । इत्यादि देह समस्त ।
क्रिया पादांत । प्रतिपादिले जाणावें ॥९४१॥

आणीक परिख्यातु । चर्यापादांतु ।
प्रायश्चितु । पवित्रारोहण ॥९४२॥

उमामहेश्वरलक्षण । जपमाळादि सर्वाश्रमादि लक्षण ।
स्कंदनद्यादि गणेश्वरलक्षण । प्रतिपाद्य ॥९४३॥

तयांतु अश्रमधर्मपद्धती । पुराणे आगमोक्ती ।
प्रतिपादन यथास्थिती । ते कैसे म्हणीतले तरी ॥९४४॥

दधीची गौतम अगस्ती । दुर्वास म्हणिजे ऋषिचतुर्थी ।
तयाचेनि अनुक्रमें सन्मतीं । होय तैसे ॥९४५॥

ब्रह्मचारी ग्रहस्त । आणि वानप्रस्थ ।
यती म्हणिजे चतुर्थ । आश्रम त्याचे ठाईं ॥९४६॥

शिखा यज्ञोपवीत । कटिसूत्र काषायवस्त्र ।
आणि धवलांबर । जपासन कृष्णाजन ॥९४७॥

पालाशदंड । भस्मधारण त्रिपुंड्र ।
सूत्रकृताने दृढ । धरूनियां ॥९४८॥

येक काळ स्नान । उदयोअस्तमान ।
संध्यावंदन । पितृमातृशेवा ॥९४९॥

बंधुबांधवमैत्रप्रीति । गुरुदेवताभक्ती ।
विद्वज्जनउपास्ती । पुष्पमंत्री अग्निकार्यें ॥९५०॥

नित्यनैमित्यादिक । कर्मारंभक ।
तयावरी पूर्वक । विश्वास धरुनी ॥९५१॥

तांवूलवर्चन त्यजुनी । कामक्रोध दंडुनी ।
दुर्वासना लंघुनी । वरी आहारभक्षण ॥९५२॥

ब्राह्मणजाती । अथं ना क्षत्रियजाती ।
ना तरी वैश्यजाती । तया ग्रहीं ॥९५३॥

भवति भिक्षां देही म्हणोनी । भिक्षान्न मागोनी अणुनी ।
हस्तपादादिक प्रक्षाळुनी । द्विराचमन करूनियां ॥९५४॥

वरी भिक्षान्न आपुलियां । सद्गुरूसी समर्पूनियां ।
तयाचे अज्ञेकरूनियां । मग आपण ॥९५५॥

पूर्वोत्तरदिङ्मुख होउनी । शुचीभूमीवरी वैसोनी ।
प्राणाय स्वाहा म्हणोनी । इत्यादि मंत्रोच्चारणे ॥९५६॥

कंवल मितीविण । यथेष्ट भोजन करून ।
सदा वेदाध्ययन । तत्पर होउनि असे ॥९५७॥

मंत्रानुष्ठानादिक । उरले न करितां पूर्वक ।
लौकीक वैदिक अध्यात्मिकादि ॥९५८॥

शास्त्राभ्यास संतत । जितेंद्रियत्वें करित ।
सद्गुणसंपन्नयुक्त । होऊनियां ॥९५९॥

गायत्रीब्रह्मचारी । प्रजापतिब्रह्माचारी ।
वैदिकब्रह्मचारी । नैष्टिक्यब्रह्मचर्य ॥९६०॥

म्हणऊनियां चतुष्क । प्रकार पृथक ।
ब्रह्मचारी मुख्य । होउनी असती ॥९६१॥

आणीक त्या ब्रह्मचारी । आश्रमाभीतरी ।
वेदाध्ययन परी । पूर्ण जाल्यानंतरे ॥९६२॥

तया ब्रह्मचर्या अत्यंत । विराग उपजला तरि वानप्रस्त ।
अश्रमकार्यांत विहित । स्विकारावया योग्य ॥९६३॥

अथवा रागयुक्त जाला तरी । आचार्यांचा अज्ञाउत्तरी ।
तो ब्रह्मचारी । आश्रम त्यज्जुनी ॥९६४॥

आपुलिया जातीभीतरी । अंगिकारावया योग्य स्त्री ।
प्रथम पाहतां कुमारी । तेथे लक्षणपरिक्षा ॥९६५॥

रुक्षादीक पक्षजाती । नदी उकरडा पद्धती ।
गिरी आदि इति । नामादि त्यजूनियां ॥९६६॥

अतिस्थूल उदर । वांकुडे शरीर ।
दीर्घ देहआकार । केश ताम्रवर्ण ॥९६७॥

केशहीन मस्तक । वाग्भरीत मुख ।
सखोल नेत्रादिक । रक्तनयन ॥९६८॥

ढेंवरे नासीक सुपाऐसे कर्ण । दीर्घ वोष्टू वाकुडे हन ।
वाह्य दंत प्रसरवदन । कोती मान अशास कुंचा ॥९६९॥

वाहुकरांगुलिया समानरहित । सुरेखाविरहीत हस्त ।
तनुकक्षा सुरभीयुक्त । उन्मत्त पृष्ठी ॥९७०॥

काळा कांतिहीन काया । घासणी घोटिया थोटिया ।
चरणांगुळिया । वाकड्या अखम ॥९७१॥

करांगुळियां न लगती धरणी । चालता भूमी दणाणी ।
पोट वर हीन कुंथे भोजनीं । सर्वदा पेंगे ॥९७२॥

कार्यार्थी मंद स्वरहीन । सदाकाळी आंगवण ।
चतुरत्वें हीन । इति अवलक्षणें त्यजूनियां ॥९७३॥

आणीक टेंगणी ना विशाळ । कांति शरीर केश सरळ ।
मुखकमळ वर्तुळ । विशाळ नेत्र ॥९७४॥

नासीक सरळ साने वदन । अधर प्रवाळवर्ण ।
दंतपंक्ती समान । घोंटी कपोळ ॥९७५॥

समानभुजा हस्तक । करतळी सुरेख अंकुश शंख ।
ध्वजांकुश रेख । सूक्ष्मांगुलिया ॥९७६॥

समान कुच इतर । रोमरहीत शरीर ।
सडपातळ उदर । माज सूक्ष्म ॥९७७॥

वृत्त जघन मृदु मांडिया । सरिळिया पोटरियां ।
मृदु पातळ द्वया । अल्प अहरी ॥९७८॥

अल्प निद्रा कार्यार्थी शीघ्र । कळहरहीत सुस्वर ।
अतिविशेष चतुर । गुणभरिता ॥९७९॥

सर्वलक्षणसंपन्न । सचरित्रयुक्त कामिन ।
सूत्रोक्तप्रमाणें नग्न । करूनियां ॥९८०॥

ते धर्मपत्नीसहित । होउनियां गृहस्त ।
सकळ धर्मविधियुक्त । आचारावें येथें ॥९८१॥

शिखा यज्ञोपवीतर । वेणुदंड कमंडलु धोत्र ।
तथा अंगवस्त्र । सहीत होउनी ॥९८२॥

प्रातःकाळी शिवस्मरणेसीं उठोन । निर्भय निर्जित्य मौन ।
विधीने मळमूत्रविसर्जन । गुदगुह्यादिक ॥९८३॥

मृत्तिकेने दुर्गंधी । निरसूनी खसमंधी ।
होय जव मनशुद्धी । तैसे शौच करूनि ॥९८४॥

अणीक आचमन करुन । अपामार्गें कीजे दंतधावन ।
वरी द्विवेळा आचमन । करूनियां ॥९८५॥

ऐसे मळस्नान जालियावरी निपुण ।
त्रिकाळ करावे स्नान । न चुके तैसें ॥९८६॥

वरी त्र्यंबकमूळमंत्रेकरुन । अनुक्रमें भस्मोद्धूळण ।
त्रिपुंड्रधारण । विस्तारुनी ॥९८७॥

रुद्राक्षमाळिका मस्तक । आदि स्थानस्थानी विशेख ।
विधियुक्तपूर्वक । धरुनियां ॥९८८॥

आणीक प्राणायामत्रय । करूनि वरी सांख्यायनीय ।
गोत्र श्वेतवर्णमय । प्रणवपूर्वक ॥९८९॥

भूतादि सप्तव्याहृती । युक्त पदादी चतुर्विंशति ।
अक्षरे अति । शोभत असे ॥९९०॥

विश्वामित्ररुपी निरुता । गायत्रीछंद रविदेवता ।
शिवआदि देवता । होऊनि शोभे ॥९९१॥

अणीक ते सप्तव्याहृति । चतुर्विंशती ।
अक्षरासी परमिति । भिन्न भिन्न ॥९९२॥

ऋषि छंद देवता । वर्ण मुद्रान्यासादि सर्वथां ।
सांगिकाने यथा । विस्तारुनी ॥९९३॥

परशिव आपणासी । अर्थेशी होय विशेषी ।
मग नित्य प्रातःसमयासी । सहस्त्रजप करावा ॥९९४॥

चतुर्विंशतिलक्षजप करूनि समाप्त ।
वरि चतुर्थसहस्त्र आज्याहुती कल्पोक्त ।
प्रमाणे पुरश्चरणयुक्त । जप करूनि ॥९९५॥

या नंतरे भिन्न भिन्न परी । क्षीरादि द्रव्यसामग्री ।
होमसंख्या नेंमे जपे साचारीं । सर्वसिद्धी होय ॥९९६॥

अणीक ऋग्वेद । यजुर्वेद सामवेद ।
म्हणिजे त्रिपाद । सहीत शोभे ॥९९७॥

पूर्व दक्षिण म्हणोनी । पश्चिमोत्तर म्हणऊनि ।
उर्ध्व अध जाणोनी । षट्कुक्षी मिरवें ॥९९८॥

आकाश ते कुक्ष । अष्टदशाक ।
पुराणादीक । ते नाभिस्थळ ॥९९९॥

जग ते शरीर । वेदांतशास्त्र तें सूक्ष्मतर ।
शिक्षा पठ्यकार । अंग ते रोम ॥१०००॥

अधर्म ते हृदय छंद ते हस्तक । न्यायसांख्य ते श्रोत्रादिक ।
अग्नी तेचि मुख । ज्योतिष ते नेत्र ॥१००१॥

व्याकर्ण शिक्षा कल्प निरुक्त । ज्योतिषादिक ।
म्हणिजे इति पंचक । शिरासहित ॥१००२॥

मूर्ध्नि तो ब्रह्मा । रुद्र तो शिखा विष्णु तो आत्मा ।
आणि तो अंतरात्मा । तो ईश्वर ॥१००३॥

मिमांस ते लक्षण । शृंग ते अथर्वण ।
वेदमाता गायत्री आपण । होऊनि असें ॥१००४॥

उदयकाळी नाभिस्थान । रक्तपद्मासन रक्तवर्ण ।
रक्तवस्त्र आभरण । गंधमाळाद्यळंकृत ॥१००५॥

चतुर्मुख द्वंद्वलोचन । दंड कमंडलु अक्षमाळा सुरभी वामदक्षिण ।
करचतुष्टाने धरुन । हंसवाहनेसी ॥१००६॥

ऋग्वेदमय होऊनी । रजोगुण अधिकाराचेनि ।
ब्रह्मादि देवता म्हणऊनी । गायत्री ब्रह्मी ॥१००७॥

म्हणोनी नाम पावोनी । कर्मज्ञानार्थ होऊनी ।
ध्यानावया योग्य असे म्हणोनी । अनुसंधानाचे ॥१००८॥

अणीक मध्याह्नकाळीं हृदयस्थान । ते पद्मासन श्वेतवर्ण ।
श्वेतवस्त्र आभरण । पुष्पगंधमाळा ॥१००९॥

अनुलेपने अळंकृत होऊन । येकमुख द्विलोचन ।
चक्र अक्षमाळा कमंडलु सुरभी धरुन । वामदक्षिणकरी ॥१०१०॥

करचतुष्टानें । आणि गरुडवाहनें ।
यजुर्वेदमय होऊनि सत्वगुणें । अधिक्यत्वें ॥१०११॥

विष्णुआदि देवता म्हणोनी । सरस्वती वैष्णवी नाम पढोनी ।
कर्मज्ञानार्थ ध्यानावया योग्य म्हणोनी । असे सदा चिंतावें ॥१०१२॥

अणीक सायंकाळी भ्रूमध्यस्थान । कृष्णपद्मासन कृष्णवर्ण ।
कृष्णवस्त्र आभरण । गंधमाळादिकें ॥१०१३॥

अळंकृत होऊन । येकमुख त्रिलोचन ।
शूळ अक्षमाळा कमंडलु सुरभी धरुन । वामदक्षिणकरें ॥१०१४॥

करचतुष्टानें । वृषभवाहनें ।
सामवेदमय होऊनि तमोगुणें । विशेषत्वें ॥१०१५॥

रुद्रआदि देवता म्हणोनि । सावित्री महेश्वरी नाम पावोनी ।
कर्मज्ञानार्थ ध्यानावया योग्य होउनी ।
असे म्हणोनी सदा ध्यानावें ॥१०१६॥

इति गायत्रीमंत्र विधीयुक्त । जप करावा नित्यकृत ।
घरी लिंगार्चन शुद्ध शैवोक्त । विस्तारावें ॥१०१७॥

अणीक ज्योतिष्टोम राजसूय पुत्र । कामिष्ठो करी याग अग्निहोत्र ।
यज्ञभेदादीक विचार । विवेकुनी ॥१०१८॥

अग्नि इंद्र उध्वर्य उद्गात्र हौत्र । मैत्रा वरुण प्रतिष्ठात्र धात्र ।
विष्टि आदि पंचदशप्रकार । ऋत्विजा संयुक्त ॥१०१९॥

करी कुश तुरग वाळ विश्वामित्र । तृणदुर्वादि दर्भ पंचप्रकार ।
आणि गंधपुष्प आज्यपात्र । यज्ञसाधन संग्रहूनी ॥१०२०॥

मग चतुराश्रय भागाकार । अर्धचंद्राकार ।
त्रिकोणकृत षट्कोण पद्माकार । अष्टकोणरूप म्हणऊनी ॥१०२१॥

अष्टकोणाकार उत्तम कुंडस्थळ । मध्यमस्थळ कनिष्ठस्थळ ।
शुभस्थळ म्हणोनि त्रिस्थळ । स्थानाआतु ॥१०२२॥

वेदीक उपस्तंभादि रचना करुनी । यथायोग्य आसनी बैसोनी ।
प्राणायाम करुनी । यज्ञ करितो ऐसे संकल्पावें ॥१०२३॥

वरी मंथनाग्नी हो अथवा श्रोत्रियाग्नि । अश्वत्थपळसादी दोन्ही ।
योगकाष्ठे धरुनी । मंत्रपूर्वकें ॥१०२४॥

दक्षिणाग्नी आणि गार्हपत्याग्नी ।
आहवनीय म्हणिजे अग्नि । त्रयात्म संस्कारावें ॥१०२५॥

आणीक धूम्रार्चिष । ऊष्मा ज्वलिनी ज्वालिनी विस्फुलिंगिनी सुश्रीस ।
सरूपा कपिला हव्य कव्य म्हणिजे दश । कळावृत्त होउनी ॥१०२६॥

अग्नि मंडळमध्यस्थानी द्विशिर । चतुर्थ श्रृंग कपर्दी चंद्रकळा त्रिनेत्र ।
त्रिपाद सप्तजिह्वा यज्ञसूत्र । त्रिमेखळा ॥१०२७॥

नामभागास्थित स्वाहाशक्तीनें ।
अग्नि सृक् स्त्रुवा दक्षिणकरचतुष्टानें ।
तोमर तळा घृत पात्रत्रयानें । वामहस्तत्रयेसी ॥१०२८॥

रक्तवर्ण रक्तांवरानें । रक्तगंधानुलेपनें ।
अळंकृत होऊनि शोभे आपण । ते शिवलिंगमूर्ति स्मरोनी ॥१०२९॥

आणि ते अग्निरहित वर्ण । गगनवर्ण रक्तवर्ण ।
कृष्णवर्ण शुभ्रवर्ण । बहुवर्णी ॥१०३०॥

अतिरक्तवर्ण म्हणोन । पूर्वोक्त जिह्वालागून ।
इति सप्तवर्णी । अनुक्रमें ॥१०३१॥

समिधा राई लाजा घृत । क्षीरान्न तीळ म्हणिजे सप्त ।
आहुती यथार्थ । प्रमाणुनी ॥१०३२॥

यज्ञपुजा योग्यता । होऊनि असती देवता ।
तयासी अव्हानूनि यथा । हव्यकव्या ॥१०३३॥

दिकभेद जाणोनी । तया तया मंत्रपूर्वक देऊनि ।
ऐसा विधियुक्त विस्तारुनी । यज्ञारंभ ॥१०३४॥

अणीक वेदाध्यायरूप ते ब्रह्मयज्ञ । अग्निहोत्ररूप ते देवयज्ञ ।
अतीतपूजारूप ते मनुष्ययज्ञ । म्हणवी जाणावे ॥१०३५॥

पितृतर्पणरूप ते पितृयज्ञ । भूतवळीरूप ते भूतयज्ञ ।
म्हणिजे इति पंचमहायज्ञ । चालवीत ॥१०३६॥

नुलंघिती ऋतुकाळसमया । संतानार्थी होऊनियां ।
वेदमंत्रस्मरण करूनियां । स्वस्त्रीसंभोगसुखें ॥१०३७॥

सद्‌गुरुयात्रा । आणि देवतायात्रा ।
महातीर्थ यात्रा । यज्ञधर्म ॥१०३८॥

म्हणिजे तया निमित्य । द्रव्यादीक संचित ।
समर्पण करात्रें आत्मार्थ । न करावें सर्वेथां ॥१०३९॥

यज्ञार्थ देवतार्थ भिक्षार्थी होउनी । पाक प्रयत्नें येकवेळा कां दोन्ही ।
मुष्टि मात्र बत्तीस ग्रास भोजन करुनी । मिती आहारत्रें ॥१०४०॥

आणीक सर्वभूतदया सत्यवचन । परउपकार पुण्य ।
कर्मानुष्ठानादी सद्‌गुण । संपन्न होउनी ॥१०४१॥

वार्तावृत्ति स्वाधीनवृत्ती । व्यभुवृत्ती वनसन्यास म्हणोनि इति ।
चतुर्थप्रकार रिती । असे तो ग्रहस्ताश्रमी म्हणवी ॥१०४२॥

अणीक तया ग्रहस्तालागून । अनुष्टानावया कारण ।
कर्म ते कवण कवण । म्हणीतले तरी ॥१०४३॥

नित्य नैमित्तिक । प्रायश्चित्त काम्यादिक ।
निर्मळ म्हणिजे पंचक । त्रिभेद होऊनि असे ॥१०४४॥

त्याचे ठाई । संध्यावंदनादिक ते नित्यकर्म निरुतें ।
शुभकाळ देशादीक तेथे । विधिपूर्वक ॥१०४५॥

कीजे जे विशेख । त्रिविधापरी पृथक ।
ते नैमित्तिक । कर्म म्हणवी ॥१०४६॥

ब्रह्महत्यादि समस्त । दोषपरिहारानिमित्य ।
क्रियारंभ ते प्रायश्चित्त । कर्म म्हणवी ॥१०४७॥

ज्योतिष्टोमे यागादीक ते । काम्यकर्म म्हणवी निरुतें ।
ईश्वरउपासना तें । निर्मळकर्म म्हणवी ॥१०४८॥

आणीक तें निर्मळकर्म म्हणिजे आपण । येकचि तपस कर्म जप ध्यान ।
ज्ञान म्हणोनिया भिन्न । पंचप्रकार असें ॥१०४९॥

त्याचे ठाई । दोषपरिहार्थकारक । होऊनि असे विशेख ।
शरीरबाधात्मक । महाकष्टकरूपी ॥१०५०॥

तप्तकृच्छ्र महातपकृच्छ्र । शीतकृच्छ्र पादकृच्छ्र प्रजापतीकृच्छ्र ।
पराकृच्छ्र देवकृच्छ्र । यवकृच्छ्रादि कृच्छ्रत्रें ॥१०५१॥

पक्षमासाचे ठाई अन्न । विशेष क्षीण करूनि सेवन ।
इत्यादीक साधन । आचरणें ॥१०५२॥

चांद्रायण एव चांद्रायण । पिप्पलिकाचांद्रायण ।
ऋषिचांद्रायण शिष्यचांद्रायण । आदि चांद्रायणे ॥१०५३॥

प्राजापत्यादि व्रताने । धर्मार्थ होऊनि आपण ।
शरीरशोषण करण । ते तप सत्य म्हणवी ॥१०५४॥

बाह्याभ्यंतरसाधनें । सगूणनिर्गुणें ।
ईश्वरार्चन करणे । ते कर्म म्हणवी ॥१०५५॥

प्रणवादि मंत्रविधान । सांगीक निपुण ।
करणे उच्चारण । तो जप म्हणवी ॥१०५६॥

हृत्कमळकर्णिकास्थान । अंतरी ईश्वरचिंतन ।
करणे ते ध्यान । म्हणवी निरुतें ॥१०५७॥

प्रत्यगात्मायातें । परमात्मियातें ।
ऐक्यविचारणेतें । ज्ञान म्हणवी ॥१०५८॥

इति समस्त । ग्रहस्ताश्रमीयासि कृत्य ।
योग्यता अभिमत्त । म्हणोनि जाणावें ॥१०५९॥

अणीक तया ग्रहस्ताने सर्वथा । आपले कुळदैवत गुरुदेवता ।
भजन न सोडितां । करीतसें ॥१०६०॥

मातृपितृचे वचन नुलंघावें । स्त्रीपुत्रबंधुबांधवासवें ।
होऊनि असावें । विनयोपचारवंत ॥१०६१॥

सतीसुतवर्गातें । आपुलिया अनुमत्तें ।
ठेवावी यथार्थे । अज्ञेआंतु ॥१०६२॥

तपोवृद्ध विद्यापन्न । सत्पात्र आलिया उदासीन ।
अस्तिनास्तिवचन । म्हणो नयें ॥१०६३॥

कोणी येक नामरूपपंथा । असूनि आला तरी न बोलतां ।
अन्नपाने सर्वथां । सत्कारावें ॥१०६४॥

विद्याभ्यसनी होआवें । बुद्धिवंत बाळका स्वभावें ।
जाले तरी तयाचे मानावें । वचन विशेष ॥१०६५॥

कोव्ही येक कार्यकृत्य । विचारुनी आदि अंत ।
करावे धैर्यवंत । होऊनियां ॥१०६६॥

संपत्ती आलियावरी । कुसुमाचिये परी ।
हृदयांतरी । मृदु असावें ॥१०६७॥

अस्त आलिया अंति । पाषाणाचिये रिती ।
कठीण होऊनि चित्ती । असावे पैं ॥१०६८॥

वृक्षाऐसे परोपकारी होआवें । सर्वदा देवाधीन म्हणावें ।
पुरुषप्रेत्न न संडावें । उद्योग करावा ॥१०६९॥

अणुमात्र परगूण । जाला परि तो आपण ।
पर्वतासमान । स्तुति करावी ॥१०७०॥

स्वगूण अतिशयां । असिला तरी तथा ।
अपणांत अच्छादुनियां । लोप करावा ॥१०७१॥

जरी दूरस्त जाले अत्यंत । परि आपणासी हितार्थ ।
खौख्यादीक तेथ । तेथ असावें ॥१०७२॥

आपणासी प्रतिबाधा करी । ते वस्तु हो पै भलतैसी तरी ।
परि ते अवस्यपरी । त्याग करावा ॥१०७३॥

लोकापवादासी । भय असावे मानसी ।
स्वकरणइंद्रियासीं । निग्रह करावा ॥१०७४॥

वेव्हारप्रवर्तनी । असत्यादीक त्यजुनि ।
सत्यवंत होउनी । असावें सदां ॥१०७५॥

उत्तरमुख दिवसाभीतरीं । दक्षिणाभिमुख रात्री ।
मळविसर्जन करावें वरी । अशोच्य बोलो नयें ॥१०७६॥

क्षौर तैलाभ्यंगनस्नान अंगिकार । आदित्य मंगळ बुधवार ।
बृहस्पती शुक्रवार । इती त्यजुनी ॥१०७७॥

जन्मनक्षत्र सोडुनी । उरले दिवस अवलंबुनी ।
पूर्वउत्तरमुख बैसोनी । कार्य संपादावे ॥१०७८॥

बुध बृहस्पती शनिवार । तये दिनी नूतन वस्त्र ।
प्रावर्ण करावे चंद्र । स्वरें ते शुभ ॥१०७९॥

उरले समस्त दिन । तयांतु सूर्यस्वर विलोकुन ।
वस्त्रादिक नूतन । परिधान करावें ॥१०८०॥

पूर्वपश्चिमदक्षिण । मुखे सूर्यस्वरें करु नये भोजन ।
नातरी उत्तरमुखें अन्न । सेऊ नये चंद्रस्वरे ॥

असाक्षी करु नये भोजन ।
ताम्रपात्री करू नये क्षीरपान । क्षीरअन्नसंयोगे लवण सेउ नये ॥१०८१॥

कांस्यपात्री नारिकेळजीवन । घालूनि करू नये सेवन ।
वामकरें जळपान । करुं नये ॥१०८२॥

प्रथम मुखोदकेवीण । करु नये दंतधावन ।
अथवा तर्जनीकरुन । करू नये ॥१०८३॥

सुपारी न फोडिता । अंत्रभाग न शोधितां ।
पर्णप्रक्षाळण न करितां । विडा घेउ नये ॥१०८४॥

वामहस्तें विडी करु नये स्विकार । चुन्याचे सेउ नये पत्र ।
दिवसा निद्रा मैथुनव्यापार । करु नये ॥१०८५॥

दासीवैश्यासंग करु नयें । मरणावस्थापर्यंत धैर्य ।
कवणासी मागो नयें । काकूलती ॥१०८६॥

मागावया आपणासी । अर्थी आला ग्रहासी ।
तरी सर्वस्व तयासी । नास्ति म्हणो नयें ॥१०८७॥

कोण्ही येक अपणासी होणार प्राप्त । तेचि होईल नसे कदाचित ।
न होय म्हणोनी स्थिरचित्त । होऊनि असावें ॥१०८८॥

भाग्यावृद्धि असें । द्रव्यहराश नसें ।
तववरी पुरुषें । भोगत्याग न संडावा ॥१०८९॥

धनार्जना वित्तक्षयत्व । ग्रहछिद्रत्व ।
आपले अपमानत्व । हे प्रगट करु नये ॥१०९०॥

सउपकारियातें । कवितेवैद्यातें ।
आणि धर्मज्ञातें । कोपो नयें ॥१०९१॥

न बोलावी जो कवण । तयाच्या ग्रहा जाऊ नये आपण ।
अपृच्छासंभाषण । करु नयें ॥१०९२॥

आत्मस्तुती परनिंदाउत्तर । अनुवादो नये किंचित मात्र ।
शिवालई शिवक्षेत्री मळमूत्र । करु नयें ॥१०९३॥

सूतक पंचप्रकार । तया अतळो नये साचार ।
लौकिकाचा आचार । लंघू नयें ॥१०९४॥

जातिसंकर करू नयें ग्रहस्तें । उपेक्षु नयें लौकिक वर्तणुकेतें ।
दुखउ नये दासीभृत्याते । अन्नवस्त्रेविण ॥१०९५॥

तृणआतु शयनाचियें । ठाई गौसी दुःख देउ नये ।
दीर्घद्वेष करु नये । कवणांसी ॥१०९६॥

सुपाचा वायू झाडणीचे अग्र । लागो नये अपवित्र ।
दुर्जनासी संगोपचार । करु नयें ॥१०९७॥

पापकृत्य करु नये सर्वथां । तनुधनवनिता ।
तयावरी दीर्घ ममता । मोह धरु नये ॥१०९८॥

ख्यातिलाभार्थ करु नये पूजन । इत्यादि ग्रहस्तालागुन ।
हितोपदेशनिरोपण । म्हणोनी जाणावें ॥१०९९॥

आणि तया ग्रहस्तासी अति । उपजली जरी विरक्ती ।
तरी वानप्रस्थ अथवा यति । आश्रम स्विकारावे येथें ॥११००॥

सतसंगे करुनि अंगिकार । ना तरी वनितादि ग्रहभार ।
पुत्रासी समर्पूनी सर्वत्र । उपरांति ॥११०१॥

सर्वसंगपरित्याग करूनि । जातीसमंध ग्रह त्यजूनि ।
तपकार्यसिध्यर्थ म्हणोनी । विवेकांचे ॥११०२॥

उत्तरायण शुक्लपक्ष शुभवार । शुभलग्न शुभनक्षत्र ।
सुमुहुर्त विचारूनि अंगिकार । करावा की ॥११०३॥

अणीक शनि सोमवारी पूर्वे । सर्वथा न रिघावें ।
आदित्य शुक्रवारी न वजावें । पश्चिमेसी ॥११०४॥

मंगळ बुधवारी पेणें । उत्तरदिशेसी न करणें ।
बृहस्पतवारी दक्षिणें । रिघो नयें ॥११०५॥

ऐसे हे सुलभ वार जाणोनि सकळी । वरी हरडा सर्षभ पाली ।
इति वामभागी बोलिली । तरी उत्तम ॥११०६॥

पिंगळयाने सव्य करावे भाष्य । कपी हरण भारद्वाज तास ।
वामभागी प्रवेश । करावा हियानीं ॥११०७॥

जंबूक मयोर वायस । नकुळ इत्यादि सव्य विशेष ।
करावा प्रवेश । इति शकुन जाणोनी ॥११०८॥

अणीक तक्र तैलाभ्यंग स्नान । सर्पि धूम्रयुक्तअग्न ।
येक विप्र नाशिकछेदन । मनुष्यादिक ॥११०९॥

वोले वस्त्र कार्पासभार सन्मुख । सूतकी विधवा शून्यघटादिक ।
म्हणिजे इति अशेख । शकुन त्यजावें ॥१११०॥

आणीक कुमारी गो भेरी शंख । दधि फळ पुष्प भंडाग्नी सुख ।
आसन विप्रद्वय अश्वद्वय गजादिक । वृषभ सुरापात्र ॥११११॥

मछद्वय सिद्धान्न । वैश्याश्री मांस सुवार्ता पूर्ण ।
कुंभादीक शुभशकुन । दर्शन करूनी ॥१११२॥

वरी दूर पेणेशी चंद्रस्वर । समीप येण्यासी सूर्यस्वर ।
विचारे करावा अंगिकार । मंगळसुचनेंनें ॥१११३॥

आपुलें ग्राम सांडावें । ब्रह्मारण्यीं प्रवेशावें ।
पुण्यवन अश्रावें । तयें ठाई ॥१११४॥

पर्णकुटी तरी सामान्य । अथवा ऋक्षअश्रमी राहोन ।
यज्ञोपवीत जटाधारण । मृगजिनसहित ॥१११५॥

नखरोम न त्यजुनी । सकळ निषेध सोडूनी ।
ग्राम अथवा पाटणी । अनन्य याचिता ॥१११६॥

शाखादिक कंदमूळ । मितिआहार षोडशकर्दळ ।
भोजन येककाळ । होऊनियां ॥१११७॥

कामक्रोधादी दंडुनी । द्रव्यप्रतिग्रह त्यजुनी ।
त्रिकाळजळस्नानी । न चुकतां करावें ॥१११८॥

भस्मोध्दूळण धारणादिक । अनुक्रमे त्र्यंबक ।
मूळमंत्रे पूर्वक । करूनियां ॥१११९॥

गायत्रीमंत्रजप शिवार्चन । अग्निहोत्र पंचमहायज्ञ ।
यमनियमादी अष्टांगसाधन । युक्त होऊनी ॥११२०॥

कृच्छ्रचांद्रायण । उपवास अन्नेविण ।
गोमयभक्षण । पयपानादि ॥११२१॥

वायोभक्षण पर्णासन । निराहार भूमीशैन ।
शीतवातादी दुखाशरण । निष्प्रयासें ॥११२२॥

आणीक मूळाधारस्थानी । असे तो मूळाग्नी ।
आणि वडवानळाग्नी । पाषाणाग्नी हे ॥११२३॥

घृताग्नी सुराग्नी म्हणऊनी । सूक्ष्मबिंदुरूप पंचाग्नि ।
अनुसंधानात्मक होउनी । ध्यानयुक्त ॥११२४॥

बाह्यजनिधापकाळाग्नी । सूर्यतप्ताग्नी रविकांताग्नी ।
दावाग्नी उदराग्नी । म्हणिजे पंचाग्निमध्यें ॥११२५॥

राहूनियां येकपादस्थित । इत्यादि पादस्थित समस्त ।
आंगे आसे आपण आचरत । अतिउग्रतपें ॥११२६॥

औदुंबरा वैयासिक प्रक्षाळणी । पौर्णमासी म्हणऊनी ।
असे चतुर्थप्रकार होउनी । तो वानप्रस्थ म्हणवी ॥११२७॥

अणीक तया वानप्रस्तासी अति । वैराग्य उपजले तरि यति ।
अश्रम अंगिकार करावया अति । योग्य होऊनियां ॥११२८॥

ते यतिवृत्तिभद पृथक । कुटीचर वहूदक ।
हंस परमहंस म्हणोनि चतुष्क । प्रकार असे ॥११२९॥

त्याचे ठाई । शिखा यज्ञोपवीत । त्रिदंड कमंडलु भिक्षापात्र ।
काषायांवर । धरूनियां ॥११३०॥

त्रिसंध्याकाळ भस्मोद्धूळण । त्रिपुंड्रधारण रुद्राक्षाभरण ।
गायत्रीजप शिवलिंगार्चन । विश्वासे करितां ॥११३१॥

स्वजाती अथवा पुत्रवंधूजन । गृही आणूनि भिक्षाअन्न ।
भोजन करूनि असे सुखी होउन । तो कुटीचर म्हणवी ॥११३२॥

आणीक शिखा यज्ञोपवीत । वरी गोवाळ रचित ।
वजुसंमंधुसहित । त्रिदंड धरुनी ॥११३३॥

मृन्मयपात्र कांस्यपात्र । अथवा दारुपात्र ।
यामध्ये कोणी येक अंगिकार । करूनियां ॥११३४॥

पादुका सुतरिका तरी । योगपट्ट्यादि परी ।
सकळ सामग्री । स्विकारूनी ॥११३५॥

कंथा कौपीन । आणि आच्छादन ।
कृष्णाजन । पत्राताप ॥११३६॥

भस्मोध्दूळण त्रिपुंड्रधारण । रुद्राक्षादी आभरण शिवार्चन ।
त्रिसंध्याकाळ समयोच्चारण । सावित्रीजप ॥११३७॥

वेदध्ययन त्यजूनी । ईश्वर आराधुनी ।
तत्पर होउनी । असे सदांसर्वदा ॥११३८॥

येक अन्नरहित पुत्रवंधूजन । तयाचे गृही न रिघता भिन्न ।
सप्तग्रही भिक्षान्न । अणूनियां ॥११३९॥

भोजन करूनि इच्छावशें । सदासर्वदा संतोषें ।
सहजमय होऊनी असे । तो वहुदक म्हणवी ॥११४०॥

आणि शिखा यज्ञोपवीत त्यजुनी । वेणुद्दयक धरूनि ।
कमंडलूक अन्न । पाणी मृत्पात्र पात्र ॥११४१॥

कंथा कौपीन । धोत्र आच्छादन ।
बाह्यवसादि लांछन । धरूनियां ॥११४२॥

भस्मोद्धरणधारण । रूद्राभरण शिवार्चन ।
त्रिसंध्याकाळी उच्चारण । सावित्रीजप ॥११४३॥

येक काळी भिक्षाअन्न । यांचूनिया आपण ।
अष्टग्रास प्रमाण । भक्षूनियां ॥११४४॥

अजिव्हा क्षडक । पंगूळ अंधक ।
बधिर मुग्ध इति मुख्य । षड्गुणयुक्त होऊनियां ॥११४५॥

वनितादि विषय कामीक आठवण । स्तुति विनोद दर्शन संभाषण ।
अपेक्षा भोग म्हणिजे मैथुन । अष्टविध त्यजुनी ॥११४६॥

अध्यात्मचिंतन । तत्पर होऊन ।
असे तो आपण । हंस म्हणवी ॥११४७॥

अणीक शिखा यज्ञोपवीत । नित्यकर्मादीक कृत्य ।
त्रिदंडकमंडलादि समस्त । परी त्यजुनी ॥११४८॥

कंथा कौपीन शीत । परिहारानिमित्य ।
पाणिपात्रादिक समस्त । स्विकारुनी ॥११४९॥

अणीक दिव्यस्नान । आणि वरुणस्नान ।
मानसस्नान । म्हणिजे पंचस्नानआतु ॥११५०॥

अग्नी म्हणजे भस्मस्नान । तें सकळ स्नानाआंतु निपुण ।
कोटि कोटि गुण । विशिष्ट होउनि असें ॥११५१॥

वेदागमप्रसिद्ध होऊनियां । असे तया कारण भलतया ।
आश्रमासी त्यजावया । योग्य नव्हे ॥११५२॥

त्यालागूनी अग्निप्रीति । भस्म म्हणऊनि इति ।
आदि मंत्रोक्ती । उद्धूळण करूनी ॥११५३॥

प्रणवपूर्वक हंसमंत्रे । त्रिपुंड्रधारण करूनि विस्तारें ।
रुद्राक्षमाळा स्नानांतरे । धरुनियां ॥११५४॥

शिवलिंगार्चन । सदांकाळी निपुण ।
न सोडितां आराधन । तत्पर होऊनी ॥११५५॥

त्रिसंध्याकाळ प्रणवसहित । शांतप्राणायामयुक्त ।
अष्टोत्तरशत । प्रणवजप करूनी ॥११५६॥

येकांतवास असुनी । स्वस्थासनी वैसोनी ।
समाधिनिष्ठ होउनी । यथाशक्ती ॥११५७॥

वरी माधोकरी अकल्पीत । प्राक् प्रणीत अयाचित ।
तत्काळीक म्हणिजे विहित । पंचभिक्षांतरी ॥११५८॥

नातरी येक गृही अन्न । यथेष्ट ना अल्पयोगानुण ।
यथायुक्त भोजन । करूनियां ॥११५९॥

सद्गुरु उपासन । साधने उपासनात्म ज्ञान ।
अभ्यास होऊन । असे निरुता ॥११६०॥

स्नान शौच असत्य अनृत । काम क्रोध लोभ मोह ममत्व ।
दंभ दर्पादि त्यजूनि समस्त । चातुर्मास्य अचरतसें ॥११६१॥

आपुला पूर्वील समाचार । सकळ परित्यागूनि उत्तर ।
आचारांतु असे निष्टातत्पर । तो परमहंस म्हणवी ॥११६२॥

अणीक सूर्योदयरहित पूर्वक । हे खद्योत दीपक ।
हे नक्षत्र हा मयंक सकळ रविप्रसे अंतक । अविर्भाव होय ॥११६३॥

तैसे ज्ञानोदयासी पाहिलें । भिन्न भिन्न वेगळाले ।
अभिमाने योग्य जालें । चतुराश्रमधर्म ॥११६४॥

तया आश्रमधर्माचरण । अंतःकर्ण शुद्ध होय वरि साधन ।
चतुष्टयसंपन्न । होऊनियां ॥११६५॥

वरी श्री गुरूपदेशवेदोक्त । विचारे जिवा परमऐक्यत्व ।
वसे सम्यक्ज्ञान विशेषत्व । जालियावरी ॥११६६॥

मग तया ज्ञानासी येकही भिन्न । विशेष नाही त्या कारण ।
आपणासी येकही अयागमन अन्न । अश्रमाभिमान नाही ॥११६७॥

विधिनिषेध विलक्षण । होऊनि सर्वाश्रमी पूज्यमान ।
आपणा आपण पूज्य होऊन । निश्चीत म्हणोनियां ॥११६८॥

मीचट म्हणउनी । जीवन्मुक्त म्हणोनी ।
अवधूत म्हणवोनी । स्थितप्रज्ञा म्हणवी ॥११६९॥

गोमद्योन्मुक्त म्हणऊनी । स्वच्छंद म्हणोनी ।
निरालंब म्हणोनी । निश्चित म्हणोनियां ॥

भगवद्भक्त म्हणोनी । गुणातीत म्हणऊनी ।
ब्राह्मण म्हणोनी । असे अपण नाम पढोनियां ॥११७०॥

अणीक इति । पूर्वोक्त समस्ती ।
शैव वर्णाश्रमाप्रती । तयामध्यें ॥११७१॥

शुद्धवैदिक तांत्रिकवैदिक । शुद्धतांत्रिक वैदिकतांत्रिक ।
म्हणोनि क्रियाभेदे चतुष्क । होऊनि असे ॥११७२॥

त्याचे ठाई । तंत्रवासना किंचित । न रिघतां कदांचित ।
वैदिक नैष्ठिक्यवंत । ते शुद्धवैदीक म्हणवी ॥११७३॥

वेद अणीक श्रुती । म्हणिजे उभयप्रीति ।
शुक्ल अल्पें अति । तो तांत्रिकवैदिक ॥११७४॥

वेदवासनालेशमात्र । न रिघतां निरंतर ।
तांत्रीक नैष्ठिक्य तत्पर । तो शुद्धतांत्रिक वेदादीक ॥११७५॥

उभयप्रीति मुक्तात्मक । होऊनि असे तो तांत्रिक ।
वैदीक । म्हणवी ॥११७६॥

अणीक तया अधिकार्यालागुनी । मार्ग शंकर नव्हे तैसे भिन्न भिन्नी ।
विधिप्रतिपादन ते कवणी । म्हणीतले तरी ॥११७७॥

सुतसंहिताख्यमुख । पारस्परपुराणादिक ।
शुद्धवैदिक प्रतिपादक । म्हणवीतसें ॥११७८॥

शिवराघवसंवादात्मक । वाशव्यसहितादिक ।
तांत्रीक प्रतिपादक । म्हणवीतसे ॥११७९॥

शैव पशुपती । सोम नकुळ म्हणिजे इति ।
शास्त्रशुद्धतांत्रिका प्रति । पादक म्हणवी जाणावें ॥११८०॥

भागवत शैवसिद्धांतादिक । वैदिक आणि तांत्रिक ।
कर्मप्रतिपादक । म्हणवी जाणावें ॥११८१॥

अणीक तया । योगपदांत विवेकूनया ।
श्रीकिच्छेश्वरापासूनियां । उपदेश पावलें ॥११८२॥

श्वेत सहदेव मदन सहोत्र । कंकुलोकाक्षजनी अत्र ।
दधि वामन वृषभ उग्र अत्रि सुवाळक । गौतम वेद शिर गौकर्ण ॥११८३॥

गुहावासी शिखंडी जटामाळी । अट्टहास दारुक लांगुळी ।
महाकाया शूळी । दंडी मुंडी ॥११८४॥

सहिष्णु सोम शर्मक । लकुळेश म्हणोनि अष्टक ।
विंशति मुख्य । योगग्रहचार्य ॥११८५॥

येकयेकासी चतुःश्चतुः शिष्य । श्वेतशिखादि गर्ग मित्र करिष्य ।
सहीत शतवरी द्वादश । शिष्यांतु युक्त ॥११८६॥

भसितोद्धूलन त्रिपुंड्र । रुद्राक्षमाळा योगदंड ।
योगप्रत्यादिके अखंड । अलंकृत होऊनी ॥११८७॥

येकशिष्य वहुशिष्य । अथवा पंचशिष्य ।
केशपाश मुंडितादिक । म्हणऊनी ॥११८८॥

शांत तेजोन्मय अति । होऊनियां आसती ।
तया योगाचार्याची स्थिती । लक्षण जाणावें ॥११८९॥

आणीक ईश्वराचे ठाईं चित्त । परतोनियां तद्युक्त ।
जाहले तें तद्युक्त येकत्व । त्या योगाचे परिभेद ॥११९०॥

मंत्रयोग लययोग । हट्टयोग राजसयोग ।
म्हणिजे चतुर्थयोग । भेद म्हणवी ॥११९१॥

म्हणोनि मध्यम म्हणोनि । अतिमंत्र अतिमंत्रोत्तर म्हणऊनी ।
चतुर्विधकर्म विशेषगुणी । मंत्रादि योगकारिका ॥११९२॥

आणीक तया चतुर्थयोगानुक्रमे विषद । प्रणवहंसादी मंत्रभेद ।
दशनाद दशबिंद । लक्षणादिक ॥११९३॥

यमनियम आसन । प्राणायाम प्रत्याहार ध्यान ।
धारणा समाधी म्हणऊन । अष्टांगयोग विधानें ॥११९४॥

अहिंसा सत्य अस्थीय ब्रह्मचर्य । क्षमा घृति दया आर्जव ।
मितिप्रमाण अहेर । शौच्य म्हणऊनियां ॥११९५॥

तप संतोष आस्तिक्य दान । ईश्वरपूजन सिद्धांतश्रवण ।
जाल्या मिति जपव्रत म्हणोन । नेमाचे दशभेद ॥११९६॥

आणि येथे विषद । यमादी लक्षणभेद ।
कैसा कवण विविध । म्हणीतले तरी ॥११९७॥

यज्ञार्थ पशु येक रहित । प्राणि मात्र परी समस्त ।
नरपीडणघात । ते अहिंसा म्हणवी ॥११९८॥

गुरु देवता प्रयोजन । विषय एकवांचून ।
आपणासी आन । अप्तादिक ॥११९९॥

वंधन्न शरीर पात । नीतीचे ठाईं अनृत ।
न बोलणे किंचित । ते सत्य म्हणवी ॥१२००॥

आचार्यापासाव अज्ञेनें । ना तरी बळात्कारानें ।
परद्रिव्य परिहारानें । तें अस्तिक्य म्हणवी ॥१२०१॥

वनितालावण्यदर्शनें । कां ऐकोनी मनोवाक्यानें ।
लेशमात्र न चंचल तेण । ते ब्रह्मचर्य म्हणवी ॥१२०२॥

परोपकारी आपण । समर्थ जाला निःशेष गुण ।
परि शरणत्वे आपण । ते क्षमा म्हणवी ॥१२०३॥

अर्थबंधूसुतादिकाचे ठाई । प्राप्तअप्राप्त विषई ।
हर्षविषाद असोनि काही । आसणे तें घृति म्हणवी ॥१२०४॥

रोगापासाव पीडित । जाले शत्रुमित्रादी समस्त ।
तया अभिमुख होणे रक्षणार्थ । ते दया म्हणवी ॥१२०५॥

हर्षशोकादिकाचे ठाई । बुद्धि कल्मषमय कांहीं ।
न होनी असणे निःसंदेही । ते आर्जव म्हणवी ॥१२०६॥

आत्मना यथेष्ट अन्न । योगांगगूण ।
करणें भोजन । ते मितीअहार म्हणवी ॥१२०७॥

स्वदेहमळविमोचन । निमित्यार्थ कारण ।
मृत्तिका जीवन । संयोगे करणें ॥१२०८॥

मनोमळनिवृत्ति करणें । मंत्रध्यानादीक विधानें ।
यथापूर्वक करणें । ते शौच्य म्हणवी ॥१२०९॥

अणीक मी तो पै कवण । मज संसार आला काय कारण ।
कैसा सुटेल म्हणोनि विचारणें । ते तप म्हणवी ॥१२१०॥

अपणासी जें भोग्यानुगुणें । प्राप्ति होय ति तुल्याने ।
प्रणामूनि असणें । ते संतोष म्हणवी ॥१२११॥

पुण्यपाप स्वर्गनर्क । असे म्हणोनि पूर्वक ।
जाणणे ते आस्तिक्य । म्हणवी जाणावें ॥१२१२॥

अपण साधिले द्रव्याधिक । धर्मार्थक निमित्तक ।
सत्पात्रे देणे विधिपूर्वक । ते दान म्हणवी ॥१२१३॥

स्मरण स्तुति भजन निरंतर । मनोवाचाकायके तत्पर ।
शिवभक्ति दृढस्तुति ईश्वर । पूजन म्हणवी ॥१२१४॥

वेदांतअर्थ अर्थअनुसंधान । पूर्वक परि विचारण ।
ते सिद्धांतश्रवण । म्हणवी जाणिजे ॥१२१५॥

लौकीक वैदीक विरोध । मार्ग परी बहुविध ।
तेथे चिंतन मोहे सावध । ते लज्जा म्हणवी ॥१२१६॥

विहित स्वधर्मी विश्वास निश्चय । ते मति म्हणवी निःसंदेह ।
प्रत्रेशत रुद्रादी स्वाध्याय । ते जप म्हणवी ॥१२१७॥

धर्मार्थ आत्मसिध्यर्थ । जाणे उपग्रहाण ते म्हणवी व्रत ।
इति अहिंसादि समस्त । लक्षण जाणावें ॥१२१८॥

अणीक स्थीर सुखासनी पूर्वक । जाहला निश्चयात्मक ।
तयासी आसनक्रमादिक । कैसे म्हणीतले तरी ॥१२१९॥

सिद्धासन सिंहासन । स्वस्तिकासन ।
शूळासन सुखासन । सर्वतोभद्रासनादि ॥१२२०॥

गोमुखासन गरुडासन । मयोरासन मच्छिद्रासन ।
मच्छासन मुद्रासन । मंडूकासनादि ॥१२२१॥

मृगासन नागासन । कुक्कुटासन कुंजरासन ।
कूर्मासन काष्टासन । क्रौंचासन जें ॥१२२२॥

रौद्रासन कामदहनासन । ऐनासन व्याघ्रासन ।
वैणिकासन वस्त्रासन । वासवासनादि ॥१२२३॥

वीरासन वराहासन । पर्यंकासन पद्मासन ।
पादासन पश्चिमतासन । त्रिपथासन जें ॥१२२४॥

हस्तिकर्णासन हेमासन । आणि अर्धासन ।
म्हणिजे इत्यादि करून । चवऱ्यायेसीं आसनभेद ॥१२२५॥

आणीक देहजनित पवन । प्राणायाम लक्षण निरोधन ।
तयाविधीलागून । प्रथमारंभी ॥१२२६॥

वेदीकूप अल्पद्वारा अंध्र वितान । सकळबाधारहित सलक्षण ।
योग मंडप रचून । यथा प्रकारें ॥१२२७॥

कुश कृष्णाजिन । आदि योग ग्रहोपकरण ।
प्रकार रचना करून । उपरि प्रथम ॥१२२८॥

तैल पिनाकादि अशेष । हीन वस्तु परि बाधक ।
योगेश्वरासी मुख्य । निषेधद्रव्ये ॥१२२९॥

मुद्ग पटोळक । गोधूमादि वस्तु सौख्य ।
कारक यागेश्वरासी सार्थक । स्विकारात्रया योग्य नेमे ॥१२३०॥

वरी प्राणायाम प्रारंभी श्रीगुरू । सरस्वती विघ्नेश्वरू ।
विशाखादि देवता उपचारु । पूजाविधाने करावें ॥१२३१॥

आणीक सकळ मनुष्य करि वळें । तेथे आपुलें आपुलें ।
शाण्णव अंगुळें । प्रमाण उन्नत असें ॥१२३२॥

गुदस्थानावरी द्विअंगुळ । गुह्यस्थानाखाली द्विअंगुळ ।
मध्यप्रमाण येकांगुळ । ते देह मध्यस्थान म्हणवी ॥१२३३॥

तेचि मूळाधार म्हणऊनि । शिखास्थान म्हणोनी ।
नाम तयालागूनी । विभेद परी ॥१२३४॥

तयाकारणे त्रिकोण । अकार होऊन ।
जैसे तप्त सुवर्ण । कांतिमय असे ॥१२३५॥

अणीक तयापासून । नव अंगुळे उन्नत चतुरांगुळ विस्तीर्ण ।
कुक्कुडांकार होउन । नाडीकंद ऐसे ॥१२३६॥

नाभि वसे तये मध्यस्थानी । तया नाडीकंदापासूनि ।
द्विअंगुळ खाली कुंडलिनी । स्थान असें ॥१२३७॥

ते कुंडलिनी सर्प अष्टप्रकृति । रूपाने विकारती ।
सप्तकुंडलाकृती । होउनी असे ॥१२३८॥

नाडीकंदमध्यस्थित सुषुम्नी । म्हणिजे नाडीद्वार अंतर्मुखे अच्छादुनी ।
दीर्घ विसर पाडोनि । निद्रिस्त होउनी असे ॥१२३९॥

तयानाडी कंदापासुनि द्वादशक । अंगुळे उन्नत होउनी पूर्वेक ।
नळसहीत परित्राष्टकाने चतुष्क । अंगुळ विस्तीर्ण ॥१२४०॥

कर्दळीपुष्पादिक । तैसे होउनि अधोमुख ।
पूर्वहृदयस्थानक । कमळ असे त्याचे ठाई ॥१२४१॥

जीवहंस तो आपण । कर्मपाशें करून ।
बद्धरूपे होऊन । तेथे वसे ॥१२४२॥

वालाग्रशत भागांत प्रति । येक भाग सूक्ष्माकृती ।
होउनी मनाचे गती । भ्रमण असे ॥१२४३॥

अणीक तया नाडिकंदापासृनि । सूत्राऐसे अंकूरनी ।
अधोर्ध्व वामदक्षिण पसरोनी । सविस्तारें ॥१२४४॥

मनप्राणादि करूनी । दशविध पवन ।
संचारालागून । मार्ग म्हणवी ॥१२४५॥

वाहत्तरसहस्त्र अशेख । नाडीसंमोहांत मुख्य ।
म्हणवी चतुर्दशक । नाडी त्याचे ठाई ॥१२४६॥

ईश्वर अधिदेवता मुख्य युक्त । सुषुम्ना मस्तकांत ।
पर्यंत पूरित । होऊनि असे ॥१२४७॥

विष्णू अधिदेवता । होऊनि युक्त ।
इडा वासना सापुटांत । पर्यंत पूरित असे ॥१२४८॥

ब्रह्मा अधिदेवता समेत । पिंगळानाडी परिपूरित ।
दक्षिण नासापुटांत । पर्यंत असे ॥१२४९॥

इंद्र अधिदेवतायुक्त । गंधारी नाम नेत्रांत ।
पर्यंत पूरित । होऊनि असें ॥१२५०॥

चंद्राधिदेवतायुक्त शशांकुनी । असे वामकर्णांतु पुरोनि ।
प्राजापत्यादि देवतायुक्त पयस्विनी । दक्षिणकर्णांतु असे ॥१२५१॥

विराटादि देवतायुक्त । सरस्वती असे पूरित ।
जिव्हांतपर्यंत । होऊनि असे ॥१२५२॥

भूमि अधिदेवतायुक्त । सरस्वती असे जिह्वांतपर्यंत ।
सर्व परिपूरित । होऊनि असे ॥१२५३॥

पावक अधिदेवतायुक्त । विश्वोदर जठराग्नीत ।
पर्यंत परिपूरित । होऊनि असे ॥१२५४॥

वरुणादि देवतायुक्त । अलंवू पायूआंत ।
पर्यंत पूरित । होऊनि असे ॥१२५५॥

सूर्यादि देवतायुक्त । यशस्विनी दक्षिणपादांत ।
गुह्यपर्यंत परिपूरित । होऊनि असें ॥१२५६॥

वरुण अधिदेवतायुक्त । हस्त जिह्वा वाम पादांगुष्टांत ।
पर्यंत पूरित । होऊनि असें ॥१२५७॥

वायू अधिदेवतायुक्त । वारुणी सर्वांगांत ।
गामिन्यत्वें पूरित । होऊनि असें ॥१२५८॥

तया कारणशरीर अभ्यंतर । नाडी चक्री विचार ।
म्हणोनिया सत्वर । जाणावया यथार्थ पँ ॥१२५९॥

अणीक । नाही चक्रपूर्वक ।
शोधनक्रमादिक । कुंभकविधी ॥१२६०॥

आपुली जानू दक्षिणे । करावी विधानें ।
येकवट करणे । ते मात्रा म्हणवी ॥१२६१॥

तयालागी षोडशमात्रा नेमे करून । तनू लंव दीपन ।
जठराग्नी वर्तन ते नाडी शुद्ध चिन्ह ॥१२६२॥

सूर्यभेदन उजाइषी करी । शिवलिंभस्त्रिकभ्रमरी ।
मूर्छा केवळ म्हणिजे परी । कुंभक षष्ठप्रकार ॥१२६३॥

मूळवंध । आणि उड्यानवंध ।
जालंधरवंध । म्हणिजे वंधत्रय हो ॥१२६४॥

प्रकृती म्हणऊन । वैकृती म्हणोन ।
म्हणिजे दोन । भेद होऊनि असती ॥१२६५॥

रेचक पूरक कुंभक । उत्कर्ष अपकर्षक ।
शून्य उत्क्रांति म्हणिजे सप्तक । प्राणायामलक्षणें ॥१२६६॥

स्वेद कंपन देहोत्थापन । म्हणिजे अनुक्रमे भिन्न ।
कनिष्ठ मध्यम उत्तम प्राण । याम सिद्धी सूचना ॥१२६७॥

पश्चिमद्वारें गमन । ब्रह्मादि ग्रंथभेदन ।
शिरोमध्यगत चंद्रामृतपान । सेवनादीक क्रमें ॥१२६८॥

आणि या प्राणायाम समस्ती । पापक्षयरूप शांति ।
अज्ञाननिवृत्ती । स्वरूप शांत ॥१२६९॥

ज्ञानप्रकाशरूपदीप्ती । बुद्धि निर्मळरूप म्हणिजे इति ।
चतुर्विध परि प्रीती । सिद्धि होय ॥१२७०॥

अगीक वाह्यकर्मपरित्यागे चित्त । अंतर्मुख करूनियां अखंडीत ।
तो प्रत्याहार लक्षणयुक्त । परि तो लक्षणभेद ॥१२७१॥

परशिव म्हणिजे चिद्धन । शुभाश्रयाचे ठाई चित्तस्थापन ॥
ते लक्षणवंत धारण परि ते भूधरण । आदि बहुविध ॥१२७२॥

विषयांते नातळतां । अंतरीं शिवचिंता ।
प्रवाहरूपें अखंडितां । ते शुद्धज्ञान परि नानाविध ॥१२७३॥

ध्याय ते वस्तूचियें । ठाई मन निश्चळात्मक होय ।
ते समाधी निश्चयें । जाणिजे शुद्ध ॥१२७४॥

परि ते ज्ञाताज्ञातादि । भेदे आणिमादि ।
अनेक सिद्धी । भेदप्रदायक ॥१२७५॥

अणीक अलस्य व्याधि प्रमाद । स्थान संशय अनवस्थित अश्रद्ध ।
भ्रांति दर्शन दुःख दुर्मानस विषयलुब्ध । जे दशयोग विघ्न ॥१२७६॥

लयचि अक्षेप कसोय । म्हणिजे चित्तदोषत्रय ।
ते विघ्नदोषमय । उपशांति प्रकारें ॥१२७७॥

अणीक यमादी अष्टक । अंगाआंतु मुख्य ।
प्रथम नियमादि मुख्य चतुष्क । ते बाह्य म्हणवी ॥१२७८॥

उरले प्रत्याहर । आदि चतुर्थप्रकार ।
ते म्हणविती अवसर । त्याचे ठाईं ॥१२७९॥

अहिंसादीक तें । अंतर होऊनि निरूतें ।
यमासी सत्यार्थें । वैर अ( ? )दि ॥ १२८०॥

स्वस्तिकादीक भेद । आसनासी साध्य ।
देह आरोग्य छंद । अनालस्यादिक ॥१२८१॥

तंन स्वाध्यायादिक । तयाचे अंतर नियमासि प्रत्यक्ष ।
अभिव्यक्त देवतादि लोक । संदर्शन ॥१२८२॥

रेचकादि सप्त । भेद प्राणायामासी अनुचित ।
दोष परि समस्त । निवृत्त्यादिक ॥१२८३॥

इंद्रियां सकळासी । अंतरंगेसी ।
करीं विशेषीं । आकर्षणादि ॥१२८४॥

प्रत्याहारासि वैराग्यलक्षण । वन्हीऐसे ते तत्पण ।
तद्विषयवर्गाचेन । दाहनादिक ॥१२८५॥

परशिवस्वरूप । शुभाश्रयाचे ठाईं चित्तबंधनरूप ।
धारणासि पाप । सकळ क्षय ॥१२८६॥

सगूण निर्गुण । ध्यानासी आन ।
अनैश्वर्यत्वे छिन्न । निवृत्यादिक ॥१२८७॥

ज्ञातादि समाधि मुख्य । प्रजाप्रतिष्ठादिक ।
इति हे अशेख । फळ म्हणवी ॥१२८८॥

अणीक तया अष्टांगयोगाआंत । यमादि अष्टांग समस्त ।
योगाभ्यासीं युक्त । ते कनिष्ठ म्हणवी ॥१२८९॥

आसनादी षट्क । अंगयोगअभ्यासी ते मध्यमादिक ।
प्रत्याहारादि चतुष्क । योगाभ्यासी ते उत्तम ॥१२९०॥

ध्यानादि द्विअंगाभ्यासिती । ते उत्तमोत्तम म्हणविती ।
इति अधिकारस्थिती । भेद म्हणवी ॥१२९१॥

या नंतरे देहादीक धर्म । सकळइंद्रीयस्थोम ।
उभयावरी वैराग्य ते यम । म्हणवी जाणिजे ॥१२९२॥

परमात्मा सकळभरित । म्हणोनि संततोदित ।
जाणीव आपणात । ते नेम म्हणवी ॥१२९३॥

सर्व वस्तुचे ठाई उदासीन । तेचि म्हणवी आसन ।
विषयार्थीअंतःकर्णनिरोधन । ते प्राणायाम म्हणवी ॥१२९४॥

विषदार्थीतें । विमुखत्व तें ।
म्हणवी वधू निरुतें । प्रत्याहार ॥१२९५॥

सत्वनिष्ठत्व निपुण । ते म्हणवी धारण ।
ब्रह्म मी म्हणोन । निश्चय ते ध्यान म्हणवी ॥१२९६॥

जाणीवनेणीवरहित । शुद्ध जाणीव अखंडित ।
स्तंभितिविन्यात्र दिग्दित । ते समाधी म्हणवी ॥१२९७॥

इति निर्गूण । ते अष्टांगयोगलक्षण ।
प्रतिपादन । म्हणोनी जाणावें ॥१२९८॥

अणीक आधार । स्वाधिष्ठान मणिपूर ।
अनुहत विशुत्धाख्य अग्निचक्र । म्हणिजे षट्चक्रें ॥१२९९॥

तयांसी परिक्रमें भेददेह । मध्य लिंग नाभि ह्रदय ।
कंठ भ्रूमध्य । म्हणिजे षट्स्थानें ॥१३००॥

चतुराश्रय अर्धचंद्र । त्रिकोण षट्कोणाकार ।
वर्तुळ विचित्र । म्हणिजे षट्प्रकार ॥१३०१॥

पृथ्वी आप जीवन । अग्नी आणि पवन ।
आकाश म्हणोन । म्हणिजे षट्भूतें ॥१३०२॥

पीत श्वेत रक्तादिक । नीळ स्फटिक ।
माणिक्य म्हणिजे षट्क । वर्णादिक ॥१३०३॥

चतुर्दळ षट्दळ । दशदळ द्वादशदळ ।
षोडशदळ द्विदळ । म्हणिजे षट्कमळें ॥१३०४॥

वादि सांत वादि लांत । हादि फांत कादिगंत ।
आदि संगात हादि लांत । इति षट्वर्णद्ळाक्षरें ॥१३०५॥

नकारादि प्रणवांत । षट्कर्णिका अक्षरे शोभित ।
ब्रह्मादि विश्वात्म्यांत । षट्अधिदेवता ॥१३०६॥

वरी ब्रह्मचक्र । आणि शिखाचक्र ।
म्हणिजे भ्रूचक्र । चक्रत्रय हें ॥१३०७॥

तयासी पृथक । अनुक्रमे शिखा मस्तक ।
ते म्हणिजे स्थानक । त्रिविध जाणावें ॥१३०८॥

सहस्त्रदळ । आणि तृतियदळ ।
आणि द्विदळ । म्हणिजे पद्मत्रय ॥१३०९॥

ज्योतिवर्ण । महाज्योतिवर्ण ।
अप्रदर्शवर्ण । म्हणिजे वर्णत्रय ॥१३१०॥

अक्षरात्मकवर्णनाद । अनाक्षरात्मकनाद ।
आणि निःशब्दनाद । म्हणिजे नादत्रय ॥१३११॥

अंतरात्मा । आणि परमात्मा ।
परब्रह्मात्मा । म्हणिजे अधिदेवतात्रय ॥१३१२॥

अणीक सोम सूर्य । अग्नी म्हणिजे हिय ।
मंडळत्रय । स्थानादिक ॥१३१३॥

ते होऊनिया कांतिमय । प्रकारे बाह्य ।
मध्ये अंतरत्रय । लक्षादिक ॥१३१४॥

गुणविरहीत । अद्यअवकाशवंत ।
म्हणिजे यथार्थ । स्वरूपपंचक ॥१३१५॥

पूर्वमध्योत्तर । म्हणिजे तारक त्रिप्रकार ।
षण्मुख खेचरी शांभव्यादि वर । मुद्राभेद ॥१३१६॥

अणीक उन्मनी । आणि मनोन्मनी ।
म्हणिजे दोन्ही । साध्य अवस्थात्रय ॥१३१७॥

वीक्षित्याग त्यागता । सुप्तिलता सलीनतां ।
म्हणिजे चतुर्था । मनोवृत्ति ॥१३१८॥

बालोन्मत्त पिशाचक । म्हणिजे योगेश्वरासी पृथक ।
वायू उत्कर्षक । चिन्हत्रय ॥१३१९॥

इत्यादि समस्त । योगवृत्तांत ।
योगपदांत । प्रतिपाद्य जाणावें ॥१३२०॥

अणीक तया चतुर्थ । ज्ञानपादाआंत ।
पति पशु पाश म्हणिजे त्रिपदार्थ । प्रतिपादक असे ॥१३२१॥

त्याचे ठाई । अनादि निर्मळ चिद्घन स्थीर । येकत्वे सृष्टि स्थिति संव्हार ।
तिरोभाव अत्युग्र । म्हणिजे इति ॥१३२२॥

पंचकृत्य कतुत्व तें । साधारणधर्म जयातें ।
होऊनि अशेख अनुमत्तें । ते पतिपदार्थ म्हणवी ॥१३२३॥

या अणीक सृष्ट्यादि पंचक । कृत्यकर्तृत्वादिक ।
विचारपूर्वक । कैसे म्हणीतले तरी ॥१३२४॥

कारणकतुत्व । संकल्पकतुत्व ।
सन्निधानकर्तृत्व । म्हणिजे कर्तृत्वत्रयाआतु ॥१३२५॥

कारणकर्तृत्वादिक । ते कुल्लाळादिकाऐसे पूर्वक ।
जालें विकारात्मक । म्हणोनि तें त्यजुनी ॥१३२६॥

संकल्प म्हणिजे स्मरण । होय विशेष गुण ।
तें तयाकारण । विश्वकर्म्याऐसें ॥१३२७॥

वरि कुमुदकमळादिक । उच्छिष्ट मृत्तिकाधर्में संकोचक ।
विकाश द्रव्य शुष्क । म्हणिजे अनुक्रमें ॥१३२८॥

अज्ञानतादि दोषादिक युक्त । म्हणवी यथार्थ ।
म्हणऊनियां संकल्पकर्तृत्व । त्यजूनियां ॥१३२९॥

विषम विकारासि करित । सूर्यन्याये निर्विकाशत ।
सन्निधानकर्तृत्व । कर्तायुक्त म्हणवी ॥१३३०॥

विंदूचे अधिकार अवस्थेत । उपाधीने अधीशसंज्ञायुक्त ।
परशिवाचे समस्त । कार्यादिक ॥१३३१॥

उत्पन्न बहुवस । जाले साकार साभास ।
व्यापक विशेष । ते सृष्टि म्हणवी ॥१३३२॥

आत्मवर्गासी समस्त । परमानंदोत्पत्ती समस्त ।
निमित्यभोगअवस्थायुक्त । करूनियां ॥१३३३॥

विंदोपाधीने सदाशिवनामाधियुक्त । परशिवाचे सकळ जगत ।
पाळणात्मक विशेष कृत्य । ते स्थिती म्हणवी ॥१३३४॥

संसारदुःख विशेष अत्यंत । म्हणूनियां पशु विश्रामार्थ निमित्य ।
शिवाचे नेमक शक्तीने समस्त । तत्वभुवनादि ॥१३३५॥

कार्य स्वर्गालागून । संकोच करून ।
लयअवस्था पाऊन । बिंदोपाधीनें ॥१३३६॥

ईशसंज्ञित । जाहला प्रतिपादार्थ ।
व्यापारविशेष अत्यंत । ते संहार म्हणवी ॥१३३७॥

सर्व आत्मवर्गाचे भोगसाधन । जाले बिंदोपाधीकरून ।
कर्मानुसारे ते ते भुवन । तये ठाई ॥१३३८॥

तेथे असोनिया भोगवीया निमित्य । ते ते नामाधियुक्त ।
परशिवाचे विशेष कृत्य । ते तिरोभाव म्हणवी ॥१३३९॥

अणीक निःशेष । नष्ट होआव्यासि मुख्य ।
योग्य जाला परिपाक । अनुसारें ॥१३४०॥

अत्यंतिक नासादिक । परिणाम अतिविशेष ।
तयासी मुख्य । योग जाला ॥१३४१॥

आपुले कार्यवर्ग विशेख । गर्भिकारासी जाला अभिमुख ।
बिंदोपाधीने पूर्वक । प्राप्ती पावला ॥१३४२॥

निराधिकारण म्हणऊनी । साधिकारण म्हणोनी ।
शिवधर्म जाणोनी । नैष्ठिकी भौतिकी ॥१३४३॥

सद्योनिर्वाण । असद्योनिर्वाण ।
क्रियावंतीज्ञान । म्हणऊनियां ॥१३४४॥

चक्षुषी स्पर्शकी । मातृकी वाचकी ।
शास्त्री योग्य की हौत्रिकीं । म्हणऊनि इत्यादि ॥१३४५॥

दीक्षाद्वारें विहित । जाला ईशसंज्ञित ।
पतीचे स्वस्वामित्व । स्वरूपता ॥१३४६॥

विशुद्धात्मक । अभिव्यक्तीसी कारक ।
जाला व्यापारविशेख । ते अनुग्रह म्हणवी ॥१३४७॥

इति आनंदसिद्धी जाले पंचीकृत । तेज यासी साधारण धर्मत्व ।
होऊनि असे तो प्रथम पदार्थ । म्हणवी जाणात्रें ॥१३४८॥

आणी अनादी मळत्रेष्ठित । ज्ञानक्रियाशक्तियुक्त ।
चैतन्य ते पशुपदार्थ । म्हणवी तसें ॥१३४९॥

तो पशु मळमाया । कर्म म्हणिजे पाशत्रया ।
संमंधे करूनियां । सकळ म्हणवी ॥१३५०॥

मळ कर्म हिया । पाश द्वितीया ।
समाधाने प्रळया । सकळ म्हणवी ॥१३५१॥

तया मळे वाक्यपाशसंमंधेकरुन । विज्ञान केवळ होऊन ।
तृतीयवर्ग म्हणोन । असे त्याचा ठाई ॥१३५२॥

प्रथम सकळवर्ग ते आपण । पक्वत्रिपाश म्हणऊन ।
अपक्वत्रिपाश म्हणोन । द्विविध असावें ॥१३५३॥

तया पक्वत्रिपाशांतु कळात्मक । स्थानी होतें मंडळेश्वर अष्टके ।
गुणमस्तकी होतें क्रोधीशादिक । अष्टवर्ग ॥१३५४॥

सूक्ष्मतन्मात्रवर्गांतें । असोनिया शतें ।
रुद्रासी जाले कर्तें । वीरभद्र ॥१३५५॥

गुणतत्वांत असोन । ब्रह्मविष्णवादिकालागुन ।
कर्ता जाला आपण । श्रीनीळकंठेश्वर ॥१३५६॥

ब्रह्मांडरक्षक । जाले शतरुद्रादिक ।
म्हणिजे मुख्य । शतअष्टादश ॥१३५७॥

समस्ताकारणें । परशिवें आपण ।
निराधिकारणदीक्षेनें । मंत्रेश्वर करुनी ॥१३५८॥

तया तया कृत्याधिकारी । करूनि ठेविलिया वरी ।
ते सकळयुक्त देहधारी । जाले तरी ॥१३५९॥

ते मायादेह वसंगत । न होना संतत ।
सर्वज्ञत्वें प्रतिपदार्थ । म्हणवीत असें ॥१३६०॥

अणीक ते पक्वविक । त्रिपाशांत कोण्ही येक ।
विषय मूर्छित । तयापेसे ॥१३६१॥

मळनिरोध समस्त । केवळ अवस्थायुक्त ।
असलिया वरी यथार्थ । शिवापासुनी ॥१३६२॥

कळा योग भोगादिक । कर्मक्षय मळ परिपाक ।
आदि परिक्रमे परिपाक पूर्वक । पावोनियां ॥१३६३॥

मग मोक्षावरी आशा । संसाराचे ठाई जिगुप्सा ।
शिवाचे ठाई सर्वाशा । भक्तिभावें ॥१३६४॥

श्रीगुरु उपास्ती । शिवागमाचे ठाई विश्वास प्रीती ।
इत्यादिक चिन्हयुक्ती । ते शक्ती पातकासी कारण ॥१३६५॥

मंदमंदतर । आणि तीव्रतीव्रतर ।
म्हणवी भेदविचार । परिक्षूनियां ॥१३६६॥

परशिव तो आपण । गुरुमूर्ति अधिष्ठान ।
साधिकारण । दीक्षाक्रम ॥१३६७॥

करूनि सर्वैथां । शिवसमानरूपतां ।
मोक्ष होय देता । तया सकळासीं ॥१३६८॥

अणीक ते अपक्व । त्रिपाशांतु राहिले सर्वं ।
ते कर्मफळउद्भव । भोगादिक ॥१३६९॥

यतीश्वर युक्त । होआवया निमित्य ।
किंचिज्ञत्व किंचित्कर्तृत्व । वशें करूनियां ॥१३७०॥

सुखदुःखहेत । मोहममतावेष्ठित ।
होऊनियां ते देह स्वत । म्हणवी तसें ॥१३७१॥

शिव नाना योगियांत । असे होऊनियां मिश्रित ।
तो स्वभ्यांतरे स्वानुमत । दीक्षाविशेषें ॥१३७२॥

पशुत्व येकदेशित्व । निरसूनियां शिवत्व ।
ऐक्य येकदेशित्व । अभिव्यक्ती घडूनियां ॥१३७३॥

मायापाशविमोचन करुनी । मळ कर्म म्हणिजे पाश दोन्हीं ।
संयुक्तं प्रळयाकळत्व देऊनी । तयाऐसे करूनियां ॥१३७४॥

आणीक प्रळय काळ आपण । ते पक्वपाशद्वय म्हणऊन ।
अपक्वपाशद्वय म्हणोन । द्विभाग असती ॥१३७५॥

अपक्वपाशद्वय तें पुरिष्टक । देहयुक्त होऊनि कर्माधीने पृथग ।
ते ते भुवन जे देहादिक । समंधे असती ॥१३७६॥

तयातु लोकपाळाष्टक । गुह्याष्टक अतिगुह्याष्टक ।
आणि गुह्यगुह्याष्टक । म्हणिजे पंचाष्टकें ॥१३७७॥

ते समस्त परि अष्टक । मंत्र महेश्वरापासूनि कोह्णी येक ।
अनंत स्वरापासूनि मुख्य । कवणी येक ॥१३७८॥

अनुगृहीत होऊनियां । सर्वज्ञत्व पावोनियां ।
भुवनपती होऊनियां । असती जाणावें ॥१३७९॥

अणीक अपक्वपाशद्वय । ते विज्ञानभोगभय ।
सन्यासादीक कर्में क्षय । होऊनियां ॥१३८०॥

वरि ऐक्यपाश । बंधाचे दर्श ।
ना अंतरे विशेष । मुक्तिस्थान म्हणवी ॥१३८१॥

मायातत्व शुद्धविद्यातत्व । द्वयांतराळ कैवल्यपदांत ।
युक्त होऊनियां विज्ञान केवळ संज्ञित । धारी होऊनियां असती ॥१३८२॥

अणीक विज्ञान केवळ ते मळ । विशिष्ट परिपाक तार्तम्यानें सकळ ।
शिवापासूनि प्राप्ति निष्कळ । निराधिकारणानें ॥१३८३॥

विद्या विद्येश्वर । सदाशिवादि भेदें उत्तरोत्तर ।
अधिकारी अवस्था विकार । करूनियां ॥१३८४॥

पर मुख्य असें दुःखलेशरहित । निरातिशयें समस्त ।
बैंदवानंद अत्यंत । वासनास्वाद भोगूनी ॥१३८५॥

मग तया भोगांतु अतिशया । विरक्ति उपजोनियां ।
प्रयोज्य कर्तृत्व दया । संमंधे सोडूनि ॥१३८६॥

सकळ बांधव । उत्तीर्ण होऊनि सर्वथैव ।
तत्वातीत होऊनि सर्व । अभिव्यक्त निर्विकल्प ॥१३८७॥

शिव समानलक्षण यथार्थ । ज्ञानक्रियाशक्तियुक्त ।
म्हणविती परममुक्त । इति द्विपदार्थ म्हणवी ॥१३८८॥

अणीक अनादी शिव । शक्तीपासाव ।
अधिष्ठित सर्वथैव । होऊनि असें ॥१३८९॥

पशूसि ज्ञानक्रिया । शक्ती करूनियां ।
असे स्थिराऊनियां । तो पाशपदार्थ म्हणवी ॥१३९०॥

तो मळ माया । कर्म बिंदू तिरोध या ।
म्हणऊनि पंचविध होऊनियां । असे त्याचे ठाई ॥१३९१॥

पशूचे चैतन्य । प्रकटित आच्छादुन ।
मायाबीजांकुरासि साधन । होआवे म्हणऊनि ॥१३९२॥

आत्मवर्गालागुनी । भोगांनुत्व देऊनी ।
अपण येक निर्वाणी । जाला तरी ॥१३९३॥

प्रत्यगात्मा यातें । अवरूनिया वर्ते ।
अनेकशक्तिसंमत्तें । युक्त होऊनी ॥१३९४॥

आपुल्या परिपाकवशें । संप्राप्तदीक्षाविशेषें ।
येकेंकडे सरोनि अपैसें । ते शक्तीसहित ॥१३९५॥

म्हणे मी अज्ञान । अविद्याअवृत्ति अंजन ।
अशुद्धें अनवछिन्न । कपटी अतिनिर्मळ ॥१३९६॥

मृत्यु मूर्छे तिरस्कारक । पशुत्वादि पृथक ।
पर्याय नामादिक । पावोनियां ॥१३९७॥

मोह महामोह मिश्र । तमिस्त्र अंधतमिस्त्र ।
कुटिल कुटिल स्थानांतर । म्हणिजे इति ॥१३९८॥

सप्तअवस्था परिकुळ । पावोनियां संमेळ ।
पाश विषम स्थळ । म्हणवी तसें ॥१३९९॥

अणीक किंचित्तत्व । आणि किंचित्कर्तृत्व ।
भोगलोलुत्व । आदि अनेक धर्मगुण ॥१४००॥

परिणामयुक्त होऊन । कार्यवर्ग हे अवया जळून ।
उपादानकारण । म्हणवी तसें ॥१४०१॥

कर्म पाश संग रहणी । येकीकडे निरसूनि ।
अगांतुक पाश म्हणउनी । घेत असें ॥१४०२॥

ग्रंथी मूळप्रकृति मोहिनी । मूळ उपादानी ।
मूळात्मक पाश म्हणऊनी । घेत असें ॥१४०३॥

शमी असावी अव्यक्ती । अधम भूमी अती ।
अपार विद्या ज्ञान व्यंजकादि इति । परी नाम पावोनी ॥१४०४॥

येकत्व जडत्व परिणत्व । मोहत्व काळादि कारणत्व ।
वस्तुरूपत्व सूक्ष्मत्व । कर्माश्रयत्वें ॥१४०५॥

सविकल्पज्ञानयुक्तत्व । ईश्वरत्व आश्रयत्व ।
संदेह अनंतत्वेश्वर प्रियत्व । व्यापक होऊनी ॥१४०६॥

धर्मविशिष्टत्व युक्त म्हणऊनी । नित्यव्यापक होउनी ।
आशापाश विशेष ते कारणी । माया म्हणवी ॥१४०७॥

अणीक यतर्थ । मायेसी कर्माश्रयत्व ।
कैसे घडत । म्हणीतले तरी ॥१४०८॥

सकळात्मक । सुकृतदुष्कृतादिक ।
कर्म करिती यथार्थपूर्वक । तयानुक्रमें ॥१४०९॥

धर्म ज्ञान । ऐश्वर्य वैराग्य । अधर्म अज्ञान अनैश्वर्य अवैराग्य ।
म्हणिजे अष्टभावात्मक योग्य । बुद्धिगुण म्हणवी ॥१४१०॥

अपूर्व म्हणिजे नामानें । संस्कारोनी सत्राणें ।
असे ते आपण । संतवर्म म्हणविती ॥१४११॥

उरले अधर्माभित्रय मुख्य । तो तामस वर्गादिक ।
वरी अवैराग्य येक । तें राजस म्हणवी ॥१४१२॥

ते गुण जाले तरी साशंक म्हणऊनी । आणि वैनीक म्हणोनी ।
प्रकृती म्हणऊनी । त्रिविध होऊनि असे ॥१४१३॥

त्याचे ठाई । इष्टापुरीषादि धर्मसंस्कारी । तया देहपतनानंतरे जन्मांतरी ।
प्रथम संस्कार स्वयंबोध करी । तो सांसिद्धिक म्हणवी ॥१४१४॥

देहत्यागावरी पुन्हा जन्म लोक । गुरुशास्त्रादिकें पूर्वक ।
संस्कारअनुसार गुणे शोभे तो त्रैनिक । म्हणवी निरुता ॥१४१५॥

स्वप्नमूर्छादि व्यापार । सरोनि चेतला तयासि साचार ।
तया उचित संस्कार । प्राप्ति होय ॥१४१६॥

तैसे वर्तमान । शरीरी ते तें गुण ।
असती अभिव्यक्त होऊन । तो प्राकृत म्हणवी ॥१४१७॥

अणीक त्याचे ठाई । सांसिद्धीक धर्माने वश्य करणें ।
ज्ञानसमंधे धर्मपरिज्ञाने । ऐश्वर्याने सकळ विघ्नें निवृत्यादिक ॥१४१८॥

वैराग्याने भोग । संगती परित्याग ।
अधर्माने भोग । शक्त्यादिक ॥१४१९॥

अज्ञाने तिरस्कारादिक । अनैश्वर्यानें विघ्नादिक ।
अवैराग्याने अनेक । धर्में जन्मप्राप्ति होय ॥१४२०॥

अणीक वैनीक प्राकृत । धर्मानें स्वर्गादीक प्राप्त ।
ज्ञानेकरूनि लाभत । मुक्ति निश्चयें ॥१४२१॥

ऐश्वर्येनि इष्टार्थ । सिध्यादीक प्राप्त ।
वैराग्याने अत्यंत । प्रकृतिलयादिक ॥१४२२॥

अधर्मानें पशुपक्षिमृगादिक । सर्पस्थ म्हणिजे पंचक ।
परि त्रियग्योनि मुख्य । प्राप्ति होय ॥१४२३॥

अज्ञाने तर्कादीक भय । अनैश्वर्यानें विघ्न अतिशय ।
अवैराग्याने प्राप्ति होय । बंधनादिक ॥१४२४॥

ऐसे सकळ कर्म । संस्कारस्थोम ।
बुद्धिआंतु स्वधर्म । होऊनि असें ॥१४२५॥

ते बुद्धि जरी जाली । तैसी ते प्रळयकाळीं ।
मायागर्भस्थळीं । लीन होय ॥१४२६॥

तो संस्कार असोनि आत । काळांतरे असे फळत ।
तयाकारणे अर्थ । माया कर्माश्रय म्हणोनी ॥१४२७॥

सुखदुःखादी अनेक गुण । तयासी जाले कारण ।
धर्माधर्मरूपे विभिन्न । विचित्र होउनी ॥१४२८॥

उतुपेक्षण । अकिंचन प्रसारण ।
पंचगती म्हणिजे भिन्न । व्यापार संभवेसी ॥१४२९॥

उत्पाद्यात्प्राणविकार्य । आणि संस्कार्य ।
म्हणिजे चतुष्टय । फळयुक्त म्हणोनि ॥१४३०॥

जातिप्रद । आणि आयुप्रद ।
होऊनि अध्यात्म त्रिविध । साधन म्हणोनि ॥१४३१॥

सुरनरतिर्यगादि योनी । प्राप्तीनें मातृगण होऊनी ।
काळादि मायाकार्य उभारणी । जनीत होआवया ॥१४३२॥

साहकारी होऊनि द्विजरुक्षन्यायें । प्रवाहनादि होय ।
पाश विशेषमय । ते कर्म म्हणवी ॥१४३३॥

अणीक या कर्मालागुनी । भोगप्रदत्व असे म्हणऊनी ।
ते भोग लक्षणी । कैसे म्हणीतलें तरी ॥१४३४॥

चक्षुरादी इंद्रियस्थोम बाह्य । प्रकासीन नीतादि विषय ।
तयांतु असौनि गुणदोषकार्य । विचारी ते मन ॥१४३५॥

आणीक बुद्धि जाली । तरि ते विषयसंमोहमेळी ।
निश्चय करीतसे सकळीं । तया ठाई ॥१४३६॥

शुभाशुभ करणें । सुखदुःखरूपानें ।
प्रणामूनि आपण । साक्षातभोग म्हणवी ॥१४३७॥

काळोद्वळीत चैतन्य । आत्मा तो आपण ।
विद्या म्हणिजे अंतःकरण । तयाने देखोनि ॥१४३८॥

वरी अहंकार म्हणिजे अकारणानें । अहं सुखी अहं दुःखी म्हणोनि येणें ।
अध्यासे भोगरूपबुद्धि जो जाणें । तो भोक्ता म्हणवी ॥१४३९॥

या नंतरे अत्यंत विशिष्ट । अधिकारी युक्त ।
तयासी मायास्पर्शन किंचित । नाहीं त्या त्या कारणें ॥१४४०॥

निरंतर निरती । सुसंधान अनुभूती ।
भोगसाधनकार्य जाती । जनीत होआवया ॥१४४१॥

उपादानकरण होऊनी । मळ तयासंगेकरूनी ।
निवृत्ती होय म्हणऊनी । तयालागीं ॥१४४२॥

अगांतुक पाश म्हणऊनी । महामाया म्हणोनी ।
कुटिळ कुतुळणी । क्रियाशक्ती ॥१४४३॥

परनिंदा परविंद । परिग्रहशक्ती परविद्या शब्द ।
तत्वशब्द ब्रह्म शुद्ध । मायातत्व ॥१४४४॥

शिवत्व षडध्व वीजकूट । शिवलिंगपीठ ।
योगपीठ मंत्रपीठ । व्योमविद्याशक्ती ॥१४४५॥

वागेश्वरी अनाहत अघोषवाक्य । ब्रह्म म्हणिजे इत्यादि वाक्यपृथक ।
परि नामादिक । युक्त होऊनी ॥१४४६॥

क्षकारादि करून । येकावन्न वर्ण ।
तयालागून । असूनियां ॥१४४७॥

ओं नमः शिवाय नमो नमः म्हणोनी । इत्यादि यम नियम करूनी ।
इत्यादीक येकादश असुनी । मंत्र शुद्धध्वासी ॥१४४८॥

हृदयाय नमः म्हणोनी । इत्यादि करुनी ।
येकादश असुनी । मंत्र आवाहनासी ॥१४४९॥

पृथ्यादि अशेख । शुद्धाशुद्ध रूपषट्क ।
त्रिविंशति मुख्य । तत्वध्वासी ॥१४५०॥

आणि काळाग्नी । भुवन आदि करुनी ।
अनेक असुनी । भुवनध्वासी ॥१४५१॥

निवृत्यादीक वर । पंचप्रकार ।
काळध्वासी आधार । होऊनियां ॥१४५२॥

आणीक वैखऱ्यादि करुनी । चतुर्विध वाचेलागुनी ।
आधार होऊनी । परिणामरूपें ॥१४५३॥

होऊनि कारणभूत । निर्विकल्पक ज्ञानोपेत ।
परशिव म्हणिजें अशरीरवंत । तयाचेनी ॥१४५४॥

कर्तृत्वपणें परिपूर्ण । परंज्योतिस्वरूप होऊन ।
पाश विशेषगुण । असे तो बिंदू म्हणवी ॥१४५५॥

अगीक येक येथें । बिंदु तो चतुर्विध वाचेते ।
कारण म्हणीतले तरी तें । वाचास्वरूप कैसें ॥१४५६॥

परा पश्यंति मध्यमा वैखरी । म्हणिजे वाचा चाऱ्ही ।
मुख्य म्हणीतले तरी । त्याचे ठाई ॥१४५७॥

कोह्ळी येकाचे वक्त्र । आणि मूळाधार ।
तये ठाई सूक्ष्माकार । नादस्वरूपें ॥१४५८॥

तयासंगे समरसे मिळोनी । समस्तांसी कारण होउनी ।
असे ते वाणी । परा म्हणवी ॥१४५९॥

ते नाभिस्थित । मयोरांडाकार संगत ।
पदपक्षादी समस्त । अवयवा नाही तैसें ॥१४६०॥

अर्थवाचक वर्णक्रमासहित । निर्विकल्प होऊनि प्रज्वलित ।
असे वाणी युक्त । पश्यंती म्हणवी ॥१४६१॥

तेचि ह्रदयस्थानी पदार्थ । वाचक वर्णयुक्त ।
अनुसंधानपूरित । सामग्रीनें ॥१४६२॥

प्राणवृत्ति असोनी । तया न मिळतां निर्विकल्प होउनी ।
असे ते वाणी । मध्यमा म्हणवी ॥१४६३॥

तेचि ऊरू कंठा । जिव्हा मूल ताल ओष्ट ।
दंत नाशीक शिर म्हणिजे अष्ट । स्थानादिक ॥१४६४॥

प्रणवासमंधे उपजें । अर्णवर्णवीजें ।
लिंग मातृका शुद्ध गेह म्हणिजे । परिसंज्ञा म्हणवी ॥१४६५॥

प्रत्यक् वर्णादी दैवत । फळ संयोगे युक्त ।
स्वरव्यंजनसहित । द्विप्रकारें ॥१४६६॥

येकावन्न अक्षरकूट । अभिव्यक्तीने हा घटपट ।
म्हणऊनि सांगे परश्रवणपूट । गोचर करूनी ॥१४६७॥

सकळ संसार वेव्हार वर्तनी । कारण होय म्हणऊनी ।
मुख्य वद्धरूप जाली वागी । ते वैखरी म्हणवी ॥१४६८॥

अगीक तया वाचाचतुष्ट्य । बाह्यज की अभ्यंतरिय ।
वर्तत असती निश्चय । तयाआंतु ॥१४६९॥

शुद्धार्थवर्ति ये समस्त । तयासि परा म्हणिजें नादसंज्ञायुक्त ।
कारण वाक्यासी सत । मुख्य होऊनि असें ॥१४७०॥

अशुद्धध्वासी जन । तयासी वैखरी म्हणोन ।
संज्ञायुक्त स्थूळवाक्येकरून । वेव्हारत असे ॥१४७१॥

शिश्नाध्वादीक विषय । तयासी पश्यंती मध्यमा उभय ।
बिंदुसंज्ञायुक्तमय । सूक्ष्मवाक्याने वर्ततसे ॥१४७२॥

आणीक येथे रुक्ष जाती । लागूनि परावाचा वर्तती ।
सर्पवर्गासी पश्यंती । वाणी वर्णे ॥१४७३॥

पशुजातीसी साचारी । मध्यमावाणी निरंतरी ।
मनुष्यासी वैखरी । प्रधान होउनि असे ॥१४७४॥

अणीक परिभेद । ते वैखरी विषद ।
रूपादीक शब्द । संमोहाने ॥१४७५॥

वाचक म्हणऊनी । लक्षणीक म्हणोनी ।
यज्ञनीक म्हणऊनी । त्रिविध होऊनि असें ॥१४७६॥

त्याचे ठाई । वृद्ध संकेते हा घट हे पटादिक ।
म्हणऊनि मुख्यर्थे गोचरपूर्वक ।
करी शब्दादीक वाचक । शब्द म्हणवी ॥१४७७॥

मात्रा या कोशित म्हणीतलें । तरी अचेत मच न बोलें ।
तत्संनिधाने वेगळें । मनुष्यशब्द म्हणीतलें ॥१४७८॥

म्हणिजे अनार्थ । लक्षी शब्दादिक ।
ते लक्षणीक । शब्द म्हणवी ॥१४७९॥

सूर्या जाला अस्तमान । तेथे सुक्रियापेक्षा देवतापूजन ।
संध्यादीकवंदन । करावया ॥१४८०॥

अयोग्य म्हणऊनी । अनार्थसूचक शब्दवचनी ।
ते यजनी । शब्द म्हणवी ॥१४८१॥

अणीक येथें घटादीक । विषयसंमोह अशेख ।
वाच्यवाचक । समंधादिकादि ॥१४८२॥

संकेतलक्षण । सविकल्पज्ञान ।
कैसे कोठून । म्हणीतलें तरी ॥१४८३॥

प्रथम निर्विकल्पत्वे अशेख । वस्तूचे ठाई यथार्थ ग्राहक ।
पणे जाले सर्वज्ञ स्वरूपादिक । प्ररमेश्वरप्रसादें ॥१४८४॥

अनंतेश्वरादिक । जाणोनि पावले अशेख ।
तरि तयापासूनि रूद्रादिक । प्राप्ती पावलें ॥१४८५॥

तयापासाव ब्रम्हादिकी । जाणीतले अशेखी ।
तयापासाव देवतालोकी । जाणीतलें ॥१४८६॥

वरी विशेष तया । पासूनिया ।
ऋषीजना अवघिया । हातावसलें ॥१४८७॥

तयापासाव अस्मादि । पितृपितामहादि ।
सकळासी साध्वीं । जाले प्रसिद्ध ॥१४८८॥

तयापासूनि सद्भावे । अस्मादिका सिद्ध जाले अनुभवें ।
म्हणोनि जाणावें प्रसिद्धक्रमें ॥१४८९॥

आणीक इति सांगीतले विषद । मळादी पाश चतुर्विध ।
अचेतनसंमंध । तेथे तयालागी ॥१४९०॥

आपआपुल्या व्यापारात । आपणचि नेणती प्रवर्त ।
म्हणऊनि तयानिमित्य । अनुग्रहलक्षण जालें ॥१४९१॥

तया पाशव्यापारानुसार । जाली शिवशक्ती विशेषात्कार ।
तो तिरोभाव साचार । म्हणवी जाणावें ॥१४९२॥

म्हणिजे येथें । तृतीय पदार्थ ।
विवेकास्मत्व । म्हणवोनि वोळखावे ॥१४९३॥

अणीक हीयाप्रकारें । सांगीतलिया अनुसारें ।
प्रथमादि विचारें । संकेतरूप ॥१४९४॥

अवतार भेदयुक्त । पत्यायादि पर्यंत ।
प्रतिपादक यथार्थ । ते ज्ञानपद म्हणवी ॥१४९५॥

इतिक्रियापादि मुख्य । चतुष्टपादादिक ।
जाले प्रवर्तक । शिवागम ॥१४९६॥

ते श्रवण पठण । ग्रहण मनन ।
निजध्यासन । संयोगानें ॥१४९७॥

उत्पन्न होऊन । आत्मयालागून ।
यथार्थ ज्ञान । दृढत्वें घटें ॥१४९८॥

समस्त प्रकृति माया वैंदव भोग । दृष्टीत लक्षण योग ।
परम वैराग्य । बळे करुनी ॥१४९९॥

षड्ध्वातीत होऊनी । शिवासमानता आपणी ।
स्वयें जाले म्हणउनी । निश्चय जयासी ॥१५००॥

ते चर्मशरीरी कृतार्थ । म्हणऊनी सांगणे परिख्यात ।
ते शिवसिद्धांतार्थ । विस्तार म्हणवी ॥१५०१॥

इति विवेकचिंतामणौ शिवागमवर्णनं नाम द्वितीय परिच्छेदः समाप्तः ॥

॥ श्री सांबसदाशिवार्पणमस्तु ॥

## तृतीय परिच्छेद

श्रीगणेशायनमः । श्रीसच्चिदात्मनेनमः । श्रीशंभू नीलकंठायनमः । श्री सांबसद्गुरुनाथायनमः ॥

सकळ आगमार्थ । साधकजनासी क्लप्त ।
होय तैसा यथार्थ । निरोपिला ॥१॥

आतां प्रकट करूनि सविस्तार । अजांडादि विचार ।
ते कैसे म्हणीतले तरी येकाग्र । होऊनि ऐकावें ॥२॥

पूर्वोक्त बिंदूचे कार्यजात । वर्णादिकळाआंत ।
षडध्वविचार अगमात । प्रसिद्ध असे म्हणउनी ॥३॥

तयामध्ये अपूर्व । तत्वध्व भुवनध्व ।
म्हणिजे परि उभयभाव । सांगिजेल ॥४॥

क्षीर आणी शर्करा । मधुयुक्त जालिया येकत्रा ।
अतिमधुरोत्तरा । रसीक होय ॥५॥

तैसे वेदागमपुराण । सन्मत्ते निरोपण ।
कीजेल प्रतिपादन । कैसे म्हणीतले तरी शिव ॥६॥

शिव ॥१॥ शक्ति ॥२॥ सदाशिव ॥३॥ ईश्वर ॥४॥
शुद्धविद्या ॥५॥ काळ ॥६॥ नियति ॥७॥ कळा ॥८॥
विद्या ॥९॥ राग ॥१०॥ पुरुष ॥११॥ प्रकृति ॥१२॥
गुण ॥१३॥ बुद्धी ॥१४॥ चित्त ॥१५॥ अहंकार ॥१६॥
श्रोत्र ॥१७॥ त्वक् ॥१८॥ चक्षु ॥१९॥ जिव्हा ॥२०॥
घ्राण ॥२१॥ वाक् ॥२२॥ पाणि ॥२३॥ पाद ॥२४॥
वायू ॥२५॥ उपस्थ ॥२६॥ शब्दतन्मात्र ॥२८॥
रूपतन्मात्र ॥२९॥ रसतन्मात्र ॥३०॥ गंधतन्मात्र ॥३१॥
नभ ॥३२॥ वायू ॥३३॥ वन्ही ॥३४॥ जळ ॥३५॥
भूमि ॥३६॥ म्हणिजे इति छत्तीस तत्वें ॥

तयाचे सृष्टिक्रमस्वरूपसिद्धी । गुणक्रमप्रयोजनादि ।
विस्तारें अगमामधीं । विचारावया योग्य ॥७॥

तयामध्यें प्रथम शिव । आदिशुद्ध विद्यातत्व पंचतत्व ।
विंदुमय होऊनी शुद्धध्व । म्हणोनि देत असे ॥८॥

विज्ञान केवळ । म्हणिजे आत्मवर्ग अखिल ।
तयासी शरीरादिक केवळ । भोगसाधन होऊनि ॥९॥

आणीक कळादि प्रकृतिआंत । सूक्ष्मतत्वे माया विकारवंत ।
होऊनि मिश्रशुद्धयुक्त । म्हणउनि घेऊनी ॥१०॥

प्रळयकाळ योग्य । म्हणिजे आत्मवर्ग ।
तयासि कारणादि भोग । साधन होऊनि असे ॥११॥

अणीक भूम्यादि गुणावमिति । चतुर्विंशति ( त ? ) त्वें प्रकृति ।
कार्य होऊनि शुद्धध्वत्रिति । म्हणोनि घेऊनी ॥१२॥

सकळ कळा जग । म्हणिजे आत्मवर्ग ।
तयासि भुवनादि भोग । साधन होऊनि असे ॥१३॥

अणीक त्याचे ठाईं । काळादि भूम्यांत येकत्रिविंशति ।
तत्वे जाली तरि ती । स्थूळ सूक्ष्म भेद द्विती । प्रकार होऊनि असे ॥१४॥

तयाआंतु सूक्ष्म । रूपाने भूततन्मात्र कर्म ।
इंद्रियज्ञान इंद्रियस्थोम । अंतःकर्ण ॥१५॥

गुणप्रकृति काळादिक । म्हणिजे अष्टवर्ग होऊनि पृथक ।
भिन्नभिन्न परि अष्टक । होऊनियां ॥१६॥

सृष्टयादि प्रळयांतरी । जाल्या तरी ।
नाना सत्ता आपुले आपुले परि । व्यापार मुखें ॥१७॥

पिशाच यक्ष राक्षस गुह्यक । इंद्र ब्रह्मा सोम प्राजाप्रत्यादिक ।
सुपक्षी सर्प । मृगऋक्षादि ॥१८॥

म्हणिजे चतुर्दशक । प्रकार सृष्टि योग्य होऊनि पृथक ।
आत्मयासी पूर्वक । भोगसाधन होऊनि असे ॥१९॥

अणीक उरले स्थूळरूप तें । सकळा भुवनारंभाते ।
आधार होऊनि असे तें । कैसे म्हणीतले तरी ॥२०॥

परमेश्वराचे अज्ञानुमत्तें । बह्मानें पृथ्व्यादि स्थूळपंचभूतें ।
येक येक निरुतें । द्विभाग करुनी ॥२१॥

तयामध्ये येक भाग कारण । तो ठेविला महाभूत करून ।
उरला येक भाग तो पूर्ण । चतुर्थ चतुर्थ ॥२२॥

तया भागआत । प्रथम भाग पदार्थ ।
तो पुनः चतुर्थ चतुर्थ । भाग करूनी ॥२३॥

वरी चतुष्क चतुष्क । भाग तो आपुलाला पृथक ।
द्वितीय भागांतु मुख्य । न मिळतां ॥२४॥

उरलिया द्वितिया । भागांतु येक येक मिळालियां ।
जाले पंचविंशति भाग मिळोनियां । ते कैसे म्हणीतले तरी ॥२५॥

आकाशाचा द्वितीय भागांश । तो ज्ञातृ म्हणवी विशेष ।
वायूच्या द्वितीय भागांतु जालिया समरस । जालियां मन म्हणवी ॥२६॥

अग्नीच्या द्वितीय भागसमंधी । मिळालीया म्हणवी बुद्धि ।
जळाचिया द्वितीयादि । भागांतुन मिळालिया चित्त ॥२७॥

पृथ्वीचा द्वितीय गूण । भागांतु मिळालिया अहंकार आपण ।
इति पंचअंतकर्ण । आकाशाचे पंचीकृत ॥२८॥

वायोचा द्वितीय भाग आपण । तो आपणापें म्हणवी व्यान ।
नभाचा द्वितीय भागांत मिळोन । समान म्हणवी ॥२९॥

वन्हाचे द्वितीय स्छान । भागांतु मिळालिया उदान ।
जळाच्या द्वयभागांतु मिळोन । अपान म्हणवी ॥३०॥

धरित्रीच्चिया द्वितीया । भागांतु मिळालियां ।
प्राण म्हणवी निःसंशया । इति वायोचे पंचीकृत ॥३१॥

अनिळाचा द्वितीय भागांशु ॥ तो आपणापे म्हणवी चक्षु ।
नभाच्या द्वितीय भागांतु समरसु । जालिया श्रोत्र ॥३२॥

अनळाचा द्वितीय अंशक । भागांतु मिळालीया त्वक ।
जळाच्या द्वितीय भागांतु सम्यक । जालिया जिव्हा ॥३३॥

धरणीचा द्वितीय गूण । भागांतु मिळालियां म्हणवी प्राण ।
इति अग्नीचे ज्ञान । इंद्रियपंचीकृत ॥३४॥

आपाचा द्वितीय भागांश । तो म्हणवी आपणापे रस ।
व्योमाच्या द्वितीय भागांतु समरस । जालिया शब्द ॥३५॥

पवनाचा द्वितीय भागांश । मिळालिया स्पर्श ।
अग्नीचा द्वितीय भागांतु समरस । जालियां रूप म्हणवी ॥३६॥

अवनीचियां । द्वितीय भागांतु मिळालिया ।
गंधइतिपंचविषया । अंबूचे पंचीकृत ॥३७॥

पृथ्वीचा द्वितीयू । भाग तो म्हणवी पायू ।
नभाचा द्वितीयु । भाग समंधे ॥३८॥

वायोचे द्वितीयभागस्थानीं । मिळालियां पाणी ।
अग्नीचिया द्वितीय भागांतु मिळोनी । पाद म्हणवी ॥३९॥

जळाचा द्वितीय । भागांतु मिळालिया गुह्य ।
इति कर्मेंद्रिय । धरणीचे पंचीकृत ॥४०॥

ऐसे पंचीकृत भूयुक्त । ब्रह्मांड तया ब्रह्मांडांत ।
काळाग्नि आदि भुवने समस्त । तया भुवनाआंतु ॥४१॥

अंडज स्वेदज । उद्बीज जरायुज ।
आणि मंत्रराज । म्हणोनी पंचभेद ॥४२॥

तयामध्ये नवलक्ष । मनुष्यजात्यादिक ।
आणि चतुर्दशलक्ष । देवताजाती ॥४३॥

दशलक्ष जळचरात्मक । दशलक्ष बहुपादादिक ।
दशलक्ष पन्नग । दशलक्ष खेचरजाती ॥४४॥

येकलक्ष भूगतु । चराचर जीवजंतू ।
विशंतीलक्ष समस्तु । स्थावरजाती ॥४५॥

इति चौरयासींलक्ष संख्याभेद । जीवयोनी प्रसिद्ध ।
स्थूळदेहयुक्त विविध । उदीत होऊनि असती ॥४६॥

त्याचे ठाई । अणीक तया स्थूळशरीरांत । पृथ्वी आदि समस्त ।
भूत पंचीकृत । होऊनि असे ॥४७॥

अस्तिचर्मादि पंचक । धरण्यादिक मुत्रादि पंचक ।
क्षुधातृषादि पंचक । अनळाचें ॥४८॥

धावनचलनादिक । पंचक वायूचे मुख्य ।
कामक्रोधादी पंचक । आकाशाचे म्हणवी ॥४९॥

अणीक इति सविस्तारी । सांगीतली तत्वें पुरीं ।
अष्टक सूक्ष्मदेहधारी । भुवनज्यादि अखिल ॥५०॥

स्थूळदेहांत तत्वमिळणी । समस्त जिवालागूनी ।
भोग स्वये होऊनी । साधारण म्हणवीतसें ॥५१॥

सूक्ष्मशरीरे भिन्न भिन्न । येकेक जिवासी भोगसाधन ।
होउनी साधारण । म्हणोनी घेत असे ॥५२॥

स्थूळशरीरे अन्योन्य । भोगसाधन होऊन ।
साधारण असाधारण । म्हणोनी घेतसें ॥५३॥

अणीक तया ब्रह्मांड । भुवनाचे वाड ।
लक्षण निवाड । कैसे म्हणीतले तरी ॥५४॥

मूळ पृथ्वीतत्वाचिया । दशांशांत येकदेशिया ।
भागाने कालऊनियां । उभारणी केली ॥५५॥

योजनें शतकोटी । प्रमाणे सदाटघटीं ।
सुवर्णमय वाटोळी वाटी । खपर असे ॥५६॥

येक अर्बुदयोजने स्थूळ । शतकोटीयोजने प्रमाण विशाळ ।
उन्नत असे विस्तीर्ण पोकळ । अकार तें ब्रह्मांड म्हणवी ॥५७॥

तें ब्रह्मांड ब्रह्मियाने आपण । मध्ये समानता भिन्न ।
संपुष्टकारक करून । खपरद्वय ॥५८॥

मध्ये रिघोनियां आपण । करंडियाचे झाकण ।
झांकिती तैसे मागुतेन । दृढाकारें ॥५९॥

उभय खपर मेळऊन । तयांतु अतिविचित्र भुवन ।
रचना केली त्याकारण । ब्रह्मांड म्हणवी ॥६०॥

तया ब्रह्मांडखपर । गर्भित्व धन्य गंभीर ।
पूरितमयनीर । होऊनि असे ॥६१॥

तयामध्ये विश्वकर्म्यापासून । निर्मित दिव्यसिंहासन ।
तयावरी घालुनी आसन । जळस्तंभकत्वें ॥६२॥

आधारशक्ति आपण । हिरण्यमयशरीरानें ।
येकमुखत्रिलोचन । सहीत सिरत्वें ॥६३॥

ते शक्तीच्या मस्तकावरी । सुवर्णमयकमळ धरिलियापरी ।
दशकोटियोजने थोरी । सुवर्णमयकूर्म असे ॥६४॥

तया कूर्मांचिये पुष्टीरेख । तयावरी मुख्य ।
इंद्रादि अष्टक । असती अनुक्रमें ॥६५॥

ऐरावत पुंडरीक वामन । कमठ अंजन पुष्पदंत सार्वभौम ।
सुप्रतीक म्हणऊन । अष्टदिग्गज ॥६६॥

अभ्रम कपिला म्हणउनी । पिंगळा अनुपमा तांम्रवर्णी ।
शुभदंती अंगनी । अंजनावती म्हणिजे ॥६७॥

आपुले आपुले क्रियायुक्त । परिक्रमे समस्त ।
भूमिका वाहत । असती सर्वदां ॥६८॥

तयासी स्तंभकत्वे कंठ वेष्टुनी । आपुले आपुले मुष्टिवंद्ये इंद्राग्नी ।
आदिं अष्टदिशा धरणी । अनुक्रमें वाहती ॥६९॥

अनंत तक्षक वासुकी शेष । शंखपाळ पद्म कर्कोटक ।
क्रोड कंबळ म्हणिजे अष्टक । फणिवर्ग असती ॥७०॥

आणिक तया कूर्माचियें । मध्यपृष्ठी परी परऐश्वर्य ।
संपन्न होऊनि तेजोन्मय । मिरवे महाशंख ॥७१॥

येकेक फणी तीससहस्त्र । योजने सविस्तार ।
फणीस युक्त सहस्त्र विचित्र । शोभत असे ॥७२॥

ते गज ते पन्नग । तो महाशंख ।
म्हणिजे तया येक । येकाचिया ॥७३॥

अहारसमयात । तरि भूमीका न ठेवित ।
अखंड वाहत । असती जाणावें ॥७३॥

आणीक तया गजाचे मस्तक । अष्टवर्ग पन्नक ।
महाशंखाचे मुख्य । फणिवर ॥७५॥

येकयोजन प्रमाण । सदाटघटित विस्तीर्ण ।
सर्वासी आधार होउन । सुवर्णमयभूमिका प्रकाशत असें ॥७६॥

तयावरी अधोर्ध्वं । इंद्रादी दशविध ।
दिशाचे ठाई विषद । अनुक्रमे शोभती ॥७७॥

प्रसन्न अनंत ईश्वर । पिंगळ काळ क्रोधीश्वर ।
जलद वलद नंद शंकर । म्हणिजे इति ॥७८॥

दशलोकेश्वर । भुवने मनोहर ।
तया मध्यस्थानी येकादश विवर । भुवन म्हणउनि असे ॥७९॥

काळाग्निरुद्रभुवन । पंचकोटियोजन ।
सविस्तीर्ण होऊन । शोभत असें ॥८०॥

तयामध्ये राजभुवन । स्थानांतु द्विकोटियोजन विस्तीर्ण ।
येककोटि विस्तीर्ण योजन । उन्नताकारें ॥८१॥

नानारत्नखचित । दिसे सिंहासन विजृंभित ।
तयाग्रासनी असे शोभत । काळाग्निरुद्र ॥८२॥

महातेजोन्मयमूर्ति । अतिरक्तवर्णकांती ।
येककोटियोजने मिती । दीर्घशरीरे ॥८३॥

कराळवदनचतुष्टानें । दीर्घश्मश्रुगानें ।
द्वादशअक्षानें । मंडिताकारें ॥८४॥

खड्गखड्गांगायुध । पाशवाण वरद ।
दक्षिणं पंचविध । हस्तेसहित ॥८५॥

शूळ अंकुश । आणि दंड धनुष्य ।
अभय वामयोः । करपंचके शोभें ॥८६॥

तो आपण जालिया ऊर्ध्वमुख । तरी जगत परी अनेक ।
संहार होईल अशेख । म्हणोनि अधोमुख ॥८७॥

आपणासमान युक्त । कोटिरुद्रसहित ।
आवर्त होऊनि असे संतत । तो कालाग्निरुद्र ॥८८॥

तयाच्या ज्वाळा दशकोटियोजनें । पर्यंत असे आवरुन ।
धूम्र पंचकोटियोजने प्रमाण । अवग्राहोनि असे ॥८९॥

तयावरी अणीक । यमराज्याचे अज्ञा सिमाधारक ।
प्रत्येक नवलक्ष । योजनाच्या अंतरे ॥९०॥

त्रयविंशति पट्टणे । तया मध्यस्थानी विस्तीर्णे ।
येक येक नवलक्षयोजनें । अवकाश असें ॥९१॥

पापात्मक समस्त । तयांसि वेदनेनिमित्य ।
तेथे अजापासाव कल्पित । जाले असती नर्कलोक ॥९२॥

रौरवादी द्वित्रिंशति । मुख्य नर्क असती ।
तयाची कैसी स्थिती । म्हणीतले तरी ॥९३॥

चतुष्कभागें द्वि द्वि होऊनि पृथक । नर्क महानर्क ।
राजनर्क राजेश्वरनर्क । म्हणवीती त्याचे ठाई ॥९४॥

रौरव ध्वान शीत उष्ण म्हणोनि । संताप अंबुज म्हणवोनी ।
महाअंबुज काळसूत्र म्हणवोनि । महानर्कसंमोह ॥९५॥

सुजिमुख काळ खड्गस्थुराधार । अंबरीशेष तप्तागर ।
महादाह संताप म्हणिजे साचार । महानर्कस्थोम ॥९६॥

लाक्ष प्रलोपमासाद निरुच्छ्वास निश्वासक ।
युग्माद्री सन्मली लेह प्रदीप पक्षुसि पाशक ।
किल्मीष कुळंक । म्हणिजे राजनर्क हे ॥९७॥

लोहस्तंब विण्मुत्र वैतरणी नदीनां मिश्र ।
कुंभिपाकसा रौरव महापाशानुग विचित्र ।
म्हणिजे राजराजेश्वर । नर्क म्हणवी ॥९८॥

त्या नर्काचे ठाई । रौरव महारौरव तमादिक ।
शीत उष्ण म्हणिजे मंत्रिंपञ्चिक । नर्केंसी परिवेष्ठोनी मुख्य ।
म्हणिजे राजनर्क असे ॥९९॥

रुदीमन सुतीक्ष्ण । सद्धास जीवन ।
शतमहासन । म्हणिजे इति ॥१००॥

पंचमंत्रि नर्कासहित । होऊनियां आवर्त ।
सुघोर म्हणिजे विख्यात । राजनर्क असें ॥१०१॥

विलोभ सुभीम कंटकतित्र । वेग कराळ म्हणिजे पंचमंत्रिवर ।
नर्केंसी परिवेष्ठोनी अतिघोर । राजनर्क असे म्हणिजे ॥१०२॥

विकराळ प्रकंप पद्म सुवक्तार । काळ म्हणिजे पंचमंत्रिवर ।
नर्केंसी परिवेष्ठोनी अघोर । म्हणिजे नर्क असे ॥१०३॥

प्रद्युम्न सुचीसुख । असूनेमी सपीडण बाधक ।
म्हणिजे इति पंचक । मंत्रिवर्ग ॥१०४॥

नर्कासहीत । होऊनि परिवेष्ठित ।
घोर म्हणिजे असंत । राजनर्क असें ॥१०५॥

कुंभिपाक सुपाक प्रमुख । दारुण अंगारुक ।
म्हणिजे इति पंचक । मंत्रिवर्ग ॥१०६॥

नर्कासहीत । होउनि परिवेष्ठित ।
तराळ म्हणिजे कर्त । राजनर्क असे ॥१०७॥

दोहान अश्रुहरद । त्रिष्ठाणाय स्तुंड शकुनी पूर्यहरद ।
महासंवर्तक म्हणिजे सन्निध । पंचमंत्री ॥१०८॥

नर्केंसी परिवेष्ठिक । होउनिया महाभयानक ।
म्हणिजे राजनर्क । प्रसिद्ध असे ॥१०९॥

ऋतुपूतिमांस । तप्तजंतूलेपद्रवत्रपुउल्लास ।
म्हणिजे विशेष । पंचमंत्री ॥११०॥

नर्कासहीत परी । वेष्ठोनि काळ रात्री ।
म्हणिजे अधिकारी । राजनर्क असे ॥१११॥

निरुस्थास सुदीर्घकुट शाल्फली अरिष्ट । सुमन म्हणिजें पंचश्रेष्ठ ।
मंत्री मंत्रासहीत भयोत्कृष्ट । म्हणिजे राजनर्क असे ॥११२॥

दानव प्रवाह रुक्ष । सुप्रवाह मेष ।
म्हणिजे पंचमंत्री नर्क । सहीत राजनर्क असे ॥११३॥

शूनक शूकर अज म्हैस । अविक म्हणिजें पंचमंत्री समरस ।
समंधे चंडकाळ म्हणिजे विशेष । राजनर्क असे ॥११४॥

सगळ शळ सिंह गजानन व्याघ्र । म्हणिजे पंचमंत्री वीर ।
म्हणिजे नर । राजनर्क असें ॥११५॥

उग्र विकाश ग्राह्य कुंभि नक्र । म्हणिजे पंचत्रिनर्क
परिवारसंमेळे प्रचंडक । म्हणिजे राजनर्क ॥११६॥

सर्प कूर्म वायस गृध्र उलूक । म्हणिजे पंचमंत्रीनर्क ।
संमेळे पद्म म्हणिजे नायक । राजनर्क असें ॥११७॥

जंबूक महाव्याघ्र मर्कट कर्कट मंडूक । म्हणिजे पंचमंत्रीनर्क ।
संमेळे महापद्म म्हणिजे मुख्य । राजनर्क असें ॥११८॥

पूतिरक्तरक्त पूतिमृतिक । कणाधूम म्हणिजे पंचक ।
मंत्रीनर्कसंयोगे भीमक । म्हणिजे राजनर्क असे ॥११९॥

तुषाग्नी क्रिमिसंग अमेध्य । अप्रतिष्ठ म्हणिजे पंचविध ।
मंत्रीनर्कैसी भीमभीष म्हणिजे प्रसिद्ध । राजनर्क असे ॥१२०॥

मळभक्षण आत्मभक्षण । सर्वभक्षण सुधाभक्षण ।
म्हणिजे पंचमंत्रीसंयोगे आपण । कराळ म्हणिजे राजनर्क असे ॥१२१॥

संकट विसंकट । सुविशाळ कट विकट ।
म्हणिजे पंचमंत्रीनर्ककूट । संगे विकराळ म्हणिजे राजनर्क असे ॥१२२॥

अंबरीशकः कट । तप्तलोहहशैन वैतरणीनदी काष्ट ।
म्हणिजे पंचमंत्रीनर्ककूट । संगे वज्र म्हणिजे नर्क असे ॥१२३॥

अशीतळ वर्ण असती यंत्र । अस्ति गर्भ प्रपितुण तिळयंत्र युक्षयंत्र ।
म्हणिजे पंचमंत्रनर्कैसी त्रिकोणाकार । म्हणिजे राजनर्क असे ॥१२४॥

महाचूर्णदळासी चूर्ण कुटवेश प्रमर्द्दन। तप्तलोहमय तप्ततैलमय म्हणऊन।
पंचमंत्रीनर्कैसहित पंचकोण। म्हणिजे राजनर्क असे ॥१२५॥

पर्वतयुग पर्वतरूप। छूराधार मूत्रकूप विष्टाकूप।
म्हणिजे पंचमंत्रीनर्कैसी अधिप। सुदीर्घ म्हणिजे राजनर्क असें ॥१२६॥

छुराकूप अंधकूप म्हणऊन। सातनमुसळ म्हणऊन।
उलूकयंत्र म्हणऊन। शिळशकट म्हणऊनियां ॥१२७॥

म्हणिजे इति पंचक। मंत्रीनर्कादिक।
सहीत वर्तुळांक। म्हणिजे राजनर्क असे ॥१२८॥

लांगूल तालपत्र। अशिगहन मशकमंदिर।
म्हणिजे घोर। पंचमंत्री ॥१२९॥

नर्कासहीत। होऊनि अळंकृत।
सप्त म्हणिजे विख्यात। राजनर्क असे ॥१३०॥

वस्तीगर्भ म्हणऊनी। तप्तशूळमय म्हणोनि।
तप्तगड वहुदुःख म्हणोनी। महादुःख म्हणोनियां ॥१३१॥

म्हणिजे इति पंचमंत्री। नर्कासहीत परी।
शोभे अष्टभीम म्हणिजे नामधारी। राजनर्क असे ॥१३२॥

शाल्मल शकल हळाहळ। विरूप स्वरूप म्हणिजे पंचकुळ।
मंत्रीनर्कैसी संमेळ। म्हणिजे राजनर्क असे ॥१३३॥

यमनुग येकपाद त्रिपाद। तीव्र अचरंतन म्हणिजे पंचविध।
मंत्रीनर्कैसी मायाख्य म्हणिजे प्रसिद्ध। राजनर्क असे ॥१३४॥

इति अष्टविंशति राजनर्क। येकयेककोटी नायक।
नर्कासहीत अनेक। परिवारसंमेळे ॥१३५॥

होऊनियां आवर्त। तीव्रवेदनारूप अत्यंत।
नर्क असती म्हणोनी सत्य। निश्चयें जाणावें ॥१३६॥

अणीक ते नर्कस्थान। प्राप्तीसी होउनी भूत कारण।
जाले ते पाप कवण। म्हणीतले तरी ॥१३७॥

व्रह्महत्या म्हणिजे शिरसमय। सुवर्णस्तेय म्हणिजे भुजाद्वय।
सुरापान म्हणिजे हृदय। प्रदेशी असे ॥१३८॥

गुरुतल्पक। म्हणिजे जंघायुग्मपातक।
म्हणिजे अंगसंगम उपपातक। म्हणिजे रोमसंमोहानें ॥१३९॥

अतिअंधकाररूप शरीरानें । भयंकर वदनानें ।
रक्ताग्निनेत्रे कर्वशनिशानें । मोकळया केशें ॥१४०॥

फळी खड्गक युग्मे धरुनी । महाभयानक भूती होऊनी ॥
जिवाचे नाम कुक्षी असोनी । मनोवाचाकाया ॥१४१॥

म्हणिजे त्रिकर्णांतपूर्वक । महापातक अतिपातक ॥
प्रसंगीकपातक । उपपातकें ॥१४२॥

जातिभ्रंशपातक । संकीर्णपातक ।
अपात्रीकरणपातक । मळवाहापातकादि ॥१४३॥

प्रकीर्णपातक । म्हणोनि इति दशक ।
विविध पातक मुख्य । बोधीत असे ॥१४४॥

त्या पातकाचे ठाई । ब्रह्महत्या सुरापान ।
स्वर्णस्तेय गुरुतल्पक गहन । वत्सरीक तत्संयोग म्हणोन ॥
ती महापातकें ॥१४५॥

मातृपुत्रीगमन । सूनअग्रजागमन ।
ब्रह्मविष्णवादि स्थान पतन । हिये अतिपातकें ॥१४६॥

क्षेत्री सूतकी गर्भिणी बंधु । म्हणिजे हियांचा वधु ।
देवब्राह्मणपितियाचे सिद्धू । भूमीअपहरण ॥१४७॥

सासूराजस्त्रीगमन । कूटसाक्षित्वपण ।
म्हणिजे प्रसंगीक भिन्न । पातकसंमोह ॥१४८॥

माता सहोदरमाता सखी कन्या । भावजया सून गमना ।
भस्मधारण त्यजूनि अना । त्रिपुंड्रांतधारण ॥१४९॥

अंकुश गदा शंख चक्र । शरीरअंकितादिक ।
धारण ते महापातक । संमोह म्हणवी ॥१५०॥

आचार्यात्त्विकमित्रस्त्रीगमन । स्वस्त्रीसखीगमन ।
स्वगोत्रकन्यागमन । अथवा कोण्ही येक ॥१५१॥

विश्वासे येऊनि आपण । रिघाला शरण ।
तयाची स्त्रीकन्यारत्न । संभोगादिक ॥१५२॥

आदित्य दुर्गी उपकरण । आदि देवतापतन ।
पाषांडियासी संगसंभाषण । ते उपपातक म्हणिजे ॥१५३॥

असत्य चाहडी गुरुनिंदा । पुत्रोत्पत्ति समंधा ।
पितृमातृत्याग ॥१५४॥

सहोदरस्त्रीसी संग । संयोग परित्याग ।
अभक्षभक्षण जग । द्रव्यापहरण ॥१५५॥

परदारागमन । गुल्मलतावनछेदन ।
ब्रह्मचर्य त्यजून । अभिचारक्रिया ॥१५६॥

कुशास्त्रअभ्यास अंगवण । कुशीळ कुमतीअवलंबन ।
इत्यादि मिळोन । उपपातक म्हणवी ॥१५७॥

सुरापानवासना । प्रेतदुर्गंधी म्हैसीमैथुना ।
पुरुषमैथुनादिकरूनि जाणा । जातिभ्रंशपातकें ॥१५८॥

ग्राम अथवा अरण्य । पशुमृगादी जीवन ।
हिंसा ते संकीर्ण । पातक म्हणवी ॥१५९॥

निषेधद्रव्यग्रहण । निषेधपात्री अन्नदान ।
असत्यसंभाषण । व्यापारविषई ॥१६०॥

अदिक्षित शूद्रवर्ण । संनेघी वेदअध्ययन ।
इत्यादी अपात्रीकरण । पातक म्हणवी ॥१६१॥

वनतटाकस्थान । वासिये पक्षीसंहारण ।
निषेधस्पर्शन अन्नभक्षण । म्हणिजे मळवाहपातक ॥१६२॥

इति सांगीतलिया विशेखें । जी सकळ पातके ।
संकीर्णादिक मुख्यें । म्हणवीती ॥१६३॥

अणीक तया पातकाचा संग्रह । निःशेष अतिशय ।
होउ नेंदीजे निश्चय । त्याचे ठाई ॥१६४॥

त्रिवर्ष त्रिमास त्रिपक्ष । अथवा त्रिदिनांत प्रत्यक्ष ।
फळोनिया महादुःख । दाखवीती जाणावें ॥१६५॥

नातरी मरणांतरें । नरकबाधाद्वारें ।
दुःखदायक साचारें । अत्यंतिक ॥१६६॥

उपजला जीव जाण । तयासी न चुके मरण ।
त्या कारणे मरणचिन्ह । कैसे म्हणीतले तरीं ॥१६७॥

ध्रुव आणी अरुंधती । चंद्रछाया महापथ इति ।
न दिसे तरी येकवर्षा प्राप्ती । मरण होय ॥१६८॥

रश्मीरहिततरणी । रश्मिसंयोगे अग्नी ।
देखिजे जरी नयनीं । तरी येकांदशमासा मृत्यु ॥१६९॥

स्वप्नी कां जागृती । सुवर्णरजतादीक वाती ।
ज्वलीत तरी दशमासा प्राती । मरण न चुकें ॥१७०॥

भूत प्रेत निशाचर । आणि गंधर्वनगर ।
रक्तवर्ण धूम्र । देखलिया नवमासीं मृत्यु ॥१७१॥

अकस्मात आपुले शरीर । अतिस्थूळ ना तरी अतिकृशाकार ।
अथवा अतिकृष्ण देखिले गौर । तरि अष्टमासा मृत्यु ॥१७२॥

वाळुकेमध्ये कां पंकाआत । आपुला पाऊल मागां का दृष्टांत ।
अर्ध देखिले ते तरी सप्त । मासी देहपतन ॥१७३ ॥

काग कपोल उलूक । आपुले मस्तक ।
स्थानीं बैसे तरी षट्क । मासी पंचत्व पावे ॥१७४॥

वाळुका पर्जन्य सत्राधारीं । येऊनि आपणावरीं ।
घर्षे नाही तरी । स्वछायेचे ठाईं ॥१७५॥

विकृत दिसे नयनांसी । तरी पंचकमासीं ।
ना तरी चतुर्थमासीं । निदान होय ॥१७६॥

अभ्ररहीत निज दक्षिणदिशेसी । कां उदकांत इंद्रचाप आपणासीं ।
दिसे तरी त्रिमासी का द्विमासीं । देहनाश होय ॥१७७॥

निर्मळ दर्पणांतु आपुले शरीर । रहीत आपणासी कांपर ।
नयन येक दिसे साचार । तरी येकमासी देहपात ॥१७८॥

आपुले शरीर कस्तुरीगंध । का स्रवे गंधका निंबगंध ।
होऊनि दिसे तरी अर्द्ध । मासी प्राणत्याग ॥१७९॥

आपला ऊर वाळला । अथवा कांप उपजला ।
तरी दशदिनी घडला । वियोग तया ॥१८०॥

स्वप्नीं दक्षिणदिशे पंथ । चालतां आपणासी तेथ ।
भालुका करी दिसे तरी मृत्यू । समीप असें ॥१८१॥

दक्षिणदिशे जाता स्वप्नीं । आपणासी कृष्णवस्त्रधारणी ।
दिसे पुरुष आणि कामिनी । तरी शीघ्र मृत्यु ॥१८२॥

स्वप्नी आपण कृष्णांवर । धरूनी का नीळछत्रधर ।
का होऊनि दिगंबर । दिसे तरी शीघ्र मृत्यु ॥१८३॥

दिवा बहुविध नक्षत्रे । रात्री इंद्रचाप रक्तवर्ण चंद्र ।
कृष्णवर्ण दिनकर । दिसे तरी शीघ्र मरण ॥१८४॥

चंद्रसूर्यमंडळी छिद्र । कां गगन रक्तमाळाकार ।
दिसे तरी मरण शीघ्र । ततः क्षणी मृत्यु ॥१८५॥

स्वप्नी स्मशान भस्मधारण । शिरस मोकळे निर्वंधन ।
दिसे तरी मरण । समीप असें ॥१८६॥

स्वप्नीं कृष्णवर्णाचे पुरुष । मुंडीतमस्तक पाषाणे आपणास ।
मारितां देखिले तरी देहविनाश । त्वरित होय ॥१८७॥

सूर्योदई आपणा सन्मुख । ध्वनी करीत आले जंबुक ।
तरी देहपात प्रत्यक्ष । त्वरीत होय ॥१८८॥

स्वप्नी आपण क्रमितां दक्षणपंथ । मुक्तकेश गायन करित ।
खेळतां देखिले तरी मृत्यू । त्वरीत न चुके ॥१८९॥

स्वप्नांत श्वेतवर्ण । गजेंद्र दक्षिण ।
दिशेसी देखिला तरी मरण । ततक्षणी होये ॥१९०॥

उष्ट्रगदर्भसंयोगें । रथारूढ होऊनि वेगें ।
जातां देखिले दक्षिणभागें । तरी शीघ्र तनूपतन ॥१९१॥

स्वप्नीचिया अवस्था । खुदोरा कां अग्नीआतु पडतां ।
देखिले तरी सर्वथां । मरणासी क्षण न लगें ॥१९२॥

म्हणोनी इत्यादि करून । मरणसुचना भिन्न भिन्न ।
सुतसंहितेआंत निरोपण । सांगत असें ॥१९३॥

प्रत्यक्ष देखिले तरी । मनुष्यजन्म संसारी ।
पापकर्म परी । त्यागूनियां ॥१९४॥

शोकमोह त्यजून । चित्तशुद्धधारण ।
होती तें कवण कारण । म्हणीतले तरी ॥१९५॥

देहांतकाळी वासना । जयालागूनि जाणा ।
जे जे भावना । लाभे अंतःकर्णी ॥१९६॥

ते ते रूपकें । गती नच कें ।
म्हणोनि जाणोनियां निके । जाणोनियां ॥१९७॥

वाराणसी श्रीशैल्य । चिदांबरादि केवळ ।
शिवक्षेत्रस्थळ । अश्रूनियां ॥१९८॥

नातरी स्वाश्रमीं अवचित । होऊनी कल्पावे मनाआत ।
शिरस तें श्रीपर्वत । ललाट ते केदार ॥१९९॥

भ्रूमध्य वाराणसी मोचक । कुच तेची कुरुक्षेत्रस्थानक ।
हृदय तेचि प्रयाग म्हणोनी पूर्वक । हे भावनायुक्त होउनी ॥२००॥

अन्नवस्त्रसुवर्ण । दानादि धर्मयुक्त होऊन ।
भस्मरुद्राक्षधारण । नैष्टिक्य होऊनी ॥२०१॥

पादोदकप्रसाद सेऊन । शिवार्चन शिवस्मरण ।
शिवमंत्री शिवध्यान । शिवज्ञानादिक ॥२०२॥

सावधान होऊनिया नर्क । वाधा जिणोनी परमागममोक्ष ।
सर्व साधावे म्हणोनी मुख्य । हितोपदेश इति ॥२०३॥

अणीक तया नरकलोकापासून । वरती सहस्त्रयोजनें ।
अंतर नवलक्षयोजन । प्रमाण भूमिका असें ॥२०४॥

ते भूमी जाली तरी आपण । चतुर्थार्धलक्षयोजन ।
अर्धपुट ते समान । भागे मृन्मय लोहमय होऊन । असे तये स्थानीं ॥२०५॥

पूर्वोक्त सकळ नर्क । संमोहासी नायक ।
अधिपती जाला मुख्य । यमराजा असे ॥२०६॥

तयावरी विशेषें अधिकारी जाला असे ।
जे नामवेशें । रुद्रमूर्ति असे ॥२०७॥

अत्यंत भीमकरानें । काळ न लुंपती कासनें ।
चाप वाण फळ (?) खड्गानें । करचतुष्टय ॥२०८॥

आपणासमान । कोटिसंख्या भूतगण ।
सहीत परिवेष्टोन । प्रसिद्ध असे ॥२०९॥

अणीक तेथून । वरी येकसहस्त्रयोजन ।
उत्तरोत्तर होऊन । प्रतियेक ॥२१०॥

नवसहस्त्रयोजन । प्रमाण उन्नत होऊन ।
येकसहस्त्रयोजन विस्तीर्ण । होऊनि असे ॥२११॥

महातळ रसातळ । तळातळ सुतळ ।
नितळ वितळ अतळ । म्हणिजे सप्तपाताळे ॥२१२॥

अनुक्रमे सुवर्ण रजत । तांम्र कांस्य लोहजात ।
वाळुका मृन्मय म्हणिजे सप्त । भूमिका असती ॥२१३॥

म्हणऊनियां प्राकारें । गोपुरादी विचित्रें ।
रचनेने मनोहरें । रसरंजित ॥२१४॥

सकळ भोगसाधन । संमधे सपन्न होऊन ।
स्वर्गलोकसमान । म्हणवीत असती ॥२१५॥

तयासी अनुक्रमे बळ । अतिबळाबळ ।
आणि अतुबॅळ । विक्रमबळांशें ॥२१६॥

बळशाली बळाक्ष । म्हणोनि नायक ।
कर्तृत्वपूर्वक । होऊनी असती ॥२१७॥

अणीक ती जाली तरी येकयेक । त्रिखंड होऊनि पूर्वक ।
दैत्य भुजंग राक्षसादिक । अश्रूनि असती ॥२१८॥

त्याचे ठाई । अनुक्रमे शंखकर्णक । प्रल्हाद शुशुपाळक ।
कर्कोटक हिरण्याक्ष । वृहद्गर्भ बळी ॥२१९॥

म्हणिजे तया सत्य । लोकाचे ठाई तेथ तेथ ।
दैत्याधिपते कर्ते । होऊनि असती ॥२२०॥

कुटिळक वासुकी कंबळ कर्कोटक । कळांग दर्दुप तक्षक ।
म्हणिजे तेथ तेथ पन्नग । पती होउनी असती ॥२२१॥

त्रिकूट लोहिताक्ष यम विकटानन ।
कराळ भीम गिहद पिंगळ म्हणिजे परिक्रम ।
त्या त्या राक्षसालागून । पती होऊनि असे ॥२२२॥

अणीक तया सत्त । पाताळाचे ठाई दैत्य ।
भुजंग राक्षस समस्त । आपुले आपुले लोकी ॥२२३॥

अनुक्रमें शिव शंभो शंकर । श्रीकंठ उमापती सर्वेश्वर ।
नीलकंठादि नाम ध्याय लिंगतत्पर । होऊनि भजत असती ॥२२४॥

अणीक तेथून । भूपृष्टांत धरून ।
अठ्याऐंसीलक्षयोजन । अधीकत्रें ॥२२५॥

द्विकोटीयोजने प्रमाण । तया सप्तपाताळालागुन ।
अधिपती जाला आपण । हाटकेश्वर म्हणिजे रुद्र असें ॥२२६॥

तो जाला तरी शेष तेथ । सहस्त्रयोजने रचित ।
विस्तीर्ण मणीखचित । दिव्यसिंहासनाग्रीं ॥२२७॥

कोटिकंदर्पदीत । लावण्यमय शोभिवंत ।
सकळ सुर सिद्धसहित । सेवा घेत असे ॥२२८॥

अणीक ते काळाग्नी । भुवनआदि करुनी ।
हाटकेश्वर मध्यस्थानी । सप्तपाताळाचे ठाई ॥२२९॥

तया तया भुवनजपती । वासियाची कायाकांती ।
रत्नाभरण दीप्ती । प्रकाश करुनी ॥२३०॥

सकळ परि विषई । प्रकाशत असे सरिसा देहीं ।
नातरी चंद्रार्कअपेक्षा नाही । म्हणोनि जाणावें ॥२३१॥

इति हिया प्रकारें । देखिलियां नंतरें ।
ब्रह्मा अधोखर्परांतु विस्तारें । भुवनसंख्या ॥२३२॥

काळाग्निरुद्रभुवन । येककोटीयोजन ।
तयाच्या ज्वाळा प्रमाण । दशकोटीयोजनें ॥२३३॥

तयाचा धूम्र पंचकोटियोजन । तयावरी नर्कलोकस्थान ।
द्विलक्षअधिक्य योजन । तीसकोटी ॥२३४॥

तयावरी कूष्मांड रुद्रभुवन । नवलक्षतीससहस्त्रयोजन ।
तयावरी सप्तपाताळस्थान । अंतराळ ॥२३५॥

समस्तसहीत सत्तरी । सहस्त्रयोजने तयावरी ।
हाटकेश्वररुद्रभुवन विस्तारी । भूपृष्ठांत धरुनी ॥२३६॥

अठ्यापेसीलक्ष अधिक्य । द्विकोटियोजनें तेथूनि रचणूक ।
पुढें सांगो तयावरी भूलोंक । येककोटीयोजनें ॥२३७॥

इति ब्रह्मांडाचे अधोकंठापासून । भूपृष्टांत धरून ।
योजने म्हणोन । जाणावे निश्चित ॥२३८॥

इति विवेकचिंतामणौ नागलोकस्थितिवर्णनं नाम
तृतीयपरिच्छेदः समाप्तिमगमत् ॥ श्री सांबसदाशिवार्पणमस्तु ॥

---

## चतुर्थ परिच्छेद

श्री महागणेशाय नमः ।
श्री शिवशंभूसच्चिदात्मने नीलकंठाय नमः ।

गणिले अजांड अर्ध । खर्पर विविध ।
तयांतु विविध । भुवने असती ॥१॥

आतां येथूनि ऊर्ध्वं । धरिण्यादि विषद ।
सांगोनि विचित्र अनुवाद । ते कैसे म्हणीतले तरी ॥२॥

पूर्वोक्त हाटकेश्वरभुवन । तयापासूनि येककोटियोजन ।
प्रमाणधातृ जंवुद्वीपादिकरुन । सप्तद्वीपसहित ॥३॥

सप्तसमुद्रसहित अनेक । गिरीनदीनदादिक ।
विचित्ररचना द्युभुर्लोक । अतिरंजत असे ॥४॥

तयासी अनेक । भिन्न भेदे पृथक ।
कर्ते असती मुख्य । तै कैसे म्हणीतले तरी ॥५॥

प्रथम स्वयंभू स्वारोच्चिष । रेवती चक्षण उत्तमेश ।
मध्यम आणि विशेष । वैवस्वादि ॥६॥

ब्रह्मसावर्णित । विष्णुसावर्णित ।
रुद्रसावर्णित । सूर्यसावर्ण्यादि ॥७॥

तेजसावर्णित । देवसावर्णित ।
रुद्रसावर्णित । म्हणिजे चतुर्दश मनूआंतु ॥८॥

प्रथममनू स्वयंभूलागुनी । उत्तानपाद म्हणऊनी ।
प्रियवर्द्धन म्हणोनी । उभय पुत्र ॥९॥

तयामधीं । उत्तानपादीं ।
तयासी स्वसमंधी । धृव म्हणिजे येक पुत्र ॥१०॥

तो नक्षत्रमंडळासी अधिकारत्वें । सकळऐश्वर्यसंपन्नत्वें ।
पुढें सांगेन विशेषतें । भुवर्लोकाग्री असें ॥११॥

अणीक ते प्रियवर्धन । म्हणिजे तयालागून ।
अग्निधा मेध्यातिथि म्हणोन । वपुस्मत ॥१२॥

ज्योतिष्मंत । आणि द्वितीयमंत ।
भव्य सांब म्हणिजे सप्त । पुत्र जाणावें ॥१३॥

तया प्रियवर्द्धनें तयालागून । जंबुद्वीपादि आदिकरुन ।
सप्तद्वीपें विभागून । दीधलें नेमूनी ॥१४॥

आणीक तयाआतु मुख्य । पुत्रअग्निधांसि नाभिके पुरुष ।
हवि इळावृत्ता रम्यक । हिरण्यक ॥१५॥

उत्तरकुरु भद्रश्व । केतु माल्य म्हणिजे नव ।
पुत्र तयासि सर्व । तपाग्निधानें ॥१६॥

आपले द्वीप नवभाग करुनी । तयासी दीधले म्हणऊनी ।
तया तयाचें नामेकरुनी । ती ती खंडे असती ॥१७॥

तयांतु प्रथम नाभि त्या नाभीचा पुत्र । वृषभ तया वृषभाचा कुमर ।
भरत तया भरताचे नामे उच्चार । भरतखंड जाहलें ॥१८॥

अणीक तयानंतरें । सकळ प्रपंच विस्तारें ।
कैसा कवण प्रकारे । म्हणीतले तरी ॥१९॥

पूर्वोक्त भूलोंक भूमिमध्यस्थानीं । वर्तुळाकार मेदिनी ।
येकलक्षयोजने विशाळ होऊनी । चित्रवर्णभूमिका असे ॥२०॥

ते जंबूद्वीप विशेषें । भूकांतीचे नाभिमंडळी तैसें ।
तरी शोभा पावोनी असे । विचित्रविषयानें ॥२१॥

तया मध्यस्थानी सुवर्णमय । मेरुपर्वत तये भूकांतीचे हृदय ।
कर्णिकाअकृति पावोनी अतिशय । सुवर्तूळ म्हणवी ॥२२॥

षोडशसहस्त्रयोजनें । भूमीआंत रूपोन ।
चौरयाशीसहस्त्रयोजने प्रमाण । होऊनी प्रसिद्ध असें ॥२३॥

तया कारण । येकलक्षयोजने प्रमाण ।
प्रमाण होऊन । प्रसिद्ध असे ॥२४॥

मूळातु षोडशसहस्त्र । योजनें पीनत्वाकार ।
अग्री बत्तीससहस्त्र । योजने मिति ॥२५॥

विस्तीर्ण होऊन । नवदशसहस्त्रयोजन ।
परि प्रदक्षिण । होऊनि असें ॥२६॥

अणीक तया मेरूचें । अग्रीं ब्रह्मयासि साचें ।
मानावती म्हणिजें नामाचें । मनोहर ॥२७॥

चतुर्दशयोजनाचें । विस्तीर्ण होऊनी रत्नाचें ।
दुर्ग मौक्तिकाचें । कंगोरेयुक्त ॥२८॥

सकळ देवताजन । सहित अळंकृत होऊन ।
सर्वसुखभोगसंपन्न । प्रकारानें ॥२९॥

होऊनि श्रेष्टादिक । पट्टण रंजित येक ।
अतिरम्य सौख्य । होऊनि विराजत असें ॥३०॥

तयाचे पश्चिमदिशें । नारायणासी विशेषें ।
निवास होऊनि विराजत असें । रजतशृंग म्हणोनी ॥३१॥

तया मानावती दक्षिणदिशें । पितामहासी विशेषें ।
सुखाश्रय होऊनि असें । सुवर्णमयशिखर ॥३२॥

तया पुराचे ईशान्यदिशे सर्वेश्वराते । नित्य मंदिर होऊनि असें निरुतें ।
रत्नमयशृंग तें आपणातें । नाम ज्योतिष्क म्हणवी ॥३३॥

तयाचिया नितंबाचें । ठाई स्कंदनंदादी महाकाळाचें ।
गणेश्वरादि सकळाचें । अनेकविध ॥३४॥

रमाश्रय असती । तेचि ब्रह्मेंद्र उपेंद्र समस्ती ।
मुख्य देवताने अती । पूज्य होऊनि असती ॥३५॥

अणि तया पुराचे अमळपुरी मुख्य । शिता अळकनंद चक्ष ।
भद्रा म्हणिजे चतुष्क । देवनदी असती ॥३६॥

अणीक तया मेरूचें अंतराळस्थानीं । सकळ रत्नोज्वल होऊनी ।
नेमी म्हणउनी । वर्तुळाकारें ॥३७॥

कंकणत्रय भिन्न । येकयेक कंकण ।
त्रयत्रय सहस्त्रयोजन । प्रमाणत्रय असें ॥३८॥

पंचविंशती । सहस्त्रयोजने क्षितीं ।
येकयेकासी अतस्थिती । होऊनि असे ॥३९॥

तयाआंतु उर्ध्वकंकणाचें । पूर्वादि अष्टदिशाचें ।
ठाई सुवर्णमय अष्टशृंग त्याचें । अग्रस्थानीं ॥४०॥

इंद्रासी सुवर्णाचे । दुर्ग नीळरत्नाचें ।
कंगोरियानें शोभीत साचें । असे अमरावतीं ॥४१॥

अग्नीसी कमळ लोहित । वर्णाचे दुर्ग धगधगीत ।
वज्राच्या कंगोरियाने शोभित । असे तेजावती ॥४२॥

यमासी अंजनवर्णाचे । दुर्ग पुंरवरागाचे ।
कंगोरयाने शोभीत साचे । असे सयामिनी ॥४३॥

नैऋत्यासी कृष्णलोहित । वर्णांचे दुर्ग मौक्तिकवंत ।
कंगोरयाने शोभित । असे रक्षावती ॥४४॥

वरुणासी शुद्धाकार । वर्णाचे दुर्ग मौक्तिकवंत सार ।
सुवर्णकंगोरयाने मनोहर । शोभत असे शुद्धावती ॥४५॥

वायूसी पांचावर्णाचें । दुर्ग वैडुर्याचें ।
कंगोरियानें शोभीत साचें । असे गंधावती ॥४६॥

कुबेरासी नानावर्णरंजित । रत्नाचे दुर्ग मौक्तिकवंत ।
कंगोरियाने शोभित । असे मनोद्या ॥४७॥

ईशान्यासी शुभ्रवर्णाचे दुर्ग । रत्नाच्या कंगोरयाने योग्य ।
शोभत असे चांग । वासीवती ॥४८॥

म्हणिजे नामापुर । अष्टक पृथकाकार ।
प्रत्यक् षट्षट्सहस्त्र । योजने विस्तीर्ण असें ॥४९॥

अणि मेघविभ्रावती । सुंदर कामावती ।
सावर्णी सुमती । कुसुमात्रती ॥५०॥

म्हणिजे इति । पंचइंद्राची अमरावती ।
भवती पट्टणे असती । तयातु अनुक्रमें ॥५१॥

सुर अप्सरस । सिद्ध अनादि द्वादश ।
आदित्य सद्मनिवास । करुनि असती ॥५२॥

अणीक तद्वन्ही रेवती । म्हणिजे व्हिती ।
अग्नीची तेजोवती । भवती पट्टणें ॥५३॥

तयातु अनुक्रम । विश्वकर्मा यम ।
आदि देवता स्थोम । शिल्प असती ॥५४॥

आणि मात्रानदी म्हणोनी । लोहिता गुणवती म्हणोनी ।
म्हणिजे त्रयत्रय यमाचे संयमिनी । भवती पट्टणें ॥५५॥

तयातु परिक्रमें निरंतर । पितृआदि रुद्र ।
येकादशरुद्र । असती । निरुतें ॥५६॥

आणीक पिंगळा कृष्णवती । सुखावती गंधारी म्हणिजे इति ।
चतुष्ट नैऋत्याचे पक्षावती । भवंती पट्टणें ॥५७॥

तया क्रमें कर्दम देवता । अजानदेवता ।
अगळदेवता । पिशाच असती ॥५८॥

अणीक सिद्धसेन हेमसंज्ञा । सिद्धावती म्हणिजे त्रयवरुणा ।
चिये शुद्धावती स्थाना । भवती पट्टणें ॥५९॥

तयाआत । अनुक्रमे भूत ।
वसु विद्याधर वसंत । असती जाणावें ॥६०॥

अणीक सिद्धी म्हणिजे येक । वायूचे गंधावतीजवळिक ।
पट्टण असे तयांतु अशेख । किन्नर असती ॥६१॥

अणीक गंधर्वसभाप्रकार । माजी चित्रावती म्हणिजे नगर ।
प्राकार कुबेराचे महोदर । भवती पट्टणें ॥६२॥

तयाआंत । अनुक्रमें चित्ररथ ।
नारदतुंबरादी दैवत । गुह्यक असती ॥६३॥

अणीक वैकुंठ पद्मावती । कामसु भेद म्हणिजे इति ।
त्रय ईशान्याच्या यशोवती । भवती पट्टणें ॥६४॥

तयाभीतरी । अनुक्रमें परी ।
विष्णु ब्रह्मा धन्वंतरी । असती जाणावें ॥६५॥

यानंतरे अशेख । इंद्रादि लोक ।
पाळ अष्टक । जालें तरी ॥६६॥

पीत रक्त कृष्ण धूम्र । शुक्ल हरिताकार ।
शीत शुभ्र । वर्ण तयाचें ॥६७॥

करी तगरमहिसा नर वाहन । मकर हरिण ।
हया वृषभ इति भिन्न । वाहनें परिक्रमें ॥६८॥

वज्र शक्ती दंड खड्गयुधा । पाश अंकुश गदा ।
शूळ म्हणिदे अष्टविधा । आयुधें क्रमें ॥६९॥

आणीक दिव्याळंक । संमोहांतु वीर विशेष ।
पद्म महाशंख । मकर कुळभ ॥७०॥

मुकुंद कुंद नीळ चर्च इति । नवविधीसी अधिपती ।
होऊनि ईश्वरेसी प्रीति । सखा होऊनि असे ॥७१॥

अणीक ते ईशान्यदिशें । आतु ईश्वरक्षेत्र म्हणिजे विशेषें ।
ये स्थान असें । तेथे नंदीश्वर ॥७२॥

कनकवर्णशरीरें । येकमुखत्रिनेत्रे ।
चतुर्भुजा श्वेतवस्त्रें । दिव्याभरणें ॥७३॥

गंधमाळादिकें । अळंकृत होऊनि विशेखें ।
शूलायुध हस्तकें । धरूनियां ॥७४॥

सनत्कुमारादि समस्त । शिष्यापरी संयुक्त ।
शिवाराधन अखंडित । तत्पर होऊनि असें ॥७५॥

आणीक ते मध्यकंकणी । सिद्धमनूमुनी ।
महासुखे आपुलाले स्थानीं । असती जाणावें ॥७६॥

अणीक तें अधोककणीं । धनुज्यादि करुनी ।
विजयगंधर्व आपुलाले स्थानी । सुस्वरूपें असतीं ॥७७॥

आणीक तया मेरुचे मूळस्थान । गुह्यांतरीं मरुद्गण ।
असती म्हणोन । सिद्ध जाणावें ॥७८॥

यानंतरें तया मेरूचिया दृढत्वका कारण अतिशया ।
अजापासूनियां । कल्पित जालें ॥७९॥

कीलकपर्वत । एक नग स्वत ।
पन्नाससहस्र उन्मत्त । होउनी असे ॥८०॥

त्याचे ठाई श्वेतवर्णमय । मंदारपर्वत अतिशय ।
तो महामेरुचिये । पूर्वदिशेसि असें ॥८१॥

अणीक पीतवर्ण । गंधमादन ।
शैल तो दक्षिण । दिशेसि असे ॥८२॥

नीळवर्णवपु लनाद्रिंद्र । तो पश्चिमदिशेसी असे साचार ।
अरुणवर्ण सुपार्श्वशिखर । तो उत्तर दिशेसी असे ॥८३॥

इति चतुर्थपर्वता । वरी सदाशिवमयता ।
लिंगे सकळ देवता । अराधीत असती ॥८४॥

आणीक मंदारादि कीलकपर्वत । तयाश्री क्रमें कर्दम जंबू अश्वत्थ ।
वटवृक्ष संज्ञित । म्हणिजे कल्पवृक्ष ॥८५॥

येकयेकसहस्र । योजने उन्नताकार ।
येकसहस्रयोजने विस्तार । होऊनी असती ॥८६॥

तयामध्ये दक्षिण । दिशेचा गंधमादन ।
मणिकीलकपर्वत ईशान्य । स्थानावरी ॥८७॥

असे जंवूवृक्ष तयाचें । ठाई महागजाचें ।
प्रमाणे साचें । फळे असती ॥८८॥

ते महागजाचें प्रमाणें । कैसे कीं लक्षण ।
कैसे म्हणीतले विवंचन । सांगिजेल ॥८९॥

नराचे चतुःशतहस्तोन्नत । प्रमाण ते महागज म्हणवीत ।
तैसी फळे तये पर्वत । अग्रीं असतीं ॥९०॥

तया फळाचेनि गळितरसें । प्रवाहरूपे विशेखें ।
होऊनिया म्हणवीत असे । जंवूनदी ॥९१॥

ते नदी विशाळ होउनी । मेरुच्या मुळासी परिवेष्टुनी ।
शिळावृत्तवर्षाची धरणी । षोडशावन्न ॥९२॥

सुवर्णमय करुनी । अपणासी असुनी ।
असती जे प्राणी । तया सकळा ॥९३॥

जगवर्गाची समस्ती । करिचळे अति ।
कनकमय कांती । करीत असें ॥९४॥

तये नदीपासून । जनित जाले सुवर्ण ।
ते देवतादिकासी आभरण । होऊनि असे ॥९५॥

तया मंदार । पर्वताच्या मुळासेजार ।
नदी म्हणिजे सविस्तार । होऊनि असें ॥९६॥

कुवेरादिकालागुनी । क्रीडार्थ होउनी ।
चैत्ररथ म्हणउनी । वन असे ॥९७॥

हेमोज्वल मंडिताकार । होऊनीयां सरोत्तर ।
अरुदकाचे सरोवर । अतिशीळमय ॥९८॥

सुरांचित होऊनी वर । तत्पुषनामाचे लिंगक्षेत्र ।
अतिमनोहर । शोभत असे ॥९९॥

अणीक तया गंधमादन । पर्वतासमीप आपण ।
भद्रा म्हणिजे विस्तीर्ण । नदी असे ॥१००॥

गंधनदिकेलागुन । विनोदार्थ होउन ।
नैभ्रांत म्हणऊन । वन विशाळ ॥१०१॥

मंडीत वहुवस । मनोहर होउनि मानस ।
म्हणिजे अतिविशेष । सरोवर असे ॥१०२॥

अणीक तया । विपुलादिया ।
अर्धोर्धभागी अतिशया । सुरभी म्हणिजे नदी ॥१०३॥

सुरसांत तीलागुनी । अस्पद होउनी ।
नैश्रांत म्हणउनी । वन विशाळ ॥१०४॥

अमरार्चितकारक । अघोरनामधारक ।
लिंगक्षेत्र मुख्य । मिरवत असें ॥१०५॥

रविकीर्णकांती । मयंक रुंजती ।
सीतोदक म्हणिजे महंती । सरोवर असें ॥१०६॥

देवतार्चितमय । सद्योजात वाम्नय ।
लिंगक्षेत्र ज्योतिर्मय । शोभत असे ॥१०७॥

अणीक तया । सुपार्श्वशिखराचियां ।
ठाई अतिसुमन म्हणिजे प्रवाहा । रूप नदी विशाळ असे ॥१०८॥

पितृजनालागून । सेव्य होऊन ।
असे धृतिमति म्हणऊन । गुल्मलतावनादि ॥१०९॥

सुगंधनलिनसंमेळेन । अळंकृत होऊन ।
भद्रिका म्हणिजे अतिविस्तीर्ण । सरोवर असे ॥११०॥

विबुधार्चित मयंक उत्तम । महादेव नाम ।
लिंगक्षेत्र निरोपम । विराजत असे ॥१११॥

यानंतरे चैत्ररथादी चतुष्क । वनांत मध्यमध्य येकयेक ।
नानारत्नमय होऊनि विशेख । कासारखेटादिके ॥११२॥

मंदार पारिजात संतान । कल्पवृक्ष हरिचंदन ।
म्हणिजे पंचनिर्जन । सुरतरु असती ॥११३॥

कामधेनू चिंतामणी । मरुजीवनी परिसखाणी ।
शुद्धरसा संजीवनी । दिव्यवस्तु ॥११४॥

अमृतमय वापी कूप तटाक । नदी परी काळी अनेक ।
कमळ कुमुद कल्हारादिक । कंजकुसुमें ॥११५॥

चकोर चक्रवाक । हंसराज हंसादिक ।
महापक्षी अनेक । संमोहानें ॥११६॥

जाई ज़ुई मोगरें । लतासुमनें परिकरें ।
मधुमती आदि सविस्तारें । कल्पलतासहित ॥११७॥

इक्षु पुंडरीकक्ष कर्दळी । कर्पूरकर्दळी नारिकेळी ।
सुगंधनारेळी । फणस रसफणसे ॥११८॥

च्यूतच्युतिक जंवू । पूग पुन्नाग खर्जुरी कदंवू ।
केशरी मधु मलयजयंवू । मंदार वदरी ॥११९॥

पारिजात जळपालाश । दाडीमादी सकळ सौरस ।
मुख्यमय सर्वात्रक विशेष । तरू असती ॥१२०॥

ते न जाले जरी संमेळे । वरी थुंकिले कां स्पर्शन केले ।
ना तरी हास्य केले । अथवा पाहिले तरी ॥१२१॥

अलिंगन चुंवन । केले कां संभाषण ।
ना तरी मुखस्पर्शन । जाले तरी ॥१२२॥

गायन केले । ना तरी प्रसन्न जाले ।
तया परीक्रमें अनुकूळें । सुमने असती ॥१२३॥

अशोक वकुळ च्युत पुन्नाग तिलक । कुरुवक कर्णिक सिंधुवरादिक ।
प्रियाळ चंपक म्हणिजे दशक । अदळ रुक्षजाती ॥१२४॥

अंकुर पल्लव दळ । कोरक सुमन फळ ।
आणि पक्कफळ । पंक्त्यादिक ॥१२५॥

शुक पीक मयुर । कपोत पारवे मयोर ।
दुरायादि विचित्र । पक्षी संमोहानें ॥१२६॥

मृग कस्तुरीमृग । चामरपुरुष गौरमृग ।
म्हणिजे इति सादमृग । संमेळसहित ॥१२७॥

शित सौरभ्य म्हणउनी । मद व्या माया म्हणोनि ।
मलयमरुत म्हणवोनी । मनोहर असती ॥१२८॥

अणीक त्या वनाचे ठाई चित्रसाळ । आणि चंद्रसाळ ।
शिशिरसाळ । लतामंडपाचे ठाई ॥१२९॥

पल्लवतोरणें । देखिलिया नयनें ।
संतोष होय तैसी स्थानें । मनोहर ॥१३०॥

शीतळछायाकार रुक्षका । तेथ तेथ कांचभूमिका ।
तेथे शशिकांति नेंदि का । सुमनसेजा ॥१३१॥

सरोवरतिरी कृतचर । तेथे जनसंमोह साचार ।
भिन्नाभिन्न वस्त्रालंकार । आभरणें ॥१३२॥

गंधमाळादीकरून । अलंकृत होऊन ।
विचित्र नटचिह्न । संचरत असे ॥१३३॥

विद्याधर अप्सरस यक्ष राक्षस । गंधर्वकिन्नरादिक पुरुष ।
पिशाच गुह्यक सिद्ध विशेष । सकळ सदेवताभेद ॥१३४॥

तेथे अखिल देवता भेदकूट । तेथें सकळ सुरश्रेष्ठ ।
तेथे क्रीडती विशिष्ट । कोणवजन ॥१३५॥

मकरध्वज नळ कुबेर । जयंत अनिरुद्ध कुचिमार ।
पंचाळ पल्लव प्रवेणादिकर । असती दैवता विटजन ॥१३६॥

रंभा उर्वशी । तिळोत्तम चित्ररेखा मंजुघोषी ।
मेनिका सुकेशी । आदि देवगणिका ॥१३७॥

संगीतसाहित्यादिक विद्या संभाषणें । मळमहिषादि युद्धरचनें ।
सारी सतरंज द्युत विनादानें । विराजत असती ॥१३८॥

यानंतरें मेरूचे । पूर्वादि चतुर्थदिशेतें ।
ठाई असती मंदरादि साचें । कीलकपर्वत ॥१३९॥

तयामध्य मध्यस्थान । अंतरी खेचर आपण ।
असती ते कवण । म्हणीतले तरी ॥ ॥१४०॥

शितातचार कुंदकुररिक । माल्य वालव कुंदक ।
म्हणिजे इति पंचक । नगकुळें ॥१४१॥

पूर्वेचा मंदरागिरी दक्षिण । दिशेचा गंधमादन ।
पर्वताचे मध्य मध्यस्थान । अंतरे असती ॥१४२॥

त्रिकुट कुविद । तंग रूचक विशाद ।
म्हणिजे पंचविध । शैलादिक ॥१४३॥

दक्षिणेचा गंधमादन गिरी । पश्चिमेचा विपुलाद्री ।
उभयाभीतरी । असती ॥१४४॥

शिखिवासा वैडुर्य म्हणऊन । कपिल गंधमादन ।
चारुधी म्हणिजे भिन्न । पंचपर्वत ॥१४५॥

पश्चिमेचा विपुलाद्री । उत्तरेचा सुपार्श्वगिरी ।
उभयाअंतरी । असती स्थानस्थानीं ॥१४६॥

शंखकूट वृषभ हंस काळांजन । शिखरी म्हणिजे पंचनग भिन्न ।
उत्तरेचा सुपार्श्व पूर्वस्थान । मंदारद्वयामध्यें असती ॥१४७॥

इति विंशति मुख्य । केशरांचरांतु येकयेक ।
पर्वत षट्कषट्क । सहस्रयोजनें ॥१४८॥

प्रमाण उन्नत होऊनी । सकळ सुरसंततीलागुनी ।
आश्रमस्थान होऊनी । असती जाणावें ॥१४९॥

या प्रकारें विचित्र । रचना मेरूची सविस्तार ।
नवखंडविचार । कैसा म्हणीतला तरी ॥१५०॥

महामेरुचियें । उत्तरदिशेसी पर्यायें ।
नीळ श्वेत श्रृंग म्हणिजे त्रय । सिमागिरी ॥१५१॥

येकयेक दशसहस्त्र । योजनें उन्नताकार ।
द्विसहस्रयोजने विस्तार । प्रसारणे असतीं ॥१५२॥

नवसहस्रयोजने । अंतप्रदेश होऊन ।
पूर्वपश्चमलवणाब्धी धरुन । पसरोनी असती ॥१५३॥

तया गिरित्रयावरी सकळ । सौख्यपदा सर्वकाळ ।
नानावर्णरसफळ । रुक्ष असती ॥१५४॥

तेथें अनुक्रमें देव महेश्वर । रुद्र म्हणिजे त्रिप्रकार ।
नाम ध्याय लिंग निर्जर । सेवित असती ॥१५५॥

अणीक तया मेरुचे दक्षिण । दिशेसी सारिखें न ।
निशादहे मकूट हिमाद्री म्हणोन । सिमापर्वतत्रय ॥१५६॥

पूर्वोक्त गिरीचे योजन । प्रमाणें उन्नत विस्तीर्ण ।
अंतप्रदेश होऊन । असे तें जाणावें ॥१५७॥

तया गिरित्रयावरी । विचित्रवर्ण परी ।
रुक्ष असती सौख्याकारीं । सदा सफळ ॥१५८॥

तेथें अनुक्रमें ईशान्येश्वर । पार्वतीपती म्हणिजे त्रिप्रकार ।
नाम ध्याय लिंग निरंतर । देवता आराधीत असती ॥१५९॥

आणीक तया मेरूचिया । पूर्वपश्चिम उभया ।
दिशेसी अतिशया । अनुक्रमें ॥१६०॥

येकयेक नवसहस्रयोजन । अंतरे असे माल्यवंत गंधमादन ।
म्हणिजे द्वितीय भिन्न । सिमापर्वत ॥१६१॥

येकयेक सहस्त्र । योजनें सविस्तार ।
पंचपंच सहस्त्र । उन्नताकारें ॥१६२॥

दक्षिणोत्तर पूर्वोक्त । नीळ निशा म्हणिजे द्वैत ।
उत्तरदक्षिण सिमापर्वत । पूर्गेसी अर्पूनि असती ॥१६३॥

तया गिरि उभया । वरी बहुविध वर्णाचिया ।
रुक्षजाती अतिशया । असती अनेक ॥१६४॥

तेथें अनुक्रमें उत्तम । महादेव महेश नाम ।
ध्याय लिंगे सकळ सुरस्थोम । अर्चित असती ॥१६५॥

अणीक इति समस्त । विभाग शैल्यअष्टकाआंत ।
अंतप्रदेशी वसत । वर्ष म्हणोनी नाम ॥१६६॥

तयासी पूर्वोक्त । इळावृत्तादी समस्त ।
नाम ध्यायवंत । ते कर्तें होऊनि असती ॥१६७॥

तयाचा विस्तार । तो कवण कैसा प्रकार ।
म्हणीतले तरी विचार । पूर्वक सांगिजेल ॥१६८॥

मेरुचे उत्तरदक्षिणें । पूर्वपश्चिमादीकरुन ।
दिशाचे ठाई अनुक्रमे समान । असती निरुतें ॥१६९॥

नीळ निशाद माल्यवंत । गंधमादन म्हणिजे सिमापर्वत ।
चतुष्टा अंतर प्रवेशत । विशाळ तेचि ॥१७०॥

इळाव्रतवर्ष आपण । ते नवसहस्त्रयोजन ।
विस्तीर्ण चतुराश्रय होऊन । असे त्याचे ठाई ॥१७१॥

सितातिचारु कुंदकुररी । अचळतममन शीळाद्रि ।
रुक्षवान् रुचकगिरी । विंदुमान ॥१७२॥

मंदारचमणुभाननग । मेघगिरी निशिद्धा देवनग ।
म्हणिजे त्रयोदश योग्य । शैलसंमोह ॥१७३॥

पूर्वोक्त मंदारक । म्हणिजे कीलक ।
पर्वताचे पूर्वादिक । भागी असती ॥१७४॥

अणीक शैल्य द्विशिखरीं । त्रयशिखरी ।
येकश्रृंग महागिरीं । गजशैल्य ॥१७५॥

पिशाचशैल पंचशैल । कैलास हिमवान् शैल ।
म्हणिजे इति दशकुळ । पर्वतस्थोम ॥१७६॥

पूर्वोक्त गंधमादन । पर्वत म्हणिजे दृढकारण ।
कीलकगिरी दक्षिण । दिशेसी असती ॥१७७॥

आणि सुगंध शिखाशैल । त्रिशृंगी पुष्पक सुपक्षशैल ।
कुंकुमशैल वैडुर्य कपिल । भद्र कुमुद ॥१७८॥

मधुमान अंजन मुकुटगिरी । पांडुर सहस्रशिखरीं ।
पारिजात म्हणिजे पै परी । षोडशकुळाचळ ॥१७९॥

पूर्वोक्त विपुळ । म्हणिजे कीकाचळ ।
पर्वताचे पश्चिमदिशे विशाळ । होऊनी असती ॥१८०॥

अणीक शंखकूटगिरी । महानगपर्वतावरीं ।
हंसादिगिरी । मानुमान ॥१८१॥

चारुधी हेमकूटनघ । नीळ भद्र कटु शृंग ।
पुष्पराग । मेघपर्वत ॥१८२॥

हेमप्रभा वराहगिरी । मयोरनग च्यारुधीगिरी ।
शैलेंद्र म्हणिजे परी । समकुळ नग ॥१८३॥

पूर्वोक्त सुपार्श्वगिरी म्हणिजें । कीलकपर्वतासी जाणिजें ।
उत्तरदिशेसी विराजें । असती जाणावें ॥१८४॥

इति छपन्नकुळाद्री । सुरसंततीसी साचारी ।
आश्रयाधिकारी । होउनी असती ॥१८५॥

यानंतरे इळावृत । वृषाचे ठाई पर्वत ।
भिन्नभिन्न द्विसहस्रयोजने उन्नत । होऊनि असती ॥१८६॥

चतुर्विंशति गिरी । महापट्टणे असती तयावरी ।
तिये कवण म्हणीतले तरी । सांगिजेति ॥१८७॥

चंद्रकांत शुक्र पारिजात । कुमुद्वती म्हणिजे पर्वत ।
तयाचे ठाई दानवासी अष्ट । नगरे असती ॥१८८॥

त्रिकुटचारुधीचियें । सहस्रशिखरीं तयें ।
ठाई अतिशयें । नगरे असती ॥१८९॥

नमुचि महानाट्य म्हणोन । महदंबु अग्निसुख म्हणोन ।
काळनेमी विरोचन । सुपर्व चपळ ॥१९०॥

मुचकुंद सुकुंद । आदि दैत्य बहुविध ।
तयासी पट्टणे निशेध । अनेक असती ॥१९१॥

तया शृंगपर्वतावरी । कृतव्यादि आदि बहुपरी ।
राक्षसांसी नगरी । द्विलक्ष असे ॥१९२॥

सुव्रतपर्वत म्हणिजे पर्वत । त्याचे ठाई नीळादि पर्वत ।
हयग्रीवादि शोभिवंत । शाणव पट्टणें ॥१९३॥

महानीळगिरिपर्वतीं । किन्नरासी मिती ।
नगरे असती । पाचशत्तें ॥१९४॥

श्वेतोदकपर्वती विशेख । हळुंची अश्वस्कंध रेणुक ।
उलूकश्वसनादि सुपर्णासी मुख्य । पंचसहस्र पुरें ॥१९५॥

सानुगिरीवरि विचित्रें । विद्याधरासी सतशत पुरें ।
करंजपर्वती नगरें । गंधर्वांसी अनंत ॥१९६॥

वसुंधरापर्वतीं । वसूजनासी मिती ।
अष्टशते असती । महापट्टणें ॥१९७॥

रत्नधार । पर्वती सिद्धाचर ।
वर्गासी पूर । पट्टणे अनंत ॥१९८॥

मेघपर्वती अत्री अंगिरस । अगस्ती भार्गव भरद्वाज भृगु व्यास ।
विश्वामित्र वसिष्ठ विशेष । सुक साकल्य ॥१९९॥

साळकापन सूत शौनक गावलग । गाध गांधीज गौतुम गार्ग्य ।
मरीची मतंग । मृकुंडी मंडुक्य ॥२००॥

कण्व कौशीक च्यवन । कपिल कश्यप कात्यायन ।
देवळ दधीची जमदग्न्य । दुर्वास दत्तात्री ॥२०१॥

जयमिनी जनुज वळी । रोमज मतंग पतंग पातांजळी ।
पाराशरादी सकळी । पुलिस्त्या सानंद ॥२०२॥

सुतानंद श्वेतकेत । उपमन्यादी समस्त ।
अठ्यांशीसहस्र ऋषी अनंत । अश्रम असती ॥२०३॥

पुष्पकेशपर्वत । तेथे नारद तुंबर पर्वत ।
कोलाहलादी समस्त । देवमुनीसी मंदिरें ॥२०४॥

हेमकूटपर्वतीं । द्वादशादित्यासी अती ।
मनोहरे असती । मंदिरे अपूर्व ॥२०५॥

पंचकूटपर्वतीं वानिभद्र । सुवीर पाचीक विभांडीक धृतराष्ट्र ।
आणि पूर्णभद्र । विरूपाक्षादी वर ॥२०६॥

मुकुंदपर्वतीं मुख्य । पद्म महापद्म शंख ।
कुलिकादि नागार्के । जनाची भुवनें ॥२०७॥

परियात्रादिगिरी। तेथे कुबेराची नगरी।
मयादीपर्वतावरी। विघ्नेश्वराची पट्टणे ॥२०८॥

गजोत्तंगपर्वतावरी। दुर्गादेवीची नगरी।
येकश्रृंगगिरी। तेथे ब्रह्मयाचे नगर ॥२०९॥

गिरिकूटपर्वतीं विष्णूचें नगर। श्रीकंठपर्वतीं मनोहर।
ईश्वराचे राजमंदिर। विराजत असें ॥२१०॥

अणीक तया श्रीकंठ। गिरीसमीप हेमकूट।
म्हणिजे पर्वतश्रेष्ठ। त्याचे ठाईं ॥२११॥

वज्र वैडुर्य स्थोम। गोमेद पूषि राजपद्म।
रागा नीळ विद्रुम। मौक्तित मकरत ॥२१२॥

म्हणिजें हियें। नवरत्नमय।
होऊनि अतिशय। श्रृंगे अष्ट असती ॥२१३॥

तया मध्यस्थानीं प्रणव ते मूळ। निर्दोष तें डाळ।
ऋग्वेद ते दळ। यजुर्वेद ते पुष्प ॥२१४॥

सामवेद ते फळ। अथर्वणवेद तो फळरस केवळ।
यज्ञी ते सुशील। छाया होऊनि मिरवें ॥२१५॥

वटसंज्ञाधारक। होऊनियां अखिलकारक।
असे महाकल्पवृक्ष। तो जाला तरी ॥२१६॥

येकसहस्त्रयोजन। उन्नत विस्तीर्ण।
प्रमाण होऊन। प्रसिद्ध असें ॥२१७॥

तयाचे मुळी सुवर्ण। मय दिव्यसिंहासन।
तया अग्रासनीं निर्वाण। दक्षिणामूर्ति असें २१८॥

अमृतमयशरीर। जटामुगुटचंद्र।
कळामुख त्रिनेत्र। फणिकुंडले ॥२१९॥

नीलग्रीव सर्पयज्ञोपवीत। नागेंद्रयोग जटामंडित।
प्रावर्णवेष्टण शोभिवंत। गजव्याघ्राजिन ॥२२०॥

दिव्यमुद्रा अक्षसूत्रक। सुधाफळ सुपुस्तक।
दक्षिणवामहस्तक। चतुष्टानें ॥२२१॥

गंधमाळादी आभरण। सहीत अळंकृत होऊन।
वीरासने बैसोन। शोभत असे ॥२२२॥

विचित्रवेषधारी । बहुविध परी ।
तयासी बोधावया अधिकारी । अपण जाला असे ॥२२३॥

गजानन स्कंदादि गणेश्वर । नारदादी मुनिवर ।
सांख्यादि मत्तांतर । यमादी साधकासीं ॥२२४॥

वेदांतादि विशेषें । सकळशास्त्र उपन्यासें ।
कृतार्थ करीत असे । सकळ जनासीं ॥२२५॥

आणीक इति अनेक । देवतासंमोहासी मुख्य ।
अस्पद जाले इळाव्रत । वर्ष त्याचे ठाई ॥२२६॥

दिव्यदेहान्वित । होऊनियां समस्त ।
जनवर्ग विचरत । असती जाणावें ॥२२७॥

सहस्रानन कनक । मय महाप्रकाशक ।
असे मेरू त्याचे दीप्तीने लोक । विचरत असती ॥२२८॥

ते विषयविस्मरणीक । होऊनि जंबू म्हणिजे कल्पवृक्ष ।
फळआहारें त्रयोदशक । सहस्त्रवर्षें ॥२२९॥

आयुष्यवंत होऊनी । ईश्वरनाम लिंगपूजनीं ।
नित्य सुखरूपसंधानी । होऊनि असती ॥२३०॥

यानंतरे तया मेरूचिया पूर्वे । दिशेसी नवसहस्त्र ।
योजने अंतर । असोनियां ॥२३१॥

माल्यवंत म्हणिजे सिमापर्वत । धरूनि पूर्वलवणाब्धीपर्यंत ।
पसरोनियां चंद्रकांत । वर्णभूमिका असें ॥२३२॥

ते भद्रश्वेतवर्ण आपण । बत्तीससहस्त्रयोजने प्रमाण ।
चतुराश्रय होऊन । असे त्याचे ठाई ॥२३३॥

सप्तकुळपर्वत । तयापासूनि जनित ।
होऊनिया पुण्यवंत । नदी असती ॥२३४॥

तया वर्षाचे ठाई शशिकांत । मय होऊनि जन समस्त ।
खिलाब्ज म्हणिजे कल्पलत । फळआहारें ॥२३५॥

दशसहस्त्रवर्षें । चिरंजीव होऊनि विश्वासें ।
महादेवनामें पूर्वक असें । लिंगपूजक ॥२३६॥

होऊनि निरंतर । सकळ देख घोर ।
विरहीत सुखशरीर । मय होऊनि असती ॥२३७॥

अणीक तया मेरुचे । पश्चिमदिशेसी साचें ।
नवसहस्रयोजनाचें । अंतर्होऊनि असें ॥२३८॥

गंधमादनपर्वत । धरूनि पश्चिमलवणाब्धीपर्यंत ।
पसरोनियां रक्तकमळाकृत । कांतिमयभूमी असें ॥२३९॥

ते केतुमाल्यवर्ष विस्तीर्ण । बत्तीससहस्रयोजन प्रमाण ।
चतुराश्रय होऊन । असे त्याचे ठाई ॥२४०॥

सप्तकुळपर्वत । तयापासाव जनित ।
होऊनियां असत । त्याचे ठाई ॥२४१॥

तया वर्षाचे ठाई अशेख । रक्तकमळवर्ण जनलोक ।
पन्नास म्हणिजे कल्पवृक्ष । फळहारें ॥२४२॥

दशसहस्रसंवत्सर । आय्यवंत चिरं ।
जीवी होउनी निरंतर । महादेव ॥२४३॥

नामधारक कारण । लिंगार्चनपूजन ।
करूनि महाबळवान । होउनी असती ॥२४४॥

अणीक तया मेरूचिया । उत्तर दिशेसी अतिशया ।
नीळश्वेत म्हणिजें सिमागिरिद्वया । अंतरस्थानी ॥२४५॥

नवसहस्रयोजन । प्रदेश सविस्तीर्ण ।
होऊ नीळवर्ण । कांतिमयभूमिका असे ॥२४६॥

जे म्हणवी रम्यकवर्ष आपण । पूर्वादि पश्चमलवण ।
समुद्रपर्यंत विशाळ होउन । असे त्याचे ठाई ॥२४७॥

सप्तकुळशैल । तयापासाव बहुमेळ ।
जनीत होउनी विशाळ । नदी असती ॥२४८॥

तया वर्षांतु मुख्य । नीळछाया जनलोक ।
युक्ष म्हणिजे कल्पवृक्ष । अन्नअहरें ॥२४९॥

द्वादशसहस्रवर्षें । आयुष्यवंत होऊनि विशेषें ।
महादेवनाम विश्वासें । पूजूनि आनंदे असती ॥२५०॥

आणीक ते श्वेतश्रृंग । म्हणिजें सिमानग ।
उभय मध्यभाग । प्रदेशस्थानीं ॥२५१॥

नवसहस्रयोजन । प्रमाण विस्तीर्ण
होऊनि धवळवर्ण । भूमिका असें ॥२५२॥

तें हिरण्यकवर्ष पूर्वादि । पश्चिमलवणाब्धी ।
उभय अवधी । होऊनि असें ॥२५३॥

तयाचे ठाई सप्त । कुळपर्वत ।
तयापासाव जनित । होऊनि नदी असती ॥२५४॥

तया वर्षांतु लोक । चंद्रप्रभामय प्रकाशक ।
लकुळ म्हणिजे कल्पवृक्ष । फळभक्षणें ॥२५५॥

द्वादशसहस्रसंवत्सर । आयुष्यवंत होऊनिया महेश्वर ।
नाम लिंग पुजोनि निरंतर । सुखरूपें असती ॥२५६॥

आणि श्रृंगगिरी आदी । उत्तरलवणाब्धी ।
पर्यंत मधी । नवसहस्रयोजनें ॥२५७॥

स्थूळपालाशतरू । कुसुमवर्णाची भूमी सविस्तारु ।
ते कुरुवर्ष अर्धचंद्राकारु । असे त्याचे ठाई ॥२५८॥

सप्तकुळपर्वत । तयापासाव जनित
होऊनियां महापुण्यवंत । नदी असती ॥२५९॥

तया पार्षाचे ठाई सकळिक । पालाशकुसुमवर्णाचे लोक ।
छक म्हणिजे कल्पवृक्ष । फळआहारें ॥२६०॥

तीससहस्रवर्षं । आयुष्यवंत होऊनि पूर्वक ।
रुद्रनाम लिंगपूजक । होऊनि सुखे असती ॥२६१॥

तेथील स्त्रिया समस्तीं । जुळे कन्यापुत्र प्रसवती ।
तीचि दंपत्ये होउनि असतीं । निषेधरहित ॥२६२॥

आणीक तया कुरुर्षांतु समुद्र । समीपाचि चाळीससहस्र ।
योजने प्रमाण उत्तर । दिशेचे वायव्यकोणी ॥२६३॥

सिद्धमुनी मुख्य समस्त । वर्गांसी अस्पद होउनि रक्त ।
कमळवर्णाची शोभित । भूमिका असें ॥२६४॥

चंद्राकार भद्राकार । म्हणिजे द्विप्रकार ।
वसत असे साचार । त्याचे ठाई ॥२६५॥

अनुक्रमें मयंक । द्विसिनिव्जकांतीचे लोक ।
जंबू म्हणिजे कल्पवृक्ष । फळआहारें ॥२६६॥

त्रयोदशसहस्रसंवत्सर । आयुष्यवंत होउनि रुद्र ।
नाम लिंगपूजनी निरंतर । सुखें असती ॥२६७॥

अणीक तया मेरूचे नीट । दक्षिणदिशेसी निशाद हेमकूट ।
म्हणिजे सिमागिरीतळवट । अंतरस्थानीं ॥२६८॥

नवसहस्रयोजन । प्रादेश मात्र विस्तीर्ण ।
रजतममयवर्ण । भूमिका असें ॥२६९॥

ते हरिवर्ष पूर्वादि । पश्चमलवणाब्धी ।
पर्यंत अवधी । होऊनि असे ॥२७०॥

तयातु सप्तकुळपर्वत । तयापासाव जनित ।
होऊनिया महंत । दिव्य नदी असती ॥२७१॥

तया वर्षांतु रजतप्रकाशक । प्रभामय जनलोक ।
इक्षु म्हणिजे कल्पवृक्ष । फळरसस्वादें ॥२७२॥

द्वादशसहस्रवर्षें पूर्ण । आयुष्यवंत होऊनि ईशान ।
नाम लिंग पूजोनि धन । सुखें असती ॥२७३॥

आणीक तया हेमकूटशैल । हिमपर्वताचे अंतराळ ।
नवसहस्रयोजने स्थळ । सुवर्णभूमिका असें ॥२७४॥

ते कैंपुरुष वर्ण म्हणवी आपण । पूर्वादी पश्चिमलवण ।
समुद्रपर्यंत पसरोन । असे विशाळ ॥२७५॥

तयांतु सप्तकुळगिरी । ते संमोहाभीतरीं ।
जनीत होऊनि परी । महानदी असती ॥२७६॥

तया वर्षांतु सकळ । हेमवर्ण जनकुळ ।
कल्पवृक्ष म्हणिजे फळ । अहारेसी ॥२७७॥

दशसहस्रवर्षें मिती । आयुष्यवंत होउनि भक्ती ।
ईशान्यपूजने अती । सुखे असती ॥२७८॥

अणीक या प्रकारे भिन्न । अष्टवर्षभीतरी जन ।
असती त्यालागून । कृतायुगानुक्रमें ॥२७९॥

ज्ञानआयूतेजबळ । संपदाऐश्वर्यादि सकळ ।
समृद्धी सदासर्वकाळ । समानसमंधें ॥२८०॥

अभिवृद्धि क्षयरहित । येकचि प्रकारे आदिअंत ।
सुखस्वरूप अखंडित । विचरत असती ॥२८१॥

आणीक तो हिमवत्पर्वत । तेथूनि दक्षिणसमुद्रपर्यंत ।
नवसहस्रयोजने प्रशस्त । नानावर्णभूमी असे ॥२८२॥

तया नाम भरत । वर्ष म्हणवी परिख्यात ।
ते धेनुवाकारवंत । होऊनि असें ॥२८३॥

ते भरतखंड येक । तेचि बहुखंड पृथक ।
होऊनि ते असे कौतुक । कैसे म्हणीतले तरी ॥२८४॥

प्रथम हरिश्चंद्र । नळ पुरु कृछ्रपुरुव सगर ।
कार्तवीर्य म्हणिजे वर । षट्‌चक्रवर्ती ॥२८५॥

गय अंबरीष । पुरुहूत पुरुहुताश ।
म्हणऊनि भरतेश । भरतसहोत्र ॥२८६॥

नाम दिलीप रघु म्हणोनि । रतिदेव ययाती म्हणऊनि ।
मांधाता भगिरथ म्हणोनी । इति षोडशमहाराजें ॥२८७॥

आपुले आणि आपुलिये । स्थितिकाळसमय ।
सकळ संपन्नमय । अधिकारत्वें ॥२८८॥

दासी भृत्य सुत बंधु । वस्त्र वाहन धन धान्य विषद्ु ।
म्हणिजे अष्टमहामद्ु । ऐश्वर्ययुक्त होऊनि ॥२८९॥

सति स्नान भोजन । वस्त्र गंध पुष्प तांबूलासन ।
म्हणिजे अष्टभोगसंपन्न । होऊनियां ॥२९०॥

तटाक धन विक्षेप ब्रह्मस्थान । सुरालय वन ।
सत्कृतिपुत्र म्हणिजे सप्तसंतान । सहीत होऊनी ॥२९१॥

साम दंड भेद । दान म्हणिजे विविध ।
इति चतुर्विध । उपाययुक्त होउनी ॥२९२॥

संधी विग्रह यान आसन । विविधाश्रय म्हणऊन ।
इति षड्‌गुणसंपन्न । होऊनियां ॥२९३॥

भेदतंत्र परिक्षातंत्र । विश्वासतंत्र वचनतंत्र ।
मित्रकार्यतंत्र म्हणिजे पंचतंत्र । प्रविण होऊनी ॥२९४॥

प्रभाशक्ती । उत्साहशक्ती ।
म्हणिजे शक्ती । त्रयासहीत होउनी ॥२९५॥

क्षयस्थान । वृद्धि म्हणिजे भिन्न ।
त्रयांसि कारण । विशिष्ट होऊनी ॥२९६॥

गज अश्व रथ । पदांती म्हणिजे चतुर्थ ।
अंगबळ सामग्रीनें अलंकृत । होऊनियां ॥२९७॥

विद्वांसक विद्वज्जन भाट गायक । परिहस्यक इतिहासन पुराणीक ।
म्हणिजे सभासत्तांगपूर्वक । परिवेष्टीत बैसोन ॥२९८॥

ते सभे मध्यस्थानीं दिव्यसिंहासन । तया उभयपार्श्वी घन ।
दाट विस्तीर्ण । सभा बैसोनी ॥२९९॥

मंत्री मान्य मान्य महंत । संधिविग्रही सामंत ।
आदि समस्त । वियोगाकारासहित पैं ॥३००॥

आणीक तेथे युक्ति प्रयुक्ती । मध्यमप्रतिष्ठा सप्रतिष्ठा गायत्री ।
उष्णिक् अनुष्टुक् वृहती । पंक्ती त्रिष्टुपू ॥३०१॥

जगती अतिजगती । शुक्करी अतिअध्यष्टी धृती ।
अतिधृति कृती प्राकृती । अतिकृति हे ॥३०२॥

विकृती संस्कृती । अभिकृती उनृती ।
म्हणिजे षड्विंशती । छंदरव जाणोनियां ॥३०३॥

समासोक्ति पर्यायोक्ति । अक्षपा व्यजस्तुती ।
उपमेयोपमा अनन्वय अती । संयोक्ति परिकार ॥३०४॥

अप्रस्तुतप्रसंशय रूपक । परिणाम संदेह भ्रांतिमत्त उल्लेख ।
अपह्नव उपेक्ष । मृति साम्य योग्यता ॥३०५॥

दीपक प्रतिवस्तोपम । दृष्टांत सहोक्ति व्यतिरेक निदर्शन ।
क्लेशा उपमा वीन । उक्ति म्हणोनियां ॥३०६॥

अर्थांतरन्यास विरोध । विष्टानन विशेपोक्ति विविध ।
विषम उद्येग अधिक्य । अन्य कारण ॥३०७॥

माळा येकावळी व्याघार । आणि सूक्ष्म उत्तर ।
मालादीक वायूलिंग अनुमान सार । यथासंख्या ॥३०८॥

अर्थाप्रति पर्याय प्रवृत्तीय । परिसंख्य विकल्प समुच्चय ।
समाधि प्रत्यानीक प्रत्यय । विशेष मळिन ॥३०९॥

सामान्य सत्संगती सद्‌गुणव्याजोक्ती । वयोक्ती स्वभावोक्ती ।
भाविक उदात्त म्हणिजे पांसष्टि इती । अळंकारयुक्त होऊनी ॥३१०॥

पुरगिरी रुतनंदन । सोमोदय सूर्योदय म्हणोन ।
समुद्रजळक्रेळी मधुपान । गोष्टि संभोग विप्रलंब ॥३११॥

विवाह पुत्रोत्साह म्हणोन । मंत्री नृपती दूत मृगायन ।
म्हणिजे अष्टदशवर्ण । सहीत होवोनी ॥३१२॥

श्लेश प्रसाद संमती । माधुर्या सकुमार अर्था व्यक्ती ।
उदारत्व वोज सुकांति समाधी म्हणिजे इति । दशप्राण धरुनी ॥२१३॥

गौडपर्याय वैदर्भपर्याय । आणि पांचाळपर्याय ।
म्हणिजे इति पर्यायत्रय । सहीत होउनी ॥२१४॥

रस भय चित्र । आणि चमत्कार ।
इति चतुर्थप्रकार । जाणोनियां ॥२१५॥

संधिनाम समान तदित अख्यात ।
धातु आप प्राण अव्यक्त म्हणिजे अष्टपरियुक्त ।
प्रपंचसमान व्याकरणोक्त । पदांसहित ॥२१६॥

अनर्थक श्रुतिकरोरव्याहतार्थ । अलक्षण संकेत प्रवलुप्तार्थ ।
असंमया अपक्रम म्हणिजे विहित । अष्टपददोष न तुळतां ॥२१७॥

खंडित व्यास्त समंध । असंमत्तवट अपक्रमेद ।
म्हणिजे विहित अष्टपद । दोष न तुळतां ॥२१८॥

शब्दपुनरोक्त अर्थपुनरोक्त । अर्थशून्य विरोधार्थ च्युतकर्म वेदरहित ।
विसंधि नय्यार्थ म्हणिजे यथार्थ । आशब्ददोष नातुळतां ॥२१९॥

गद्य पद्य । कंज म्हणिजे त्रिविध ।
वाक्यप्रबंध । लक्षणिकें ॥२२०॥

संस्कृत प्राकृत अपभ्रंश । पिशाचकादि भाष ।
भेदे परिविशेष । कविश्वरयुक्त ॥२२१॥

आणि तानमान दाऊन । विश्राममंदिर जाणोन ।
पदव्यक्त करून । श्रृतयाचें ॥२२२॥

श्रवणी आनंद । उपजे तैसें मृध ।
मधुरवर्णोच्चारण शुद्ध । कारणी नेमकीसहित ॥२२३॥

अणीक न्यायवैशेषिक । खड्गचिंतामणी आदि मुख्य ।
शास्त्रकोविद वादक । संमेळेसहित ॥२२४॥

आगी मधुरसवाणी । सर्व नवीनच वचनी ।
रचनेनें श्रोतयाचे श्रवणीं । रसपण होऊनिया ॥२२५॥

वाग्विभवादिक । दाखवी विशेख ।
अति अलौलिक । संमेळेसीं ॥२२६॥

अंति करिती हंस्य । शोक क्रोध उत्साह भय ।
जुगुप्सा विस्मय समय । म्हणिजे क्रमें श्रृंगारादिक ॥२२७॥

नवरसासी वीजभूत । जाला स्थायभव तो संतत ।
दक्षिणादिक नायक हृदयस्थ । स्थायी होउनी असे ॥२२८॥

आणीक स्वक्रियादि मुख्य । नायकी म्हणिजे विशेख ।
अवलंबन विभागाने पूर्वक । अकारुनी ॥२२९॥

आणि मंदानिळादी उदीपन । विभवानें प्रकटोन ।
वरीवरी जन । शरीरगत होउनी ॥२३०॥

ते ते रसकार्य होय । त्या कारण अतिशय ।
रसनांतरमय । भावी जालें ॥२३१॥

स्तंभ भेद रोमांच स्वरसेद । कंपन विवरण अश्रु प्रळयादि विपद ।
म्हणिजेति अष्टविध । सात्विकानें ॥२३२॥

दरहसन कटाक्ष ईक्षणीक । भ्रुवियपनादि विशेख ।
ज्येष्ठली अध म्हणिजे मुख्य । अनुभवियासहित ॥२३३॥

मति लज्जा अविशंका मरण । चपळता हर्ष निर्वेक दैन्य ।
स्मृति मोह अलस्य गर्व स्मरण । मंद जडत्व ॥२३४॥

ज्ञानी शुक्ति निद्रा धृति तर्क उन्मद । बोध अमय भय विषाद ।
अशक्य अमर्षध । चिंता आया ॥२३५॥

अहिंसा उग्र अपस्मार । म्हणिजे इति त्रिविंशति संचार ।
भावानें विशेषात्कार । प्रवर्ध्दुनी ॥२३६॥

आणीक श्रृंगार हास्य । करुणा रौद्र वीर भयानक विभत्स ।
अद्भुत शांत म्हणिजे नवरस । अवस्थानें ॥२३७॥

वर्ततसे धृतीमधीं । म्हणोनी लौकिकादि ।
नवरसविधी । व्यापारपरानें ॥२३८॥

आणीक परमार्थांचियें । ठाई जाले तरी रति अद्वय ।
तेचि तया तया उपाधीविषय । भेदेकरुनी ॥२३९॥

ते ते स्थायभवांतर । संज्ञा पावोनि ते ते विभवानु साचार ।
अनुभव सात्विक संचार । भावाचेनि ॥२४०॥

ते ते श्रृंगारादि समस्त । रससंज्ञा पावत ।
असती तो कैसा वृत्तांत । म्हणीतले तरी ॥२४१॥

रति येक कांतादि । विषयरागमय बुद्धि ।
होउनिया श्रृंगारविधी । रससंज्ञा ॥२४२॥

पुत्रादिकांचियां विषयें । वांछानाम ध्याय ।
मित्रादीक विषई स्नेह । नामधारक ॥३४३॥

बंधुविषई प्रेम हव्यय । नृपतीगुरुदेवतात्रय ।
विषई भक्ति कंचमय । आत्मविषई ॥३४४॥

परंप्रीतिनामधारणा । अप्राप्तवस्तुविषई इच्छाभिधाना ।
नाम्ना इति संज्ञा । पार्वतो कीं ॥३४५॥

आणि हंसितव्य शौच्यदेश । प्रतिभटु भीषण जिगुप्स ।
आश्चर्य सौम्य स्पद म्हणिजे विशेष । अष्टावलंबनविभवाने ॥३४६॥

अनुक्रमे हस्य । करुणा रौद्र वीर भयानक जिगुप्स ।
विस्मय शांत म्हणिजें अष्टकरस । होय म्हणोनी ॥३४७॥

तया लौकीक नवरसस्थिति पश्चित । धीरोदत्त धीरललित ।
धीरशांत म्हणिजे चतुर्थ । महानायकासहीत ॥३४८॥

अनुकूळ दक्ष । षठ दुष्ट म्हणिजे पृथक ।
चतुर्विध मुख्य । शृंगारनायकेंसीं ॥३४९॥

शश वृषभ हय । म्हणिजे त्रय ।
प्रमाणमय । पुरुषासहित ॥३५०॥

मंदवेग मध्यवेग । आणि चंडवेग ।
म्हणिजे वेग । त्रय प्रणितानें ॥३५१॥

आणीक विट विदूषक । विटवर्धन नागरीक ।
म्हणिजे चतुष्क । भोग संख्ययासहित ॥३५२॥

आणीक स्वक्रिय । आणि परक्रिय ।
म्हणिजे त्रय । विविध नायकीणीसी ॥३५३॥

जेष्ठ कनिष्टा । म्हणिजे द्विविध वरचंटा ।
गूणविशिष्टा । वनितासहित ॥३५४॥

अष्ट नव द्वादश । विंशती तीस ।
चाळीस पंनास । वर्षानुक्रमें ॥३५५॥

अंकुरयौवन कोमळयौवन । पूर्वयौवन भरितयौवन ।
उन्नतयौवन मध्ययौवन । उतारयौवनानें ॥३५६॥

गौरी कन्या बाळ मुग्धा विगधा । प्रगल्भा इच्छागता म्हणिजे विविधा ।
परिणाम पावोनी सप्तविधा । यौवनविशिष्ट रौग्यासहित ॥३५७॥

शिस्थीत्य मध्य । घना म्हणिजे विशद ।
अकारयुक्त शुद्ध । सिमंतिनीसहित ॥३५८॥

उत्तम मध्यम जघन्य । म्हणिजे त्रिविध भिन्न ।
कोपप्रसादलक्षण । लक्षिता स्त्रियासहित ॥३५९॥

धीर अति धीर । म्हणिजे द्विप्रकार ।
प्रोदागवीर । संमेळेसहित ॥३६०॥

कन्या उढेय । म्हणिजे द्वय ।
प्रकाराच्या परिक्रिय । भेद नारीसहित ॥३६१॥

स्वाधीनपतीक खंडिका । विप्रलंब अभिसारिका ॥
वासकसविका । ते गर्भरीतारीक ॥३६२॥

अभिसंधिका । सुमुक्ताय म्हणिजे अभ्रका ।
प्रकार अवस्थात्मका । कामिनीसहित ॥३६३॥

मोट्टाइता । विंबौक ललिता ।
लीलाकिलि किंचिता । विळवी चित्र ॥३६४॥

विलासा विह्रता । विभ्रमा कूटमता ।
म्हणिजे दशकेळिभाववनिता । विलासरूपिणीसहित ॥३६५॥

हस्तिनी शंखिनी । चित्तिनी पद्मिनी ।
म्हणिजे चौघीजणी । जाति स्त्रियासहित ॥३६६॥

हरिणी अश्वी विभुका । म्हणिजे मुख्य ।
प्रमाण प्रेमिका । प्रमादासहित ॥३६७॥

मंदवेगी । आणि मध्यवेगी ।
चंडवेगी । म्हणिजे रतिभेद कांतासहित ॥३६८॥

देवसत्वा यक्षसत्वा । गंधर्वसत्वा नरसत्वा ।
नागसत्वा कागसत्वा । वानरसत्वा ॥३६९॥

मुनिसत्व पिशाचसत्व । राक्षससत्व विनरसत्व ।
खरसत्व म्हणिजे द्वादशसत्व । सहित संमोहा ॥३७०॥

अगीक सारक चतुरका । साहासंचार द्युतिका ।
म्हणिजे चतुष्का । परि सखियांसहित ॥३७१॥

अभिमानप्रीति । सदृश्यप्रीति विषयप्रीति ।
म्हणिजे चतुर्विध प्रीति । तात्प्रिययानें ॥३७२॥

लज्यामोह विभावमोह । करुणामोह निजमोह ।
म्हणिजे चतुर्विधमोह । विशिष्टस्त्रियांसहित ॥३७३॥

कूर्ममोह मछमोह । मृगमोह म्हणिजे मोहत्रय ।
उत्तम मध्यम अधम मोह । मय स्त्रियांसहित ॥३७४॥

आणीक वोष्ठतळ । घोटी जानुयुगुळ ।
जघन नाभी उरस्थळ । कुचक्ष कंठ ॥३७५॥

कंदर्प अधर नेत्र भाळ । मस्तक म्हणिजे पंचदशस्थळ ।
शुक्लपक्षादि योग सकळ । क्रमविचारें ॥३७६॥

पुष्कर विविधक दुष्टक पीडण । पक्षारोहण लतावेष्टण ।
तिळतंडुळाक्ष मिळण । क्षीरवीर ॥३७७॥

ऊरूप गुडघे जघन । मूढपस्तन ।
श्लेष्म ललाटिक म्हणोन । म्हणिजे द्वादशक ॥३७८॥

निमित्तिका सद्घटिका । स्फुरतिका भ्रांतिका ।
तिर्यका अतिउष्टिका । उत्तर सपुष्टिक ॥३७९॥

जिव्हामिळण जिव्हका अधिका । जिव्हायोग म्हणिजे द्वादशिका ।
चुंबनादिका । संख्या संभ्रमानें ॥३८०॥

रागोपगूढक । प्रवाळमाणिक ।
माळा खंडा भ्रमिक । मंडळाकृती ॥३८१॥

क्रोधचर्चित । वराहचर्चित ।
म्हणिजे अष्टविध दंतक्षत । लाक्षणिकानें ॥३८२॥

पंचनखयोगादिक । द्वंद्वनखयोगादिक ।
अर्धचंद्रक । मंडळाकार ॥३८३॥

मयोरपंथ शशिपूलित । उत्पळ म्हणिजे सप्त ।
विविध नखरोमहत । विहितानें ॥३८४॥

मदन अंदोळण । सदन छत्र पूर्ण ।
चंद्रादि नाडी वर्मज्ञ । संमेळानें ॥३८५॥

शैय्यातोरकरण । विकृतोरुकरण तिर्यकरण ।
स्थितिकरण उदानकादि अनेककरण । प्रणिताने ॥३८६॥

परिछिन्नसंभोग । प्रकाशसंभोग ।
म्हणिजे द्विविध संभोग । रतिकळाकुशळानें ॥३८७॥

आदि मध्य अवसान । म्हणिजे रतिमंत्र अनुसंधान ।
चातूर्यगुण । लक्षणानें ॥३८८॥

पूर्वानुराग मनाख्य । प्रवास करुणात्मक ।
म्हणवी योगचतुष्क । विशिष्टानें ॥३८९॥

परिछिन्न । प्रकाशप्रलंबन ।
म्हणिजे त्रिभिन्न । विदग्धानें ॥३९०॥

कार्य जागरण । आणि संतापन ।
म्हणिजे अवस्थात्रय भिन्न । परिक्षाकारासहित ॥३९१॥

मन्मदन मदन मोहन । संतापन वशीकरण ।
म्हणिजे यंत्र मंत्र वाण । प्रताप प्रवेशानें ॥३९२॥

असौक्यैक अरविंद । चतु मोगर नैद्य ।
म्हणिजे पंचविध । कुसुमास्त्रका दावें ॥३९३॥

अणीक तया पंचक । वाणासि लक्षण स्थान जाले मस्तक ।
मुख वक्ष पृष्टि हृदय म्हणिजे पंचक । अवपमानें ॥३९४॥

अनुक्रमें येक । येकासि मुख्य ।
द्वि द्वि होऊनि पृथक । उपजलें ॥३९५॥

अभिलाश चिंता स्मृती । विभूगुणानुति ।
संतापन अति । क्रीडाद्वेषें ॥३९६॥

विलास मौन्य । मूर्छा मरण ।
म्हणिजे दशअवस्था भिन्न । विचार परीनें ॥३९७॥

यानंतरे अकार । उकार मकार ।
म्हणिजे त्रिप्रकार । बीजाक्षरें ॥३९८॥

अकार तों रजोगुणात्मक ब्रह्मा आपणु । उकार सत्वगुणात्मक विष्णु ।
मकारात्मक तमोगुण । रुद्रुद्र ॥३९९॥

अणीक अकार तो आपण । वामनासापुटस्थान ।
त्याचे ठाईं आपण । इडा म्हणिजे चंद्र ॥४००॥

उकार तो दक्षिण । नासापुटस्थान ।
त्याचे ठाई आपण । पिंगळा म्हणिजे ॥४०१॥

मकार तो ईश्वर । वर्गाचे अंतर ।
स्थानांतु सुंदर । सुषुप्ति म्हणिजे अग्नी ॥४०२॥

अणीक अक्षरत्रय येक । कूटसंमेळे मुख्य ।
सकळ देवतामंत्रात्मक । ओंकार जाला ॥४०३॥

तया ओंकारनादापासूनी । स्वर निर्दोष निर्णयध्वनी ।
वासध्वनि म्हणिजे दशनादध्वनी । त्याचे ठाई ॥४०४॥

मेघध्वनि भेरिध्वनि । मृदंगध्वनि मंदध्वनी ।
म्हणिजे दशनादध्वनी । म्हणोनियां ॥४०५॥

प्रथमस्वर तो नाभि उर कंठ म्हणिजे । त्रिविध स्थानांतरीं उपजें ।
मध्य जीवनिष्ठा विराजें । मरुतोद्गतीनें ॥४०६॥

अभिव्यक्त होऊनी पृथक हृदय । कंठ शिरस म्हणिजे त्रय ।
निषेधस्थानाचियें । ठाई अनुक्रमें ॥४०७॥

मधुर मंद्र तारतार । म्हणिजे त्रिविध प्रकार ।
भेदात्मक होऊनि विस्तार । पावती जाणावें ॥४०८॥

तो स्वरचि विविधाकार । षडजादि सप्तस्वर ।
जाला म्हणोनि सांचार । परिभावावे ॥४०९॥

आणीक तया सप्तस्वरासी उद्भव । अनुक्रमे परशिव ।
ईश्वर सद्योजात वामदेव । अघोरादिक ॥४१०॥

तत्पुरुष ईशान । म्हणिजे सप्तवदन ।
पासूनि जनन । रागग्राम ॥४११॥

अनुक्रमे षट्ज त्रिधा । गांधार मध्यम पंचम दैवत निषेधा ।
म्हणिजे सप्तविधा । स्वर जाले ॥४१२॥

अणीक कंठ शिरस नासिक हृदय । मूख पूर्वांग म्हणिजे हिय ।
तया षट्जादि पर्याय । स्वरजननस्थान ॥४१३॥

उदय मध्याह्न । आणी अपराह्न ।
अस्तमान । पूर्वरात्रीं ॥४१४॥

मध्यरात्री निशावसान । म्हणिजे अनुक्रमे भिन्न ।
तया षट्जादिस्वरजनन । उत्पत्तिकाळ ॥४१५॥

मयुरध्वनी वृषभध्वनी । अजाध्वनी सिंहध्वनी ।
कोकिळाध्वनी । जात्याश्वधन्वादि ॥४१६॥

आणि मृदंगध्वनी । म्हणिजे अनुक्रमेकरुनी ।
तया षट्जादिस्वरध्वनीं । भेदादिक ॥४१७॥

अरद्रा पूर्वाषाढा रेवती । विशाखा मूळ अनुराधा मघा इति ।
परिक्रमें षट्जादि समस्ती । स्वरजन्मनक्षत्रें ॥४१८॥

अमावास्या त्रयोदशी पंचमी । अष्टमी सप्तमी बीज नवमी ।
म्हणिजे षट्जादिस्वरजन्म क्रमीं । परिक्रमें ॥४१९॥

अंगिरस भृगू कश्यप वसिष्ठ । नारद अत्री कपिल म्हणिजे श्रेष्ठ ।
अनुक्रमें षट्जादिकूट । स्वरवर्गाचे ऋषी ॥४२०॥

ब्राह्मी माहेश्वरी कौमारी । वैष्णवी वाराही माहेंद्री ।
चामुंडा म्हणिजे परी । क्रमें षट्जादिस्वरशक्ती ॥४२१॥

अरुणाजा कपिल नीलोत्पल । कृष्ण श्वेत बहुवर्णमेळ ।
म्हणिजें षट्जादि अनुक्रमें सकळ । स्वराचे वर्ण ॥४२२॥

षट्ज मध्यम पंचम म्हणिजे इति । तृतीय ब्राह्मणजाती ।
वृषभ द्वैत द्वैती । क्षेत्रियजाती ॥४२३॥

गांधार निशाद उभय । वैश्यजाती निःसंशय ।
भिन्नांतर काकुळी म्हणिजे द्वय । शूद्रवंशी ॥४२४॥

आणि शृंगार हास्य । करुणा रौद्र वीर भयानक विभत्स ।
म्हणिजे अनुक्रमे रस । षट्जादिस्वराचें ॥४२५॥

आयुवृद्धि सौभाग्यशोभन । सुवर्णलाभ पापक्षीण ।
सकळऐश्वर्यसंपन्न । कार्यसिद्धी ॥४२६॥

म्हणिजे परिक्रमाचेनि । षट्जआदीकरुनी ।
सप्तस्वराचे फळ म्हणोनी । निर्धारावें ॥४२७॥

यानंतरे गव्हरी । निष्कळी गूढ सकळ म्हणिजे च्याऱ्हीं ।
श्रुतीसीं षड्स्वरीं । जन्म जाला ॥४२८॥

मधुराग यावळी येकाक्षरी । म्हणिजे तृतीय परी ।
श्रुतीसी वृषभस्वरीं । उत्पत्ती जाली ॥४२९॥

भृंगिजाती परांगती । म्हणिजे उभयश्रुती ।
गांधारस्वरेसी उत्पत्ती । जाली असें ॥४३०॥

रंजका पूर्णा अळंकारणी । वंश म्हणिजे चतुर्थध्वनी ।
श्रुतीसी मध्यमस्वरापासुनी । जनन जालें ॥४३१॥

रेणुका ललिता वास्तुवास । तया स्वरवास ।
म्हणिजे चतुर्थश्रुतीस । पंचमस्वरीं जन्म जाला ॥४३२॥

भासांगी वर्तकी । सपूर्णा म्हणिजे पृथकी ।
त्रयश्रुती विशेखीं । धैवतस्वरे उदित ॥४३३॥

प्रसन्न सर्वव्यापी । म्हणिजे द्वयश्रुतीं साक्षेपीं ।
निषेधस्वरूपीं । जनित जालियां ॥४३४॥

सप्तस्वरापासूनि इति । द्विविंशति श्रुती ।
जालिया उत्पत्ती । म्हणोनि जाणावें ॥४३५॥

अणीक स्फूर्ति प्रमिता । दीर्घा ललिताच्छागदगुम्रिता ।
उल्लासिता कंपिता । सूक्ष्मिता दीर्घितादि ॥४३६॥

दीर्घलोलिता लिलोच्चरिता । लीलोदीर्घ दीर्घललिता ।
प्रस्तुताकादिता । ऊर्जित क्षिप्त ॥४३७॥

हत अक्षिप्त संगूल । शित कोमळ ।
म्हणिजे द्विविंशति संमेळ । श्रुतीगमक ॥४३८॥

कंपित स्फुरित । लीना त्रिभि सप्तध अंदोळत ।
अहंता म्हणिजे सप्त । देशीगमक जाणावें ॥४३९॥

इति सांगीतले स्वरश्रुतिगमक । तयापासाव जनित विशेख ।
जाळे गीतादिक । ते जाले तरी ॥४४०॥

स्वर सुस्वर सुपांग मधुर । अक्षर अळंकार ।
म्हणिजे प्रकार । लक्षणवंत होऊनि असे ॥४४१॥

तये रागोत्पत्तीसी षड्जग्राम । मध्यमग्राम ।
गंधारग्राम । म्हणिजे ग्रामत्रय असे ॥४४२॥

तयांतु गंधारग्राम ते दैवत । लोकाभीतरी असे वर्तत ।
उरले उभयग्राम तें । मर्यलोंकी वर्तती ॥४४३॥

त्याचे ठाई धैवता निशाधिनी । सजज केसरी म्हणोनी ।
षड्जमापासाव उत्पत्ती । जाली तयांसीं ॥४४४॥

म्हणिजे इति । पंचरागाप्रति ।
षड्जदिव्यमापासाव उत्पत्ती । जाली तयासीं ॥४४५॥

गांधारी रक्षगांधारी मध्यमगांधारी ।
दिव्यवती मध्यमदिव्यवती पंचगांधारी ।
पंचम इनंद प्रतिकर्म व्यभिचारी । आणि कौशिक ॥४४६॥

म्हणिजे इति दशम । रागवर्गासी मध्यम ।
ग्रामःपासाव जन्म । जाला जाणिजे ॥४४७॥

इतिग्रामद्वयापासूनि पंचदशरागालागूनी ।
जन्म जाला म्हणोनी । अंगिकारावें ॥४४८॥

अणीक शुद्ध भिन्न । गौड अष्टसाधारण ।
षड्जस्वर म्हणिजे जाण । षड्जजाती ॥४४९॥

त्याचे ठाई षड्जग्राम । मध्यमग्राम ।
गौडपंचम । कौशिका साधारण ॥४५०॥

मालाव कौशिक । म्हणिजे इति षट्कर्म ।
शुद्धजातीपासाव मुख्य । जाले राग ॥४५१॥

भिन्न षड्ज भिन्न तान । कौशिक मध्यम भिन्न ।
म्हणिजे चतुष्टराग भिन्न । जातीपासाव जाली ॥४५२॥

गौडपंचम । गौडकौशिक गौडमध्यम ।
म्हणिजे त्रयरागासी जन्म । गौडजातीपासाव जाला ॥४५३॥

षड्ज अष्टक राग मालवी । पंचमी माळवी ।
कौशीक संवी । रहिंदोळ ॥४५४॥

म्हणिजे अष्टराग मिती । अष्टसाधारणजाती ।
पासाव उत्पत्ती । जाले निरुतें ॥४५५॥

वर्तकी ककुंभक । षड्कौशिक ।
भ्रमाळ पंचकभ्रमाळक । पंचमगांधार ॥४५६॥

रूपसाधारण । म्हणिजे सप्तसाधारण ।
जातीपासाव जनन । जाले सत्परा ॥४५७॥

कौटिक गुप्त उपांग । म्हणिजे अष्टवर्ग ।
जनित जाले राग । षडस्वरजातीपासाव ॥४५८॥

ठक्य सैंधवी म्हणोनि पंचमा षडाव ।
म्हणोनि देवगुप्त म्हणोनि पंचमा षडाव ।
म्हणोनी गुप्त म्हणोनि देव । गांधारगुप्त ॥४५९॥

षट्जातीपासाव । छत्तीसरागासी उद्भव ।
जाला सर्वथैव । म्हणोनी जाणावें ॥४६०॥

अणीक रागांग भासांग । क्रियांग उपांग ।
म्हणिजे चतुष्टअंग । त्याचे ठाई ॥४६१॥

मधुमाधवी शंकराभरण राग । हिंदोळा वंगाळा गुडकी श्रीराग सारंग ।
अभ्रपंचमादि विघटराग । गुर्जरी सोनराग ॥४६२॥

धन्वीसी देशि देशाक्षी म्हणोनि । माळव श्रीवराळी म्हणऊनी ।
नागवराळी नागदिवी म्हणोनी । कर्नाटक बंगाला ॥४६३॥

म्हणिजे विंशति । रागसंमोहमिती ।
रागांगापासाव उत्पत्ती । जाले राग ॥४६४॥

कौशिका वेळावळा शुद्धावळी । कौमुदी नाद सोहरी ललिता अंदोळी ।
गौडी सैंधवी नागध्वनी अहिरी त्रावळी । शुद्धअहिरी ॥४६५॥

काजोजी श्रीकंठ बृहस्पती म्हणोनि । दक्षिणादित्या दोडाक्री म्हणउनी ।
गाधाष्ट्र सैधवी पौराणी । भिन्नपुराणें ॥४६६॥

नाम्नाळी मधुकरी म्हणोनि । कालिंदी पुलिंदी तरंगिणी ।
मेघरंजी कुरंजी शुद्धवाहिनी । प्रथममंजिरी ॥४६७॥

नाट्यनारायणी । फळमंजिरी सायासोदरी म्हणोनी ।
म्हणिजे चतुर्विंशति भागांशापासूनी । जाले राग ॥४६८॥

नीळोत्पळ नियकाछधि जोहरी उत्पलिनी । किन्नरी की गीतराई तरंगिणी ।
गांधिनी भाळांग भैरवी म्हणोनी । गंधकामोदी ॥४६९॥

सक्सी रागिणी । नादोत्तरी म्हणोनी ।
वसंती म्हणऊनी । गंधकौमोदी ॥४७०॥

भैरवी सिंहानळी । कामोदी हेवाळी ।
नाट्यतरी वसंत बंगाली । उपांगादी ॥४७१॥

म्हणिजे विंशती । रागसंमोहमिति ।
जाले उत्पत्ती । क्रियांगापासाव ॥४७२॥

सिंधुरवराली कनडवराळी । द्राविंद्रवराळी प्रथमवराळी ।
प्रथमवरा म्हणिजे उपांगवराळी । चतुष्टय ॥४७३॥

महाराष्ट्रगुज्जरी । द्राविडगुज्जरी दक्षिणगुज्जरी ।
सौराष्ट्रगुज्जरी । म्हणिजे चतुष्टप्रकारानें ॥४७४॥

कर्नाटकगौळ देशगौळ । पुरुकगौळ गालवगौळ ।
छायागौळ सौराष्ट्रगौळ द्रविडगौळ । म्हणिजे सप्तउपांगगौळ ॥४७५॥

छायातोडी । तुरुश्रुतोडी ।
म्हणिजे उभयतोडी । उपांगादिक ॥४७६॥

मळहरी म्हणोनी । भैरवी म्हणवोनी ।
म्हणिजे या दोन्हीं नाट्यालागुनी । उपांगादीक ॥४७७॥

गौरी कामकर्मिणी । म्हणिजे हिया दोन्ही ।
नाट्यालागुनी । साळांगा उपांगे ॥४७८॥

साळांगनाट्य म्हणोनि । भुल्लरकुरंगी म्हणवोनी ।
म्हणिजे हिया दोन्ही । ललिता उपांगे ॥४७९॥

कोलाहल रामक्री । म्हणिजे साचारी ।
उभया रामक्री । उपांगादीक ॥४८०॥

देवकी भूलक्री । आणि त्रिनेमकी ।
म्हणिजे तृतीयपरी । कोलाहल उपांगे ॥४८१॥

इति चतुर्विध । अंगापासाव विविध ।
षडांतर शतराग प्रसिद्ध । जनीत जालें ॥४८२॥

या प्रकारे ग्रामजाती । अंगे म्हणिजे तृती ।
यापासाव मिती । रागादिक ॥४८३॥

जाले येकशत । वरी पन्नास आणि सप्त ।
संख्या समस्त । जाणावें ॥४८४॥

अणीक हिया सकळीं । रागांतु रामक्री भूपाळी ।
वसंत नाट्य साळांग चौळी । कंबोधी गुज्जरी ॥४८५॥

भैरवी गुडक्री । मल्लहरी घनाश्री ।
ललिता फळमंजरी । वंगाळ देशी ॥४८६॥

देवगांधारी । मेघरंजी कुरंजी अहिरी ।
श्रीराग पाहाडी गौळसिंधू रामक्री । शंकराभरण ॥४८७॥

भूल्लती साक्षी म्हणोनी । वराळी देवगुप्ती म्हणउनी ।
मग कैसी म्हणोनी । नराणी आरंभी ॥४८८॥

म्ह(णि)जे द्वितीय विंशती । रागलोक परिख्याती ।
होऊनि असती । त्याचे ठाईं ॥४८९॥

प्रथम अष्टराग ते पुरुष । उरले चतुर्विंशतिराग शेष ।
ते येकयेकास । त्रयत्रय असती ॥४९०॥

मिती रागस्त्रिया । यथाक्रमें जाणोनियां ।
अभ्यास करावया । प्रवर्तावें ॥४९१॥

आणीक वसंतभैरवी शामलहरी । नादरामक्री ।
म्हणिजे रामक्री । मित्रराग ॥४९२॥

मुखारी हिंडुळ वसंत । म्हणिजे उभयत ।
ते वसंत । मित्रराग ॥४९३॥

नाट्य अहिरीनाट । साळंगनाट हयीरनाट ।
गुजरीनाट्य म्हणिजे नाट । संमोहादिक ॥४९४॥

सौराष्ट्रगौल मालवगौळ । केदारगौळ छायागौळ कन्नडगौळ ।
वसंतगौळ प्रतापगौळ म्हणिजे अष्टविधगौळ ।
साळांगाचे मित्रराग ॥४९५॥

मंचबहुळी । अपण येकळी ।
तये बहुळी । लागूनि मित्रराग ॥४९६॥

गुममागामोघी । तेलकामोघी ।
म्हणिजे उभय कांबोधी । लागूनि मित्रराग ॥४९७॥

शोकवराळी वसंतवराळी । जोनगवराळी पत्रवराळी ।
प्रतापवराळी लक्ष्मणवराळी । नागवराळी ॥४९८॥

म्हणिजे हिये सप्त । वराळीआदि समस्त ।
मित्रराग यथार्थें । म्हणोनि जाणावें ॥४९९॥

अणीक विशद । तया रागाचे ठाईं शुद्ध ।
मित्र संकीर्णभेद । विभागूनी ॥५००॥

ग्रामवर्णादिक । परिक्षूनि पूर्वक ।
जन्याजन विशेख । देखोनियां ॥५०१॥

कौळ बोंवाळ नराट मिश्रित । म्हणोनि सुस्वर चतुर्थ ।
परि ठेउनि अलाप भजवणी किंचित । ठाये न चुकतां ॥५०२॥

नादावती नंदावती । भद्रावती विनयावती ।
भोगावती म्हणिजें पंचप्रकारे मिति । अलापविधी पदक्रमें ॥५०३॥

गौडी वैदर्भ पंचाळिक । म्हणिजे विशेख ।
यथा परिपूर्वक । रितीत्रयायुक्त ॥५०४॥

दारु परीं विकृतीं । विंदण म्हणिजे इति ।
चतुर्थ धावे नेरुक्ती । रितीं दाऊनी ॥५०५॥

कंपित चिंतित । अनुनाशिक शिरोगत ।
कुंठडपणवंत । विशिष्टानिसार ॥५०६॥

निष्ठुर निरस्य चित्रांत । श्रुतिविवर्जित ।
काकस्वरवंत । प्रयाणीं असमान ॥५०७॥

तालहीन म्हणिजे पंचदशक । स्वरदूपणादीक पक्ष ।
नातळतां गायने गायक । मोहित असती ॥५०८॥

अणीक तंति बाधोनी । वाद्यवाय परि भिन्नी ।
वहुविध वेण्यादि करुनी । ते तंतू म्हणवी ॥५०९॥

चर्म बांधोनी वाद्य । वायनें परिभेद ।
अवाज मृदंगादि वहुविध । ते तंतु म्हणवी ॥५१०॥

मुखे फुंकूनि वाद्यवायन । जितुले परि भिन्न ।
वासु आदिकरुन । ते सुस्वर म्हणवी ॥५११॥

काहळा पट्टाह शंख । भेंरी जेंगटादिक ।
म्हणिजे पंचमहावाद्यपूर्वक । विचक्षणासहित ॥५१२॥

कांस्यादि करूनी । ताळघोळ ते म्हणवी ध्वनीं ।
इति चतुर्थविधलक्षणी । वाद्यभेदसहित ॥५१३॥

अणीक विपंचिका चित्रक । चित्रव घोषवल्ली लकुलाष्टिक कूर्मिक ।
कुज्वक परिवादिनी किन्नरिक । तुंवरवेणित सती ॥५१४॥

रावणहस्त म्हणोनी । चाकण वालिकी म्हणऊनी ।
आणि आळविणी । अनाविद ॥५१५॥

कश्यपवेणी ब्रह्मवेणी । सारंगवेणी सुवेणी ।
आकाशवेणी अंतरवेणी । रुद्रवेण्यादि ॥५१६॥

म्हणिजे इति । द्वेविंशती ।
प्रकार तंती । वाद्य म्हणवी ॥५१७॥

दुकंडी गीतानुगत । उभय धनुगत ।
वेणानुगत म्हणिजे प्रकारयुक्त । असे म्हणवी ॥५१८॥

त्याजवळी जाती मुख बैसक । आदि प्रमाण मुनि विशेख ।
तया तया रागासी अनुगुण्य मुख्य । मिळऊनी ॥५१९॥

तंत्रवाद्याच्या कळा मेळऊनी । सप्तस्वरभेदजन्य जनन जाणोनी ।
वाद्य ऐकिलिया आनंद श्रवणीं । होय तंत्रवाद्यादिकें ॥५२०॥

आणि अष्टदशांगुळ । सप्तदशांगुळ षोडशांगुळ ।
आणि येकादशांगुळ दशांगुळ नवांगुळ । अष्टांगुळें ॥५२२॥

सप्तांगुळ षडांगुळ । पंचांगुळ चतुरांगुळ ।
त्रिअंगुळ द्विअंगुळ येकांगुळ । प्रमाण क्रमेकरुनी ॥५२३॥

जातिवास । आणि सजातिवास ।
सुकुमारिकावास । पक्षवासादि ॥५२४॥

भुवनवास । श्वेतवास ।
आदित्यवास । रुद्रवास म्हणोनी ॥५२५॥

हरिवास निधिवास । दिग्वास ऋषिवास ।
आणि कुमारवास । अघोरवासादि ॥५२६॥

ब्रह्मवास त्रिपुरवास । शिवशक्तिवास ।
भुवनादिपतिवास । म्हणिजे इती ॥५२७॥

अष्टदशप्रकारें विशेखें । वासाचे लक्षण निकें ।
जाणोनी तया जातिमुखें । मनानें सज्जुनी ॥५२८॥

उष्कर उदित । अळापकळाप हेळण व्याप्त ।
आदिकरुनी चतुर्थ । विंशतिप्रकारें ॥५२९॥

सरिगमपदनी । म्हणिजे सप्तस्वराक्षरें अरोहुनी ।
अवरोह आदिकरुनी । सेताळीस ॥५३०॥

भेद जाणोनियां परिकर । आलापूनि विचित्र ।
एकवीस भार स्वर तर । वासविलासें ॥५३१॥

अणीक शुद्ध साळांग संकीर्ण टंकिणी । म्हणिजे चतुर्विध मृदंग मेळउनी ।
कांसरी वोट गुडादिकरुनी । भेद जाणोनियां ॥५३२॥

त्वन्य अळंग ऊर्ध्वक । म्हणोनि त्रिविधक्रमे जाणोनि पूर्वक ।
वाजविती अतिकुशलादिक । मृदंगासहित ॥५३३॥

आणीक कंदाउज । षडाउज कुडगायुज ।
म्हणिजे चतुर्विधउज । संमेळेसीं ॥५३४॥

आणीक तकार तो रुद्रे लकार । ते पर्वतीं उभयां संपुटांतर ।
जाला नाद तो ईश्वर । निरुता जाणावा ॥५३५॥

तया ताळ उभयकूटेकरुन । येकधृतें धृत म्हणवी आपण ।
धृवुभय मिळोन । येकमात्रा म्हणवी ॥५३६॥

भयाने येक । गुरु म्हणवी मुख्य ।
त्रिमात्राने येक । पुनीत म्हणवी ॥५३७॥

येक पुलित । पुलितार्थे ते चतुर्थ ।
अर्धमात्रा म्हणवी निभ्रांत । तेचि विराममात्रा म्हणवी ॥५३८॥

इति मात्रा विशेषे सूक्ष्मात । निमिष्यार्धासी व्यंजनकळायुक्त ।
अनागत । वर्तमानेकरुनी ॥५३९॥

क्रियारुपे अनेक पद्धती । होय ताळउत्पत्ती ।
म्हणोनी ती समस्ती । तालोदय जाणोनी ॥५४०॥

अणीक तया तालाचे काळमार्गक्रिया । अंगजातीग्रहाकाललया ।
इति प्रस्तर म्हणिजे हिया । दशप्राण जाणोनी ॥५४१॥

आणीक धृवमयरूपक । झेपांती बुडी अटक ।
चचुपुडा चंचु ।टक । खड्गीतप्रत्रछंद ॥५४२॥

सव्याचित समितलद्यजोबक । गाहारढक मढाढक ।
सकरणा पटकरणादिक । पिंडकरण क्रौंचपाद ॥५४३॥

कळाहंस आदि ललित । मत्तमातंग फळचक्त ।
अस्थानमंडप मपमंदत । येकरसास्व ॥५४४॥

उत्तरपाणि संकृष्टत । संखज संखज अखंडित ।
आणि विलंवित । कुटिल ॥५४५॥

चतुराश्रय खंडवृद्ध आपण । उपवृद्ध सुभद्र संगत प्रछक्र ।
लय चांचव्यण गोठियण । धृवलय ॥५४६॥

जो भायारहरिण । विषम विद्याधर मतंग ब्रह्मनंदन ।
सरस्वतीकंठाभरण । आदि मठया ॥५४७॥

संपाकमठया सरमठया । सर्वसंयोगमठया ।
पूर्वकंकण मध्यकंकण कंकणकास्या । प्रस्तस्त कोकिळप्रिय ॥५४८॥

सिंहासनाद सिंहविक्रीडत । महासिंव्हनाद सप्त ।
समुद्रिक जळ या म्हणिजेत । इत्यादि ॥५४९॥

शत येकताळ । जाले तरी भंगताळ ।
उपभंगताळ । विभंगताळादि ॥५५०॥

चिताळ शुद्धताळ अनुताळ । म्हणिजे षड्वर्गताळ ।
संख्याभेद वेगळ । होऊनि असे ॥५५१॥

सांगीतले भरत । शास्त्रप्रणित योग्यत ।
योग्यतालधरवंत । संमेळेसी ॥५५२॥

अणीक नाटकाचे ठाईं दिनदिनास । विचित्र म्हणोनी रस ।
भाव संविधान आश्रय म्हणिजे प्रवोधांश । चतुष्ट जाणोनि ॥५५३॥

मुख दृष्टि हस्त । पाद अंगादि समस्त ।
अभिनव यथातथ्य । लक्षण न चुकतां ॥५५४॥

वरी मुखरस ते वाव । नेत्र विशाळ ते भाव ।
पादन्यास ते सर्वथैव । विलासादिक ॥५५५॥

भ्रूविक्षण तें विभ्रमादिक । म्हणिजे परि चतुष्क ।
मोहन अंग लक्षिणिक । अवरोनियां ॥५५६॥

शुद्धदेशीं । म्हणिजे मार्गद्वय विशेषीं ।
तयावरीं लक्षेसीं । मन घालूनि ॥५५७॥

तांडव नाट्यनृत्य म्हणोनी । लास्य गुंडील पेकण म्हणोनी ।
लंचण अपरिपात्र म्हणऊनी । सुपाव सर्वतोभद्र ॥५५८॥

म्हणिजे दशविधपात्रयुक्त । दावीत अतिरंजित ।
नर्तकनर्तकीसहित । संमेळेसीं ॥५५९॥

इति गुणानुग्रण्य जाले वाद्य । वाद्यानुगुण्यसार नृत्यभेदें ।
संभ्रमानें तूर्यात्रयानें बुद्ध । जनसहित ॥५६०॥

यानंतरें अंदोलन वस्त्र । अभरण वाहन राज्य वधूपूर ।
विडा म्हणिजे त्यागांग सप्तप्रकार । सहित होऊनियां ॥५६१॥

चतुःसमुद्रादि स्वरत्वें । प्रजापाळणादि सद्गुणसंपन्नत्वें ।
दशदिग्भरित पुण्यकीर्तिमयत्वें । राज्य करीत असती ॥५६२॥

आगीक तयाआंत सागर । महाराजयासी साठसहस्त्र पुत्र ।
तयानी अश्वमेधयाग अंगिकार । ते निमिसें ॥५६३॥

दक्षिणसमुद्रथडिये धरुन । अष्टसहस्त्रयोजने विस्तीर्ण ।
साठिसहस्त्रयोजन । सखोलादिक ॥५६४॥

पूर्वपश्चिमादि मेदिनीं । खनीत केले तयानीं ।
तया तया समुद्रोदक अवरोनी । तयानें द्वीपे जालीं ॥५६५॥

पूर्वादि इंद्रद्वीप । कुशद्वीप ताम्रपर्णीद्वीप ।
गभक्तिमाद्वीप । नागद्वीपादि ॥५६६॥

सौम्यद्वीप गंधर्वद्वीप । आणि वरुणद्वीप ।
म्हणिजे अष्टविधद्वीप । जाली विषद ॥५६७॥

तियें पृथकाकार । येकयेकसहस्त्र ।
योजनाचा विस्तार । होऊनि असती ॥५६८॥

तयात म्लेंछादिक हीन । जाती बहुविध भिन्न ।
अश्रय करुन । असती जाणावें ॥५६९॥

आणीक तयाआंत । उरली सहस्त्रयोजने प्रशस्त ।
भूमिका तेही समवेत । पर्वतपर्यंत ॥५७०॥

कणिकाद्वीप म्हणोनी । नामकरण पावोनी ।
ब्रह्मादी सकळजातीलागूनी । अश्वपद होऊनि असें ॥५७१॥

तयातु मर्यादापर्वत । सवालक्षपर्वतासहित ।
त्रिशतयोजने स्थूळ हिमजळांत । अच्छादले असती ॥५७२॥

उरले हिमस्वत । मध्यस्थूळ सप्तशत ।
योजनें ते भरत । खंड प्रसिद्ध म्हणवी ॥५७३॥

तया महेंद्रमल्यादिक । सद्य शक्तिमान् रुक्षक ।
विंध्यापरित्रयाय सप्तक । कुळपर्वत असती ॥५७४॥

तयाचे ठाईं जनन । होऊनियां परिभिन्न ।
तया कवण कवण । म्हणीतले तरी ॥५७५॥

त्रिसाम्यऋषिकुळ । म्हणिजे भयानदी विशाळ ।
तया महीपर्वती मेळ । जनित जाला ॥५७६॥

कृतमालिनी ताम्रपर्णी । म्हणिजे नदी दोन्ही ।
मलयापर्वतापासोनी । उदीत जाल्या ॥५७७॥

तापी पयोष्णी । म्हणीजे नदी दोन्हीं ।
रुक्षपर्वतापासूनी । जनीत जालियां ॥५७८॥

नर्मदा सुरसेवाळ । म्हणिजे उभयनदीकूळ ।
विंध्यापर्वती मूळ । उदीत जालियां ॥५७९॥

वोध स्मृती । म्हणिजे हिया द्विती ।
नदी परियात्रयपर्वतीं । जनीत जालियां ॥५८०॥

शतद्रुका चंद्रभागा उभय । नदी अतिशय ।
हिमवत्पर्वती उदय । म्हणोनी जाणावें ॥५८१॥

मल्लप्रहारा मणिमंदाकिनी । गौतमी गंगा म्हणोनी ।
तुंगा म्हणउनी । गंडकी कावेरी ॥५८२॥

कपिला कुंडलिनी । कौशिका केशरी वारुणी ।
शरयू सरस्वती शोणी । सुवर्णमुखी ॥५८३॥

भद्रा निरंजनी । जान्हवी आदिकरुनी ।
महानदी प्रवाहिनी । पंचशतें ॥५८४॥

महानदी मुख्य । पुण्यमयदायक ।
तीर्थसंमोह येक । कोटिसंख्या ॥५८५॥

श्रीशैल्य श्वेतकेदार । काशी काळहस्ती कुरुक्षेत्र ।
कुंभकोण कनकाचळ अभ्र । सभा कुकुभ्द्दग्दिरी ॥५८६॥

अरुणाचळ आदि ग्रामादिक । अगस्ती नाथ वाल्मिक ।
वृद्धाचळ हळाख्य । गया गोकरण ॥५८७॥

सोमेश्वर । आणि भीमेश्वर ।
जपेश्वर । वेदारण्य ॥५८८॥

श्वेतारण्य । अणि गजारण्य ।
नैमिषारण्य । नीळक मध्यार्जुन ॥५८९॥

वाराणसी विशालाक्षी । कंची पुरी कामाक्षी ।
लंकास्थानी शांकरिकी । कोल्हापुरीं महालक्ष्मी ॥५९०॥

जालांधरी महादेवी कन्याकुब्जके । कुब्जकाशक्ती विशेखें ।
सिंहळे सिंहके । श्वरी आपण ॥५९१॥

चक्रवाकें माणिकेश्वरीं । पूर्णक्षेत्र काशीपुरी ।
पूर्णकादेवी पर्वताग्रीं । श्रीपर्वतादेवी ॥५९२॥

श्रीशैल्य भ्रमरांविका । विंध्याद्री विंध्यवासिका ।
काळक्षेत्र महारौद्रिका । योगिनीपुर योगिनी ॥५९३॥

उज्जनी महाकाळी जननी । हिमाचळ भीमरूपिणी ।
श्वेतद्वीप पद्मासनी । सुमेरु सुप्रभादेवी ॥५९४॥

म्हणिजे इति अष्ट । दशशक्ति योगपीठ ।
जाले तरी नट । बाळार्कतेजें त्रिनेत्रें ॥५९५॥

त्रिसंध्याकाळपूर्वक । नाम जपती तयासी प्रत्यक्ष ।
राजवैश्यादि सिद्धिप्रदायक । होऊनि असे ॥५९६॥

पाश अंकुश चाप बाणांत । करचतुष्टे शोभिवंत ।
सर्वालंकारयुक्त । होऊनि असें ॥५९७॥

अणीक अयोध्या मथुरावती । मायापुरी काशी कांती ।
अवंतिका द्वारावती । म्हणिजे सप्तपुरी ॥५९८॥

तया अपणासीं । अश्रित प्राणियांसी ।
मुक्तिप्रदायक विशेषीं । होऊनि असती ॥५९९॥

तयांतु कासी म्हणिजे येक श्वेत । वाराणसी काशी अविमुक्त ।
अंतग्रह म्हणोनी चतुर्थ । प्रकार होऊनि असे ॥६००॥

तयामध्ये मरण । जालिया पिप्पलीकादी करुन ।
सकळ प्राणियासी आपण । विश्वेश्वर तो ॥६०१॥

दक्षिणकर्णभीतरी । तारक ब्रह्मउपदेश केलियावरी ।
सदोन्मुक्ति लाभे साचारीं । म्हणोनियां ॥६०२॥

सुराभांडेश्वरादि करुनी । लिंगदृष्टांतपूक होऊनी ।
वेदागम पुराणी । प्रसिद्ध होउनी असे ॥६०३॥

तया कारणें कासी सर्वोत्कर्षक । होय अन्यतीर्थाऐसे अन्यपक्ष ।
नव्हे म्हणोनी विवेक । करुनि जाणावें ॥६०४॥

अणीक तया भरतवर्षांतु अंग । वंग कलिंग ।
वेलुंग कोंग । काळ वंगाळ ॥६०५॥

चौळ केळेर गौळ । पांचाळ सिंहळ कुंतळ ।
नेपाळ मळियाळ । मळिवा हैव ॥६०६॥

हिंदैव सौंधव कोक । शा कुरू कंभाती कलहती किरातन मुगळममद मारुक ।
म्हणोनी चतुष्क । तिरुहती ॥६०७॥

त्रिगर्ता आर्यावृत्त भाट । महाभाट अरवट ।
चैंदीचिन्ह महाचिन्ह मरहट । पर्पर कर्फर ॥६०८॥

मध्यराष्ट्र महाराष्ट्र । सौराष्ट्र हुण हंभीर ।
काश्मीर संमीर । षटळ पाट ॥६०९॥

पांडिया पार्षिक । धयन अंवष्ट मिलिछक ।
द्रावीड कर्नाटक । म्हणिजे छपन्न देश ॥६१०॥

आणीक ते छपन्न । देश जाले तरी भिन्नभिन्न ।
नगर पट्टण ग्रामखंडे खर्वड द्रोण । मंडपादि भेदे ॥६११॥

स्वामी अमात्य होउनी । वंधु राष्ट्र कोश म्हणवुनी ।
दुर्ग वळ म्हणोनी । म्हणिजे राज्यसप्तांगानें ॥६१२॥

जळदुर्ग वर्णदुर्ग । आणि गिरिदुर्ग ।
कृतकावनदुर्ग । म्हणिजें दुर्गचतुष्टानें ॥६१३॥

सकळ संमोहे अळंकृत । होऊनिया शोभिवंत ।
द्वादशयोजनेसी पृथक्पृथक् । विभाग होऊनि असें ॥६१४॥

आणीक भरतवर्षाचे । ठाई जनसंमोह बहुवर्णाचें ।
कृतायुगादि तयाचे । अनुक्रमें ॥६१५॥

ज्योतिरिति नीतिभाषोत्तर । प्रावर्ण अळंकार ।
आदि क्रिया भिन्नाकार । होऊनि असें ॥६१६॥

ज्ञानऐश्वर्यादिक । तेजोवळादि विशेख ।
क्षिणक्षिण युगसंख्य । प्रमाण होउनी ॥६१७॥

कृषिवाणिज्यशेवक । जनादि अनेक ।
व्यापारपूर्वक । अर्जित करुनी ॥६१८॥

कष्टान्नभोक्त होउनी संतत । आशुचि अनित्यत्व ।
अनात्मअसुखत्व । त्याचे ठाई ॥६१९॥

अनुक्रमे शुचि मी नित्य । आत्मासुखवंत ।
म्हणोनियां मोहित । होऊनिया ॥६२०॥

अविद्याअस्मित्य राग द्वेष । अभिमान वेश म्हणिजे क्लेश ।
पंचकाने विशेष । बाधा पावोनी ॥६२१॥

ज्ञानविकृतीभाव । वर्तनी प्रकृतीभाव ।
मोहिनीविकृतीभाव । म्हणिजे भावत्रयानी भ्रमोनी ॥६२२॥

अर्थैषणा पुत्रेषणा । दारेषणा म्हणिजे ईषणा ।
त्रयोदोषे करुनि जाणा । वद्ध होऊनी ॥६२३॥

जातिवर्णाश्रम । कुळगोत्रनाम ।
म्हणिजे षट्भ्रम । वशें भ्रमोनियां ॥६२४॥

प्राणवुद्धी तनुसिद्धी द्वयकर्में आसन । पिपासन शोक मोह जरा मरण ।
म्हणिजे षट्कर्माचरण । संतप्त होऊनी ॥६२५॥

तनुव्यसन मनुव्यसन । आणि धनव्यसन ।
राज्यव्यसन । विश्वासव्यसनादि ॥६२६॥

उत्साहव्यसन । सेवकव्यसन ।
म्हणिजे सप्तव्यसन । वसे मति विभ्रंशोनी ॥६२७॥

कुळ शीळ धन रूप । यवन राजस विद्या तप ।
म्हणिजे अष्टमदें अमुप । उन्मत्त होऊनियां ॥६२८॥

कृपा शंका भीति लज्या जिगुप्सा । कुळ शील गर्व प्रशंसा ।
म्हणिजे अष्टपाशा । चेनि वद्धीत होऊन ॥६२९॥

भूमि जळ अग्नी मारुती । गगन मनो वुद्धी अहंकृती ।
म्हणिजे अष्टप्रकृती । वसे विकारोनी ॥६३०॥

वुद्धि सुख दुःख राग द्वेष यत्न । धर्म अधर्म भावना ।
म्हणिजे नवगुण । वसे विकारोनी ॥६३१॥

अशुर्वासना । दैववासना ।
लोकवासना देहवासना । वसे वद्ध होउनी ॥६३२॥

व्योमादि भूतमय । श्रोत्रादि ज्ञानेंद्रिय ।
प्रणवादि वाय । म्हणोनियां ॥६३३॥

मनसादि अंतःकर्णस्थोम । कामादि कर्मोत्तम ।
म्हणिजे पुरी अष्टम । आंतु वास करुनी ॥६३४॥

ज्ञानेंद्रियकर्मैद्रियदशक । चित्त मन अहंकार विद्यात्मक ।
षोडशकळा लोक । विकळ होऊनि ॥६३५॥

जन्म मृत्यु राग द्वेष जरा युज मद खेदा । विषाद निद्रा कांक्षा क्षुधा ।
तृष्णा भ्रम चित्त क्लेश म्हणिजे अष्टदश समंधा ।
दोषे दुःखीत होउनी ॥६३६॥

परदारागमन । परद्रव्यअपहरण ।
अभक्षभक्षण । जीवहिंसा ॥६३७॥

म्हणिजे इति चतुष्क । दोषाने चांडाळादिक ।
आदि हीनयोनी अनेक । जन्म पावोनी ॥६३८॥

अनुचित निष्ठुरत्व असत्य । पैशून्य म्हणिजे चतुर्थ ।
वाचकदोषे पशुपक्ष्यादी अनंत । योनी जन्मोनी ॥६३९॥

जनविरोधकार्यापेक्ष । अनिष्टचिंतन आनसतीसाक्षेप ।
आनधनादिककांक्ष । म्हणिजे हियां ॥६४०॥

चतुर्थप्रकार । दोषाचेनि पाथर ।
रुक्ष आदि अन्यत्र । जाती पावोनी ॥६४१॥

देहअभिमानत्व । मंदमतीसितरत्व ।
निद्राजडभावत्व । निषेधकर्म ॥६४२॥

अलस्य आचळत्वादिक । इत्यादि तामसगुणाने प्रत्यक्ष ।
अधी अधोलोक । वास पावोनी ॥६४३॥

मदमोहमत्सरयुक्त । निष्ठुर निःकारणत्व ।
कामकपटत्व । कोपकलहो ॥६४४॥

कर्कशा अतिशोक । मोह म्हणिजे इत्यादिक ।
रजोगुणाने मध्यलोक । वास पावोनी ॥६४५॥

विरक्ति विवेक वितरण । विनय विशेषज्ञ ।
दया दमन । धर्म धैर्य ॥६४६॥

निराभिमान । निर्धारादि सत्वगुण ।
समंधे ऊर्ध्वलोकस्थान । वास पावोनी ॥६४७॥

पूर्वजन्मांतरी केले सुकृतदुष्कृत । संस्कृतकर्म ते संस्कारे अनंत ।
भवासी बीजहेत । होऊनी असे ॥६४८॥

बुद्धीचे ठाई संचित । कर्म असंचितकर्म अंत ।
येकयेक देहजात । आरंभुनी ॥६४९॥

भोग पुरवी विशेषें । प्रारब्धकर्म सरिसें ।
भोग भोगीतसें । म्हणोनियां ॥६५०॥

जे केले पाप आधिक्य । ते अगम्यकर्मादिक ।
म्हणिजे या कर्मत्रयाने दुःख । अत्यंत पावोनी ॥६५१॥

पापकर्माधीनाचेनि अंति । चित्तव्याकुळिता अख्याती ।
ते अध्यात्मिका उपजे दुःख स्वानुभूती । ते अध्यात्मिक म्हणवी ॥६५२॥

व्याघ्रसर्पादि दुर्जनादिक । समंधे भयबाधादिक ।
ते आदिभौतिकें दुःख । ते आदिभौतिक म्हणवी ॥६५३॥

अनिष्टवातवर्षादिक विक्षेप । ते आधिदैवीक म्हणवी या तांप ।
ते आधिदैवकें उपजे दुःखरूप । त्रयतापेरूप नासोनी ॥६५४॥

येक्यांशी प्रकारे वात । चौसष्ट प्रकारे पैंत्य ।
पंधरोत्तरद्विशत । प्रकारे श्लेष्म ॥६५५॥

या परी भेदानें । त्रिशतेंसाठि संख्यानें ।
रोगरूपदोषानें । शक्ति नष्टोनी ॥६५६॥

महिषवाहन वळघोनी । इक्षुदंड धरोनी पीतवर्ण ।
रूप कामाने गुरुदारादीक गमन । करूनियां ॥६५७॥

खरवाहन वळघोनी । टोणपा करीं धरोनी ।
रक्तवर्ण क्रोधाचेनी । हृदयदीप मालऊन ॥६५८॥

लोभ तयाचेनि इहीपर । वद्धताप परिकर ।
भ्रमरूप साचार । भोग हरऊनि ॥६५९॥

शुनकवाहनावरी । वळघोनी गळकाष्ट धरोनी करीं ।
वहुविध वर्णपरी । रूप कोपी ॥६६०॥

मोह तयाचेनि । नित्यानित्य दोन्ही ।
विवेकसुनीं । होऊनियां ॥६६१॥

शुकरवाहनी वळघोनी । अंकुश करीं धरुनी ।
कृष्णवर्णरूप मद तयाचेनी । मिती त्यजुनी ॥६६२॥

अविवाहन वेघोनी मुसळ । धरूनि मेघवर्ण करी बळ ।
मछराचेनि परमगूण सकळ । निराकारुनी ॥६६३॥

पूर्वदळी पुण्यमती । अग्निदळीं निद्रालस्यप्राप्ती ।
यमदळी वुद्धिप्रीती । फळे क्रोध विशेष ॥६६४॥

नैऋत्यदळीं पापाद्भुत । वरुणदळीं विनोदमत्त ।
वायोदळी गमनहेत । कुबेरदळीं रतिप्रीति ॥६६५॥

ईशान्यदळीं द्रव्यदान । मध्यकळिके वैराग्य उत्पन्न ।
ऐसे हृत्कमळ अष्टदळप्रमाण । गति फिरत असती ॥६६६॥

लिंगईशसूत्र । विराटरुद्र ।
व्रह्माविष्णवेंद्र । विघ्नेश्वरादि ॥६६७॥

वीर कुमारक । वृषभ भैरव मैराळ यक्ष ।
राक्षसादिक । वास करुनी ॥६६८॥

गौरी लक्ष्मी दुर्गा भवानी । शारदा मातृका यक्षिणी ।
योगिनी मारी मसणी । धाकुटी मसणो ॥६६९॥

विप्र क्षेत्री वैश्य शूद्रादिक । गो अश्व मृग पक्षी घट रंभक ।
शालिग्राम पुस्तक । अश्वत्थ जळ ॥६७०॥

पाषाण काष्ठ मृत्तिका । चित्र वासकु दाळिका ।
देहाली मातृका । आदि वहुदेवभजनें ॥६७१॥

पूज्यपूजानुसाराचेनि । तारतम्यगति धरुनी ।
इति सकळ सौंसारी होउनी असती जाणावें ॥६७२॥

आणीक तें भरतखंडाआत । केले अभ्रफलसंचित ।
तें पूर्वोक्त इच्छाव्रत । वषाचे ठाई ॥६७३॥

प्रथम केली निरोपित । तया द्वापारांत ।
स्वर्गादि लोकाचे ठाई अनुभवित । असती जाणावें ॥६७४॥

म्हणोनि हेचि येक मुख्य । कर्मभूमिका विशेख ।
येर उरली सकळिक । भोगभूमिका असती ॥६७५॥

म्हणोनि भोगभूमिकास्थान । वासियासि जनालागुन ।
हे कर्मभूमिकाकारण । होय तयालागी ॥६७६॥

अणीक येथील समस्त । प्राणियासी अकाळमृत्य ।
न घडे तरी विधिलिखित । आयुष्यादीक तें ॥६७७॥

पिप्पलिकासी पंचदशदिवस । अजासी द्वादशवर्षे ।
पशूसी पंचदश । वर्षे मिती ॥६७८॥

गौ.ी विंशतिवर्षे । शकटासी सप्तविंशतिवर्ष ।
महिषीसी तीस वर्षे । अश्वास द्विंत्रिंशति वरुषें ॥६७९॥

गजासी शतसंवत्सर । पक्षीसर्पासी सहस्त्र ।
नरासी साचार । शतवर्षे आयुष्य ॥६८०॥

तया शतआयुष्याआंतु वाल्य वृद्ध म्हणोन । बळनेत्रा चर्मवती म्हणउन ।
श्रोत्रविषय उत्तानपतन । म्हणिजे अनुक्रमें ॥६८१॥

दशदशक । वरुषासी येकयेक ।
नष्ट होऊनि प्रत्यक्ष । दिसत असती ॥६८२॥

अणीक येथे वनितादि विशेख । विषय जातीसी तात्काळिक ।
भोगहेतुत्व परिणामादि तत्वादिक । निरसतत्व ॥६८३॥

अविचारीत रमणीचे हेतुत्व । क्षणभंगुरत्व ।
म्हणो स्वप्नप्रपंचजात । समान होती ॥६८४॥

अणीक येथे सकळ । विषय ते सुरचाप वाहट्ठळ ।
अस्त अरुणप्रभा अभाळ । वीज प्रातधुर्केट ॥६८५॥

तरंगवरी अक्षरवर्ण । जळबिंदु अवु पाषाण ।
द्वीपजळादी करुन । तया न्यायें ॥६८६॥

स्थिती नेमरहित । क्षणभंगीक पदार्थ ।
सकळ नाशवंत । म्हणोनी जाणावें ॥६८७॥

सर्वथा सुस्थिरवंत । नव्हे म्हणोनी न देखती देखत ।
श्रवणीं ऐकत ऐकत । विवेकविचारें ॥६८८॥

अणीक हे भरतखंडाआंत । पुढें सुरूप नित्य ।
पद द्यावया निमित्य । कारण असे ॥६८९॥

दैवत्वपददायक यज्ञ । संपदापददायक दान ।
ब्रह्मासी पददायक कारण । तपसादिक ॥६९०॥

सकळैश्वर्य चित्तशुद्धदायक शिवार्चन । मुक्तिपददायक सम्यक्ज्ञान ।
पुरुषें अचरावें संपूर्ण म्हणोन । सत्य सत्य निर्धारें ॥६९१॥

इति सांगीतलें भरत । वर्षादी नवखंड समस्त ।
तयाचे विभाग पर्वता । सहित संख्या परिक्रमें ॥६९२॥

येकलक्षयोजन । विस्तीर्ण होऊन ।
असे मनोहर म्हणोन । जंबुद्वीप म्हणवी ॥६९३॥

इति विवेकचिंतामणौ जंबुद्वीपस्थितिवर्णनं नाम
चतुर्थपरिच्छेदः समाप्ति ॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥

---

## पंचम परिच्छेद

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीशंभूनीलकंठात्मने नमः ॥

विस्तीर्ण भूलोकमध्य । जंवुद्वीप सांगीतले विषद ।
आतां पुढे अन्नद्वीप विविध । क्रमेकरुनी ॥१॥

संक्षेपमात्रे सांगिजेति । अंवुनिधीसहीत अति ।
विस्तारे वर्णीन स्थिती । ते कैसे म्हणीतले तरी ॥२॥

जंवुद्वीपासी वाह्यआवरण । लवणसमुद्र येकलक्षयोजन ।
असे सविस्तीर्ण होऊन । तो जाला तरी ॥३॥

कर्मठ कर्कट जळक । जळकुंभी चक्रनक्रादिक ।
मकर मछ वक । भेकादि महा ॥४॥

जळचरप्राणी । दशलक्षजातीलागूनी ।
आश्रयस्थान होउनी । असे प्रसिद्ध ॥५॥

मुक्तमाणिक्यप्रवाळादिक । वस्तुजाती अनेक ।
उदिताचा मुख्य । अगर म्हणवी ॥६॥

फेणतरंगलहरी । उर्मीआवर्त परी ।
घोषत साचारीं । असे निरुता ॥७॥

अणीक लवण । समुद्रासी वाह्यआवरण ।
होउनिया शुभ्रवर्ण । भूमिका असें ॥८॥

द्विलक्षयोजन । असे विस्तीर्ण होऊन ।
ते म्हणवी आपण । सांख्यद्वीप ॥९॥

तयाचे ठाई मेधतिथी । म्हणिजे नृपती ।
राज्य करीत अती । संपन्नत्वें ॥१०॥

तयासी सुह्रद पुण्यवंत । शांतभय शिशिर सुवुद्ध अनंत ।
शिवक्षमक ध्रुव म्हणिजे सप्त । कुळदीपक ॥११॥

तयासी तें द्वीप नृपतीनें । सप्तभाग करूनि समानें ।
दीधले तरी भषा तयाच्या नामानें । ती ती खंडे आसती ॥१२॥

तया शाखा द्विपाभीतरीं । विभाग पर्वतगिरी ।
कवण कवण परीं । म्हणीतले तरी ॥१३॥

पूर्वादि प्रदक्षिणाकारे विस्तारीं । गोमेदगिरी चंद्रगिरी ।
नारदगिरी दुंदुभगिरी । सुमनगिरी ॥१४॥

अलंध्यगिरी । वैभ्राकगिरी ।
म्हणिजे सप्तगिरी । महास्थूळ असती ॥१५॥

तयाचे ठाई उत्पत्ती । नदी कवण कवण असती ।
म्हणीतले तरी अनुतप्ती । शिखिनी पापी ॥१६॥

त्रिदिवेणी कल्पहारी अमृती सुकृती । म्हणिजे सप्तनदी तयातु खंडाप्रति ।
अनुक्रमे संचरोनि असती । समुद्रगामिन्यत्वें ॥१७॥

तया सप्तखंडाभीतरी । सप्तकुळपर्वत क्षुद्रगिरी ।
नदीनदादी अनेक परी । शोभत असती ॥१८॥

तेथिचे जन समस्त । त्रिताळ उन्नत असत ।
कल्पवृक्षफळ सेवित । तयाचेनि ॥१९॥

विंशतिसहस्त्र वर्षे । आयुष्यवंत होऊनी विशेषें ।
जराव्याधीक्लेशें । दुःखरहीत होउनी ॥२०॥

हरनामालिंग मुख्य । होऊनियां पूजक ।
परऐश्वर्याने सूख । स्वरूपें असती ॥२१॥

आणीक तया शाल्वद्वीपावाहेर । अवरण क्षीरसमुद्र ।
तो द्विलक्षयोजने सविस्तार । असे तो जाला तरी ॥२२॥

अहिल्या शिरितादेवी शुद्ध म्हणोनी । सुधौषध सुरतरू चिंतामणी ।
मुख्य वस्तु उदितालागूनी । अमर म्हणवी ॥२३॥

तेथे सकळ मोहक । दशसहस्त्रयोजने पूर्वक ।
सविस्तीर्ण कनक । मणिमय ॥२४॥

राजमंदिर विजृंभित । नारायण तयाआंत
पहुडला असे अनंत । शयन करुनी ॥२५॥

अणीक तया क्षीर । समुद्राचे वाहेर ।
आवरण सविस्तर । नीळवर्णभूमिका असे ॥२६॥

चतुर्थलक्षयोजन । असे विस्तीर्ण होउन ।
ते म्हणवी आपण । कुशद्वीप ॥२७॥

तया शिवपुष्पमती । म्हणिजे अधिपती ।
तयासी पुत्र अती । पुण्यवंत ॥२८॥

श्वेत हरित । जीमूत लोहित ।
वेद्यक मानस सुप्रभात । म्हणिजे सप्तवर्ग ॥२९॥

तया नृपतीने तयालागुनी । ते द्वीप सप्तभाग करुनी ।
दीधले तरी तया तयाचेनी । नामे ती ती खंडे असतीं ॥३०॥

तेथील विभाग गिरी । कैसे म्हणीतले तरी ।
पूर्वादि प्रदक्षणा परि । अनुक्रमें ॥३१॥

कुमुदनघ उन्मत्तनघ । वलाहनघ केतुनघ ।
द्रोणनघ महिमिकानघ । कुकुथनघ म्हणिजे सप्त ॥३२॥

उदित नदी योगी तोयोष्णी । चंद्रशुक्ला विमोचनी ।
विवृत्ति म्हणिजे पुण्यकारिणी । सप्त नदी ॥३३॥

तया तया वर्षाचे स्थानीं । अनुक्रमे संचरोनी ।
समुद्रगामिनी । होऊनि असें ॥३४॥

तया सप्तखंडांत भिन्न । सप्तसप्त कुळाचळ समान ।
गिरीनदीनदादी रचना जाण । असंख्य असे ॥३५॥

तेथील मनुष्यजन । येकतालउन्नत प्रमाण ।
कल्पवृक्षफळ भक्षण । करूनियां ॥३६॥

विंशति सहस्त्र । वर्षे मिती चिर– ।
जिवी होऊनि जर– । व्याधिरहित ॥३७॥

रुद्रनामधारक । लिंगाधिष्ठानपूजक ।
होऊनि नित्य सुख– । मय असती ॥३८॥

अणीक येथे ताळाचे । प्रमाण कैसे कवणेपरीचे ।
म्हणीतले तरी पुरुषाचें । चाळीस विती म्हणिजें ॥३९॥

पुरुषउन्नत प्रमाण । तैसे पंचपुरुष मिळोन ।
ताळ म्हणवी त्याप्रमाणे ते जन । असती जाणावें ॥४०॥

अणीक तया कुशद्वीपावाहेर । अवरण होउनिया दधिसमुद्र ।
चतुर्लक्षयोजने सविस्तार । होऊनी असें ॥४१॥

तयासी अवरुनी । कपिलवर्णाची धरणी ।
अष्टलक्षयोजने विशाळ होउनी । असे संख्येनें ॥४२॥

ते म्हणवी क्रौंचद्वीप । तयांसी पुण्यदेही निःपाप ।
म्हणिजे ज्योतिष्मत नृप । असे निरुता ॥४३॥

तयासी उद्योद वेणुमान । स्वैर दळंव धृति म्हणोन ।
प्रभाकर कपिल म्हणोन । सप्तकुमर ॥४४॥

त्या नृपतीने त्यालागुनी । तें द्वीप सप्तभाग करुनी ।
दीधले तरी तयाच्या नामेकरुनी । ती ती खंडे असतीं ॥४५॥

तया सिमापर्यंत । पूर्वादि प्रदक्षणा आवर्त ।
होऊनि विद्रुमपर्वत । होऊनि असती ॥४६॥

धृतिवान्पर्वत पुण्यवान्पर्वत । कुशेशयापर्वत रत्नपर्वत ।
मंदारपर्वत म्हणिजे सप्त । कुलाचल ॥४७॥

त्याचे ठाई नदी उत्पत्ती । दत्ततापी शिवापवित्रा सामती द्युती ।
दंभा महीचिका सर्वपापापहारी इति । सप्तनद्या ॥४८॥

अनुक्रमे संचरोनी । तया तयां वर्षांतु प्रभाऊनी ।
होऊनि समुद्रासी मिळणी । असती जाणावें ॥४९॥

तया सप्तखंडाआंत । सप्त सप्तकुळपर्वत ।
गिरीनदनदादि अनंत । परिकल्पित असती ॥५०॥

तेथींचे जन समस्त । त्रिताळप्रमाणउन्नत ।
कल्पवृक्षफळ भक्षित । तयाचेनि ॥५१॥

विंशतिसहस्त्र वर्षे । आयुष्यवंत होउनि विशेष ।
जराव्याधीक्लेशरहित । होऊनि असती ॥५२॥

स्थान नामधारक । लिंगाधिष्ठानपूर्वक ।
होऊनियां नित्य सुख । रूपें असती ॥५३॥

यानंतरे तया क्रौंचद्वीपालागुनी । बाह्य अवरण होऊनि ।
घृतसमुद्र अष्टलक्षयोजनीं । विस्तीर्ण असें ॥५४॥

वरी तयालागुनी । बाह्यजआवरणीं ।
रक्तवर्णाची धरणी । षोडशलक्ष- ॥५५॥

योजने असे विस्तीर्ण । ते शाल्वद्वीप म्हणवी आपण ।
तयासी द्युतिमंत संपन्न । राजेंद्र असें ॥५६॥

तया कुशाळ मनोनुग ऊर्वोष्ट । प्रवर अंधकार श्रेष्ठ ।
म्हणोनी मुनिवरिष्ट । पुण्यवंत सप्तपुत्र ॥५७॥

तयासी ते द्वीप समान । दीधले सप्तभाग करून ।
तयातयाचे नाम पडोन । ती ती खंडे असती ॥५८॥

तयाची सिमागिरी । पूर्वादि सविस्तारी ।
प्रदक्षणा परी । होऊनि असे ॥५९॥

क्रौंचनघ वामननघ अंधकागिरी । दिवावृत्पर्वत विविधशिखरीं ।
पुंडरीकाद्री । दुंदुभीगोत्र ॥६०॥

म्हणिजे सप्तपर्वत । त्याचे ठाईं आश्रित ।
होउनिया विचरत । असती देवगंधर्व ॥६१॥

तयापासाव नदीउत्पत्ती । गौरी कुमुद्वती ।
संध्याराग जयस्वाती । पुंडरीक ॥६२॥

अनुक्रमे तया खंडामधी । संचरोनिया वारिधी ।
मिळोनी असती त्यामधीं । म्हणोनी असे ॥६३॥

तया सप्तखंडाआत । सप्त सप्तकुळपर्वत ।
समान गिरीनदीनदवनादी अत्यंत । विचित्र असें ॥६४॥

तया वर्षाचे ठाई जन । त्रिताळउन्नतप्रमाण ।
कल्पवृक्षफळसेवन । करिती तेणें ॥६५॥

विंशतिसहस्त्र । वरुषे आयुष्यवंत चिर- ।
जिवी होऊनि स्वतंत्र । जराव्याधीरहित ॥६६॥

भीमेश्वरनाम्नाय । लिंगपूजक कृतनिश्चय ।
होऊनिया अतिशय । सुखरूप असती ॥६७॥

यानंतरे तया शाल्वद्वीपास । बाह्यआवरण होऊनियां इक्षुरस- ।
समुद्रतोपे ईश । लक्षयोजने असे ॥६८॥

तयासी आवरण । होऊनिया रक्तवर्ण ।
भूमिका बत्तीसलक्षयोजन । विस्तीर्ण असे ॥६९॥

ते गोमेदद्वीप म्हणवीत । असे तयासी पुण्यवंत ।
भव्य म्हणिजे महासमर्थ । राजेश्वर असे ॥७०॥

तयासी जळधा कुमारक । मणिचक्र सूकर उत्तम सौदाक ।
विशिष्ट म्हणिजे मुख्य । सप्तकुमार ॥७१॥

तयासी ते द्वीप वाटून । दीधले समभागें करून ।
तरी तयाचे नाम पडोन । ती ती खंडे आसतीं ॥७२॥

तयाचे सविस्तारे । शिमापर्वत अंतरे ।
पूर्वादि प्रदक्षणाकारें । होऊनी असती ॥७३॥

उदयाचळ दाचलाद्री । रैवतक महेंद्र शामाद्री ।
अंभोद्री अंबिकाद्री रामाद्री । म्हणिजे सप्तपर्वत ॥७४॥

त्याचे ठाई नदीनद उत्पन्न । पापभय महापुण्य ।
कुमारी सुकुमारी नलिन । वेणुका जयो ॥७५॥

म्हणिजे सप्तनदी । तयातया खंडामधी ।
अनुक्रमे संचरोनी अब्धी । मिळोनि असती ॥७६॥

तया सप्तखंडाभीतरी । सप्त सप्तकुळगिरी ।
क्षुद्र नदीनद परी । शोभत असे ॥७७॥

तया वर्षाचे जन समस्त । त्रिताळप्रमाणऊन्नत ।
कल्पवृक्षफळ सेवित । तयाचेनि ॥७८॥

सहस्त्रविंशती । संवत्सर मिती ।
आयुष्यवंत होऊनि असती । जराव्याधिरहित ॥७९॥

विश्वेश्वरनाम लिंग । पूजक होउनि आरोग्य ।
सुस्थीरचित्त सुखांग । होऊनि असती ॥८०॥

यानंतरे तया गोमेदद्वीपाबाहेर । आवरण सुरासमुद्र ।
बत्तीससहस्त्रयोजने सविस्तार । होऊनि असे ॥८१॥

आणीक तयासी बाह्य । आवरण अतिशय ।
धवलवर्णमय । भूमिका असें ॥८२॥

चौसष्टलक्षयोजने विस्तीर्ण । ते म्हणवी पुष्करद्वीप आपण ।
तयासी सांव म्हणिजे मंडण । नृपती असे ॥८३॥

तया सिद्धतुकी सुखोत्तर । म्हणिजे उभयकुमार ।
तयासी ते द्वीप इतर । भाग करूनी दीधले ॥८४॥

तरी तयातयाचिया । नामेकरूनियां ।
तीं ती खंडे होऊनियां । असती विभेद ॥८५॥

तया मध्यस्तमणी । वर्तुळाकार होउनी ।
मानसोत्तर म्हणऊनी । येक पर्वत असे ॥८६॥

तयावरी यक्षक । राक्षसगरुडादिक ।
गंधर्वादि अनेक । पट्टणे असती ॥८७॥

तया गिरीची उत्तर । भागे धातुकी म्हणिजे पुत्र ।
तयाचे दक्षिणभागे सुखोत्कर । म्हणिजे तयाचें ॥८८॥

तया खंडाद्वयाभीतरीं । महानदी क्षुद्रगिरी ।
नंदनंदनादि नानापरी । विचित्र असें ॥८९॥

तया वर्षाचे ठाईं समस्ती । मनुष्ये त्रिताळउन्नत असतीं ।
कल्पवृक्षफळे स्विकारितीं । तयाचेनी ॥९०॥

विंशतिसहस्त्रवर्ष आयुष्यानें । जराव्याधीरहित भक्तीनें ।
सोमेश्वरलिंगपूजनें । नित्यसुखे असतीं ॥९१॥

अणीक तया पुष्करद्वीपावाहेर । अवरण स्वादोदकसमुद्र ।
चौसष्ठिलक्षयोजने विस्तार । होऊनि असे ॥९२॥

समस्त मेघालागुनी । उदक पुरऊनि ।
सकळ लोकोपकारार्थ होउनी । प्रसिद्ध असे ॥९३॥

तयासी वाह्यआवरण । सर्वदेवताक्रीडार्थ हिरण्य- ।
मयद कोटियोजन । विस्तीर्ण असे ॥९४॥

जंघामात्रप्रमाण । जळमय होऊन ।
निर्झरप्रदेशसमान । होऊनि असे ॥९५॥

तयासी आवरुनी । सुरसंततीसी आस्पंद होउनी ।
सूर्याच्या रथचक्रालागुनी । संचारासी- ॥९६॥

ठाव देऊनि समस्त । दक्षिणदिग्भागाकडे आत ।
तया सूर्याचा प्रकाश अत्यंत । प्रवेशें प्रकाशें ॥९७॥

उत्तरभागेचे । कडेपर्यंत तया सूर्याचे ।
कीर्ण प्रवेशे साचें । नाही म्हणउनी ॥९८॥

वसुधातम असे अत्यंत । तया कारणे लोकालोकपर्वत ।
म्हणोनि नाम विख्यात । पावोनि असे ॥९९॥

तो पर्वत दुर्गाचिये रिति । हिरण्यमयभूमी सभोवती ।
दशसहस्त्रयोजने मिती । विस्तीर्ण असे ॥१००॥

पन्नाससहस्त्र । योजने उन्नताकार ।
होऊनिया साचार । असे जाणावें ॥१०१॥

तया गिरिवरी सूर्याचिया । रथसंचारासी तया ।
राक्षसाचे तमोभूमीचिया । विघ्न नव्हे तैसें ॥१०२॥

इंद्रादि दिक्पाळकांची पद्धती । अवरुनी अपुले अपुले मतीं ।
दक्षणाचे ठाईं असती । राखणाईत होउनी ॥१०३॥

आणि तयाचे छायेचा ठाई । तुसध्या अंधकारें अछादिली भूंई ।
पंचतीसकोटि संख्याविषई । वरी येकोणीसलक्ष ॥१०४॥

आणि चाळीससहस्त्र । योजने प्रमाण सविस्तार ।
तया ठाई निशाचर । म्हणिजे राक्षस असती ॥१०५॥

आणीक तयाचिये । छायेचे ठाई अवरणमय ।
गर्भोदकसमुद्र अतिशय । येककोटी ॥१०६॥

वरी सप्तविंशति । लक्षयोजने मिती ।
असे विशाळ होउनी अती । जळचरसहित ॥१०७॥

तया दक्षिण आवर्त । शंखाचा असे पर्वत ।
आणि ती अमित मंगळ जेथ । महाजळप्राणी असती ॥१०८॥

ते मिति मंगळ म्हणिजे मीन । येकयेकासी निरक्षण ।
मिळणीसंयोगे मथन । होय तयानें ॥१०९॥

गर्भोदकसमुद्र उचंबळोन । उदकमर्यादा सांडून ।
सप्तद्वीपेंकरून । जळप्रळय होय ॥११०॥

ते वेळी तयाचे मध्यांतराळ । महापर्वताकार स्थूळ ।
कूर्माआड रिघोनी जळ । प्रळयो वारीत असे ॥१११॥

अणीक तयाचिया छाया । असे ब्रह्मांडकठोरांत होऊनियां ।
तयाचे विस्तीर्ण अतिशया । येककोटीयोजन असे ॥११२॥

अणीक या क्रमेकरून । योजने प्रमाण ।
गुणीत मेळवण । केले तरी ॥११३॥

जंवुद्वीपादि समस्त । सप्तद्वीपासी येककोटि सत्य ।
विंशतियोजने प्रशस्त । प्रमाण असें ॥११४॥

क्षारांवुधी आदि समस्ती । सप्तसमुद्रासी मिती ।
येककोटीसप्तविंशती । लक्षयोजनें असें ॥११५॥

हिरण्यमयभूमिकाप्रमाण । असे दशकोटीयोजन ।
लोकालोकपर्वत विस्तीर्ण । दशसहस्त्रयोजनें असें ॥११६॥

ते ते भूमिका पंचतीस । कोटि वरी योकोणिस ।
लक्ष आणि चाळिस । सहस्त्रयोजने असें ॥११७॥

तयाचे छायागर्भोदक- । समुद्र तो येक ।
कोटिसप्तविंशतिलक्ष । योजने प्रमाण असे ॥११८॥

अणीक तयाचे । छाया विस्तीर्णाचे ।
येककोटीयोजनाचे । प्रमाण असे ॥११९॥

इति पन्नासकोटी वरि विशेख । पन्नाससहस्त्रयोजनादिक ।
मेरूस मूळपीठेसी लक्षयेक । योजने प्रमाण असे ॥१२०॥

जंवुद्वीपासी मेरू मध्यांतर । असे तयाकारण विशेषात्कार ।
वरील पन्नाससहस्त्र । योजनें सोडुनी ॥१२१॥

मुख्य महामेरूपासूनी । व्रह्मांडकोठारांत धरूनी ।
पन्नासकोटियोजने धरणी । प्रमाण असें ॥१२२॥

याप्रमाणे मेरूचे आवरण । पूर्वपश्चिमदक्षिण- ।
उत्तरादि सविस्तीर्ण । व्रह्मांडमध्यें ॥१२३॥

शतकोटीयोजन । भूमिका प्रमाण ।
असे म्हणोन । निश्चयें जाणावें ॥१२४॥

इति विवेकचिंतामणौ मृत्युलोकस्थितिवर्णनं नाम
पंचमपरिच्छेद समाप्ति ॥ श्रीसांवसदाशिवार्पणमस्तु ॥

---

## षष्ठम परिच्छेद

श्रीमहागजाननाय नमः ॥ श्रीसच्चिदानंदात्मने नमः ॥
श्रीशंभूनीलकंठाय नमः ॥

अनुक्रमें भूलोकस्थिती । भूमिका विस्तीर्ण मिती ।
सांगीतले समस्ती । विषद करूनी ॥१॥

आतां ऊर्ध्वलोक विशेषें । जन अश्चर्य होय तैसें ।
सांगिजेल तें कवण कैसें । म्हणीतले तरी ॥२॥

या भूतळापासूनि मुख्य । धृवमंडळपर्यंत अशेख ।
पंचदशलक्ष । योजने प्रमाण असें ॥३॥

ते म्हणवी भुवर्लोक । त्याचे ठाई वायूपूर्वक ।
आधार जाला अशेख । मेघासी गंधर्वादि ॥४॥

सूर्यादि नवग्रह समस्तीं । अनुक्रमे उत्तरोत्तर असती ।
वायुआधारे ते कैसी स्थिती । म्हणीतले तरी ॥५॥

प्रथम तन्वा आपण । या भूतळापासून ।
वरी पंनासयोजन । पर्यंत मिति ॥६॥

असे व्यापूनि समस्त । भूमीचे सकळ पदार्थ ।
औषधी पोखीत । असे निरुता ॥७॥

अणीक तया वायूआंत दधि वा हंस । म्हणिजे वा विशेष ।
हे पृथ्वी व्यापूनि समस्तांसी देख । दीप नष्ट करी ॥८॥

धेनूजंगमनासी । पक्षीकुळसंचारासी ।
आधार होऊनि समस्तांसी । शूकर होऊनि असे ॥९॥

आणीक तया वायूआंत । उदीत जाला प्रचेत ।
म्हणिजे वायू तो स्वत । आपणचि ॥१०॥

येकयेकवेळा चेतोनि । वाहटूळ होऊनि ।
समुद्रसंचाराचेनी । मोडी रुक्षादिक ॥११॥

अग्नीसी चेतऊनी । ग्रहदहन करुनी ।
समुद्रवडवानळाग्नी । पट करूनि देत असें ॥१२॥

अणीक तेथूनि वरि शत । संख्या योजनेपर्यंत ।
व्यापोनी असे समस्त । शोचनी म्हणिजे वायू ॥१३॥

तडित्प्रभामुख म्हणिजे मेघासी । स्वयोगे स्वादोदकसमुद्रासी ।
ना तरी लवणसमुद्रासी । घेउनी जाउनी ॥१४॥

समुद्रउदक भरुनी । मेघसमूह उचलूनी ।
भूमिकेवरी उन्नतन गुणी । येकशतार्थ ॥१५॥

योजने त्या मेघालागुनी । ताप्याचे परि घेउनी जाउनी ।
पुन्हा भूमीवरी आणुनी । येकक्रोष प्रमाण ॥१६॥

सामग्रीसी मेघ स्थिराऊनी । तेथूनि जळ विकरोनि ।
धारावारे करुनी । वृष्टि वर्षवी ॥१७॥

अणीक ते मेघ उन्नत । प्रथम ऐसे होऊनि पर्वत ।
वनक्षेत्रादि ग्रामाश्रित । पृथ्वीसमीप ॥१८॥

समान आणउनी । प्रथम ऐसे मागुतेनी ।
निश्चळ करूनी । संग्रहरहित ॥१९॥

तया मेघगर्भी जळ तया मेघाची कांती । वीज वायू वन्ही जळ इति ।
समंधे करूनि क्षिती । वरी पाद उतरे ॥२०॥

अणीक येथें येक । क्षीरोदक निःशेख ।
निरसोनी स्वादोदक । जाले म्हणीतले तरी ॥२१॥

जैसे भूमिकेच्चिया । समंधे करूनियां ।
रसपरी अतिशया । विचित्र होय ॥२२॥

तैसे लवणसमुद्रोदक जाले । तरी ते तयातया बहुवासनामेळे ।
मेघसंपर्के वायुवसानकुळें । स्वादोदक होय ॥२३॥

आणीक तो मेघवर्षाव । करि ते काळीं भूमिपासाव ।
येकक्रोश मिती ऊर्ध्वे । प्रमाणानें ॥२४॥

येऊनियां समीपस्थ । मेघवृष्टी करित ।
असे म्हणऊनि यथार्थ । निश्चयेसी जाणावें ॥२५॥

अणीक ते शतअर्धशत । योजनापासाव वरी उन्नत ।
शतयोजना अंतरे आंत । तो सेचनी म्हणिजे वायू ॥२६॥

सत्ववहा म्हणिजे मुख्य । मेघानी अणिले उदक ।
त्याचे ठाई मंडूक । मछ कूर्म ॥२७॥

संयुक्ते मेघविशेषें । वर्षाव करीत असें ।
आणि दुर्दीन अभाळवशें । करी अत्यंत ॥२८॥

अणिक तेथूनि वरी उन्नत । पन्नासयोजनेपर्यंत ।
व्यापूनि असे समस्त । मेघ म्हणिजे वायू ॥२९॥

रोषध म्हणिजे मेघानी अणुनी । जळवृष्टी करी मेदिनी ।
तज्ज्ळापानें जळालागुनी । दुःख होय ॥३०॥

अणीक तेथून । वरी पन्नाससहस्त्रयोजन ।
उन्नत असे आपण । अमोघ म्हणिजे वायू ॥३१॥

मारूक म्हणिजे मेघेकरुनी । जळ आणूनी वृष्टि करी धरिणी ।
तया जळपाने जळप्राणी । त्यासी मरण होय ॥३२॥

तेथूनी वरी उन्नत । पन्नासयोजनेपर्यंत ।
व्यापूनी असे समस्त । वज्रांग म्हणिजे वायू ॥३३॥

फळकाव्हया म्हणिजे मुख्य । मेघानें अणिले उदक ।
तया जळवृष्टीने अनेक । भूमीवरील ॥३४॥

सकळ वृक्षजाती । शाखापल्लव अंकुरती ।
कुसुमफलादी अती । भरीत होय ॥३५॥

अणीक तयापासुन । वरी पन्नासयोजन ।
उन्नत आसे आपण । वैद्यु म्हणिजे वायु ॥३६॥

वैद्यु म्हणिजे मेघसमंधे ध्वनी । गर्जना करीत धरणी ।
चतुष्कार्धशतयोजने येऊनी । ऐको येत असे ॥३७॥

तेथूनी वरि विशेख । पंनासयोजने पूर्वेक ।
व्यापूनि असे रैवतक । म्हणिजे वायू ॥३८॥

घटवाहा म्हणिजे मेघाने । आपुलिया जळवृष्टीने ।
महीजळासी तया जळपानें । पुष्टि होय ॥३९॥

तेथूनि वरि विशेख । पन्नासयोजने उन्नतादिक ।
व्यापूनी असे सर्वक । म्हणिजे वायू ॥४०॥

रोषध म्हणिजे मेघाने । अलिया जळवृष्टीनें ।
भूजळासी तया जळपानें । व्याधी होय ॥४१॥

तेथूनि वरी उन्नत । पन्नासयोजनेपर्यंत ।
व्यापूनि असे सर्वत्र । म्हणिजे वायू ॥४२॥

क्रोध म्हणिजे मेकाने । आलिया जळवृष्टीनें ।
जालिया उदकानें । भूमीवरीं ॥४३॥

तया जळपाने अतिशय । भूजनासी क्रोधयुद्ध होय ।
आणि राक्षस तयें । वृष्टीनें संहारती ॥४४॥

अणीक येथे धूम ज्योती । मारुत सलिल इति ।
येककूटे मेघ तया मेघा अती । वृष्टि होय ॥४५॥

तेथे मेष वृषभ मिथुन । कर्क सिंह कन्या तूळ वृश्चिक धन ।
मकर कुंभ मीन । म्हणिजे द्वादशरासी ॥४६॥

अश्विनी भरणी कृत्तिका रोहिणी मृगशिरस । आर्द्रा पुनर्वस ।
पुष्य आश्लेष । मघा पूर्वा ॥४७॥

उत्तरा हस्त चित्रा स्वाती । विशाखा अनुराधा ज्येष्ठा मूळ इति ।
पूर्वाषाढा उत्तराषाढा साभिजिती । श्रवण धनिष्ठा ॥४८॥

शततारका पूर्वाभाद्रपदा । आणि उत्तराभाद्रपदा ।
रेवती म्हणिजे विषदा । सप्तविंशति ॥४९॥

नक्षत्रें ती समस्त । आपुले आपुले मत्त ।
अधिकार करित । असती जाणात्रें ॥५०॥

तयांतु येकयेक । नक्षत्रासी विशेख ।
चतुष्क चतुष्क । पाद होऊनी ॥५१॥

मेषादि द्वादश । रासीआंतु येकास ।
नवनव विशेष । पाद म्हणवी ॥५२॥

अश्विनीआदि करूनी । सप्तविंशति नक्षत्रे मिळोनी ।
अनुक्रमें हाविभाग होउनी । असती तेथें ॥५३॥

मेषादि राशी उदित तें लग्न आपण । तयातया लग्नाच्या शुभाशुभरूपानें ।
प्रवेश जालिया नक्षत्रानें । देशकालकर्मवशें ॥५४॥

सुवृष्टी कव्यवृष्टि होउन । भूजनलोकासी अन्न ।
भोगादिका साधन । विशेष करीतसें ॥५५॥

तो मेघ होय ते ठाई संविती- । चिया वरुषकीर्णासंगती ।
आपण निती । चालवीत असे ॥५६॥

इति वायुमेघजीवन । विद्युल्लतागर्जन ।
शारी पाषाण । परिक्रमें जाणात्रें ॥५७॥

आणीक तेथूनियां वरी । नवसहस्त्रत्रि- ।
शतयोजने दुरी । प्रमाणाआंतु ॥५८॥

मोघ अमोघ वज्रांग वैद्युत । रैवतद संवर्त ।
विसंवर्त म्हणिजे सप्त । पवनाधारें ॥५९॥

उत्तरोत्तर । होउनी विचित्र ।
मेघाश्रयपूर । पट्टणे असतीं ॥६०॥

ते कैसे कवण । म्हणीतले तरी सांगेन ।
प्रथम मेघ म्हणिजे पवन । आधारानें ॥६१॥

मेघाश्रय म्हणिजे पूर । असे तयातू रौद्र ।
मूर्ति छत्तीससहस्त्र । असती जाणावें ॥६२॥

कामरूपें महापराक्रमी म्हणवीती । भूम्यादि सकळ लोक संचरती ।
षण्मुखातें असती । आराधित ॥६३॥

पिशाच्य देवता धनदा भीषणी । कालिका भीमरूपी हंसिनी ।
पूतना मुक्तकेशी हासिनी । हरिकेशी ॥६४॥

भूमाळी रोदनी शाकुनी । उत्तमी पिंगली गोकुर्णी ।
पंकजा श्रीमुखी जननी । कुंभकर्णिका ॥६५॥

तापता काळरक्षी नंदिनी । क्रोधिनी शाकिनी ।
पंचाळी कामिनी मेदिनी । महाकुंभिनिका ॥६६॥

नलिनी हरिहक्कारिणी । वायवी चिक्कणी ।
सुगंधिनी वनदेवी कुंटणी । म्हणिजे इति ॥६७॥

नामाचिया अति । देवता असती ।
तया इहलोकी दुःख देती । छळकवर्गोसी ॥६८॥

दशदिवस येकादशमास । षोडशवर्ष बाळकास ।
अनुक्रमे महाविशेष । पीडित असे ॥६९॥

आपुले आपुले विकार । सुचऊनि भिन्नभिन्नाकार ।
बळिभक्षण आहार । देत असती ॥७०॥

तेथूनी वरी ऊर्ध्वमय । अमोघ म्हणिजे द्वितीय ।
पवनाधारें मेघाधारे अश्रय । असे त्या पट्टणांतु ॥७१॥

रुद्रापासाव घटित । नीलांजनकायेने शोभत ।
स्थूळशरीरवंत । महोदराचें ॥७२॥

महागजवक्त्राचे । सर्पआभरणाचें ।
तीससहस्रकोटी मितीचें । विनायक असती ॥७३॥

मृत्युलोकीच्या दुर्मार्गियाचें । कर्मी फळ कर्माचें ।
अपहरुनी बळिवंत साचें । होऊनी असती ॥७४॥

आणीक तयापासूनियां । वरी वज्रांग म्हणिजे त्रितयां ।
पवनाधारांचिया । मेघाश्रय पट्टणांतु ॥७५॥

भिन्नाजिनकांतिवंत । भीमकायेचे अत्यंत ।
कोट्यानकोटी विरक्त । असती जाणावें ॥७६॥

तेथे भूलोकीचे समकळ । स्मशानभूतवेताळ ।
मंत्रसाधकांसी केवळ । प्राप्ति होय ॥७७॥

ते इहलोकीची समस्ती । श्मशानिची वळी अंगिकारिती ।
वीरपाषाणादि पूजा बळिभक्ती । घेत असती ॥७८॥

तेथूनि वरी द्यूत । म्हणिजे पवन चतुर्थ ।
अधारा मेघोचित । पट्टणांतु ॥७९॥

सुरसमंत व्याकार । सुरअज्ञेने स्थीर ।
अप्सरस म्हणिजे वीर । देवता असती ॥८०॥

तेथे नरलोकीचे करमरी । अग्निनळसंग्रामाभीतरीं ।
गोग्रहणादी अनेक परीं । परोपकाराचे ठाईं ॥८१॥

पराक्रमाने प्राणी । हत जाले तयालागुनी
तेथील देवकन्या येऊनी । अनंतसंभ्रमाने ॥८२॥

मणिखचित विमानी वैसविती । स्वलोकासी घेऊनि जाती ।
तयासी होय प्राप्ती । वीरस्वर्ग ॥८३॥

तेथूनि वरी रैवतक । म्हणिजे पंचमापवन आधारक ।
मेघाश्रय पट्टणांतु मुख्य । महासिद्ध असती ॥८४॥

तेथे हे पृथ्वीचे कोण्ही येक । सिद्धिप्रदानग्राहिक ।
महामंत्रसाधक । पावत असती ॥८५॥

तेथूनी वरि संवर्त । म्हणिजे षष्ठममारुत ।
आधाराचे मेघाश्रित । पट्टणांतु ॥८६॥

त्रिकोटि विद्याधर । वास करूनि निरंतर ।
असता सर्वदा चीर । महाऐश्वर्याने ॥८७॥

तेथूनि वरि विसंवर्त । म्हणिजे सप्तममारुत ।
आधाराचे मेघाश्रित । पट्टणाआतु ॥८८॥

वेणूआदि अनेकविद । नाद्यतंत्रसिद्ध ।
पक्षीकुळ आनंद । रूपें असती ॥८९॥

इति सप्तमारुत । आधार मेघाश्रित ।
स्थितिभेद वृत्तात । समाप्त जाणावें ॥९०॥

तेथूनि वरि शत । योजना अंतरे दशमारुत ।
आधारें शोभिवंत । ब्रह्मसृष्टीचें ॥९१॥

दशमहाजळधर । मेघस्थानकें विचित्र ।
परि ते उत्तरोत्तर । होऊनि असती ॥९२॥

तयांतु प्रथममारुत । आधाराचे मेघस्थानात ।
कश्यप ब्रह्मयापासाव जनित । होऊनि प्रकाशत असे ॥९३॥

मेघे वीज प्रकाशेंशी । तडित्पन्नासी ।
कारणजाला विशेषीं । देवेंद्रअज्ञेनें ॥९४॥

दशकोटिसंख्या वारी । धर मेघ जाले तरी ।
अभ्रकथराचे परी । युक्त होऊनि असती ॥९५॥

तया वारिधरमेघासि स्वतंत्रगमन । नाही तया कारण पवन ।
साहकारी होऊनि आपण । पूर्वोत्कारें ॥९६॥

भूलोकासी वृष्टि करुनी । वावडिन्याये उचलुनी ।
नेऊनि प्रथमस्थानी । ठेवींत असे ॥९७॥

तो वारिधरमेघ आपण । असे तेथे मेघस्थान ।
दशसहस्त्रयोजन । हे भूमीपासाव असें ॥९८॥

तेथूनि वरि द्वादशसहस्त्र । योजनात स्थानांतर ।
द्वितीयपवनाधार । वासाचे मेघस्थळी ॥९९॥

स्थूळशरीराचे अपार । जीमूत म्हणिजे विद्याधर ।
गंधर्व विशाळ विचित्र । गुहाचे ठाई असती ॥१००॥

ते देवगंधर्व गंधर्व म्हणोनि । मृत्युगंधर्व म्हणऊनी ।
द्विविधप्रकार होऊनी । असती त्याचे ठाई ॥१०१॥

प्रथमयुगीं पुण्यपरिपाक । संयोगे सृष्टिप्रारंभी मुख्य ।
तत्पद पावले पूर्वक । ते गंधर्व म्हणविती ॥१०२॥

हे सृष्टीसी मनुष्यरूपें उपजोनी । वरी पुण्यादिके करुनी ।
ते पद पावले जी कोह्मी । ते मृत्युगंधर्व म्हणविती ॥१०३॥

अणीक तेथून । वरी दशसहस्त्रयोजन ।
अंतरवृत्तीपवन । आधाराचे मेघस्थानीं ॥१०४॥

भिन्न भिन्न अकार विषद । वाहने अधियुक्त विपदायुध ।
होउनियां प्रसिद्ध । असती अग्निकणिका ॥१०५॥

ब्राह्मी माहेश्वरी कौमारी । वैष्णवी वाराही माहेंद्री ।
चामुंडा म्हणिजे परी । सप्तमातृका असती ॥१०६॥

कोह्मी रुद्रकणिका सुरंगी । सामर्थ्यसिद्धिदेवी तवलंगी ।
विद्यायोगी दिव्ययोगी । धूर्जटी धूम्राक्षी ॥१०७॥

ध्वंशिनी दंडधारिणी । महायोगिनी मेदिनी ।
मारी मारिका सिद्धयोगिनी । शांकरी मुष्णांगी ॥१०८॥

सुंदरी सर्वेशी प्रेतासनी । प्रेतभूषणी प्रसादिनी ।
परमेश्वरी क्रोधिनी । कंकाळी काळरात्री ॥१०९॥

कलहप्रिया काकदृष्टिणी । कामरूपी काळी किंकिणी ।
कपाळी वीरकौमारिणी । विरूपाक्षी ॥११०॥

वीरभद्री विश्वरूपिणी । विशालाक्षी वाराही विषलंघिनी ।
व्याघ्री उग्री उग्रार्धानुधारिणी । उग्रकेशी ॥१११॥

तटाकी पुष्टी त्रिपुरांतकी । त्रिपुंड्रधारिणी रौद्रकी ।
रौद्री वेताळी राक्षसी रक्ताक्षी । भूतशंका ॥११२॥

भयंकरी भैरवी भेसुरी । भीषणी लक्ष्मी लंबोष्टी निशाचरी ।
नरभोजनी गणेशी घोरी। इषियक्षिणी ॥११३॥

अधोमुखी शाकिनी । डाकिनी चवडी हुंकारिणी ।
म्हणिजे इति चौसष्ट योगिणी । मुख्यनायका ॥११४॥

आपुलें आपुले नामोच्चारण । मात्रें ग्रहादिकरून ।
सकळ परि विघ्न । निवारीत असती ॥११५॥

तेथूनि वरी विस्तारें । दशसहस्त्रयोजनांतरें ।
चतुर्थपवनाधारें । असे ते मेघस्थानीं ॥११६॥

खड्ग करा छुरि कंकडायुध । आणि शेणायुध ।
सबळ इटे हस्तायुध । उल्बणत वर ॥११७॥

चक्रचुंचु परिचळिया । वाकुलें जांवळिया ।
नराज शुळें शिरादिया । छुरि हस्तकटार ॥११८॥

कुठार कीरस फरश पट्टीश । मठ कंकी अंकुश ।
लौडी जमदाड पाश । म्हणिजे इति ॥११९॥

बत्तीस आयुध । पाणिधर विविध ।
घनदेवता बहुविध । वास करुनी असती ॥१२०॥

तेथूनि दशसहस्त्र । योजने अंतरे दूर ।
पंचमहामारुताधार । असे ते मेघस्थानीं ॥१२१॥

देवेंद्राचा मुख्य । ऐरावतादि अनेक ।
गजवर्गादिक । असती जाणावें ॥१२२॥

तेथूनि दशसहस्त्र । योजनांत षण्मारुताधार ।
वशे असे ते मेघस्थानी खगेश्वर । नाम गरुड असती ॥१२३॥

तेथूनी वर उन्नत । दशसहस्त्रयोजनात ।
सप्तमारुत । आधाराचे मध्यस्थानीं ॥१२४॥

देवगंगापावन । दशलक्षयोजन ।
प्रदेशें विस्तीर्ण । होऊनी असें ॥१२५॥

विचित्रवर्ण कमळ । कूर्मादि हंसादि बहुमेळ ।
संमोहासहीत सकळ । अळंकृत होऊनियां ॥१२६॥

देवमुनीमनुसिद्धगंधर्वालागून । आपुलें दर्शनस्पर्शन ।
स्नानपानादिक परमपावन । करीत असें ॥१२७॥

तेथूनि वरि विशेख । दशसहस्त्रयोजनांत पूर्व ।
अष्टममारुत आधाराचे मुख्य । मेघस्थानीं ॥१२८॥

सकळगणसंयुक्त । संमेळे अळंकृत ।
होऊनियां नंदीश्वर संतत । असे जाणावें ॥१२९॥

तेथूनि वरि दशसहस्त्र । योजनात नवमारुताधार ।
असे तया मेघस्थानांतर । दशब्रह्मा असें ॥१३०॥

अणीक हियासमस्ती । मेघाश्रयाचे ठाई अति ।
तया तयाची शरीरकांती । रत्नाभरणी उद्यत ॥१३१॥

प्रकाश तेथे तयाचा तयासीं । सरिसा प्रकाश ना तरी रविशशी ।
दीप्ति अपेक्षा नाहीं विशेषीं । म्हणोनी जाणावें ॥१३२॥

अणीक तयापासून । वरि दशसहस्त्रयोजन ।
अंतरे (द)शमपवन । आधाराचें ॥१३३॥

मेघविमानस्थानक । ते म्हणवी आपण मुख्य ।
सूर्यभूर्लोक । असती तेथें ॥१३४॥

महेश्वराचे मानस । उद्भवचरद विशेष ।
वीरभद्र शंभू गौरीश । अजायक पातु ॥१३५॥

अहिर्बंधन स्थाणु पशुपती । पिनाकी भवत्वी शक्ती ।
म्हणिजे येकादश रुद्रशक्ती । अतिपूज्य होऊनी ॥१३६॥

तेथे धात्रादि प्रभावत । अष्टवसू द्वादशादित्य ।
आदि सकळ परियुक्त । वर्तत असती ॥१३७॥

अणीक ते स्थान । हें पृथ्वीपासून ।
येकलक्षयोजन । प्रमाण असें ॥१३८॥

तेथ तया भुवर्लोकाधीश्वर । अपण जाला असे दिनकर ।
रथारूढ होऊनि निरंतर । महामेरू ॥१३९॥

पर्वतासि भोंवती । प्रदक्षणा करूनि गभस्ती ।
भूर्लोकाची दिवाराति । करीत असे ॥१४०॥

तयाचिया रथासि चक्र । येकचि असे साचार ।
विंशतिसहस्त्र । योजने विस्तीर्ण ॥१४१॥

वर्तुळाकार । तयासी पंच खिळे तें चक्र ।
पंचसहस्त्र । योजने पुष्ट ॥१४२॥

ते चक्र फिरे शीघ्र । तयामध्ये दशसहस्त्र
योजने प्रमाण वज्र । मय कणा असें ॥१४३॥

पूर्वोक्त भूमीचा लोक । अलोकपर्वताचा मस्तक ।
वरी पाठारी भूमिक । आधारे फिरत असे ॥१४४॥

तयाच्या नाभिस्थानातु प्रवेश । जाला वज्रमयकणा षोडश ।
कोटियोजने प्रादेश । विशाळ असे ॥१४५॥

तयाचे चतुर । अश्वाय पुष्टाकार ।
प्रमाण अष्टसहस्त्र । योजने असें ॥१४६॥

घाण्याच्या कातरिन्याये कण्यासीं । महामेरूच्या कंकणासी ।
दृढ जोडुनी सख्यार्थासी । मर्यादा कण्यावरी ॥१४७॥

वर्तुळाकार पाट । अंति विशाल निघोंट ।
द्विसहस्त्रयोजने पुष्ट । तया पाटावरी ॥१४८॥

मध्यस्थानी अतिशोभिवंत । विश्वकर्म्यापासाव निर्मित ।
महाविशाळ उन्नत । अनर्घ्यविमान ॥१४९॥

ते रत्नमय स्तंभानें । पताकादि विचित्ररचनेने ।
शृंगार होऊनि शोभेने । प्रशांत प्रकाशत असे ॥१५०॥

तया मध्यस्थानी सुवर्ण । रत्नमय दिव्य सिंहासन ।
तया अग्रस्थानी आपण । सूर्य आपण ॥१५१॥

त्याचे ठाई तपिनी तापिनी । धूम्रा मरीची ज्वलिनी ।
रुची सुषुम्नी । भोगदा म्हणवी ॥१५२॥

विश्वा बोधिनी निर्धारूनी । क्षमा प्रभा करणीं ।
म्हणिजे द्वादशकळाचेनि । आवर्त होऊनि असो ॥१५३॥

हिमकिरणें त्रिशतेत्यत्तिस । उष्णकीर्णें त्रिशतेत्यत्तिस ।
वर्षकीर्णें त्रिशतेत्यत्तिस । बीजभूतकिरण येक ॥१५४॥

इति द्व्यासहस्त्रकीर्णें । समंधे सहस्त्रकर म्हणोन ।
काळकर्मात्मक कारण । होऊनि असे ॥१५५॥

हिरण्यकेशमुख । रोमाने अतिप्रकाशक ।
कमळादि धरूनि चतुष्क । भुजाने शोभे ॥१५६॥

किरट केयूर कुंडला । आदि अनेक अभरणे सकळा ।
वस्त्र गंध माळा । अळंकृत होऊनी ॥१५७॥

सिंदूरवर्ण निकर । प्रमाण नवसहस्त्र ।
योजने दीर्घ शरीर । अकारसहित ॥१५८॥

सप्तविंशतिसहस्त्र । योजने विशाळाकार ।
आपुले साचार । प्रभामंडळ असे ॥१५९॥

तया संयुक्त शस्त्री विंशति । सहस्त्रयोजने मिती ।
विशाळ अकारा नेमिती । शोभत असें ॥१६०॥

अणीक तया सूर्याच्या रथासी । ईशादंडाग्रजूवामध्यप्रदेशीं ।
अश्व असे येक विशेषीं । तया जुवांचे ॥१६१॥

वामदक्षिणभागीं । त्रयत्रय अश्वसंगी ।
इति सप्तवारू मनोवेगीं । अपाडाचे ॥१६२॥

सर्पाच्या पागोरयाने विशेषें । बाधोनियां कुलाळचक्रप्रमाणा ऐसें ।
प्रदक्षणा करूनि फिरतसे । तो रथ निरुतां ॥१६३॥

नर उश्वास अवर्ति । येकासी येकविंशति ।
सहस्रषट्शते मिती । योजने चालत असे ॥१६४॥

अणीक या क्रमानें । दिवारात्रि संख्येने ।
दिवस येकासि योजनें । शेताळीसकोटी ॥१६५॥

अणीक पासष्ठलक्षावरी । साटीसहस्रभरी ।
योजने अहोरात्री । चालत असें ॥१६६॥

घटिके येकाभीतरी । सप्तविंशतिलक्षावरी ।
षड्विंशतिसहस्रभरी । योजने चालत असे ॥१६७॥

ऐसे चालतां दिवस येकाभीतरीं । पूर्वाद्रिपासाव माद्रि ।
पावलिया साचारीं । मेरुआड होउनियां ॥१६८॥

पश्चिमादी पूर्वांत । दिग्भागसंख्या समस्त । -
आंधार पडोनि रात्रि होत । असे जाणावे ॥१६९॥

अणीक तया मेरूचे । उत्तरभागी सूर्याचे ।
प्रकाशे साचें । दिवस होय ॥१७०॥

ऐसे गतीं वेगे चालतां । पूर्वादि पावलिया सर्वथा ।
मेरूआड होऊनि तथां । पूर्वादि करुनी ॥१७१॥

पश्चिमांत उत्तर । दिग्भागांतु अकार ।
पडोनियां साचार । रात्रि होय ॥१७२॥

हे दक्षिणदिग्भागी निरुता । प्रकाश होउनी मागुतां ।
प्रथम ऐसा सर्वथा । दिवसहोय ॥१७३॥

अणीक येक येथें । दिवारात्रीचे निरुतें ।
स्वरूप कवण तेथें । म्हणीतले तरी ॥१७४॥

प्रथम सृष्टीचिया । प्रारंभी पितामहाने अतिशया ।
स्वयें आपण तमोमया । देह धरुनी ॥१७५॥

राक्षस निर्माण करुनी । ते देह त्यजिले मागुतेनी ।
तेचि मृत्युलोकालागुनी । रात्रि जाली ॥१७६॥

त्या ब्रह्याने सत्वमयदेह धरुनी । देवता स्रजूनि ते मागुनेनी ।
त्यजिले तोचि मृत्युलोकालागुनी । दिवस जाला ॥१७७॥

अणीक तो चतुर्मुख । स्वयें आपण सात्विक ।
करी बळ विशेख । स्विकारुनी ॥१७८॥

पित्रासी स्रजूनि सर्वा । ते देह त्यजिले तेव्हां ।
मनुष्यवर्गासि दिवा । संध्या स्वरूप जाले ॥१७९॥

आणीक तो कमळज आपण । रजोमयतनु धरुन ।
श्रृजिले नरजन । वरी मागुतेनी ॥१८०॥

ते कलिवर उपाधी । त्यजिले तेचि सकळादि ।
नराजनासी रात्रिकौमुदी । स्वरूप जालें ॥१८१॥

या प्रकारे जाले उत्पन्न । दिवानिशी तोय अंगिकारुन ।
चालवीतसे आपण । सूर्यभानू ॥१८२॥

तेथ आड रिघे तमाहर । म्हणिजे महाराक्षस निशाचर ।
ते संहारीत करीत असे संचार । तेव्हां होय ॥१८३॥

ते संख्या घटिका दीन । पक्ष मास संवत्सरादी करून ।
युगादी लक्षण । ते पुढे सांगिजेल ॥१८४॥

तो सूर्य आपण भ्रमें । तये ठाई परि नेमे ।
चैत्रादि द्वादश अनुक्रमें । मासाआंतु ॥१८५॥

येकयेक अधिपती होउनी । ते रथसिंहासनीं बैसोनी ।
चालवीत द्वादशतरणीं । म्हणोनी जाणावें ॥१८६॥

तया तयाचे अतिशय । साचाररूप नामधेय ।
क्रमवर्णना पर्याय । कैसा म्हणीतला तरी ॥१८७॥

धाता अर्यमा मित्र वरुण । इंद्र विश्ववान्य पर्जन्य ।
पुष्यक अंशुमान । गभस्तिमान् म्हणिजें ॥१८८॥

त्वष्टा विष्णू म्हणिजे इति । द्वादशक प्रति ।
आदित्यनामांस्थती । अनुक्रमें ॥१८९॥

पुलस्त्य पुलह अत्रि वसिष्ठ म्हणउनी । अंगिरस भृगु भारद्वाज मुनी ।
गौतम कश्यप ऋतु जमदग्नी । कौशीक म्हणिजे ॥१९०॥

इति द्वादशऋषी । तया तया आदित्यासी ।
परिक्रमे विशेषीं । स्तुति करणार ॥१९१॥

वासुकी कंकवीर । तक्षकनाग येळपत्र ।
शंखपाळ ऐर । वत धनंजय ॥१९२॥

महाप्रज्ञा कर्कोट कंबाळ । अश्वतर म्हणिजे द्वादशमेळ ।
सर्प परिक्रमे अश्वासी अळिकुळ । बंधाधिकारी ॥१९३॥

तुंबर नारद हाहा हूहू म्हणोन । विश्वावसू उग्रसेन ।
वसुरुचि सर्वांशु चित्रसेन । उन्नाहा धृतराष्ट्र ॥१९४॥

सूर्यवज्र म्हणिजे द्वादशक । गंधर्व अनुक्रमें विशेख ।
पाठगायन रसिक । करीत असती ॥१९५॥

कृशस्थूळ युजिकास्थूळ मेनुका । सहन्य प्रमोचती अनुमोचंतिका ।
विश्वासी धृतवाची उर्ध्वशिखा । पूर्वाचिती ॥१९६॥

तिळोत्तमा रंभा म्हणिजे हिया । द्वादशअप्सरा स्त्रिया ।
अनुक्रमें अतिशाया । नृत्य करिती ॥१९७॥

आणीक रथभृतें । रथौंजरथ चित्ररथ स्ववृत ।
अरुण सुषेण सेनजित । तार्क्ष्य अरिष्टनेमी ॥१९८॥

ऋतुजित सत्यजित । म्हणिजे द्वादशधर्मीं युक्तवंत ।
अनुक्रमे रक्षत । सारथिया ॥१९९॥

प्रहेति पौरुष म्हणोन । वेददर्प व्याघ्र म्हणोन ।
अप्सुवात म्हणोन । विद्युत दिवाकर ॥२००॥

ब्रह्मवेत्ता यज्ञवेत्ता । म्हणिजे द्वादश अद्भुता ।
राक्षस रावणा इता । अनुक्रमें ॥२०१॥

अंगुष्ठमात्र सूर्याचें । किरण असे ऊन साचे ।
गोपादअंकित स्थळाचे । परम पवित्रोदकें ॥२०२॥

स्नाने पाने महाऋषेश्वर । वाल खिल्प साटीसहस्त्र ।
समभागें द्वादशदिनकर । तयाचे सभानायक ॥२०३॥

यानंतरे धृतो आपण । प्रवाह म्हणिजे पवन ।
रज्जुसमंधे करुन । तया रथांसी ॥२०४॥

सूत्रे चालवीत असे । म्हणोनी सूर्यसिद्धांत ऐसे ।
प्रतिपादीत असे । जाणावे म्हणोनी ॥२०५॥

अणीक तया सूर्यापासून । वरी लक्षयेकयोजन ।
अंतरे आपण । चित्तलोकवासी ॥२०६॥

ऋतु दक्ष वपुषु पुरुरव । सत्यवकाम काळधुनि रुचअद्रनव ।
म्हणिजे इत्यादि विश्व । देवतायुक्त ॥२०७॥

अग्निष्कांत आदि करुनी । पितृलोकदेवता संयुक्त म्हणोनि ।
चंद्र असे तये स्थानीं । तो जाला तरी ॥२०८॥

अमृता मानदा पूषा तुष्टि धृती । शशनी चंद्रिका कांति ।
ज्योत्स्ना श्री अंगदा पूर्णपूर्णा वृत्ती । कामदायनी ॥२०९॥

म्हणोनि षोडशकळाभरित । होऊनि शरीरें समस्त ।
औषधीश्वर होऊनि रंजत । असे निरुता ॥२१०॥

तयाचिया रथासी रंजत । मय त्रिच्याखती सखिळेश्वत ।
दशअश्व स्फटिकरजत । मययुक्त रथ असें ॥२११॥

सूर्याच्या विमानासी । द्विगूण होय विशेषीं ।
असे तया पुष्पकारूढ शशी । जाला असें ॥२१२॥

तया चंद्राचे किरणांमृत । कृष्णपक्षीच्या पाडव्यादि समस्त ।
अमावास्यादिपर्यंत । अग्नी मुख्य ॥२१३॥

सकळसंमोह देवता । पितृगणादि पान करितां ।
क्षय जालिया सर्वथां । कळा मागुत्यानीं ॥२१४॥

सूर्य आपुले सुषुम्नेनी । म्हणिजे किरणसूत्रेकरुनी ।
तया चंद्रालागूनि । शुक्लपक्ष ॥२१५॥

पाडवा आदि करुनी । पौर्णिमापर्यंत दिनिदिनी ।
अतिविशेष भरुनी । वृद्धि करीतसें ॥२१६॥

वरी तया चंद्राचा रथ । धृतसंवाहा म्हणिजे मारुत ।
रज्जूनी धरुनि चालवीत । असे जाणावे ॥२१७॥

आणीक तया चंद्रापासूनि वरी । येकलक्षयोजनांत दुरि ।
मोगरियाच्या पुष्पापरी । श्वेताकार ॥२१८॥

चंद्रा ऐसे शांताकार । पुष्पकारूढ निरंतर ।
होऊनि असे नक्षत्र । मंडलादिक ॥२१९॥

वरी धृते आपण । विवाह म्हणिजे पवन ।
रज्जुसूत्र धरुन । चालवीत असें ॥२२०॥

अणीक ते नक्षत्रमंडळ तेथून । वरी द्विलक्षयोजन ।
अंतरे पद्मरागवर्णे । कांतिमय मंगळ असे ॥२२१॥

तयासी प्रवाळाचे निघोट । विमान तयासी चतुष्क ।
प्रवाळाचीं चक्रे अष्ट । घोडे असती ॥२२२॥

अणीक तया मंगळापासून । अंतरे कुंकुमवर्ण ।
कांतीने पूर्ण । बुध असे ॥२२३॥

तयासी रत्नाचे धनवट । विमाने तयासी पांचाचीं चोखे अष्ट ।
पिंगळवर्णांचे विशिष्ट । दशवारू असती ॥२२४॥

तेथूनि वरी विस्तारें । द्विलक्षयोजन अंतर ।
तप्तकांचन वर्णाकार । बृहस्पती असे ॥२२५॥

तयासी सुवर्णाचा रथ । त्यासी माणिकाची चाके चतुर्थ ।
कुंकुमवर्णाचे शोभित । अश्व अष्ट असती ॥२२६॥

अणीक तया बृहस्पती । पासूनि द्विलक्षयोजने मिती ।
अंतरे कुंदनवर्ण कांती । –चा शुक्र असें ॥२२७॥

तयांसी रजताचे विमान शोभित । तयासीं वैंडुर्याची चाके चतुर्थ ।
विचित्रवर्णाचे अत्यंत । दशअश्व असती ॥२२८॥

शुक्रापासूनि द्विलक्षयोजनें । वीजांजनवर्णाचा क्रोधदृष्टीनें ।
भयंकरमूर्ती होउनि आपण । शनिश्चर असे ॥२२९॥

तयासी लोहाचे विमान मुख्य । तयासी नीळवर्णाची चाके चतुष्क ।
कृष्णवर्णमय अष्टक । तुरंग असती ॥२३०॥

इति मंगळादि पंचग्रहावरी । घृतपुराड म्हणिजे वायु दोरी ।
धरूनी रज्जू वक्रगतीने परी । चालवीत असे ॥२३१॥

अणीक तया शनिमंडळाचें । ठाईं अंजनवर्णाचे ।
धूम्रवर्णाचे अनुक्रमें राहूकेतू साचें । असती जाणावें ॥२३२॥

तयासी तिरख्याचे रथ । तयासी वज्राची चाके युक्त ।
परिक्रमे चतुर्थ चतुर्थ । अष्टवारू असती ॥२३३॥

राहूकेतू उभयालागून । वरी घृतोपवास पवन ।
रज्जुसूत्राचे धरुन । चालवीत असे ॥२३४॥

आणीक दिव्यदेहान्वित । जाहला सकळ ग्रहाआंत ।
प्रथम निरोपिला विख्यात । सूर्यभानू ॥२३५॥

तया सूर्यमंडळा द्विगुण । असे चंद्रमंडळ आपण ।
तया उभया समान । असे राहुमंडळ ॥२३६॥

तया चंद्राचे मुख्य । षोडशअंशक ।
ते शुक्रमंडळ पूर्वक । असे निरुतें ॥२३७॥

तया शुक्राचे चतुष्क । भागाभीतरीं येक ।
भागहीन असे मुख्य । ते बृहस्पतिमंडळ ॥२३८॥

तया बृहस्पतीचे चतुष्क । भागाभीतरीं येक ।
तयाचे समान मंगळाचे मंडळ । तयाच्या चतुष्कभागात केवळ ।
येक भागहीन असे मंडळ । तया बुधाचें ॥२४०॥

तया बुधासी होउन समान । उरल्या नक्षत्रांत योजुन ।
असी पन्नासयोजन । मंडळे असतीं ॥२४१॥

ना तरी तयाहूनी । उणी नाही म्हणऊनी ।
नक्षत्रमंडळें येथुनी । दिसत असतीं ॥२४२॥

अणीक तया ग्रहामध्ये कैसेनी । चंद्रसूर्यादिक दोन्ही ।
ग्रह कैसे म्हणोनी । म्हणीतले तरी ॥२४३॥

तया संवत्सरापासूनि जाले मास । मासापासाव पौर्णिमा अवांस ।
तयाचे ठाई मेषादि द्वादश । राशी तयांतु ॥२४४॥

चंद्रसूर्य उभय ते राशी । राहो म्हणिजे योग जालिया विशेष ।
तरि तया तयास । ग्रहण होय ॥२४५॥

ते राशीचे ठाई मिती । वर्तत आसती ।
अश्विन्यादि समस्ती । परि नक्षत्रें ॥२४६॥

येकपाद त्रिपाद चतुष्क । पादक्रमानें येकयेक ।
अंशग्रहण ते मुख्य । खांशग्रहण ॥२४७॥

हे अंशत्रयग्रहण । तेचि पूर्णग्रहण ।
होय म्हणोन । निश्चितार्थें ॥२४८॥

अणीक तया शनेश्चरावरी । द्विलक्षयोजनांतरी ।
दुरी मरीचि अत्रि । अंगिरस ॥२४९॥

तथा पौलस्त । पुलह ऋतु ।
वसिष्ठ म्हणिजे सप्तु । ऋषिमंडळ असे ॥२५०॥

इति सांगीतले समस्त । भूलोकापासूनि उन्नत ।
भुवर्लोकीचे सप्त । ऋषिमंडळपर्यंत ॥२५१॥

विचित्र होऊनी इति । स्थानकें परि समस्ती ।
मारुताधाराची अती । मेघाश्रय पट्टणे ॥२५२॥

अणीक तया सप्त । ऋषिमंडळावरी उन्नत ।
पुढें सांगणे यथार्थ । रुद्रलोक ॥२५३॥

पर्यंत दृश्य स्थानें । सकळ पवनाधारानें ।
असती विमानें । म्हणोनी जाणावें ॥२५४॥

यानंतरे तया सप्त । ऋषिमंडळावरी उन्नत ।
पुढें सांगयुक्त । रुद्र लोक ॥२५५॥

पर्यंत दृश्य स्थानें । सकळ पवनाधारानें ।
असती विमानें । म्हणोनी जाणावें ॥२५६॥

यानंतरे तया सप्त । ऋषिमंडळावरी उन्नत ।
येकलक्षयोजनात । शुशुमारचक्र असे ॥२५७॥

ते शुशुमार अपण विशेषें । सुसरीच्या अंकाऐसें ।
स्वशिरें होउनि असे । महाधर्मस्वरूप ॥२५८॥

त्या कारणे ते नामोपचार । महावृषभेश्वर ।
म्हणोनियां साचार । घेत असे ॥२५९॥

तयाचे शीर ते ईश्वर । धर्म ते मूर्धिन व्रह्म ते उदर ।
अन्नयज्ञ तें अधर । विष्णू ते हृदय ॥२६०॥

वक्ष ते गर्भ अश्विनी । देवता ते पूर्वपाद दोन्ही ।
अत्री ते मध्य मित्रवरुण मिळोनी । अधरपादद्वय ॥२६१॥

अग्नीते पूंस प्रथम इंद्र । ते पुंस मध्य प्रजापती ते पुंसाग्र ।
अभय तें पूंस विसानाकार । होऊनि असें ॥२६२॥

तया पुंसाचा सूक्ष्म अग्र । तये ठाई सर्व स्तवकत्वाचे सूत्र ।
विश्वकर्म्याचे सूत्र कृत्य विचित्र । असे तया स्थानीं ॥२६३॥

ध्रुव असोनि पूर्वोक्ति सप्त । वायूसूत्रे धरूनि समस्त ।
ग्रहतारादि चालवीत । असे जाणावें ॥२६४॥

आणीक याचि प्रकारें । भुवर्लोकावरी विस्तारे ।
पंच्यांसींलक्ष योजनांतरें । स्वर्गलोक असें ॥२६५॥

तयासी वल्लभ कर्तार । जाला आपण इंद्र ।
तरि तो हिरण्मयशरीर । अकारानें ॥२६६॥

येकमुखचर्तुर्भुजानें । येकसहस्त्रलोचनें ।
वस्त्राभरणगंधमाळानें । अळंकृत होऊनी ॥२६७॥

दधीची ऋषेश्वर । तयाची पुष्टि दीर्घाकार ।
अस्ति म्हणिजे वज्र । आयुध धरूनी ॥२६८॥

शचीदेवी संयुक्त । सकळैश्वर्यसंपन्नत्वे समस्त ।
मनूमुनी देवतांची नित्यकृत्य । सेवा घेत असे ॥२६९॥

तया देवता विशेष गुणी । अजानदेवता म्हणोनी ।
कर्मदेवता म्हणोनी । द्विप्रकार असती ॥२७०॥

त्याचे ठाई । श्टष्टिप्रारंभी तें पद सर्वथां ।
पावल्या त्या अजानदेवता । मनुष्ययोनी जन्मोनि यथा ।
प्रयत्नपूर्वक ॥२७१॥

अश्वमेधाधि परि यज्ञ । इष्टापूर्तादि कर्मादिकापासून ।
ते पद पावले जे कवण । त्या कर्मदेवता ॥२७२॥

तया कर्मदेवता इंद्राग्नी । यम बृहस्पती आदि करूनी ।
सकळ आसती म्हणोनी । तेही जाणती ॥२७३॥

अणीक त्या सकळ देवता आपण । अमृतमयशरीरानें ।
कंदर्पलावण्यानें । अनिष्यनेत्रें ॥२७४॥

महदैश्वर्यसंपन्नें । सुरस्त्रियसंभोगानें ।
महासुखसमंधाने । असती जाणावें ॥२७५॥

ते सेविती अमृतादिक । अहार तो भोग मुख्य ।
मदनी वुडोनी विशेख । झगेनि जाये ॥२७६॥

ना तरी मळमुत्र । परिपाके परिहर ।
कदा नाही साचार । म्हणोनि जाणावें ॥२७७॥

अणीक ते स्वर्गलोक । तयापासाव वरि विशेख ।
द्विकोटियोजनात महर्लोक । असे जाणावें ॥२७८॥

तयासी मृकुंड संतती । मार्कंडेय मुनेश्वर अधिपती ।
म्हणोनि त्याची आदि समस्ती । मुनिसंयुक्त ॥२७९॥

परमेश्वराचे आराधन । सामर्थ्यें नित्यव्यापकत्व पावोन ।
महासुख स्वरूपसंपन्न । होऊनि असे ॥२८०॥

अणीक ते महर्लोक । तयापासूनि वरि अष्टक ।
कोटियोजनांत जनलोक । असे जाणावें ॥२८१॥

तयासी वसिष्ठादि ऋषेश्वर । अधिपती होउनी पित्र ।
जन्हुजनासहीत संयुक्त तपोवर । राज्य करीत असती ॥२८२॥

तेथे तया ऋषेश्वराचे । पितृपितामह भूलोकाचे ।
ब्राह्मण तयाचे । गोत्र म्हणविती ॥२८३॥

तया कारणे तें । पितृलोक सत्यार्थें ।
आपणापे निरुतें । म्हणोनी घेत असती ॥२८४॥

आणीक ते आनलोक । तयापासूनि वरी द्वादशक ।
कोटियोजनात तपोलोक । असे जाणावे ॥२८५॥

तयासीं ब्रह्म्याचे मानसपुत्रजन । सनक सनंदन ।
तया सनातन । म्हणोनियां ॥२८६॥

सनत्सुजात सनत्कुमार । म्हणिजे पंचराज ऋषेश्वर ।
अधिपती होऊनि योगनिष्टवर । होऊनि असती ॥२८७॥

तया तपोलोकापासून । वरी षोडशकोटियोजन ।
अंतरे सत्यलोकस्थान । असे जाणावें ॥२८८॥

तयासी अधिपती निरुता । जो रजोगुणानें जगोत्पत्तिकर्ता ।
होऊनि असे कर्तापिता । महा तो जाला ॥२८९॥

तरि सुवर्णमयकांती अकार । शरीर अतिसुंदर ।
चतुमुर्ख अष्टनेत्र । विशाळेसी ॥२९०॥

यज्ञसूत्र अक्षमाळा । पाशदड कमंडला ।
सहीत वामदक्षिणकरकमळा । चतुष्टानें ॥२९१॥

दिव्यवस्त्रआभरणयुक्त । गंधमाळासहित ।
सकळ सामग्रीने अळंकृत । होऊनियां ॥२९२॥

सरस्वतीयुक्त मूर्तिमंत । होऊनि वेदपुरुषासहित ।
मरीची आदि समस्त । नवब्रह्म्यानें संमेळें ॥२९३॥

सकळ मुनिजनसमेत । इंद्रादि परि समस्त ।
सुरदेवतासहित । सेवा घेत असे ॥२९४॥

अणीक तया ब्रह्म्यासी प्राप्ती । चौसष्टसिद्धी आसती ।
तया सकळ सांगिजेती । विषद करूनी ॥२९५॥

पिशाच देवताजन । अंतर संपादन ।
तारतम्य दाखवीन । ते कैसे म्हणीतले तरी ॥२९६॥

स्थूळ सूक्ष्म होय अति । बाळक यौवन होय मिती ।
वृद्ध होय नाना जाती । रूप होय ॥२९७॥

धरत्रीविरहीत । उरलिया चतुर्थ ।
भूताने देहे धरुनी नीत । सुगंध सेवी ॥२९८॥

म्हणिजे इति अष्टक। पार्थिव सिद्ध विशेख।
पिशाचादिक पूर्वक। गुण होय ॥२९९॥

अणीक करी जळनिरशन। भूसदृश्य करी जळगमन।
अनातुरें समुद्रजळपान। करी हेळामात्रें ॥३००॥

निर्जीवनस्थानी जीवन। दर्शन दाखवी परिपूर्ण।
शिळादि ताडणाचे ठाई वर्ण। रहीत होऊनि असे ॥३०१॥

करपुटी समुद्र धरी। निरस वस्तु सुरस करी।
आपरहित देह धरी। उरले भूतत्रयानें ॥३०२॥

म्हणिजे या अष्टायसिद्धी। सहीत पूर्वोक्त अष्टगुणादि।
संयुक्त षोडशविधी। राक्षसगुण होय ॥३०३॥

अणीक शरीरीं। अग्निनिर्माण। अग्निभयबाधा निरशन।
जळांतु अग्निस्थापन। हस्ते पावकधारणादि ॥३०४॥

आग्न अतिशय पचन। अप्रयत्न जगतदाहन।
अग्निरहित देहधारण। वरिल भूतद्वयानें ॥३०५॥

म्हणिजे सप्त भिन्न। अतिसूक्ष्म गुण।
अदृश्य होऊन। असती ते ॥३०६॥

अतीत अनागत। वस्तु विसर्जनार्थ।
जाहला तो पदार्थ। जाणीव ते प्रतिभासा ॥३०७॥

प्रयत्नरहित दुरातन। शब्दहृण ते श्रवण।
सर्वजनवृत्तांत विषयज्ञान। तिये वाहती ॥३०८॥

प्रयत्नाविहीन। दिव्यदर्श ते दर्शन।
दिव्यरसस्वादन। ते अश्वादन ॥३०९॥

सकळ जनलोक। त्याचे ठाई विशेख।
दिव्यगंधादिक। जाण ते वेदन ॥३१०॥

म्हणिजे इति षट्क। उपसर्ग म्हणवी मुख्य।
हे सकळ मिळोनी येक। इत्याद्यष्ट तैजससिद्धी ॥३११॥

या संयोगे पूर्वोक्त। षोडशगुणासहित।
चतुर्विंशति मुख्य युक्त। यक्षगुण होय ॥३१२॥

अणीक मनोजय भूतजन। तयांतु प्रवेशन।
पर्वतादि भारधारण। गुरुत्वेंसी ॥३१३॥

हस्ते अनिळधारण । अग्रांगुळीने भूतकंपन ।
वायुरहीत गगन । मात्रे देहधारणा ॥३१४॥

म्हणिजे हे अष्टमारुत । सिद्धीसहीत प्रथमचतुर्थ ।
विंशतिगुणे संयुक्त । बत्तीस गंधर्वगुण होय ॥३१५॥

आणीक छायाविहीनता । इंद्रियसदृश्यता ।
खोरगमनता । यथेष्ट विषयसंगती ॥३१६॥

पर्वतादि कल्पन । शैलगर्भीकरण ।
आकाशपिंडीकरण । अशरीरत्व ॥३१७॥

म्हणिजे आकाश । सिद्धिसंयोगे प्रथम बत्तीस ।
गुणसंयुक्त चाळीस । इंद्राचा गुण होय ॥३१८॥

अणीक यथाकामोपलब्धी निपुण । यथाकामविनिर्गमन ।
सकळतिरस्करण । अखिल परी ॥३१९॥

गुह्यार्थदर्शन । कर्मानुगुणे निर्माण ।
सर्ववश्यत्व प्रियचेत्वदर्शन । संसारदर्शनादिक ॥३२०॥

म्हणिजे ह्या अष्टमानस । सिद्धिसंयोगें प्रथम चाळीस ।
सहीत अठेताळीस । सौम्यगुण होय ॥३२१॥

अणीक छेदन । ताडण बंधन मोचन ।
ग्रहण संसारपरिवर्तन । प्रसाद मृत्युकाळजय ॥३२२॥

म्हणिजे अष्टअहंकारसिद्धी विशेष । या संयोगे पूर्वोक्त अठेताळीस ।
संयोगे छपन्न गुण विशेष । प्रजापतीचे होय ॥३२३॥

आणीक जगज्जनन । जगत्परिरक्षण ।
जगत्संहारण । इष्टादि कारणादि ॥३२४॥

अभिमत्तलोकप्रवर्तन । अदृश्यनिर्माण ।
असूभरण सुभरण । म्हणिजे इति ॥३२५॥

ह्या अष्टबुद्धिसिद्धिसंयोगें । पूर्वोक्त छपन्न गुणसंगें ।
चौसष्टगुणे संपन्न होऊनि आंगे । सत्यलोकी ब्रह्मा असें ॥३२६॥

इति पृथ्वी आदि बुद्धांत । अष्टतत्व यजने सिद्धी समस्त ।
पिशाचादि ब्रह्मदैवत । पद या प्रकारें असें ॥३२७॥

तयावरी प्रकृतीत तत्वादि जयानें । सिद्धी होय तयानें ।
विष्णुपद अगणित महिमानें । असें म्हणोनी जाणावें ॥३२८॥

आणीक तया सूर्यापासाव । सकळ देवता दानव ।
उत्पत्तीक्रम परिभाव । कैसे म्हणीतले तरी ॥३२९॥

प्रथम सृष्टीचे ठाईं तयां । ब्रह्मयाच्या नेत्रापासूनिया ।
मरीची जन्मला हृदया । पासूनि भृगू जन्मला ॥३३०॥

शिरसी अंगिरस जनित । उदानवायूचे ठाईं पुलस्त्य ।
व्यानवायूचे ठाईं सत्यार्थ । पुलह जन्मला ॥३३१॥

अपानवायूचे । ठाईं ऋतू जन्मला साचे ।
प्राणवायूचे । ठाईं दक्ष जन्मला ॥३३२॥

श्रोत्राचे ठाईं अत्री जन्मला । समानवायूचे ठाईं वसिष्ठ संभवला ।
संकल्पाचे ठाईं सकळा । धर्मदेवता जन्मल्या ॥३३३॥

इति मरीच्यादि वसिष्ठांत । जे जाले परिजनित ।
ते नवब्रह्मे विख्यात । म्हणवीत असती ॥३३४॥

यानंतरे तया आंत । मरीचीसी धर्मवंत ।
कश्यप ब्रह्मसुत । येक जाला ॥३३५॥

तया दक्षब्रह्मयाची सुती । प्रथं आदिती दिती ।
धेनुकाळी अनायुती । संहिकी मुनी ॥३३६॥

प्रवाही अरिष्ट म्हणोन । वैनिता कपिला म्हणऊन ।
कंद क्रोधी म्हणिजे भिन्न । त्रयोदश स्त्रिया ॥३३७॥

तया भीतरीं । आदित्याचे उदरी ।
धात्रादि विष्णवांत परी । क्रमें द्वादशादित्य ॥३३८॥

इंद्रादी समस्ती । त्यत्तीस कोटी मितीं ।
देवतासंतती । जन्मल्या ॥३३९॥

अणीक सूर्यनारायणासी । वैवस्वतमनू जन्मला तयासी ।
इक्ष्वाकु आदि विशेषी । संतानपरंपरा ॥३४०॥

राम लक्ष्मण भरत । शत्रुघ्नाआत ।
क्षत्रि राजगर्व समस्त । संभवले ॥३४१॥

अणीक तया वैवस्वतमनूसी । इच्छा म्हणिजे पुत्री तयासी ।
चंद्राच्या पुत्रबंधुसंयोगेसी । पुरीरव जन्मला ॥३४२॥

तयासी आयू म्हणिजे सुत । आदि संतती पांडव जन्मे जयांत ।
सकळ क्षेत्री जनित । म्हणोनि जाणावें ॥३४३॥

अणीक दुसरियासी । दिती म्हणिजे तियेसी ।
छपन्नकोटी अतिशयेसी । राक्षस जन्मलें ॥३४४॥

तया हिरण्यकश्यपासी सुह्रद । प्रल्हाद संवाद ।
शिनी भास्कर म्हणिजे प्रसिद्ध । पंचपुत्र जन्मले ॥३४५॥

तया प्रल्हादालागुनी । कुमार विरोचनी ।
कुंभ निकुंभ म्हणिजे भिन्नीं । तृतीयवर्ग ॥३४६॥

तयांतु विरोचनासी । बळी जाला तयासीं ।
बाणासुरादी विशेषी । शतपुत्र जन्मले ॥३४७॥

अणीक तृतीय । धेनू म्हणिजे तिये ।
लागूनि क्रूरमय । चाळीस नव जन्मले ॥३४८॥

अणीक चतुर्थी । काळी म्हणिजे सुती ।
तियेसी उत्पत्ती । निवांत कवचासुर जाले ॥३४९॥

पंचमी अळधुती । म्हणिजे तियेसी संतती ।
व्रतासुरादि मिती । चाळीस पुत्र जाले ॥३५०॥

षष्ठमांस संहिकी स्त्री । तियेचे उदरी ।
रोहो आदि चारी । कुमर जन्मले ॥३५१॥

अष्टमा प्रवाहीसि चिंतामणी । सकल लोहखाणी ।
सप्तकन्या सुकामिनी । दशपुत्र जन्मले ॥३५२॥

अणीक नववी अरिष्ट । तयेसी दशअप्सरा स्त्रियाकूट ।
तुंबर आदि चतुष्ट । कुमर जन्मले ॥३५३॥

अणि दशमावरी सुनता । तयेसी गरुड अरुण तथा ।
वज्र आणी वीज वरुणादी जळदेवता । जन्मलियां ॥३५४॥

अणीक येथे गरुड । बीज उभय जन्मली जोड ।
म्हणउनी अखंड । सर्पांसी वैर ॥३५५॥

जळदेवत बंधू समंध म्हणऊनी । वर्षाव होय तेथोनि ।
अतिगर्जना करोनी । जीव वेव्हारत असे ॥३५६॥

अणीक येकादशादि कामिनी । कपिला म्हणिजे तयेलागुनी ।
अमृत आणि ब्राह्मणी । जन्मले जाणावें ॥३५७॥

द्वादश विकटेसी विशेख । अनंत वासुकी तक्षक ।
आदि नागकुळ सहस्त्रयेक । जन्मले जाणिजें ॥३५८॥

त्रयोदशात्री तयेसी । पर्वतावरी कोळ्ही येक लोकवासी ।
बाधक क्रोधात्मक विशेषीं । द्वादशकन्या ॥३५९॥

जन्मल्या आणीक तयाभीतरीं । भद्रा म्हणिजे प्रथमपुत्री ।
तयेच्या उदरीं । ऐरावती जन्मला ॥३६०॥

शेती म्हणिजे दुसरी । कन्या तयेचे उदरीं ।
उरले गज परी । सकळ जन्मलें ॥३६१॥

मातंगी म्हणिजे तृतीया । कन्या तयेपासूनियां ।
उरली अतिशया । गजजाती जन्मली ॥३६२॥

गधर्वी म्हणिजे चतुर्थी । कन्येपासूनि उत्पत्ती ।
जाली परि समस्ती । अश्वजाती ॥३६३॥

शार्दुळा म्हणिजे पंचमकन्येसी । जन्मले सिंह नुसधे विशेषीं ।
हरी म्हणिजे षष्ठम तयेसी । वानर जन्मले ॥३६४॥

हगी म्हणिजे सप्तमपुत्री । तियेचिये उदरीं ।
जन्मली अखिल परी । मृगजाती ॥३६५॥

मृगमदा म्हणिजे विशेष । अठवी कन्या तियेस ।
गंगावन गौरीस । जाती जन्मली ॥३६६॥

सुरजा म्हणिजे सुती । नववी तियेपासूनि उत्पत्ती ।
जाली सर्पजाती । नानापरी ॥३६७॥

नळा म्हणिजे दशमसुती । तयेसी फुलावीण फळे येती ।
ते अश्वत्थादि रुक्षजाती । जन्मलिया ॥३६८॥

कुही म्हणिजे सुलक्षण । येकादशात्रे कन्येपासुन ।
फूलफळयुक्त विभिन्न । वृक्षजाती जन्मली ॥३६९॥

विरोधा म्हणिजे कामिनी । द्वादशाची तियेपासुनी ।
तरुगुल्मलता नाना तृणी । आदि उदित जाली ॥३७०॥

इति सकळ परिभिन्न । सांगीतले निरोपण ।
मरीची ब्रह्मयाचे संतान । म्हणवी जाणावें ॥३७१॥

यानंतरें तया भृगूसी । कवी म्हणिजे पुत्र जाला तयासी ।
शुक्र जन्मला तो दैत्यासी । गुरु होऊनि असें ॥३७२॥

अणीक तया अंगिरासी । बृहस्पती जन्मला तो विशेषी ।
आचार्या सुरसंमोहासी । होऊनि असें ॥३७३॥

आणीक तया पुलस्त्यातें । विश्वावसू जन्मला यातें ।
कुबेर किन्नर निरुतें । जन्मले पैं ॥३७४॥

आणीक तया विश्वावसूसी राक्षसा । पुत्री जन्मल्या कैकशा ।
पुष्पोत्कटा म्हणिजे विशेषा । उभयस्त्रिया ॥३७५॥

तयांतु कैकशा म्हणिजे आपण । तियेसी रावण कुंभकर्ण ।
बिभीषण म्हणवी भिन्न । त्रयपुत्र जाले ॥३७६॥

पुष्पोत्कटा म्हणिजे सुंदर । तियेसी खर दूषण त्रिशिर ।
शूर्पणखी म्हणिजे त्रिपुत्र । येकी कन्या जन्मली ॥३७७॥

यानंतरे तया पुलस्ती । लागूनि कैंपुरुषजाती ।
व्याघ्रादि समस्ती । मृग जन्मलें ॥३७८॥

अणीक तया क्रतूसी । सूर्याग्नी तेजयुक्त विशेषी ।
कवण येक वरूशेषी । जन्मले जाणावे ॥३७९॥

यानंतरे तया दक्ष । ब्रह्मयापासूनि असेख ।
पन्नास कुमरी मुख्य । जन्मलियां ॥३८०॥

तयातु कीर्ति लक्ष्मी धृती । मेघा पुष्टि श्रद्धावती ।
क्रीडा बुद्धि लज्जामती । म्हणिजे हिया ॥३८१॥

दशसंख्या कन्यारूप । ब्रह्मयापासूनि संकल्प ।
जनीत धर्मदेवता स्वरूप । तयासी दिधलियां ॥३८२॥

अदिती प्रथम । त्रयोदशकन्यास्थोम ।
पूर्वोक्त कश्यप ब्रह्म । यासी दिधलिया ॥३८३॥

अश्विनी आदि करुनी । सप्तविंशति कामिनी ।
तया समस्ता चंद्रालागुनी । दीधलिया ॥३८४॥

अणीक तया धर्म । देवतांसी सम ।
काम हर्ष म्हणिजे उत्तम । त्रयपुत्र जाले ॥३८५॥

तयांतु शमांसी प्रीति । कामाभिरती ।
हर्षासी आनंदती । म्हणिजे स्त्रियां ॥३८६॥

तया इही अखिल । जगताचिया सकळ ।
धर्मासी अनुकूळ । होऊनि असती ॥३८७॥

यानंतरें तया अत्री । लागूनि दुर्वास दत्तात्री ।
चंद्रमा म्हणिजे त्रि । पुत्र जाले ॥३८८॥

तया चंद्रासी मुख्य । बुध म्हणिजे विशेख ।
कुमर येक । जाला निरुता ॥३८९॥

अणीक तया वसिष्ठालागून । शक्ति पराशर व्यास म्हणोन ।
शूकादि ऋषिसंतान । उदीत जाले ॥३९०॥

या प्रकारे हिया नाव । ब्रह्मयापासाव ।
श्रृष्टिकर्मउद्भव । जाले जाणावें ॥३९१॥

यानंतरे तया कारण । आदि ब्रह्मयालागून ।
प्रजापतीसंतान । जाले जाणिजें ॥३९२॥

तया धर ध्रुव सोमेश । आप नीळ अनळ पीयूष ।
प्रभास म्हणिजे अष्टश । जाले जाणावें ॥३९३॥

तयांतु धरासी द्रविण । म्हणिजे पुत्रसंतान ।
उदीत जाले ध्रुवासी काळ म्हणोन । पुत्र निरुता ॥३९४॥

सोमासी सुवर्च म्हणिजे पुत्र । अपासी शांत म्हणिजे कुमर ।
अनिळासी साचार । पुरोचन म्हणिजे सुत ॥३९५॥

अनिळासी जाती । पुत्र म्हणिजे संतती ।
पत्युषासि शीर्षोत्पत्ती । देवल महामुनी ॥३९६॥

प्रभासासी बृहस्पतीचें । पाठीं जनित जाली साचें ।
योगसिद्धी म्हणिजे क्रियेचे । संगती करुनी ॥३९७॥

विश्वकर्मा जन्मला । तो देवतांसी सकळा ।
शिल्पिकसंमेळा । नायक असे ॥३९८॥

अणीक तया विश्वकर्म्याची कन्या । वडभी म्हणिजे सुमना ।
तयासी सूर्यसमंधे संताना । अश्विनौ देवता जन्मल्या ॥३९९॥

तया अश्विनीदेवतेसी उत्पत्ती । गुह्यक म्हणिजे देवताजाती ।
जन्मोनी औषधी समस्ती । जनीत जाल्या ॥४००॥

यानंतरे तया अतिब्रह्मयालागुन । येक धात्रा म्हणऊन ।
येक विधात्रा म्हणोन । उभयपुत्र जाले ॥४०१॥

ते द्वितीय इहीं जन । सकळ लोकाचे पुण्य ।
पाप चाळवणार होऊन । असती जाणावें ॥४०२॥

तयासी लक्ष्मी म्हणोनी । ज्येष्ठादेवी म्हणऊनी ।
उभयवर्ग वहिणी । असती जाणावें ॥४०३॥

तयामध्ये लक्ष्मीसी जातीं । अश्व जाले उत्पत्ती ।
ज्येष्ठ जेठीसि सुती । सत्रादेवी म्हणिजे जाली ॥४०४॥

तयेसी गौडी पैष्ठी मध्विकी । म्हणिजे त्रिविध सुरी विशेखीं ।
जन्मल्या त्या सूर्यापासूनि शेखीं । धर्म जन्मला ॥४०५॥

तया धर्मासी भय म्हणोनी । महद्भय अंतक म्हणऊनी ।
त्रयपुत्र आणि कोह्नी । येक कन्या जन्मलिया ॥४०६॥

तयापासाव क्रौंच वायस । गृध्र सिकरे राजहंस ।
शुक कोकिळ चास । चक्रवाकें ॥४०७॥

वकादि अनेकविध । नानापक्षजातीभेद ।
जन्मली बहुविध । म्हणोनि जाणावें ॥४०८॥

इति सांगीतल्या प्रकारें । सर्व जनाचा जनक ब्रह्मा साचारें ।
जाहला असें तयाच्या सुख आदरें । कैसे म्हणीतले तरी ॥४०९॥

क्रिमी कीटक पतंग पशु । आदि करुनी वहुवसु ।
जीवजाती अतिविशेषु । जाला तो नरजन्म ॥४१०॥

तयातु आयुरारोग्यतां । कुळ वळ प्रताप स्वरूपता ।
यौवन विद्या समुदादी यथा । सौभाग्यांतु ॥४११॥

काहीं येक उणे न होतां । अखिल सामग्रीने संपन्नता ।
सप्तमुद्राधीश्वरकर्ता । पती होऊनि असे ॥४१२॥

तया राजेंद्रासी विशेख । सार्वभौम्य सकळीक ।
नरापरीस शतगुणसुख । संभवत असे ॥४१३॥

तयापरीस शतगुणाधिक्य । मनुष्यगंधर्वासी सूख ।
तयाहूनि शतगुणोत्तर मुख्य । देवगंधर्वासी सौख्य ॥४१४॥

तयापरीस शतगुणोत्तर । पितृजनासी सुखांकुर ।
तयाहूनि शतगुणोत्तर । सुख चीर कनिष्ठदेवताचे ॥४१५॥

तयाहूनि शतगुणोत्तर विशेख । मध्यदेवतासी संतोषसुख ।
तयापरीस शतगुणोत्तर सुखसंतोष । विशिष्टदेवतांसी ॥४१६॥

तयापरीस शतगुणोत्तर । इंद्रासी सुख निरंतर ।
तयासी शतगुणे विशेषात्कार । बृहस्पतीचे सूख ॥४१७॥

तयापरीस शतगुणोत्तर । ब्रह्मयास सूख चिर ।
इति महासुखस्वरूपे स्थिर । सत्यलोकीं ब्रह्मा असें ॥४१८॥

अणीक तया सत्यलोकापासून । वरी चतुर्थकोटीयोजनें ।
अंतरे वैकुंठस्थान । असे त्याचे ठाई ॥४१९॥

अंतर तम बाह्य सत्वगुण । व्यसने जगाचे सृष्टिस्थितिनिर्माण ।
कर्तु होऊनि असे नारायण । तो जाला तरी ॥४२०॥

नीळवर्णमय शरीर । येकमुख द्विनेत्र ।
शंख चक्र गदा पद्म वाम दक्षिण कर । चतुष्टेसीं ॥४२१॥

वनमाळा पवित्र पीतांबर । किरीट कौस्तुभादी अळंकार ।
दिव्यगंधमाळादिक अतिश्रृंगार । होऊनी लक्ष्मीसहित ॥४२२॥

ज्ञान शक्ती बळ म्हणोन । ऐश्वर्य तेज वीर्य म्हणऊन ।
म्हणिजे वैष्णवोक्त षड्गुण । संपन्न होऊनी ॥४२३॥

मच्छ कूर्म वराह नारसिंह वामन । फरशराम रघुराम यदुरामकृष्ण ।
बौध्य कल्की म्हणिजे दशसमान । अवतारासहित ॥४२४॥

अनिरुद्ध रुक्मांगद । अंबरीष प्रल्हाद ।
पुंडरीक नारद । गजेंद्र मुद्र ॥४२५॥

उद्धव संकेत भीष्मादि बिभीषण । क्षपादि भागवतजन ।
संमोहाने अतिपूज्यमान । होऊनि असे ॥४२६॥

येकदंडी द्विदंडीयादि समस्त । आपुलिया भक्तजनासंयुक्त ।
ब्रह्मेंद्र देवतासहित । सेवा घेत असे ॥४२७॥

आणीक तया वैकुंठापासून । वरी येककोटीयोजन ।
अंतरे आसे आपण । षण्मुखलोक ॥४२८॥

तयापासोनि वरी । एककोटीयोजने दुरी ।
अंतरे आसे साचारीं । उमालोक ॥४२९॥

तेथूनि वरी येक । कोटियोजने पूर्वक ।
अंतरे कामधेनूलोक । असे जाणावें ॥४३०॥

तेथूनि वरी द्विकोटियोजन । अंतरे ज्योतिर्मयघन ।
महामुक्तिकारणस्थान । इंद्रलोक असे ॥४३१॥

तेचि कैलास म्हणोनी । प्रथमलोक म्हणवोनी ।
परिणाम पावोनी । शोभत असे ॥४३२॥

अतिविचित्र अतिआश्चीर्य । अतिसुख मंगळमय ।
प्रकाशमान अतिशय । असे त्याचे ठाईं ॥४३३॥

अंतर सत्व बाह्य तमोगुणयुक्त । जगताचे सृष्टिसंहारकृत्य ।
स्थितिकर्तु होऊनी परिख्यात । तो जालातरी ॥४३४॥

गोक्षीरधवल द्युतिमयशरीर । जटाजूटचंद्रकळानिर्भर ।
येकमुख तृतीयनेत्र । नीळकंठसहित ॥४३५॥

फरश आणी मृग । वराभयसहीत चांग ।
वामदक्षिणअंग । करचतुष्टे शोभें ॥४३६॥

आत्माराम आपण होय स्वयें । तयाकारण बाह्यविषय ।
व्यामोहनादि म्हणो दृष्टिनिग्रह । सृजावया कर्ता होऊनि असे ॥४३७॥

वेष्टणप्रावर्ण गजव्याघ्राजिन । सर्पाभरण भस्मोद्धूलन ।
शिरोमाळादिके पूर्ण । अलंकृत होऊनि ॥४३८॥

गिरजाभवानी । युक्त होऊनी ।
सकळ देवतामंणी । सर्व सौभाग्य म्हणवी ॥४३९॥

सत्य क्षमावृत्ती । अधिष्ठिता आत्मरती ।
सृष्टि विरती । तपसादिक ॥४४०॥

मति ईश्वरत्व । म्हणिजे दशत्व ।
कल्याण ठाणत्व । संयुक्तेसीं ॥४४१॥

सत्वज्ञात्वादि षड्गुण ज्ञानादि षड्गुण । अणिमादि अष्टमासिद्धिगुण ।
महदैश्वर्यादि संपन्न । होऊनि असे ॥४४२॥

गंगावाळुसमान रुद्रेसी । ब्रह्मेंद्र उपेंद्र मनु मुनि सुमानसीं ।
आदि देवता सकळ श्रेष्ठेसीं । सेवा घेत असे ॥४४३॥

अणीक तया अष्ट । अणिमादि सिद्धिकूट ।
तयाचे लक्षण उत्कृष्ट । कैसे म्हणीतलें ॥४४४॥

अत्यंत सूक्ष्म प्राणिमात्र । तयाचे आत्मत्वे अंतर ।
प्रवेशोनि करणे वर । ते अणिमा म्हणवी ॥४४५॥

ब्रह्मांडी शिवाआत । छत्तीस तत्वासी समस्त ।
बाह्य व्यापूनि प्रवर्तवीत । असे ते महिमा ॥४४६॥

महामेरुपर्वतासीं । समान होणें स्वशरीरेसीं ।
वरी अंतरिक्ष आकाशीं । गमनादिक ॥४४७॥

प्रत्यक्षाचे ठाईं स्वगुणें । परिमाणासीं तत्क्षणें ।
सदृश्यत्व होणें । ते लघिमा ह्मणवीं ॥४४८॥

जे परमाणूसीं दृश्य होणें। ते देह उन्नत वाढऊनि कृत्यानें।
मेरूसमान भार होणें। तें गरिमा म्हणवीं ॥४४९॥

स्वस्थासनी आसोनी आपण। समस्तलोकापेक्षिता कारण।
यथादर्शने देणें। ते प्राप्ती म्हणवीं ॥४५०॥

आपुले इच्छेकरून। महदाकाशी गमन।
आदि सर्वादि संपन्न। ते प्रकाश म्हणवी ॥४५१॥

स्वशरीरप्रकाशानें। अतिप्रकाश करणें।
सकळ लोकाकारणे। ते प्रकाशत्व म्हणवी ॥४५२॥

स्वइच्छामात्रें जगउत्पत्ती। आदि कृत्य करणे समस्तीं।
सूर्यादि देवतासीं प्रति। प्रेरक होणें ॥४५३॥

ईश्वरत्व सकळदिक्पाळासी मिळोन। ते जग आपणा आधीन।
चालवणे शिवत्व म्हणऊन। निर्धारानें ॥४५४॥

अणीक तया रुद्रलोकापासून। ब्रह्मांडकटोरांत भशून्य।
येककोटीयोजन। प्रमाण असें ॥४५५॥

यानंतरे विशेषीं। तया ब्रह्मांडासी।
बाहेर प्रदेशीं। अग्रस्थानीं ॥४५६॥

बत्तीस कोटियोजन। विशाळ उन्नत होऊन।
असे शिवलोकस्थान। परिख्यात ॥४५७॥

तयासी ज्योतिर्मयकांती। भवतें दुर्ग बत्तीसकोटि मिती।
योजने विस्तीर्ण अती। रम्य होऊनि असे ॥४५८॥

तयासी अतिविचित्र। रचनेची मनोहर।
असती पै साचार। अष्टद्वारें ॥४५९॥

तयासी अतिपराक्रमाचें। राखणाइत भैरव साचें।
असती लक्षणें तयाचें। कैसे म्हणीतले तरी ॥४६०॥

प्रथम भैरवमूर्ति। रक्तमयवर्णकांती।
शरीर दीर्घ अति। येकमुख त्रिनेत्र ॥४६१॥

दंड कमंडल। पाश जपमाळ।
धरूनि करकमळ। चतुष्टाने ॥४६२॥

ब्रह्मी म्हणिजे स्वशक्तियुक्त। हंसवाहना संयुक्त।
अपण समान स्वतमत्त। भैरवादिक ॥४६३॥

सप्तकोटीसंमोह सर्व । संमेळेसी शोभत पूर्व ।
दारवठा महाभैरव । म्हणोनी प्रसिद्ध असे ॥४६४॥

अणीक हिरण्यमय । शरीरें स्थूळ अतिशय ।
येकमुख त्रितीय । नेत्रकमळ ॥४६५॥

शूळ डमरुग । खड्ग खट्वांग ।
धरुनी वामदक्षिणांग । करचतुष्टानें ॥४६६॥

माहेश्वरीशक्तिसमेत । अजावाहनसहित ।
अपणासमान युक्त । षोडशकोटी ॥४६७॥

भैरव प्रतापवंत । संमेळेसी शोभत ।
अग्निद्वारी कृतांत । रुरू म्हणिजे भैरव असें ॥४६८॥

अणीक सुवर्णमयकांति । स्थूळशरीरे महामूर्ति ।
येकमुख त्रिती । नेत्रेसहित ॥४६९॥

शुक्र वज्रशक्ती । शूळ धरूनि हातीं ।
वाम दक्षिण प्रति । चतुष्टानें ॥४७०॥

कौमारी म्हणिजे शक्तिसंमेळानें । मयूरमहावाहनें ।
आपणासमान । भैरवमूर्ति ॥४७१॥

पंचकोटिसहित । अति परिवेष्टोनी शोभत ।
दक्षिणद्वारस्थित । चंड म्हणिजे भैरव असे ॥४७२॥

अणीक सुवर्णमयकांती । महाचारमूर्ति ।
दीर्घशरीर अति । येकमुख त्रिनेत्र ॥४७३॥

शंख आणी चक्र । गदा पद्मधर ।
वामदक्षिण कर । चतुष्टानें ॥४७४॥

वैष्णवी म्हणिजे विशेषीं । स्वशक्तीसंमेळेसीं ।
गरुडवाहनासीं । अपणासमान ॥४७५॥

पंचकोटी भैरवमूर्ति । संयोगे परिवेष्टोनि अति शोभती ।
नैऋत्यद्वारठाई असे परिख्याती । क्रोध म्हणिजे भैरव ॥४७६॥

अणीक मयूरवर्णमय । शरीरे छत्र अतिशय ।
येकमुख अक्षत्रय । अवेवेसीं ॥४७७॥

शंख फळक खेटक । मुशलादी आयुधादिक ।
धरुनियां हस्तक । चतुष्टानें ॥४७८॥

वाराही म्हणिजे शक्तियुक्त । महिषीवाहनासहित ।
अपणासमान संतत । भैरवमूर्ति ॥४७९॥

शतकोटीसहित । अति परिशोभित ।
वरुणद्वारी उन्मत्त । भैरव असे म्हणिजें ॥४८०॥

आणीक माणिक्यवर्णमय । सिकराकाराने अतिशय ।
येकमुख अक्षत्रय । अवयवेसीं ॥४८१॥

वज्रशक्ती धनुक । शर धरुनी पूर्वक ।
वामदक्षिण हस्तक । चतुष्टानें ॥४८२॥

माहेंद्री म्हणिजे शक्तियुक्त । राजवाहनसहित ।
आपणासमान अद्भुत । महापराक्रमी ॥४८३॥

त्रिकोटीभैरवासहित । परिवेष्टोनि विराजत ।
वायव्यद्वारी विख्यात । कपाली म्हणिजे भैरव असें ॥४८४॥

अणीक धूम्रवर्णमयकांती । भयंकमें अति शरीरस्थिती ।
येकमुख तृती । नयनसहित ॥४८५॥

शूळ डमरु घंट । कपाळादी चतुष्ट ।
धरुनियां वामदक्षिणकरसंपुट । चतुष्टानें ॥४८६॥

चामुंडा म्हणिजे विशेख । स्वशक्तीसहीत काक ।
वाहनेसी पूर्वक । अपणासमान ॥४८७॥

द्वादशकोटी भैरवजन । संमेळेसी आपण ।
उत्तरद्वारीं भीषण । म्हणिजे भैरव असे ॥४८८॥

अणीक हेमवर्णमयदेह । अतिप्रचंड विग्रह ।
येकमुख त्रितीय । नेत्रकमळेसीं ॥४८९॥

खड्ग गदा खेटक । फळक धरुनियां पूर्वक ।
वामदक्षिण चतुष्क । हस्तकानें ॥४९०॥

माहेंद्री म्हणिजे शक्तियुक्त । वृषभवाहनसहित ।
आपणासमान अत्यंत । प्रतापिये ॥४९१॥

भैरव अष्टकोटिमूर्ति । संमोहेसी शोभत अति ।
ईशान्यद्वारे असे अधिपती । संहार म्हणिजे भैरव ॥४९२॥

इति भैरवसंमोहता । आपुल्या स्मरणमात्रे सर्वथां ।
सकळ विघ्नव्यथा । परिहरती जाणावें ॥४९३॥

अणीक अष्टभैरवद्वार । लंघूनिया अंतर ।
निघोनिया विस्तार । पाहिला तरी ॥४९४॥

नेत्रासी मंगळदर्शने प्रीति पुरें । मनासी मनोहर होऊनि मुरे ।
वाचेसी अगोचर होऊनि स्थिरें । तैसे आपसमान ॥४९५॥

मयमंडपादि कृत्य । विश्यकर्म्यादि समस्त ।
शिल्पिक कल्पित । विरहीत असें ॥४९६॥

मंजूरमय रंजित होउनी । अंतरेअंतरे स्थानस्थानीं ।
भीति मेरु चित्रकर्मज चिंतामणी । कार्य काळ कृतीं ॥४९७॥

कोटि उपकोटी अमित्य । सुवर्णकळसेसीं रंजित ।
महागुण असंख्यात । संमोहाची मंदिरे ॥४९८॥

उभयविदीसंमत्त । सोमसूर्यासहित ।
वल्लीने अपरिमित । उपविदिसहित ॥४९९॥

पैं नीर छिडक्यानें । कस्तुरी सारवणें ।
कुंकुम मांडण्याने । मौक्तिक करांगुळियां ॥५००॥

ताटतोरणें मरगजतोरणें । आणि हेमतोरणें ।
नानावस्त्रादि तोरणें । अनेकरचना ॥५०१॥

वृषभध्वजपताका । झळकती अनेका ।
पुष्पवृष्टी घरी भाका । निरंतर वर्षे ॥५०२॥

धूपधूम्र सुगंधवास । वेदागमशास्त्रघोष ।
नाना वाद्यविशेष । ध्वनिगर्जना होय ॥५०३॥

सकळ गणेश्वर । मध्यप्रदेशी साचार ।
येक दाटसांद्र । संमोहानें ॥५०४॥

अतिविशेष शृंगार । लावण्य सकुमार ।
शरीरानें रुद्र । गणींसहित ॥५०५॥

सकळ सुखमय । भोग परि अतिशय ।
संपन्न होऊनि ऐश्वर्य । असती तयानें ॥५०६॥

अत्याश्चर्य अत्यद्भुत । अतिकौतूक अतिमंडित ।
अतिनवल अतिमंडित । विचित्रमय ॥५०७॥

अतिशोभा शोभन । अतिरम्य अतिनूतन ।
अतिविशाळ होऊन । प्रकाशत असे ॥५०८॥

तया मध्यस्थानी कारण । श्री शंभूचे राजभुवन ।
पंचविंशतिकोटि योजन । विस्तीर्ण असे ॥५०९॥

तयासी अतिविचित्र । दारवठे चतुर्थप्रकार ।
तयातु पूर्वदिशाद्वार । वटाचे गोपुर तें ॥५१०॥

ऋग्वेदमय संततोदित । धवलवर्ण विजृंभित ।
लक्षयोजने विशाळ उन्नत । होऊनि असे ॥५११॥

तया दारवठा चतुर्थ । अंबुजकूष्मांड गणसंयुक्त ।
वेत धरुनिया राखत । असे नंदीश्वर ॥५१२॥

अणीक दक्षणदिशे । द्वार गोपुर तें सरिसें ।
यजुर्वेदमय विशेष । प्रकाशस्वरूपें ॥५१३॥

विजृंभित नीळवर्ण । येकलक्षयोजन ।
विशाळ उन्नत होउन । असे निरुतें ॥५१४॥

तये द्वारी निरंतर । असंख्यात रोमगणेश्वर ।
संमेळेसीं वीरेश्वर । राखत असे ॥५१५॥

अणीक कपिल मंदिक । द्वार गोपुर तें अशेख ।
सामवेदमय मुख्य । होऊनि असे ॥५१६॥

शुभ्राकारवर्ण । येकलक्षयोजन ।
विशाळ उन्नत होऊन । शोभत असें ॥५१७॥

तया दारवठा अगणित । रुद्रगणसंयुक्त ।
राखत असे नीळलोहित । म्हणिजे गणेश्वर ॥५१८॥

आणीक उत्तर दिशें । द्वारी गोपुर जे असें ।
ते अथर्वणवेदमय सरिसें । होऊनि असें ॥५१९॥

तयादारवठा असित्य । प्रथमगणेश्वरसहित ।
महाकाळ म्हणिजे रुद्र विख्यात । राखत असे ॥५२०॥

आणीक चतुर्थदिशा । द्वारानुकरूनि प्रवेशा ।
निरक्षले तरी दृष्टी ऐसा । आश्चीर्य असें ॥५२१॥

वर्णावयासीं अनुपम्य । सर्वेश्वराचे निरोपम ।
सभामंडप उत्तम । परिशोभत असें ॥५२२॥

तयाचे मध्यस्थानीं । कोटिसंख्या तरणी ।
प्रभा अछादुनी । प्रकाशत असे ॥५२३॥

दिव्यसंहासन । येकलक्षयोजन ।
विशाळ उन्नत होउन । शोभत असे ॥५२४॥

तया सिंहासनाग्रीं गुण । त्रयासी जो विलक्षण ।
प्रणवांतकारण । निष्कळंकस्वरूप ॥५२५॥

ब्रह्म्यादि त्रिमूर्तिंसी ध्यायमान । होउनी असे आपण ।
परीतयासी अंतरध्यान । आन येक वस्तूचे नसें ॥५२६॥

त्रिमूर्तिदेवताचे ध्यान । त्याचे ठाई आपण ।
तूर्यात्मक विद्यमान । होऊनि असे ॥५२७॥

घृतकाठिण्यन्यायें । सच्चिदानंदात्मक अद्धय ।
ब्रह्म ते साक्षांत विग्रह । साकार जालें ॥५२८॥

शिव रुद्र महादेव । महालिंग महाभस्मादि परि नाव ।
स्वाज्ञाधारी पंचकृत्य सर्व । कर्तत्व करीत असे ॥५२९॥

सत्यकाम सत्य । विकल्पादी समस्त ।
कल्याणगुणभरित । सिंधु म्हणवी ॥५३०॥

सकळ देवताजन । शिरस संमोहालागून ।
अपण समुद्रस्थान । जाला असे ॥५३१॥

सस्वरूप अनुसंधान । प्रमोदाने चेष्टमान ।
सूत्रीक आपण । जाला असे ॥५३२॥

सर्वांतर्यामी होउन । सर्वकारण होऊन ।
सर्वमायात्री होउन । असे समानत्वें ॥५३३॥

स्मरणमात्रे पापराशी अनेक । भस्म करूनि भोगमोक्षप्रदायक ।
सांवशिव मुख्य । जालातरी ॥५३४॥

स्फटिकेसुवर्णमय निष्कळ । शरीर प्रकाशमान अमळ ।
चंद्रार्कमंडितभाळे । प्रसन्नवदन ॥५३५॥

अनंतकोटिकंदर्प । लावण्यानें सुरूप ।
त्रिनेत्र नीळरूप । ग्रीवासहित ॥५३६॥

अभयवरहस्त । उभयाने शोभिवंत ।
धवळ यज्ञोपवीत । वामांगीसहित उमा ॥५३७॥

वेष्टणप्रावर्ण । गजव्याघ्राजिन ।
गुदपादतळ सगुण । पद्मसहित ॥५३८॥

किरीटकेयूरकुंडलादि भूषित । सर्पाभरणगंधमाळादि अळंकृत ।
होउनियां महेश्वर शोभत । असे सिंहासनीं ॥५३९॥

अधोवामदक्षिण । भागीं बैसले गुहगण ।
येक दाट महाघन । संमोहसहित ॥५४०॥

उभयपार्श्वी संतत । चामरकर अनंत ।
सूर्या पानकरसहित । तिष्ठत असें ॥५४१॥

वानिती चंडकीर्ति मेळ । स्तुती करिती सकळ ।
वेदशास्त्र जळ । संमोहासहित ॥५४२॥

स्मरण करिती । मुनिजन समस्ती ।
वाद्य उभारिती । मुनिसंमेळे ॥५४३॥

प्रेमानंदे नमस्कार । करिती हरि अजा इंद्र ।
श्रेष्ठ देवतादि अपार । संमेळेसीं ॥५४४॥

अगस्पर्शने मर्दिती । प्रसूति कुंति ख्याति ।
वृत्ति संभूति प्रीति । क्षमा संतती ॥५४५॥

अनुसया देवमती । अरुंधती म्हणिजे इति ।
येकादश परम प्रीति । वृत्तांतसहित ॥५४६॥

हासती विमुक्तांगणी । बोलविती श्रुतिशब्दवाणी ।
सावित्री आदि करुनी । मंत्रशक्तीसहित ॥५४७॥

अतिशीघ्रवेगवती । परिचर्या करिती ।
लक्ष्मी सरस्वती । शची देवी संमेळे ॥५४८॥

गायक तुंबर नारद संयुक्त । नृत्य करीती रंभादि समस्त ।
देवगणिकासहित । परिवेष्टोनी ॥५४९॥

असती रुद्रगण । प्रथमगण देवगण ।
मुक्तमहागण । सकळ संमोह ॥५५०॥

येक दाट कोलाहल । अतिअश्चीर्य केवळ ।
मतीसी मंगळ । स्वरूप होऊनि दिसें ॥५५१॥

तेथे नंदीश्वर मुदल । भृंगीश्वर महाकाळ ।
किरीटी घंटाहळ । घंटाकरण ॥५५२॥

सघोष दंडी ईशान । लंबाकरण विश्वतोमुख म्हणोन ।
म्हणिजे येकादश कारण । गणेश्वर श्रेष्ठ ॥५५३॥

परिक्रमे तया तया संयोगे प्रीति । महासंभ्रमाने असंख्याती ।
गणसंमेळे पूर्वादि सभा अति । शोभत असें ॥५५४॥

अणीक ब्रह्मा मुनेश्वर । कालाग्निरुद्र ।
तया वीरभद्र । पिनाकी काळकंठ ॥५५५॥

अग्निकराळ केशकराळ । मुखकराळ ।
नेत्रकराळ श्रोत्रकराळ । मुंडमाळाधर ॥५५६॥

त्रिशूळी विश्वपतीश । अजांडादि नाथ काळांतक लकुळीश ।
मयोराने म्हणिजे अष्टादश । मुख्य वरगण ॥५५७॥

परिक्रमें तया तया संगे । अनंतगण संकुलयोगें ।
दक्षिणदिशा भागें । सभा शोभत असें ॥५५८॥

अणीक दंड धारादंड । पाददंड बाहो प्रचंड ।
प्रचंडाचित प्रचंड । कर वरपळ ॥५५९॥

प्रथमवळ वळविकर्ण । सुमाल्य सर्वभूतदमन ।
मनोन्मन म्हणिजे द्वादश मुख्यगण । अग्रज परिक्रमें ॥५६०॥

तया तया संगे अगणित । गुणविस्तारे मंडित ।
पश्चिमदिशासभा अत्यंत । शोभत असे ॥५६१॥

आणीक नारायण दिक्पाळ समस्त । येकपाद रुद्र द्वादशादित्य ।
अष्टवसू नवविधीचे भक्त । प्रभाव पुष्कर ॥५६२॥

अषाढी डिंडि अमरेश । नैमिष्य नकुळ म्हणिजे त्रयोदश ।
मुख्य गण विशेष । परिक्रमें ॥५६३॥

तया तया संयोगे अपार । देवताजन विस्तार ।
शिवलोक संमोहाने उत्तर । दिशेसी सभा शोभत असे ॥५६४॥

इति सांगीतले सविस्तार । शिवलोक संमोहाने अपार ।
तया मध्यस्थानीं अशेषाकार । दैदीप्यमान ॥५६५॥

सकळार्थवर । प्रदायक सर्वेश्वर ।
सांबशिव स्थीर । शोभत असे ॥५६६॥

अणीक पूर्वोक्त देवता । तारतम्यक्रमें विशेषता ।
कैसे म्हणीतले तरी यथा । सांगिजेल ॥५६७॥

भूम्यादि अचेतनाहुनी । विशेष चेतनाप्राणी ।
तयापरिस मनुष्यखाणी । अतिविशेष ॥५६८॥

मनुष्यजातीसकळा । तयापरीस द्विज आगळा ।
तया द्विजाहूनि बोलिला । ब्राह्मणा परीस ॥५६९॥

मुख्य मृत्य । गंधर्व विशेष अत्यंत ।
तयापरीस दैवत । गंधर्व विशेष ॥५७०॥

देवगंधर्वापरीस सर्वथा । विशेष कर्मदेवता ।
तयाहूनि अजानदेवता । अतिविशेष ॥५७१॥

अजानदेवताहूनि अति । विशेष म्हणवी सुरपती ।
तयापरिस बृहस्पती । विशेष जाणावें ॥५७२॥

तया बृहस्पती । परिस विशेष प्रजापति ।
प्रजापतीहूनि अती । विशेष ब्रह्मा ॥५७३॥

ब्रह्मयापरीस विष्णू विशेषात्कार । विष्णूपरीस विशेष रुद्र ।
तया रुद्रापरीस साचार । सांबशिव ॥५७४॥

म्हणिजे महेश्वर । तो सर्वोत्कर्ष साचार ।
म्हणोनी श्रुतिशास्त्र । पुराणप्रसिद्ध असे ॥५७५॥

अणीक येक येथे लक्षण । गुणाभिमानी होऊन ।
सकळ देवतालागून । वल्लभ जाला रुद्र ॥५७६॥

गुणातीत लक्षण । मायावी जळपूर्ण ।
महेश्वर आपण । म्हणिजे तया ॥५७७॥

उभयासीं लिंगलक्षण । जाला येकोपि अधिकरण ।
त्याचे ठाई पूजायोग्य म्हणोन । तयाकारण ॥५७८॥

प्रणवपंचाक्षरी । आदि् सकळ परी ।
मंत्रसंमोह साचारी । तो उभयवर्ग ॥५७९॥

पूजेचे ठाई समान । होय ते पूजालक्षण ।
पंचविध भिन्न । असे त्याचे ठाई ॥५८०॥

केवळ रुद्रपूजन । ते कनिष्ठ म्हणवी आपण ।
तयांतु रुद्रध्यान । ते पूजा मध्यम म्हणवी ॥५८१॥

ते पूजाभेदक्रम । शिवरुद्रसम ।
प्रधानपूजा ते उत्तम । मध्यम म्हणवी ॥५८२॥

केवळ शिवप्रधान । पूजाविधान ।
ते म्हणवी आपण । मध्यमोत्तम ॥५८३॥

तो महेश्वर निरुपाधिक । सच्चिदानंदस्वरुपात्मक ।
तयाचे पूजन मुख्य । उत्तमोत्तम म्हणवी ॥५८४॥

उत्तमोत्तम वर । पूजन तें साचार ।
शिवप्रीतिकर । होय म्हणऊनि जाणावें ॥५८५॥

आणीक अग्नि सूर्य इंद्र । ब्रह्मा विष्णू आदि सुरवर ।
तयाशी शिवसन्निधी अकार । पूजायोग्यता ॥५८६॥

ना तरी भिन्नाधिकारण । भिन्न मंत्र भिन्न पूजन ।
कर्तव्य पुराण । युक्त होय ॥५८७॥

अणीक वह्नि सूर्या । इंद्रादीक देवताच्चियां ।
भजने करूनियां । ब्रह्मपूजा लाभे ॥५८८॥

तया ब्रह्मदेवतांच्चिये । पूजने विष्णुपूजा लभ्य होय ।
तया विष्णुपूजनें निश्चय । रुद्रार्चन लाभे ॥५८९॥

तया रुद्रआराधने करुन । शिवभक्ति लाभे निजकारण ।
तया शिवभक्तीनें पूर्ण । इहीं परभोग साधें ॥५९०॥

परापर मुक्ति सिद्धि निश्चय । त्यालागी शिवशक्ती असंशय ।
सर्वोत्कर्ष होय । म्हणोनि जाणावें ॥५९१॥

अणीक यानंतरे । इति सांगीतल्या प्रकारे ।
संख्याक्रमें विचारे । करूनि पाहतां ॥५९२॥

भूलोक । वरी स्वर्गलोक ।
म्हणिजे तो पंच्याशी लक्ष । योजनें असे ॥५९३॥

भूलोकादि अशेख । धृवमंडळपर्यंत भुवर्लोक ।
तो पंचदशलक्ष । योजने प्रमाण असे ॥५९४॥

भूलोक सुवर्लोक । याचे प्रमाण अशेख ।
उभय मिळोनि येक । कोटियोजनें ॥५९५॥

तया स्वर्गलोकापासून । महर्लोक द्विकोटियोजन ।
जनलोक वरि तेथून । अष्टकोटी योजनें ॥५९६॥

तयावरी तपोलोकस्थान । ते द्वादशकोटी योजन ।
सत्यलोक वरी तेथून । षोडशकोटी योजन ॥५९७॥

तयावरी विष्णुलोक । चतुर्थकोटी योजने पूर्वक ।
वरी स्कंदलोकसहीत रुद्रलोक । षट्कोटि योजन ॥५९८॥

तया रुद्रलोकापासुन । वरी ब्रह्मांड ऊर्ध्वकटाहस्थान ।
येककोटि योजन प्रमाण । मिती असे ॥५९९॥

इति भूमी प्रथम करून । ब्रह्मांड ऊर्ध्वकटाहस्थान ।
पन्नास येककोटि योजन । क्रम प्रमाण असें ॥६००॥

इति उभय संख्या मिळोन । ब्रह्मांडगोळ शतकोटी योजन ।
प्रमाण उन्नत म्हणोन । विवेकें जाणावें ॥६०१॥

अणीक या प्रकारें विचित्र । रचनायुक्त ब्रह्मांड अंतर ।
पूर्वादि सविस्तार । अष्टदिशाचे ठाईं ॥६०२॥

इंद्र अग्नी धर्म नैऋत्य । वरुण वायू धनवंत ।
ईशान्यादि राखत । असती लोकपाळ ॥६०३॥

ऐसी परीची ब्रह्मांडे । अनंतकोटि प्रचंडे ।
असती म्हणोनि धडपुढें । निश्चये जाणावें ॥६०४॥

येथे मायात्मकाचे समंधलक्षण । काळतत्व म्हणिजे औदुंबरकारण ।
रुक्षात तुं येकचि समान । जनीत होत असती ॥६०५॥

तिये जनित अपार । जाली उत्तरोत्तर ।
तया जनितासी साचार । नाश होय ॥६०६॥

अपणांतु येकाचा वृत्तांतु मुख्य । येकासी न होय ठाउक ।
सकळ प्राणी म्हणिजे मश्यक । विचारि तुं ॥६०७॥

शिवब्रह्मांड अकृती । म्हणिजेति असंख्याति ।
येक दाट असती । म्हणोनि उपमा होय ॥६०८॥

या नंतरे योजनादिक । प्रमाण ते सकळिक ।
तत्वव्यापी व्यापक । स्थिति आदी ॥६०९॥

जाणावया योग्य म्हणऊन । ते योजनलक्षण सांगेन ।
तरी कैसे किं लक्षण । म्हणीतले तरी ॥६१०॥

अष्टप्रमाणु मिळालिया येक । तृषरेणू म्हणवी ते गवाक्ष ।
मध्यगत सूर्यरश्मी प्रत्यक्ष । दिसे ते रज म्हणवी ॥६११॥

तया रेणुमात्रा अष्टक । मिळालियां वालाग्र येक ।
तो वालाग्र अष्टअंशक । संयोगे येकलक्षी ॥६१२॥

तया लक्षी अष्टक । संयोगे येक येक ।
ते युक्त अष्ट मिळालियां येक । यव म्हणवी ॥६१३॥

तैसे यवादीक अष्टम । जालिया येक उत्तम ।
प्रतियेक संगम । मानांगुळ म्हणवी ॥६१४॥

सप्त मिळालिया मध्यम । मानांगुळ म्हणवी नाम ।
षद् मिळालियां अधम । मानांगुळ म्हणवी ॥६१५॥

हा मानांगुळाचा विचार । आता मंत्रांगुळाचा प्रकार ।
कैसा कवण सविस्तर । म्हणीतला तरी ॥६१६॥

कर्तुचे मध्यमांगुळिचे । मध्यस्तपनाचें ।
दीर्घ तेचि साचे । मंत्रांगुळी म्हणवी ॥६१७॥

तयासी येक पाद भाग विषम । तया मध्यममात्रांगुळ नाम ।
तया पूर्वार्धे ते अधम । मात्रांगुळ म्हणवी ॥६१८॥

आतां देहलब्धांगुळ ते कैसें । आपणापासाव विशेषें ।
विग्रह करावया असें । योग्य होउनी ॥६१९॥

प्रतिमेचे दीर्घ तया । तया ताळाच्चिया ।
अंगुळ संशये करुनियां । येक येक ॥६२०॥

अवयवालागून । पिष्टोष्टभाग म्हणऊन ।
करणे जे विभागून । ते देहांगुळ म्हणवी ॥६२१॥

अणीक येक येथें । उपरि आदि कृत्य तें ।
मानांगुळानें निरुतें । आरंभावें ॥६२२॥

कुंडादी करुनि अशेख । अनुग्रहोपकरणादिक ।
मात्रांगुळे संख्य । क्रमे करावें ॥६२३॥

प्रतिमेचे अवयवदेह । लब्धांगुळे करावे निःसंशय ।
यापरी अंगुळीभेद निश्चय । जाणोनी विस्तारोनी ॥६२४॥

आता हस्तभेद सांगिजेति । पूर्वोक्त मानांगुळे चतुर्विंशति ।
जाले तरी येक प्रति । किष्करहस्त ॥६२५॥

मध्यपंचविंशाती । जाले तरी मिती ।
तरि येक प्रजापती । हस्त म्हणवी ॥६२६॥

मध्यस्थानीं षट्क । विंशती मुख्य ।
तरि धनुर्मुष्टि येक । हस्त म्हणवी ॥६२७॥

मध्यस्थानीं सप्त । विंशति जाले गणित ।
तरि धनुग्रहस्त । म्हणवी हस्त येक ॥६२८॥

अणीक येथे मंचादिक तें । करावें विष्करहस्तें ।
गृही देवाल्या लिंगादिक तें । प्रजापतीहस्तें ॥६२९॥

पट्टणादि कृत्योद्धारण । करावे धनुमुष्टिहस्तकें करुन ।
क्षेत्रप्रमाण । धनुअग्रहस्ते करावें ॥६३०॥

अणीक तें धनुअग्रचतुष्क । संयोगे धनु म्हणवी येक ।
तया धनु उभयाने मुख्य । येक दंड म्हणवी ॥६३१॥

ते दंड द्विसहस्र जालियां पूर्ण । येक क्रोश म्हणवी आपण ।
ते क्रोश उभय मिळोन । येक गयुत म्हणवी ॥६३२॥

ते गयुत उभय मिळोन । म्हणवी येक योजन ।
म्हणऊनि इति प्रमाण । जाणावें विचारें ॥६३३॥

इति विवेकचिंतामणौ देवलोकवर्णनं नाम षष्ठोध्यायः ॥
॥ श्रीसांबसदाशिवार्पण समस्त ॥

---

## सप्तम परिच्छेद

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसच्चिदानंदात्मने श्रीशंभूनीळकंठाय नमः॥

विदित अनेकपरी । कमळज अंडाभीतरीं ।
होता तो प्रपंच सविस्तारीं । सांगीतला ॥१॥

आता तया ब्रह्मांडाबाह्य । भागीचे संपद्पर्याय ।
सांगेन जैसे सर्वां क्लप्त होय । ते कैसे म्हणीतले तरी ॥२॥

तया अजांडा सकळिक । लोकापरीस अधिक्य ।
ज्ञानतेजोबळादिक । ऐश्वर्यादि ॥३॥

गुणविशिष्ट अति । अगमप्रमाण समस्ती ।
ते ऊर्ध्वलोकस्थिती । तेथूनि वरी सांगिजेल ॥४॥

भुवनपतीं संमोहविशेषीं । उत्तरोत्तर सुखराशी ।
भोगी म्हणोनी जाणावि यासी । योग्यतया कारण ॥५॥

पूर्वोक्त पंचभौक्तिक । ब्रह्मांड तया बाह्य दशगुणाधिक्य ।
केवळ पृथ्वीतत्वाचे कंचुक । असे त्याचे ठाईं ॥६॥

इंद्रादि दशदिशा समस्ती । तयाभीतरीं असती ।
इंद्रादिकांसीं अधिपती । नियंतृत्व होउनी ॥७॥

परमऐश्वर्यसंपन्न होउनी । असती त्यासंगे अनुक्रमेन ।
विचित्रवेशधारी होऊन । महापराक्रमी ॥८॥

नानाशस्त्रपाणीधर । गंगावाळुकासमान रुद्र ।
सहीत तद्ब्रह्मांड सविस्तार । रक्षक जाले ॥९॥

शतरुद्रादीक आपण । तयाचे नामध्याय कवण ।
म्हणीतले तरि सांगेन । विषद करुनी ॥१०॥

कपालीश अज बुद्ध म्हणोन । वज्रदेही प्रमर्दन ।
प्रभूती म्हणोन । अव्यय शाश्वु ॥११॥

पिनाकी त्रिदशावदित । म्हणिजे दशरुद्र विख्यात ।
इंद्र सारस्वत । असती जाणावें ॥१२॥

अनिरुद्ध हुतांशक । पिंगळा बाधक ।
हरज्वलनादिक । दाहनबभ्रू ॥१३॥

अस्मातक क्षयांतक । म्हणिजे रुद्रदशक ।
अग्नि दिशा मुख्य । राखत असती ॥१४॥

याम्य मृत्युहर म्हणोन । धातृ विधातृ म्हणोन ।
कर्तृ काळ म्हणऊन । धर्म अधर्म ॥१५॥

संयुक्त विमुक्त । म्हणिजे दशरुद्र संतत ।
यमदिशेसी राखत । असती प्रसिद्ध ॥१६॥

नैर्ऋत्य मारण हंतृक । क्रोधदृष्टी भयानक ।
धर्म शेष विरूपाक्ष । लोहित म्हणिजे ॥१७॥

आणि दौष्टी म्हणिजे इति । दशरूद्रमूर्ति ।
नैर्ऋत्यदिशेसी आसती । राखणायित ॥१८॥

बळ अतिबळ । पाशहस्त महाबळ ।
श्वेत जयभद्र जळ । अंतक दीर्घबाहो ॥१९॥

वडवामुख भीम । म्हणिजे रुद्रदशम ।
वरुणदिशासीम । राखत असती ॥२०॥

शीघ्र लघू म्हणऊनी । वायुवेग सूक्ष्म म्हणोनी ।
तीक्ष्ण भयांतक म्हणवोनी । पंचांतक ॥२१॥

पंचशि कदर्पी मेघवाहन । म्हणिजे दशरुद्र आपण ।
वायुदिशास्थान । राखत असती ॥२२॥

जटामुकुटधारी । नानारत्नधारी ।
विदीश रूपवान् धन्यात्री । सौम्यदेही ॥२३॥

प्रसाद ऋतु प्रकाश । लक्ष्मीवान्कामरुपी म्हणिजे दश ।
रुद्रकुबेरादि शेष । राखत असती ॥२४॥

विद्याधर ज्ञानधारक । सर्वज्ञ वेदपाठक ।
मातृवृक्ष पिंगाक्ष । भूतपाळ बळिप्रिय ॥२५॥

सर्वविद्याविधात्र । सुखदुःखकर ।
म्हणिजे दशरुद्र । ईशान्यदिशा राखती ॥२६॥

अनंताधीर । पाळक पताळीश्वर ।
वृषभधर । सुवीर्यग्रसन ॥२७॥

शुभकर लोहित । म्हणिजे दशरुद्र संतत ।
ब्रह्मांडअधोभागस्थित । राखत असती ॥२८॥

शंभू विभू म्हणोन । गणाध्यक्ष त्र्यक्ष म्हणऊन ।
त्रिदशवंदित म्हणोन । संवाद विवाद ॥२९॥

नभळीशु विचक्षण । म्हणिजे दशरुद्र आपण ।
ब्रह्मांड ऊर्ध्वप्रदेशी राखण । असती जाणावें ॥३०॥

अणीक याप्रकारे विशेख । इंद्रादी लोकपाळाष्टक ।
ब्रह्माच्युतादी अनेक । देवतांसी पूज्य जाले ॥३१॥

आपल्या नामोच्चारणें । सद्भक्तिआराधनें ।
इष्टार्थसिद्धी वर देणें । कायक होऊनि असती ॥३२॥

अणीक सर्वज्ञत्वसहित । तया शतरुद्रासी कर्तृत्व ।
होऊनि असे विख्यात । वीरभद्र ॥३३॥

तो जाला तरी आपण । नीळवर्णमयशरीरानें ।
जटाजूट येकवदन । त्रिनेत्र दीप्त दांष्ट्रेसीं ॥३४॥

खड्ग फळक चापबाण । आयुधादीक धारण ।
वामदक्षिण । करचतुष्टानें ॥३५॥

वस्त्रगंधमाळासहित । आभरणें होऊनी अळंकृत ।
भद्रकाळी शक्तियुक्त । होऊनियां ॥३६॥

दुष्टनिग्रह सुष्टप्रतिपाळन । प्रतापवंत होऊनि आपण ।
पृथ्वी आदि सूक्ष्मगुण । भूतवर्गांतु असें ॥३७॥

यानंतरे तया स्थूळरूप । पृथ्वीतत्वाबाहीर प्रतिरूप ।
दशगुण अधिक्य अवरूनि असे आप । तत्व त्याचे ठाई ॥३८॥

अमरीश प्रभास नैमिश । पुष्कराक्ष अषाढीश ।
भारभूती नकुळीश । म्हणिजे गुह्याष्टक असती ॥३९॥

अणीक तया आपतत्वापासून । वरी दशगुणाधिक्य होऊन ।
असे तेजतत्व आवरून । त्याचे ठाई ॥४०॥

हरिचंद श्रीशैल्य मत्तकेश्वर । कव्यवान महाकाळ मध्यम केदार ।
भैरव म्हणिजे वर । अतिगुह्याष्टक आसती ॥४१॥

अणीक तया तेजतत्वापासुनी । वरी दशगुणाधिक्य होउनी ।
असे वायुतत्व आवरुनी । त्याचे ठाई ॥४२॥

गया कुरुक्षेत्र नखलंडक । खळ विमळ महेंद्र अट्टहासक ।
भीम म्हणिजे गुह्याष्टक । असती जाणावें ॥४३॥

अणीक तया पवन । तत्वावरी दशगूण ।
अधिक्य आपण । व्योमतत्व त्याचे ठाई ॥४४॥

वस्त्र पाद रुद्रकोटि गोकर्ण । अविमुक्त महाकाळ कर्ण ।
स्वर्णाक्षस्थान म्हणिजे आपण । पवित्राष्टक आसती ॥४५॥

इति पूर्वोक्त लोकपाळक । अष्टकसंयोगे पंचाष्टक ।
चाळीस वर्ग मुख्य । भुवनपती ॥४६॥

ते सर्वज्ञत्वादि सर्व । कर्तृत्वादिसहित स्वयमेव ।
येऊनी सर्वथव । भूलोकाआंतु ॥४७॥

तया तया नामध्यायपूर्वक । अवतारूनि सकळिक ।
लोकाभिमत्त फळप्रदायक । होऊनि असती ॥४८॥

अणीक तया पृथ्वादि पंचक । महाभूताचे कंचुक ।
तयासी कारण जाले मुख्य । अनुक्रमें ॥४९॥

गंधादि तन्मात्रादिक । म्हणिजे गुणपंचक ।
त्याचे ठाई पूर्वक । परिक्रमें ॥५०॥

मंत्ररूपी सुबाहू भास्वर । सर्वजित अजेश्वर ।
म्हणिजे पंचवर । भुवनपती ॥५१॥

तयासंयोगे गर्धांग जळोदर । भानु आणी वळिवत्तर ।
सूक्ष्मनाद म्हणिजे रुद्र । तया क्रमे असती ॥५२॥

अणीक तया तन्मात्राचिये । वरी असे वागादि कर्मेंद्रिये ।
पंचक त्याचे ठाई वासियें । अनुक्रमें ॥५३॥

काळदंष्ट्र पिंगळाक्ष । रौद्र जटिळ विशाळक ।
म्हणिजे पंचक । भुवनपती असती तयासंगे ॥५४॥

तयासंगे दुंदुभीरूद्र । समानाद तूर्णकरुद्र ।
प्रणवाघननाद म्हणिजे रुद्र । असती अनुक्रमें ॥५५॥

अणीक तया कर्मेंद्रियापासून । वरी श्रोत्रादि ज्ञानेंद्रिय मन ।
म्हणिजे असती षट्कारण । त्याचे ठाई ॥५६॥

कामरूपी हुताशन । प्रजापती घोरक विधुकर म्हणोन ।
अनुपम्य गुणयुक्त म्हणिजे भुवन । पती असती ॥५७॥

तयासंयोगे व्योमाचार । सर्वांगप्रकाशक महावक्त्र ।
नीळपंक संकल्प म्हणिजे रुद्र मुख्य । परिक्रमें असती ॥५८॥

अणीक तया गंधतन्मात्रादि । मनसांत षोडशविधी ।
विकार रूपासी आदि । कारण होऊनी ॥५९॥

पूर्वोक्त आकाशा होउनी । वरी दशगुणाधिक्य होऊनी ।
असे अहंकार अवरूनी । त्याचे ठाईं ॥६०॥

चांगलंड दुक्षरंड म्हणोनि । माकुट मंडळेश्वर काळांजनी ।
शंखकर्णस्थेश्वर म्हणोनी । म्हणिजे स्थाणुअष्टक असती ॥६१॥

अणीक अहंकारतत्वापासून । वरी दशगुणाधिक्य होऊन ।
असे प्रकृतितत्व आपण । त्याचे ठाईं ॥६२॥

पिशाच राक्षस यक्ष । गंधर्व इंद्र सोमादिक ।
प्रजेषु ब्रह्म म्हणिजे देवाष्टक । असती जाणावें ॥६३॥

अणीक तया बुद्धितत्वापासून । वरी दशगुणाधिक्य होऊन ।
असे गुणतत्व आवरून । त्याचे ठाईं ॥६४॥

अकृत कृत भैरव म्हणोनी । ब्रह्मा विष्णु कुमार म्हणउनी ।
उमा श्रीकंठ म्हणिजे आपणी । योगाष्टके आसती ॥६५॥

अणीक तया गुणतत्वापासून । वरी दशगुणाधिक्य होऊन ।
असे प्रकृतितत्व आपण । त्याचे ठाईं ॥६६॥

क्रोध वाचंड संड संवर्तक । ज्योतिर्व्यंग सुरंग पंचांतक ।
येकवीर शिखिरंद म्हणिजे मुख्य । महादेवताष्टक असती ॥६७॥

इति ब्रह्मादि प्रकृती । अंतरत्वें दशगुणांतरप्रती ।
अधिक्य होउनी असती । म्हणोनी जाणावें ॥६८॥

आणि तया प्रकृतितत्वापासून । वरी दशाधिक्य होऊन ।
असे पुरुषतत्व आवरून । त्याचे ठाईं ॥६९॥

सर्वेंद्रियें सर्वेतन । सर्वअंतःकरण ।
आश्रय म्हणिजे आपण । रुद्र असती ॥७०॥

तो पुरुष जाला तरी आपण । नित्यव्यापक चैतन्य ।
मायाकार्य विलक्षण । असे तें पुढे सांगो ॥७१॥

भोगादि कळाआंत । पंचविध कंचुकयुक्त ।
होऊनि असे संतत । तया कारण ॥७२॥

उपचारमात्रे तत्व वसे । गणितासी येत असे ।
म्हणोनी भुवनाश्रया ऐसें । म्हणो ये योग्य ॥७३॥

तैसे जाले तरी । ग्राम असे गंगेभीतरीं ।
म्हणीतले तयापरी । लक्षणवृत्तीनें ॥७४॥

तत्वमसीची प्रकृती । मस्तकांतुनी भुवने असती ।
म्हणोनी विभागूनि इती । सांगीतलें ॥७५॥

अणीक तया पुरुषतत्वापासून । वरी शतगुणाधिक्य होऊन ।
असे रागतत्व आवरून । त्याचे ठाईं ॥७६॥

महादेव भीम उग्रदेव सर्वेषण भवय। येकवीर प्रचंड ईश्वर उमाभर्तृ जय।
अनेक शिव म्हणिजे हिय । रुद्र असती ॥७७॥

अणीक तया रागतत्वापासून । वरि सहस्रगुणाधिक्य होऊन ।
असे विद्यातत्व आवरण । त्याचे ठाईं ॥७८॥

महानेज महादेव । ज्योतिर्पिंगेक्षण ईशान्यभव ।
भुवनेश्वर अंगुष्ठमात्र उद्भव । म्हणिजे रुद्रासहित ॥७९॥

संहृष्ट संहृष्ट म्हणोन । पुरुष सुवर्द्धन मनोन्मन ।
म्हणिजे शिष्यजन । पंचकसहित ॥८०॥

महावीर्य कल्याण । पिंगळ बभ्रू म्हणोन ।
वीरप्रभान । मेघेशतिथी ॥८१॥

मयंकदाहक । आणि शास्त्रकारक ।
म्हणिजे दशक । आचार्ये असती ॥८२॥

अणीक तया विद्यातत्वापासून । वरि लक्षगुणाधिक्य होऊन ।
असे नीतितत्व आवरून । त्याचे ठाईं ॥८३॥

शूळधर वटरुद्र वाळोद्भूक । नीळलोहित ज्योतिरूपक ।
परमेश्वर परमपिंगेक्ष । वामदेव ॥८४॥

शर्वभव उद्भवक्रम । वज्रदेही प्रभु विक्रम ।
सुप्रभा म्हणिजे स्तोम । रुद्रासहित ॥८५॥

स्थापक वाळुकासंयमक । त्रिशिर चिरपुष्टक ।
म्हणिजे शिष्य रुद्रपंचक । यागताकारण ॥८६॥

असी मसी कृषि वाणिज्य । देवनिर्माण म्हणिजे ।
पंचकृत्य स्वतेजे । नेमक होऊनि असती ॥८७॥

अणीक तया नीतितत्वापासून । वरी लक्षगुणाधिक्य होऊन ।
असे कळातत्व आवरण । त्याचे ठाईं ॥८८॥

माइया हळाहळ क्रोधन ।वडवामुख होऊन ।
उष्ट शांवर म्हणोन । चंड मातंग घोररूप ॥८९॥

शुद्ध बुद्ध प्रबुद्ध प्रशांत म्हणोन । परमात्मा शिव सुशिव म्हणऊन ।
बळ अक्ष राट शंभू म्हणोन । म्हणिजे रुद्र असती ॥९०॥

अणीक तया कळातत्वापासूनी । वरी दशगुणाधिक्य होऊनी ।
असे कळातत्व आवरुनी । त्याचे ठाईं ॥९१॥

गगनेश साध्य विष्णू हर देशशान । महावीर्य रुद्र त्रिकाळ तत्वापासून ।
वरी कोटिगुणाधिक्य होऊन । गोपती म्हणिजे रुद्र असती ॥९२॥

अणीक तया कळातत्वापासूनी । वरी कोटिगुणाधिक्य होउनी ।
असे मायातत्व आवरुनी । त्याचे ठाईं ॥९३॥

अनंत त्रिकाळ गोपक्षमिश । ब्रह्म प्रतिध्रुव तेजोदीप्त सहस्रेश ।
म्हणिजे अष्टविशेष । रुद्र असती ॥९४॥

याप्रकारें समस्त । पृथ्वी आदिमाया आंत ।
तत्वाचे ठाई परिख्यात । रुद्र असती म्हणोनी सांगीतले ॥९५॥

रुद्राच्या नामध्ययनें । तेथें तेथें असती भुवनें ।
तया भुवनाच्या विस्तीणपणें । संख्या असें ॥९६॥

मुख्य भुवने नेमुनी । सांगावया योग्य म्हणऊनी ।
तया तया भुवनाच्या स्थानीं । विचित्रपरी ॥९७॥

नदी नद्या सरोवर । नंदन परप्रकार ।
द्वार विदी खदिर । प्रसादादि रचना ॥९८॥

गीतवाद्यनृत्यादिक । वनितादि सकळ सूख ।
भोगसाधनें अधिक्य । होऊनी असती ॥९९॥

ज्ञानविचारसंपन्न । यज्ञ तपोतीर्थ दान ।
सत्क्रिया नैष्ठिक्यपण । तत्पद प्राप्त होय ॥१००॥

इति विवेकचिंतामणौ ऊर्ध्वलोकस्थितिवर्णनं नाम
सप्तम परिच्छेदः समाप्तः ॥७॥ श्री सांब सदाशिवार्पणमस्तु ॥

---

## अष्टम परिच्छेद

श्रीगणेशाय नमः ।। श्रीसच्चिदात्मने शंभूनीळकंठाय नमः ।।

याप्रकारे अधोमाया । शक्तीपासूनियां ।
विस्तारे अतिशाया । सांगीतलें ।।१।।

आतां ऊर्ध्वप्रकृति विशेषे । अनादितत्व विशेष असे ।
ते निरोपीन क्लप्त होय ऐसें । जगत्रासी ।।२।।

ते प्रकृति मायेपासून । वरी कैसे किंलक्षण ।
म्हणीतले तरी सांगेन । यथास्थीत ।।३।।

पूर्वोक्त मायातत्वापासून । वरी दशकोटी गुणाधिक्य होऊन ।
असे विद्यातत्व आवरून । त्याचे ठाईं ।।४।।

वाम ज्येष्ठ रुद्र काल कलविकरण । बलविकरण बलप्रमथन ।
सर्वभूतदमन मनोन्मन । त्रयगुणी ।।५।।

ब्रह्म वेताळी अंबिका स्थाणुपती । रूपिणी नंदिनी ज्वाला विद्यापती ।
म्हणिजे भुवने असती । त्याचे ठाईं ।।६।।

कामिकाद्री वातुळाद्री मिती । अगम अष्टविंशती ।
त्याचे ठाईं समस्ती । मननत्राणधर्म ।।७।।

ज्ञानशक्ती अधिकत्वें । क्रियाशक्ती न्यूनत्वें ।
सप्तकोटि महामंत्र विशेषत्वें । असती त्याचे ठाईं ।।८।।

त्रिअर्धकोटि मंत्र समान । परमेश्वराचे निराधिकारण ।
दीक्षेलागूनि साधन । होऊनि असती ।।९।।

उरले त्रिअर्धकोटि मंत्र । ते गुरूप नदीश्वर ।
त्याचे साधिकारण दीक्षेसि वर । साधन होऊनि असती ।।१०।।

अणीक तया पूर्वोक्त । विद्यातत्वाचे ठाई श्रीकंठ अनंत ।
सूक्ष्म त्रिमूर्तिमंत । अमरीश अर्द्धीश ।।११।।

क्रोधेश चद्रेश पंचातक । शिवोत्तम येकरुद्र कूर्मचक्ष ।
चतुरानन अजेश शर्वक । सोमेश्वर ।।१२।।

लांगुली दारूक अर्धनारीश । उमाकांत अषाढीश ।
अत्री मीन मेश । लोहित शिखी ।।१३।।

स्थानलंड द्विलंड महाकाळीश । वाणी भुजंगेश पिनाकी खड्गेश ।
बकश्वेत भृगु लकुळीश । शिवसंवर्तक ॥१४॥

म्हणिजे अकारादि क्षकारांताप्रती । येकावन्न मातृकामूर्ती ।
रुद्रादीक असती । ते जाले तरी ॥१५॥

पूर्णोदरी विराजी शाल्मली लोलाक्षी । वर्तुळाक्षी दीर्घनाशिकी ।
दीर्घसुखी गोमुखी । द्विजिव्हा ॥१६॥

कुडोदरी अर्द्धकेशी दीर्घमुखी । ज्वालामुखी उल्कामुखी ।
श्रीमुखी विद्यामुखी । महाकाळी ॥१७॥

सरस्वती सर्वसिद्धी समान्विती । गौरी त्रैलोक्यविद्या मंत्रशक्ती ।
आत्मशक्ती भूतशक्ति । लंबोदरी ॥१८॥

द्राविणी नगरी खेचरी मंजिरी । रूपिणी विराजी करोदरी ।
पूतना भद्रकाळी योगेश्वरी । शंखिनी गर्जिनी ॥१९॥

कराळ रात्री कुर्द्दन्य कपर्द्दिनी । वाजन्मई जई म्हणोनी ।
सुमुखी सूर्वी म्हणऊनी । रेवती माधवी ॥२०॥

रावणी राक्षोवधारिणी । सहजी लक्ष्मी व्यापिनी ।
मायान्मती म्हणोनी । इति अनुक्रमें ॥२१॥

येकावन्न शक्तियुक्त । रक्तांगवर्णसहित ।
शूळकपाळपाणी म्हणोनि घेत । असती आपणापें ॥२२॥

आपुलिया नामोच्चारण । मूर्तिध्यान अवलंबन ।
मात्रे सर्वसिद्धिप्रदायक होऊन । असती जाणावें ॥२३॥

अणीक तया विद्यातत्वापासूनी । वरी शतकोटी गुणाधिक्य होऊनी ।
असे ईश्वरत्व आवरुनी । त्याचे ठाईं ॥२४॥

अनंतसूक्ष्म म्हणोन । शिवोत्तम येकनेत्र म्हणऊन ।
येकरुद्र त्रिमूर्ती म्हणोन । श्रीखंड शिखंडी ॥२५॥

म्हणोनि भुवनें उभयें । असती तयांत परिक्रमें ।
तया तया नामें । करूनियां ॥२६॥

ज्ञानशक्तीन्यूनत्वें । क्रियाशक्तिबाहुल्यत्वें ।
अष्टईश्वरविशेषत्वें । असती जाणावें ॥२७॥

तयांतु प्रथम अनंत म्हणिजे मुख्य । अर्धमाया क्षोभक ।
होऊनियां सकळिक । आत्मवर्गासी भोगमोक्षप्रदायक होऊनि असें ॥२८॥

अणीक ईश्वरत्व म्हणिजे तें । विंदूचे अधिकार अवस्थे ।
उपाधीने परशिव निरुते । आपचि तो ॥२९॥

जगतहितार्थी कारणें । ज्योतिर्मंत्रमय शरीरानें ।
जटामुकुट येकमुख त्रिनयन । वर अभयहस्तेसीं ॥३०॥

दिव्यवस्त्राभरणसहित । गंधमाळादिके अळंकृत ।
अंबिका म्हणिजे शक्तियुक्त । होऊनियां ॥३१॥

विचित्र दाखवी भिन्न भिन्नत्व । सोमधावत्व उमासमत्व ।
वृषभारूढत्व नृत्यविलासत्व । विवाहोत्साहित्वें ॥३२॥

भिक्षाटणत्व कामारित्व । काळारित्व त्रिपुरारित्व ।
जळधारित्व अजारित्व । वीरभद्रत्वें ॥३३॥

औतारत्व हरिविध्वंसनत्व । अर्धनारीश्वरत्व ।
किरातनरूपत्व कंकाळधरत्व । चंडेशानुग्रहत्वें ॥३४॥

विषापहरित्व वक्रपादानुरूपत्व । विघ्नेश्वरप्रसादअभिमुख्यत्व ।
उमाकुमार सहितत्व । जाणोनियां ॥३५॥

दक्षिणामूर्तिस्वरूपत्व । महालिंगस्वरूपत्व ।
म्हणिजे पंचविंशति सन्मूर्तित्व । लीलाधर म्हणवीं ॥३६॥

सकळ अधिकारी आपण । सकळ अपण अधीश्वर्य आपण ।
प्रवृत्त आपण स्वभाव आपण । म्हणोनि घेउनी ॥३७॥

जगत परि अपार । तयाचा उत्पत्ति स्थिति संहार ।
कृत्यादीक निरंतर । करीत असे ॥३८॥

आपुलिया ध्यानपूजान्वितालागून । भोगमोक्षप्रदायक होऊन ।
महेश्वरत्व म्हणऊन । घेत असे ॥३९॥

अणीक तया ईश्वरतत्वापासूनी । वरी सहस्रकोटि गुणाधिक्य होऊनी ।
असे सदाशिवतत्व आवरणी । त्याचे ठाईं ॥४०॥

निवृत्ती प्रतिष्ठा विद्या शांति । शांत्यातीत पवित्रा गति ।
सादरव्याध्वनीपती । म्हणजे भुवने असती ॥४१॥

त्याचे ठाईं ज्ञानक्रियाशक्ति उभय । समानत्व नित्यसुखमय ।
होऊनि आपण सदाशिव ज्ञेय । स्वरूप असती ॥४२॥

ते सदाशिवतत्व म्हणिजे विंदूचें । भोगावस्था उपाधीने साचें ।
तो परशिव आपणचि योग्याचें । ध्यानपूजार्थनिमित्यें ॥४३॥

स्फटिकवर्णमयशरीरानें । पंचजटामुकुटचंद्रकळानें ।
सद्योजातादि पंचमुखानें । पंचदशनेत्रेसीं ॥४४॥

शूळ फरश खड्ग वज्र । अभययुक्त दक्षिण पंचकर ।
सर्प पाश अंकुश घंटा अग्निधर । वाम पंचहस्तेसीं ॥४५॥

सर्वलक्षणसंपन्न । दिव्य वस्त्र आभरण ।
गंधमाळाधिकान । अळंकृत होऊनी ॥४६॥

मनोन्मनी म्हणिजे शक्तियुक्त । होऊनिया सद्योजात ।
अठावीस कळान्वित । म्हणवीतसें ॥४७॥

सर्वसदाख्य कर्तुसदाख्य । मूर्तिसदाख्य अमूर्तिसदाख्य ।
शिवसदाख्य म्हणिजे पंचक । मूर्ति धरुनी ॥४८॥

सकळ निष्कळ अपण भोगून । संततोदित मूर्ति म्हणोन ।
घेउनि आपुल्या ध्यानपूजान्वितालागुन । धर्मार्थकाममोक्ष ॥४९॥

म्हणिजे चतुर्थ । परपुरुषार्थ पुरवीत ।
सदाशिव नाम परिख्यात । म्हणोनि घेत असे ॥५०॥

अणीक तया सदाशिवतत्वापासूनी । वरी येकअर्बुद गुणाधिक्य होऊनि ।
असे शक्तितत्व आवरुनी । त्याचे ठाईं ॥५१॥

इंद्रिका दीपिका रोचका मोचका । ऊर्ध्वगामी व्योमरूपी अनाथिका ।
अनाश्रिता म्हणिजे भुवनसंख्या । असे त्याचे ठाईं ॥५२॥

महासुखसंपन्न । भोगयुक्त होऊन ।
अपरमुक्त होऊन । शिव असती ॥५३॥

तया नित्याधिष्ठात्र होऊन । शिवतत्व म्हणऊन ।
घेत असे बिंदू आपण । म्हणोनियां ॥५४॥

तो जाला तरी परशिव आपण । परंज्योती परिपूर्ण ।
स्वरूप होऊन । असे तो ॥५५॥

बिंदु म्हणिजे आपुलिया । अवस्था उपाधी करूनियां ।
परशिव न संशाया । अपणातीत तो ॥५६॥

शिव परात्पर सूक्ष्म नित्य सर्वगत । अव्यय अनुपम्य अनंदित ।
अप्रमेय अप्रमाण अनामय म्हणिजे युक्त । दश नामध्येय ॥५७॥

परंगूढ शरीरस्थ लिंग क्षेत्र । अनादि म्हणिजे पंचप्रकार ।
स्वाज्ञामात्रे साचार । लिंगस्वरूप म्हणवी ॥५८॥

निष्कळलयत्व । शक्तिईशत्व ।
आपणापे विशेषत्व । म्हणोनि घेऊनी ॥५९॥

सर्व कारणासी आपण । मूळकारण होऊन ।
शिवतत्व म्हणोन । घेत असे ॥६०॥

अणीक तो बिंदु गर्भाकृत । करूनियां सर्वज्ञत्व ।
नित्यत्व अनादिसिद्धबोधत्व । स्वतंत्रत्व अलुप्तत्व शक्तितत्वें ॥६१॥

अनंतशक्तितत्व म्हणिजे षड्गुण । स्वरूपीणी होऊन ।
परप्रकाश जाली आपण । चित्‌शक्ती तरी ॥६२॥

परशिवासी नित्यमय । साक्षात् शरीर इंद्रिय ।
अंतःकरणादि तृतीय । आपण म्हणवी ॥६३॥

अग्नी अग्नउष्णत्व जैसें । कां सूर्यों सूर्यकिरणाऐसें ।
परशिवायुक्त तैसें । तादात्म्यसमंधे शोभें ॥६४॥

आपणचि येक साचार । परि ज्ञातृत्व अधिकार ।
कर्तृत्वादि व्यापार । उपाधिभेदें ॥६५॥

इछाशक्ति ज्ञानशक्ती म्हणोनी । क्रियाशक्ती वामज्येष्ठरौद्रिणी ।
काळी काळविकरणी । वलविकरणी ॥६६॥

वलप्रमथनी सर्वभूतदमनी । मनोन्मनी इत्यादि करुनी ।
अनेक नाम ध्यानयुक्त होउनी । भक्तवछळत्वें असें ॥६७॥

आणि ते चिछक्ती । म्हणिजे दिव्यज्योती ।
तेजोमंडळांतु अस्ती । सत्यशुद्धस्वभाव ॥६८॥

स्वयंप्रकाश चिन्मात्र । स्वरूप निर्विकार ।
श्रीशंभोनीळकंठ सद्‌गुरुवर । शोभत असे ॥६९॥

इति सांगीतले सकळ । देहादि विषयमेळ ।
तया काळाग्नी आदि अखिल । भुवनें अश्रूनि असती ॥७०॥

तया भुवनसंमोहालागून । भूम्यादि तत्वें असती आवरून ।
तया तत्वांसी निवृत्यादि करून । कळा अश्रयो असती ॥७१॥

तया काळाग्नी विशेषें । बिंदु अश्रयो असे ।
तया बिंदूसीं स्वप्रकाशें । चित्‌शक्ती आधार असें ॥७२॥

ते चित्‌शक्ती अखिल कूट । अवलंबूनियां येकवट ।
श्रीशंभूनीळकंठ । आधारें असतूचि असें ॥७३॥

तो श्रीशंभूनीळकंठ । सर्वाधार आपण येकट ।
तयासी अत्युत्कृष्ट । आन आश्रयो नाहीं ॥७४॥

निर्विकारस्वरूपें करुनी । सकळ आत्मवर्गालागुनी ।
सुखकर होऊनी । विराजत असे ॥७५॥

इति विवेकचिंतामणौ शुद्धभुवनस्थितिवर्णनं नाम
अष्टम परिच्छेदः समाप्तिमगमत् ॥

---

## नवम परिच्छेद

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसच्चिदानंदात्मने श्रीशंभोनीळकंठाय नमः ॥

इति सकळ भुवन । पद्धती विवरून ।
सांगीतली भिन्न । आतां जिवाचें ॥१॥

भुवनकर्मानुसार । फळसमंधविचार ।
अनुभव कवण प्रकार । म्हणीतले तरी ॥२॥

विश्वास अखिल जन । लोकाचे ठाई नाही म्हणोन ।
आत्मनाम विवेकशून्य । जाले मूढ जन हे ॥३॥

प्रत्य जाले ते प्रमाण । सत्य मानिती अनुमान ।
अगमप्रमाण । उदासीन करूनिया ॥४॥

मी अहं स्वामी दीर्घ । मी सुंदर मी योग्य ।
मी कुसुम मी पुष्टांग । म्हणोनी इत्यादि ॥५॥

देहअभिमानवशें । आपुलियां अभिमत्त ऊल्हासे ।
कल्पितमय विशेषें । अनुभवावें ॥६॥

म्हणती हे शरीर जरी । चिरूनि पाहिले तरी ।
अनेक आत्म्याभीतरीं । न दिसे सर्वथां ॥७॥

म्हणोनि इत्यादि अनेक । युक्तीने देहादिक ।
आत्मा म्हणोनि अधिक्य । दृढ धरिती ॥८॥

जो दीपकत्वें प्रकाशत असे । तो काळांतरे विनाशे ।
परी तयासी न दिसे । पुनः अनुरूप ॥९॥

तैसे शरीरादिक । भंगलिया आणिक ।
आपण भिन्न येक । नाही म्हणोनी ॥१०॥

स्वर्ग नर्क पावणे । मागुतेनी जन्म मरणें ।
ती संसृतिबंधने । नाहीं सर्वथां ॥११॥

तया कारण देह आत्मा प्रत्यक्ष । तेचि प्रमाण मरण तेचि मोक्ष ।
सुख तेचि स्वर्ग दुःख । तेचि नर्क साचे ॥१२॥

या प्रकारे नव्हे तरी । अणीक येक परी ।
विचार साचारीं । नाही तयालागीं ॥१३॥

विधि निषेध पुण्य । पापादी नाही बंधन ।
म्हणोनि नास्तीकबुद्धि वर्तणें । करीत असें ॥१४॥

तयासी परिहर । कैसा कवण प्रकार ।
म्हणीतले तरी उत्तर । सांगिजेल ॥१५॥

जरी लोकांतु येकांतु येक । नाही तरी बाल्य यौवन वार्द्धिक्य ।
म्हणिजे नाना अवस्था देहादिक । पावोनि पातु होय ॥१६॥

आत्मा येक नाही तरी सर्वैथां । बालादि यौवनावस्था ।
भोगूनि तयाच्या अर्था । यथास्थीत ॥१७॥

वार्धिक्यपणाभीतरीं । स्मरणाची जाणीव परी ।
सांगावया साचारीं । न घडे सर्वैथां ॥१८॥

तयाचा अनुभवकर्ता आपण । आत्मा येक असे म्हणोन ।
ते प्रत्यक्षाभिज्ञान । होय प्रमाणसिद्ध ॥१९॥

ते कैसे म्हणीतले तरी पुरातन । जे जे गेले ते यावया पुनःपुन ।
या शरीरातु आत्मा आपण । येक म्हणवी ॥२०॥

प्रथम हा पुण्याधिक्य । प्रथम हा पापात्मक ।
म्हणोनी ऐसी लौकिक । प्रसिद्धयात्रा ॥२१॥

सुखदुःखाधीक । तारतम्याने विशेष ।
जाणावयासी मुख्य । योग्य जालें ॥२२॥

जन्मला अकार ते मातेचें । स्तनपानसेवन नीतीचें ।
हो पूर्वसंस्कार साचें । दृष्टांत असें ॥२३॥

अणीक आपुले जातीं । स्मरत्व सांगती ।
योगसिद्ध असती । कोण्ही येक ॥२४॥

म्हणोनि मृत्यु पावोनी । पुनः मागुता चेतोनी ।
यमलोकी आपणालागुनी । जाली ते बाधा ॥२५॥

प्रथम जन्मवेव्हार । खूण दाखवी साचार ।
ते पक्षाकार । दिसत असे ॥२६॥

आणि रतिकाम । बळिकाम हंतुकाम ।
म्हणिजे ग्रहाचे वर्म । इष्टमंत्रवादें ॥२७॥

बोलविलिया प्रथम । मी या प्रकाराचा उत्तम ।
अतां मी हा प्रकार अधम । जालो असें ॥२८॥

आता मज कवण पै गती । म्हणोनी आपुली पूर्वापार स्थिती ।
ब्रह्मराक्षस भूत वेताळ सांगती । प्रत्यक्षाकार ॥२९॥

आणीक हे शरीर म्हणिजे । पूर्वजन्मी कर्तूने जें ।
केले कर्म तयाने निफजें । अकार हा ॥३०॥

तेधवा तें शरीरयुक्त । भोगसाधन होऊनि जनित ।
जाले म्हणिजे जन्मत । सकळ जन ॥३१॥

ना तरी आपणची उदित । जाले म्हणितलियां निरोधमत्त ।
वरी कारणाविरहित । कार्य न घडे ॥३२॥

अणीक सकळे आपेआप । उदीत जाले आवंधरूप ।
म्हणे तयासी अकर्ताभ्यागमा रूप । बाधा असे ॥३३॥

आणि कंटकासी तीक्ष्णाग्र । कोकिळेलागूनि सुस्वर ।
स्वभावीक वेव्हार । जयापरी ॥३४॥

तैसे पुरुषाचिये वीर्यासीं । शरीर जन्मले अपैसीं ।
स्वाभावीक ऐसीं । युक्ति स्थापिती जरी ॥३५॥

तरि दिनदिनासी व्यर्थ । योनिमुखी होय सूवलित ।
तया वीर्याने देह जनित । कां न घडें ॥३६॥

आणि लोकांत सर्वजन । बहुप्रकार करिती यज्ञदान ।
व्रतउपवासादि पुण्य । फळादिक ॥३७॥

ते वरी अनुभवितां विशेष । नाही म्हणो तयासी कृत्यविनाश ।
म्हणिजे बाधक दोष । घडत असे ॥३८॥

अणीक माझे हे भुवन । पत्नी पुत्र धन ।
म्हणणे सिद्धवचन । म्हणणे ज्यापरी ॥३९॥

तैसे आपले हे शरीर । म्हणतां देह देही इतर ।
भेद सुचनायुक्त उत्तर । सिद्ध असे ॥४०॥

अणीक देह आत्मा न होय । भूते कारण ते कार्य ।
होउनी घटापरि न्याय । म्हणिजे अनुमान घडें ॥४१॥

तया शास्त्रयुक्तीने तुळाभार । म्हणिजे ते अंगिकार ।
करिती तयासी साचार । निधिप्राप्ती ॥४२॥

जालियावरी मंत्र । संस्कारे महाघोर ।
पापक्षय प्रत्यक्षाकार । होय सकळ ॥४३॥

ना तरी चंद्रअर्क । मंडळग्रहणादिक ।
सांगे शास्त्रपूर्वक । न चुके ऐसें ॥४४॥

तेसे देह अनात्मा । वर्ग म्हणिजे अगमा ।
प्राणांत धर्मा । असत्य न घडे ॥४५॥

त्यालागी देहविलक्षण । आत्मा येक असे आपण ।
म्हणोनी प्रतिपादन । सिद्धांत जाणावें ॥४६॥

आणीक ते देह आन । आत्मा तो विलक्षण ।
नित्य व्यापक चैतन्य । जाला तरी ॥४७॥

आपुलिया ज्ञानसामर्थ्यें । कर्माचिया अनुमत्तें ।
ईश्वर प्राणीतें । घटाकाशन्यायें ॥४८॥

सूक्ष्मशरीराचे संचरण । तयाचेनि वशे आपण ।
भ्रमत असे सर्व जन । लोकाचे ठाईं ॥४९॥

तेथिचे सुखदुःखविहित । मुक्तिपर्यंत अनुभवित ।
असे म्हणिजे सत्य । कैसे म्हणीतले तरी ॥५०॥

कर्मभूमिका मुख्य । म्हणवी इहलोक ।
येथ वापी कूप तटाक । आदि बहुपरी ॥५१॥

म्हणिजे नामादिक । पुण्यविशेषे लोक ।
तत्पर जाले अनेक । तयालागुनी ॥५२॥

आणीक ज्योति स्थोमे । अश्वमेधयागादीक कर्मे ।
इष्टार्ती म्हणिजे नामें । तया कर्मनिष्ठासीं ॥५३॥

वामनासापुट तें । इडा म्हणवी निरुतें ।
प्राणत्याग तया नाही ते पंथें । जाल्यानंतरें ॥५४॥

प्रथम पावे धूमदशा वरीं । तया धूमाने रात्री ।
तया रात्रीने साचारी । कृष्णपक्ष ॥५५॥

तया कृष्णपक्षानें । दक्षिणायन दक्षिणायनें ।
संवत्सर संवत्सरानें । पितृलोक ॥५६॥

पितृलोके आकाश त्या आकाशानें । चंद्रस्थान तया चंद्रानें ।
ऊर्ध्वगती अनुक्रमानें । स्वर्गलोक प्राप्त होय ॥५७॥

तया स्वर्गलोकाआंतुनी । इंद्राची सालोक्य सालोक्यानि ।
सामिप्यादि पदहस्त होऊनी । असती जाणावें ॥५८॥

तेथे असतां वरि तयां । लोकाची प्रियविषया ।
भोगांतीक क्षयां । म्हणिजे दुःख ॥५९॥

वरी आन येकाचें । अतिविशेषे पुण्याचें ।
सुख न साहे कवणाचें । म्हणिजे ते दुःख ॥६०॥

पतनयदुःख । म्हणिजे दुःखत्रय होऊनि विशेख ।
पाउला पाउला अधिक्य । अछादूनि दुःख दाखवी ॥६१॥

वनितादी परि समस्ती । महासुखभोग भोगोनी अती ।
सरलिया पुनरावृत्ती । घडे तत्समई ॥६२॥

प्रथम गमन गमनापासूनि वायू । वायुपासूनि धूम त्या धूमापासाव मेघु ।
ते मेघापासूनि वर्षाऊ । ते वृष्टीपासूनी ॥६३॥

शाल्यादि सकळ धान्य । तया धान्यापासाव अन्न ।
अन्नरूपी करुन । अंतर वेधिलियां ॥६४॥

मग ते पंचभूतात्मक। जाला जो पाक ।
ते परि भोज्यादिक । भक्ष्यादी करुनी ॥६५॥

लेह्य पेह्य चोष्य खाद्य पाणी । म्हणिजे षविड्ध होऊनी ।
असे तेचि पतीपत्नी । उभय भुंजलिया ॥६६॥

ते आप अग्नीने पचोनी । येक कीट म्हणवोनी ।
येक रस म्हणोनी । द्विप्रकारे होय ॥६७॥

ते कीट मळमुत्रा होवोनी । गुदगुह्यद्वारे करूनी ।
अपानवायूच्या व्यापारे करूनी । बाहेर पडें ॥६८॥

आणि तो रस नाभिस्थानीं असोनी । समानवायू सर्वांगी विभागुनी ।
दीधलिया तो रस पचोनी । तेथ तेथ ॥६९॥

मागुतेन कीट म्हणोनी । आणि रस म्हणऊनी ।
उभय प्रकार होऊनी । असे तयामध्यें ॥७०॥

ते कीट आपण समूळ । कफस्वेदमळ मुत्रजिव्हामळ ।
दंतमळ नासीकमळ । नेत्रमळादि ॥७१॥

श्रोत्रमळ गुदमळ । आणि नखमळ ।
म्हणिजे द्वादशमळ । रूपें झरोनि जायें ॥७२॥

उरला रस जो आपण । स्थूळरस सूक्ष्मरस म्हणोन ।
उभय प्रकार होउन । असे त्याचे ठाईं ॥७३॥

सूक्ष्मरूपसानें । प्राण इंद्रियें अंतःकरण ।
परिपोषत असे कारण । संमोह सकळ ॥७४॥

उरला स्थूळरूपरस । तयानें रुधिर मांस ।
मेद सुयुष्य । अस्ति मज्ज शुक्र ॥७५॥

म्हणिजे सप्तधातू परी । क्रमें वर्धलियावरी ।
जीव जाला तरी । तया धातुमय होऊनी ॥७६॥

पुरूषाचे गर्भी मास । त्रय असोनि वास ।
उपरि स्त्रीपुरुष । संभोग समई ॥७७॥

तो पिंड आपणे । काळकर्मवशाने ।
शुक्रसमंधानें । उतरे तेथें ॥७८॥

स्त्री रुतुवंती आपण । जालिया दिनापासून ।
पंचादश दिन । पर्यंत ॥७९॥

सुवर्णकीचे फूल । तैसियापरी सकळ ।
विकाशरूप कमळ । होऊनि असे ॥८०॥

निर्दोष जालिया निःशेष । गर्भाश्रय म्हणिजे कोश ।
वायुवसानें होय प्रवेश । त्या वायुविकारानें ॥८१॥

शुक्र द्विभाग पृथक । होऊनि जरायु म्हणिजे कंचुक ।
आश्रयानें जळपिंडादिक । उदीत होय ॥८२॥

तेथ उदराग्नीपासून । अन्न सकळ जाय पचोन ।
हा शुक्रपिंड कैसा कसे स्थीर होऊन । म्हणीतले तरी ॥८३॥

तया शुक्रपिंडासी सकळ । वन्हीचे उष्णत्व प्रबळ ।
नातुळे तैसे परि जाळ । पट्टांतराऐसे ॥८४॥

तयावरी अग्नी । ऊर्ध्वमुख होउनी ।
सकळ वायू निरोधुनी । असे आपण ॥८५॥

तयापासुनी । अधो असे म्हणऊनी ।
शुक्रपिंड तया अग्नीचेनि । न जळे जाणावे ॥८६॥

जैसे शुक्तीचे ठाई पडोनी । स्वाती उदकबद्ध होऊनी ।
मौक्तिक होय संयोगाचेनि । तैसा पिंड जाला ॥८७॥

पुरुषाचे शुक्रांत । स्त्रीवर्गीचिया रक्तयुक्त ।
संयोगे येक दिनात । लळ होय ॥८८॥

पंचदिवसी होय बुद्बुदा । दशदिनी होय रक्तबाधा ।
पंचदशदिनी मांसमय न शुद्धा । अंडाकार होय ॥८९॥

पूर्णविंशति दिवसीं । वळी काया होय विशेषीं ।
पंचविंशति दिने तयासीं । पंचांकुर दिसती ॥९०॥

मासा येका निपजे शरीर । द्विमासीं भुजा इतर ।
त्रिमासी पादांकुर । केशगुह्यादि होय ॥९१॥

चतुर्मासी नासिक द्वंद्व । नेत्र श्रोत्रादि रंध्रे होती विविध ।
पंचमासी स्कंध । जठरादि होय ॥९२॥

षण्मासी होती पादाद्यंगुळिया । सप्तमासी सर्वांगकाया ।
संधि संपूर्ण होउनियां । चेतना उपजें ॥९३॥

तेथे जननी करी जे भोजन । तया अन्नाचे रसअन्न ।
नाभिसूत्रद्वारे रससेवन । करीत असें ॥९४॥

अष्टमासी तो गर्भाश्रिया । म्हणिजे रौरवनर्काचिया ।
मळमूत्राचा अतिशया । कंटाळा उपजे ॥९५॥

नरककुंडाभीतरीं । कीटक असे तयापरी ।
महादुःख गर्भांतरीं । अनुभविना ॥९६॥

उपजे जातिस्मरत्व तेथें । विचारूनि पाहतां निरुतें ।
प्रथम मी अनुचितें । अज्ञानवळें ॥९७॥

शिवज्ञानहीन होउनी । याचिपरी नाना योनी ।
जन्माचे ठाई भ्रमण करूनी । अति कष्टलों ॥९८॥

आता मीं या गर्भाश्रया । पासाव बाहेर निघोनियां ।
श्रीगुरूसि जाउनियां । शरण रिघेन ॥९९॥

शिवभक्ती शिवज्ञान । शिवध्यान शिवार्चन ।
शिवव्रत शिवयजन । महेश्वरसंगादि ॥१००॥

सद्गुणसंपन्न । होऊनि जनन मरण ।
रूपसंसारार्णवलंघन । म्हणोनि आपुलें ॥१०१॥

पूर्वपरस्थित । गर्भोपनिषत ।
सन्मत्ताने आठवित । असे गर्भीं ॥१०२॥

आणीक ते माताभुक्त अन्न । मधुर अम्ल तिक्त म्हणऊन ।
कटु कषाय लवण । म्हणिजे षड्विध ॥१०३॥

रसअन्न परिणामभेदेंकरून । श्वेत पीत कपित हरित कृष्ण ।
मांजिष्ठ म्हणिजे षड्वर्ण । प्रकटोनियां ॥१०४॥

शुक्राधिकाने पुरुष । शोर्णिताधिकाने स्त्रीवेश ।
शुक्रशोर्णितसमाने निर्जस । नपुंसक होय ॥१०५॥

सुकर्म सुलक्षण देहोतत्ती । कुकर्मे वधिर पंगुळ लसक्ती ।
शोर्णीत हिनांगी कुकांती । अनुक्रमें त्रयत्रय निपजें ॥१०६॥

रोम नाडी अस्ति रक्त मांस । त्वक् म्हणिजे षट्कोपयुक्त ।
अंगप्रत्यंगादि सकळ वेश । परिपूर्ण होय ॥१०७॥

आयुष्य कर्म म्हणऊन । द्रव्य व्याधि मरण ।
म्हणिजे पंचविध विभिन्न । समंधानें ॥१०८॥

विधिलिखित । पावोनि तेथ ।
दुःख आयास अत्यंत । पावत असें ॥१०९॥

नवमास भरलियावरी । येककोटी मुद्गल वांधे परी ।
तीव्र हाणोनी काढी वाहेरी । प्रसूतवायू ॥११०॥

तयाचेनि घाते मूर्छा पडोन । दीर्घभ्रांती उपजोन ।
प्रथम विवेक नासोन । व्याकूळ होय ॥१११॥

वरी उपमारहित । वेधनेने तेथ ।
जैसा लोहतप्त । जंत्री वोढे ॥११२॥

तैसा योनिद्वारापासोनी । वहिर्गत पडोनी ।
मूर्छागत होवोनी । हळूच चेतें ॥११३॥

अनुक्रमे त्या त्या । जातिसंस्कार योग्यता ।
होआवया सर्वथां । कारण असे ॥११४॥

धनुवात वाळ । ग्रहादि सकुळ ।
कंटक सकळ । निवारूनियां ॥११५॥

वाळलीळा आदि । विनोद नटोनी वृद्धी ।
संकेते भाष्यादि । अभ्यास करी ॥११६॥

अणीक अस्तिते जायते विवर्द्धते । विपरीणमते अक्षयते ।
विनाश म्हणिजे षट्भाव विकार तें । देहयुक्त म्हणवी ॥११७॥

पुण्याचेनि विशेषे ब्राह्मण । आदि शिष्टादीक जनन ।
पापाधिके श्वानशूकरादिक हीन । योनी जन्मादिक ॥११८॥

अणीक त्या कर्मवैचित्राचेनि । पुरुष तो होय कामिनी ।
कामिनी ते पुरुष होऊनी । जन्मत असे ॥११९॥

तेथ केलियां पुण्य । कर्माने दैवत्वपण ।
पापाधिक्के आन । स्थविरादि क्रिमित्व ॥१२०॥

पापपुण्यसमानत्वें । मनुष्यदेह लाभे निरुतें ।
पुढे पावावयासि तें । योग्य होउनि असें ॥१२१॥

या प्रकारे पुण्यानुमत्तें । स्वर्गलोक पावोनि मागुतें ।
इति लोकी जन्म पावणे तें । पितृयानी म्हणवी ॥१२२॥

अणीक ब्रह्मा विष्णु रुद्रादिक । सगुण देवता मुर्ति उपास्तिक्य ।
जाले तरी तया तया मुख्य । भक्तजनासी ॥१२३॥

दक्षिणनासापुटांग । पिंगळा म्हणिजे नाडिमार्ग ।
संयोगे प्राणवियोग । जालियावरी ॥१२४॥

प्रथम पावे ज्वलप्रकाश । तया ज्वलानें दिवस ।
तया दिवसाने विशेष । शुक्लपक्ष ॥१२५॥

वरी तया शुक्लपक्षानें । उत्तरायण उत्तरायणें ।
संवत्सर त्या संवत्सरानें । वायू त्या वायूपासूनी ॥१२६॥

सूर्य तया सूर्यापासूनी । शुद्धांश तया शुद्धांशापासोनी ।
विजयता विजयतेपासूनी म्हणोनियां ॥१२७॥

इंद्र तया इंद्रापासून । वरी अनुक्रमे करून ।
ब्रह्मा विष्णु म्हणोन । रुद्रादिपरी ॥१२८॥

देवतादिक । लोक सकळिक ।
साचारपूर्वक । प्राप्ति होय ॥१२९॥

तेथे ब्रह्मयाचेनि मानें । कामधेनू हंसादि वाहनें ।
ते ते देवतालोकीं असणें । ते सालोक्य म्हणवी ॥१३०॥

अणीक तया ब्रह्मया अति । सन्निध समंधे असती ।
सावित्र्यादि मंत्रशक्ती । तया समानत्वें ॥१३१॥

तया तया देवता समस्ती । जया प्रकारे असती ।
तैसी समीप स्थिती । ते समीपता म्हणवी ॥१३२॥

अणीक तया शिवसमंधत्व । जाले रुद्रानु जैसे विशेषत्व ।
तैसे ते ते देवतासम अकारत्व । ते सारूप्य म्हणवी ॥१३३॥

आणीक विष्णू । समंधी जाले आपणु ।
शुशुपाळादी अभिमन्यु । जयापरी ॥१३४॥

तैसे तया तया मुख्य । देवतासंयोगे ऐक्य ।
देहलक्षण येक । ते सायोज्यता म्हणवी ॥१३५॥

अणीक तया शिव । समंधी जाले सर्वे ।
नंदीश्वरादि देव । जयाप्रकारें ॥१३६॥

तैसे तया तया सर्वे विशेषत्व । देवतासमानत्व ।
ऐश्वर्यादि संपन्नत्व । ते सारूप्यता म्हणवी ॥१३७॥

त्या प्रकारे पंचपद । तार्तम्य तया तया विविध ।
देवतालोकाचे ठाई महानंद । सुखे असती ॥१३८॥

तेथे प्रळयकाळ वर्तता । तया तया देवता ।
संयोगे येकरूपता । शरीर होय ॥१३९॥

नातरी येथेचि अत्यंत । वैराग्यबळे उदित ।
सत्यज्ञान जालिया सत्य । निजमोक्ष होय ॥१४०॥

अणीक कोण्हे येके काळी तेथून । येथे पुनरावृत्ती होऊन ।
संमोहरहित जन । हितार्थ निमित्य ॥१४१॥

उभय कुळ शुद्धमय श्री । मन्वंतर गर्भी ना तरी ।
संप्रदाय सिद्ध आचारीं । तया कुळीं जन्मोनी ॥१४२॥

वरी ज्ञानक्रियासंपन्न होऊनी । सहज कैवल्यत्व पावोनी ।
असे तोचि देवायनी । म्हणवी निरुता ॥१४३॥

अणीक यम नियम । आदि अष्टांग योगधर्म ।
साधने सिद्ध जाले उत्तम । तया योगसिद्धासीं ॥१४४॥

रेचकादि सप्तप्राणायाम वळात्कारें । सुषुम्नानाडी शिरोरंध्रे ।
प्राणोत्कार आत संचारे । जाला तरी ॥१४५॥

सकामाने स्वइछा लोकप्राप्ती । निष्कामाने ब्रह्मलोकादि समस्ती ।
वेव्हाररहित तत्वातिती । शिवतत्वप्राप्ति होय ॥१४६॥

अणीक विशिष्टज्ञान । दीक्षाक्रमे जाला संपन्न ।
तयासी जीवन्मुक्ती होय पूर्ण । सिद्धी जाली ॥१४७॥

यालागी पूर्णघन । स्वरूपी स्थीर परतोन ।
गगनाऐसे गमनागमन । नाही तयासी ॥१४८॥

म्हणोनी नाही मार्ग नेमरहित । कासीचे ठाई तरी उचित ।
ना तरी अन्यत्र अन्यत्र । हीनाश्रयो होय पैं ॥१४९॥
जाणीव कां नेणीव ना तरी । कवणे प्रकारें प्राणायाम परी ।
येणे जालियां निज मोक्ष साचारी । होय म्हणोनि जाणावें ॥१५०॥
अणीक कर्मभक्ती । योगज्ञानादि समस्ती ।
पुण्यहीन जाला अती । तया पापात्म्यासी ॥१५१॥
तृणजळकन्यानुसारे । यातना शरीर धरूनि गुदगुह्यद्वारें ।
प्राण त्यजूनि गेल्यानंतरे । वरि तयासी ॥१५२॥
नीळादि ऐसे तम करिवळ । रक्तनयन विकराळ ।
दाढा पाश दंड युगुळ । करसहीत ॥१५३॥
रक्तवस्त्राभरणे । रक्तमयचंदने ।
रक्ताकार पुष्पानें । अळंकृत होऊनी ॥१५४॥
उग्रकंटक अतिउग्र । सुरकंटक उग्रचंड अत्युग्र ।
समग्र बळादि भयंकर । यमदूतादिक ॥१५५॥
धरूनि अति वांधता । नेऊनि दंडधारसमीपस्था ।
उभे करूनि चित्रगुप्ता । वाक्यप्रमाणे ॥१५६॥
जया जया पापासी । अनुसरला तैसी ।
वाधा महा तयासी । करूनि वरी ॥१५७॥
पूर्वोक्त समस्त । नरकसंमोहांत घालित ।
असती म्हणऊनि सत्य । निश्चये जाणावें ॥१५८॥
आणि उरलिया सामान्य । जीवजातीच्या गुदगुह्याने ।
प्राणत्याग जालिया पिशाचलोकस्थान । पदप्राप्ती होय ॥१५९॥
श्रोत्ररंध्रमुखे । प्राणत्याग विशेखें ।
जालियां न चुकें । पितृलोकप्राप्ती ॥१६०॥
मुखे प्राणत्याग जालिया । दैत्यलोकप्राप्ति न संशया ।
नेत्ररंध्रे प्राण गेलिया । स्वर्गलोकप्राप्ती ॥१६१॥
नासिके प्राणप्रयाणु । जालिया मृत्युलोकप्राप्तिस्थानु ।
प्राणत्याग जालियां कामधेनू । लोकप्राप्ती ॥१६२॥
अणीक उरलिया प्राणियां । कौळव्यामळमत्ताभिमानियां ।
पिशाचलोकपद तया । प्राप्ति होय ॥१६३॥
चार्वाक ज्योतिष । पूर्वमिमांसीक तयास ।
स्थूळभूतांतरवास । प्राप्ती होय ॥१६४॥

स्मार्तासि चिन्मात्रप्राप्ति इंद्रियें । जितासी इंद्रलोकप्राप्ती होय ।
मनचैतन्यवादिये । तया मनतत्वप्राप्ती ॥१६५॥

अहंकारचैतन्यासी । प्राणचैतन्यासी ।
अहंकारतत्व निश्चयेसी । प्राप्ति होय ॥१६६॥

वौध न्याइक । आणि वैशेषिक ।
तृतीयासी मुख्य । वुद्धितत्वप्राप्ती ॥१६७॥

अर्हत सत्व संभोगवादि द्विति । वर्गासी गुणतत्वप्राप्ती ।
पंचरात्रियासी प्रकृती । तत्वप्राप्ती ॥१६८॥

सांख्यवादियासी प्रकृती । मस्तकीचे भुवनप्राप्ती ।
अद्वितीया अति । पुरुषतत्वप्राप्त ॥१६९॥

पुराणिकासी समंधत्व । प्राप्त होय रागतत्व ।
कापाळिकासी काळतत्व । प्राप्ती होय ॥१७०॥

पशुपतीमत्ताभिमानियां । उत्पत्ती साम्यवादियां ।
अवेव सम्यक्वादियां । मायातत्वप्राप्ती ॥१७१॥

अणीक मायावृत्तिया । तयासी शुद्धमया ।
विद्यातत्वप्राप्ती होआवया ।निश्चयेसी ॥१७२॥

शिवप्रयोजककर्तृत्व । ईश्वरोदासिन्यकर्तृत्व ।
उपकर्तृत्ववर्गासी विशेषत्व । ईश्वरतत्वप्राप्ती ॥१७३॥

गरूड दक्षिण । वाम भूतादि विभिन्न ।
तांत्रिकासी निवृत्यादि भुवन । पदप्राप्ती ॥१७४॥

शुद्धशाक्तिक सर्व । तयासी शक्तितत्वप्राप्तव्य ।
शैवासी परशिव । समानत्व प्राप्ती ॥१७५॥

वेद वेदांत आगम । पुराणीक शास्त्र स्तोम ।
त्याचे ठाई गोप्योत्तम । सार तंत म्हणवी ॥१७६॥

अतिरहस्यार्थप्रतिपादक । वीरशैवमार्गे पूर्वक ।
जाला लिंगांगसंमंधी मुख्य । त्या षट्स्थूळज्ञानियासी ॥१७७॥

सर्वोत्कर्ष अकलंक । अखिल शिवऐक्य ।
प्राप्ति होय म्हणोनी विवेक । विचारे जाणावे ॥१७८॥

इति विवेकचिंतामणौ भुवनांतरप्राप्तिप्रकारवर्णनं नाम नवम परिच्छेदः समाप्तिमगमत् ॥ श्रीसांवार्पणमस्तु ॥

---

## दशम परिच्छेद

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसच्चिदानंदात्मने श्रीशंभूनीळकंठाय नमः ॥

तारतम्यानें समस्ती । मत्ताभिमाने जीवजाती ।
तयासी होय जे जे गती । तें सांगीतलें ॥१॥

आतां मार्गस्थिती काळ कर्म विशेष । निश्चीत म्हणिजे ऐसे ।
सांगिजेल अमोघ ते कैसें । म्हणीतले तरी ॥२॥

काळ म्हणिजे मायाकार्य निर्माण । तो स्थूळकाळ म्हणोन ।
सूक्ष्मकाळ म्हणऊन । द्विप्रकार असे ॥३॥

तयाआंतु लौकीककाळ । तो स्थूळकाळ म्हणवी केवळ ।
अध्यात्मककाळ । तो सूक्ष्म म्हणवी ॥४॥

अणीक तो काळ मनुष्यासी । पितृवर्गांसी देवतासी ।
ब्रह्मादिकाचेनि विशेषीं । समंधाने ॥५॥

बहुविधप्रकारे होऊनी । सकळ आत्मवर्गालागुनी ।
नाना वेव्हार गणीत करुनी । देतु असे ॥६॥

स्थूळमय लौकिक । काळाचे यथापूर्वक ।
लक्षण सकळीक । कैसे म्हणीतले तरी ॥७॥

येकचि मी चतुष्क । भागअंशातु येक ।
भागअंश तो मुख्य । तृटी म्हणवी ॥८॥

तया तृटिद्वय संयोगानें । येक लव म्हणवी आपण ।
तया लवउभययोगानें । येक निमिष्य म्हणवी ॥९॥

निमिष्यपंचदशसंयोगें । येक काष्ठा म्हणवी प्रसंगे ।
तया काष्ठा तीससंयोगे । येक कळा म्हणवी ॥१०॥

तया कळापंचदशसंयोगे येक । क्षीण म्हणवी मुख्य ।
क्षीणद्वयासंयोगे येक । मुहूर्त म्हणवी ॥११॥

तया मुहूर्तचतुष्क । संयोगाने येक ।
घटिका पूर्वक । म्हणवीतसे ॥१२॥

घटिकाअष्टाने येक प्रहर शुद्ध । प्रहर येकासी भेद ।
ज्योतिषाचे ठाई सप्तार्धं । घटिकासंयोगें ॥१३॥

तया प्रहर अष्टासी । मिळोनि दिवानिशी ।
साठि घटिकासी । दिन होय ॥१४॥

ते दिन अदितवार सोमवार । मंगळवार बुधवार ।
बृहस्पतवार शुक्रवार । शनिवारादि ॥१५॥

म्हणिजे विशेषें । सप्तप्रकार होऊनि असे ।
तया वारपंचदशें । येक पक्ष होय ॥१६॥

आणीक ते पक्ष दोन्ही । शुक्ल पक्ष म्हणऊनी ।
कृष्ण पक्ष म्हणोनी । द्विभेद पक्ष असती ॥१७॥

अग्नी आदि देवता । पाहावयासी निरुता ।
सूर्य अधिदेवता । विजेसी जाणावें ॥१८॥

कुबेर अधिदेवता । तृतीयेसी जाणा निरुता ।
नैर्ऋत्यवरुण अधिदेवता । चतुर्थी पंचमीसी जाणावें ॥१९॥

षण्मुख अधिदेवता षष्ठीसी । देवी आदि देवता सप्तमीसी ।
रुद्र अधिदेवता अष्टमीसी । असे निरुतां ॥२०॥

दुर्गी अधिदेवते । तिती नवमीते ।
इंद्र अधिदेवता निरुतें । येकादशी ॥२१॥

विष्णु अधिदेवता द्वादशी । ईश्वर अधिदेवता निश्चयेसी ।
( त्रियोदशी ) । चतुर्दशी तें ॥२२॥

चंद्र अधिदेवता पौर्णमेसी । म्हणिजे शुभाशुभरूपेसी ।
पंचदशतिथी संमंधेसी । शुद्ध शुक्लपक्ष म्हणवी ॥२३॥

या क्रमे प्रतिपादी पितृ अधिदेवता । अमावास्यापर्यंत समस्ता ।
पंचदशतिथ्या । कृष्णपक्ष म्हणवी ॥२४॥

अणीक ते पक्षद्वैत । त्याचे ठाई मेषादि समस्त ।
द्वादशराशी अश्विन्यादि सप्त । विंशति नक्षत्रें ॥२५॥

विष्कंभ प्रीति आयुष्मान । सौभाग्य शोभन ।
अतिगंड सुकर्मा म्हणोन । धृति शूल ॥२६॥

गंजवृद्धी म्हणोन । धृव व्याघात हर्षण ।
वज्रसिद्धि व्यतिपात वर्यान । परिघ शिव ॥२७॥

सिद्धि साध्य शुभकर । शुक्ल ब्रह्मा ऐंद्र ।
वैधृती म्हणिजे परिकर । सप्तविंशति योग ॥२८॥

शकुनी चतुष्पाद म्हणून । नाग किंस्तुघ्न ।
म्हणिजे चतुष्करण । स्थीरकर ॥२९॥

वव वालव कौलव म्हणोन । तैतिल गर वणिज म्हणऊन ।
भद्रा म्हणिजे सप्तकरण । चरकर म्हणिजे ॥३०॥

आपआपुलिया विशेख । क्रमाने साटिसाठिपूर्वक ।
घटिकेसी येक येक । म्हणवीत असें ॥३१॥

क्षयगामी होऊनी । वृद्धिगामी होऊनी ।
शुभाशुभरूपे करुनी । वर्तत असती ॥३२॥

तयाआतु विशेषीं । स्थीर करण ते चतुर्दशी ।
पौर्णमा अमावास्येसी । वर्तत असती ॥३३॥

उरले चरकरणादिक । तेतीस घटिकासी येक ।
दिवसासी द्वयद्वय मुख्य । वर्तत असती ॥३४॥

तिथि वार नक्षत्र योग । करण मणिजे पंचांग ।
युक्त पक्षद्वय संयोग । वशे मास होय ॥३५॥

ते मास चैत्र वैशाख म्हणऊन । ज्येष्ठ आषाढ श्रावण ।
भाद्रपद अश्विन । कार्तिक मास ॥३६॥

मार्गेश्वर पूस । माघ फाल्गुण मास ।
म्हणिजे द्वादश । प्रकारे असती ॥३७॥

तया मासद्वयाने होय ऋतु । ते ते हिम शशिर वसंतु ।
ग्रीष्म वर्ष शरद्रुतु । म्हणिजे ऋतुषट्‌क ॥३८॥

ऋतू होउनी पृथक । मार्गेश्वरादि मुख्य ।
द्विद्विमासासी येक येक । वर्तत असे ॥३९॥

तया ऋतुत्रयाचेनि । संयोगेकरुनी ।
येक अयन म्हणवोनी । घेत असे ॥४०॥

ते दक्षिणायन म्हणवोनी । उत्तरायण म्हणोनी ।
द्विप्रकार होउनी । घेत असे ॥४१॥

तया अयन । उभय योगेकरून ।
येक आपण । संवत्सर म्हणवी ॥४२॥

ते संवत्सर प्रभव विभव शुक्ल । प्रमोदूत प्रजापती आंगिरा श्रीमुख ।
भावा युवा धाता ईश्वर वहुधान्य प्रमाथी विक्रमार्क । चित्रभानू सुभानू ॥४३॥

तारण पार्थिव व्यय सर्वजित्सर्वधारी ।
विरोधी विकृती खर नंदन विजय मन्मथ दुर्मुखी ।
हेमलंवी विलंवी विकारी । शार्वरि प्लव ॥४४॥

शुभकृत् शोभकृत् क्रोधी विश्वावसु पराभवः ॥
प्लवंगः कीलकः सौम्य साधारण विरोधिकृत् ॥४५॥

परिधावी प्रमादी च आनंदो राक्षसो नळः ॥
पिंगळः काळयुक्ता च सिद्धार्थी रौद्र दुर्मतिः ।
दुंदुभी रुधिरोद्गारी रक्ताक्षी क्रोधन क्षयः ॥४६॥

म्हणिजे साठिप्रकार विभिन्न । असती तरि ते भिन्नभिन्न ।
शुभाशुभफळदायक होऊन । अनुक्रमें ॥४७॥

उत्तम मध्यम म्हणऊन । आणि कनिष्ठ म्हणोन ।
म्हणिजे विंशति विंशति होउन । वर्तत असती ॥४८॥

आणीक दिवस । पक्ष तथा मास ।
ऋतु अयन वर्ष । सकळ वर्ग ॥४९॥

मनुष्यजन्म पूर्वोक्त । सूर्याचे यथार्थ ।
वर्तन प्रणामूनि घेत । असती निरुते ॥५०॥

देवताजनातें । तयाचे निरुतें ।
इडा पिंगळा म्हणिजे तें । चंद्र सूर्य ॥५१॥

रेचक पूरक । म्हणिजे तयाचे मुख्य ।
संचरणादिक । लक्षीत आसती ॥५२॥

अणीक लौकीक । वर्गासी येकमास संख्य ।
ते पितृजनासी येक । दिन होय ॥५३॥

तैसे दिन साठित्रय । जालिया येक वर्ष होय ।
तया क्रमें तयासी शताय । म्हणोनि जाणावें ॥५४॥

अणीक तया सूर्याचे दक्षिणे । अयन ते देवतालागून ।
येकरात्री उत्तरायण । तेचि दिवस म्हणवी ॥५५॥

ऐसे दिवारात्री उभय । संयोगे येकदिन होय ।
ते दिन साठित्रय । शत जालियां ॥५६॥

देवताजनासी येक । होय दिव्यवर्षक ।
तैसे दिव्यवर्षे संख्य । शतायु त्या स्थिती ॥५७॥

आणीक तया मनुष्यजाती । चि या वर्षानुक्रमें समस्ती ।
कृतादि युगे वर्तत असती । ते कैसे म्हणीतले तरी ॥५८॥

त्रेतायुग ते द्वादशक । लक्षवरी विशेख ।
शाण्णवसहस्त्रक । वर्षे वर्तत असे ॥५९॥

कृतायुग ते सप्तदश । लक्षवरी विशेष ।
अष्टविंशतिसहस्त्रवर्ष । वर्तत असे ॥६०॥

द्वापारयुग साचारीं । अष्टलक्षावरी ।
चौसष्ट सहस्त्रभरी । वर्षे वर्तत असे ॥६१॥

कलियुग ते चतुष्क । लक्षावरी विशेख ।
बत्तीससहस्त्रवर्षक । वर्तत असे ॥६२॥

या चतुष्ट्युगानुक्रमे चतुष्पाद । त्रिपाद द्विपाद एकपाद ।
होऊनियां परिभेद । धर्म वर्तत असे ॥६३॥

अणीक कृतायुगीं । आणि त्रेतायुगीं ।
ज्ञान द्वापारयुगीं । यज्ञ कलियुगांत ॥६४॥

दान ईश्वर क्षेत्र । यात्रादी साचार ।
भोग मोक्षासि वर । साधन होऊनि असे ॥६५॥

अणीक तया युगांत विशेष । कृतायुगाचे ठाईं दश ।
वर्षा येका सिद्धि तपास । कर्मादिक ॥६६॥

त्रेतायुगीं येक वरुषां । मध्ये सिद्धि तपसा ।
द्वापारीं येक मासां । तपासी सिद्धि होय ॥६७॥

कलियुगीं येके दिवसीं । सिद्धी होय तपासी ।
त्यालागी निश्चयेसीं । कलियुगांतु ॥६८॥

रोगादि दोषरहित मनसादिक । अनृतादि दुष्कृतरहित वाक ।
हिंसादी कलुषरहित कायेक । हे त्रिकरण ॥६९॥

शुद्ध जाले पूर्वक । तया महापुरुषासी प्रत्यक्ष ।
हे कलयुगी भोग मोक्ष । शीघ्र होय ॥७०॥

अणीक तया चतुष्ट्युगाचे ते तें । गणितानें भिन्न भिन्न निरुतें ।
ही साटी त्रिशतें । दिनाने विभागुनी ॥७१॥

गणीत करूनि संख्येचें । पाहिलिया देवताचें ।
दिव्य वर्ष होय साचें । तया कारण ॥७२॥

कृतायुगादी चतुष्क । सहस्त्रावरी विशेख ।
अष्टशत दिव्यवर्षक । होय निरुतें ॥७३॥

त्रेतायुग ते त्रिसहस्त्रषट्क । शते होय दिव्यवर्षक ।
द्वापार द्विसहस्त्र चतुष्क । शते दिव्यवर्ष होय ॥७४॥

कलियुगी तें येक । सहस्त्रावरी अधिक्य ।
द्विशत द्विवर्षक । संख्या होय ॥७५॥

इति गुणलियां येकत्र । द्वादशसहस्त्र ।
जालिया साचार । दिव्यवरुषें ॥७६॥

कृतादि चतुष्क । युगे मिळोनियां येक ।
म्हणवी मुख्य । दिव्ययुगें ॥७७॥

तैसी ती दिव्य युगें । येकविंशति संयोगें ।
म्हणवी प्रसंगे । येक मन्वंतर ॥७८॥

तैसी मन्वंतरे । चतुर्दश जालियानंतरें ।
म्हणवी साचारें । येक सृष्टिकल्प ॥७९॥

सृष्टिकल्प ते कारण । महादिव्ययुग म्हणवी आपण ।
तैसी दिव्ययुगें सहस्त्र जालिया दिन । येक ब्रह्मयासि होय ॥८०॥

तयां दिवस । येकांतु चतुर्दश ।
मनूसी बहुवस । इंद्रवर्गासी ॥८१॥

अधिकार समाप्त । होऊनि पुन्हा अत्यंत ।
अधिकारी उदित । होत असती ॥८२॥

अणीक तैसे दिव्ययोगभरी । ब्रह्मियासी येक रात्री ।
होऊनि असे साचारीं । संहारकल्प ॥८३॥

तैसी दिव्यरात्री उभय । मिळोनियां येक दिवस होय ।
तैसे दिवस साठित्रय । शते जालियां ॥८४॥

येक वर्ष होय युक्त । तैसी तिये वरुषे शत ।
संख्यापर्यंत । ब्रह्मियाची स्थिती ॥८५॥

ते स्थितीआंतु अनेक मनु अनंत । शेषादिकाचा अधिकार समाप्त ।
होऊनियां पुनः अधिकारी उदित । होत असती ॥८६॥

अणीक तया ब्रह्मियाची । स्थिती म्हणिजे तोची ।
विष्णूचा येकचि । मास होय ॥८७॥

तया मास येकाभीतरी । ब्रह्मियासी अधिकार परी ।
समाप्त होऊनि पुनः अधिकारी । उदीत होत असती ॥८८॥

तैसे मासद्वादशक । मिळालिया वर्ष येक ।
तैसी वर्षे शतसंख्य । विष्णूची स्थिती ॥८९॥

तया स्थितीभीतरीं । अनेक ब्रह्मियासी अधिकार परी ।
समाप्त होऊनी पुनः अधिकारी । उदीत होत असती ॥९०॥

अणीक तया विष्णूची जे । स्थिती पै म्हणिजें ।
तोचि रुद्रासी जाणिजें । येक मास होय ॥९१॥

तया मास येकाआंत । विष्णूचा अधिकार समाप्त ।
होउनियां पुन्हा उदित । होत असती ॥९२॥

तैसे मासद्वादश मिळालियां । येक वर्ष होय तैसियां ।
शतवर्षपर्यंत तया । रुद्राची स्थिती ॥९३॥

तया स्थितीआतु अनंत । नारायणासी अधिकार समाप्त ।
होउनियां पुन्हा अधिकारी उदित । होत असती ॥९४॥

अणीक तया रुद्राची पूर्ण । स्थिती म्हणिजे ईश्वरालागून ।
येक दिवस तया दिन । येकाभीतरीं ॥९५॥

रुद्राचा अधिकार समाप्ती । होऊनियां आणीक पुढतीं ।
अधिकारी उत्पत्ती । होत असे ॥९६॥

तैसे दिन साठित्रिशत । जालिया येक वर्ष युक्त ।
तैसी वर्षे शतपर्यंत । ईश्वराची स्थिती ॥९७॥

तया स्थितीआंतु असंख्याती । रुद्राचा अधिकार समाप्ती ।
होऊनिया अणीक पुढती । अधिकारी उत्पत्ती होत असती ॥९८॥

अणीक तया ईश्वराची । स्थिती म्हणिजे तेचि ।
सदाशिवाची येकचि । निमिष्य होय ॥९९॥

तया निमिष्याआंतु ईश्वराचियां ।
स्थिती म्हणिजे तेचि अधिकार समाप्ति होऊनियां ।
पुढती अधिकारी अतिशया । उदीत होत असे ॥१००॥

या क्रमाने विशेष संख्या । वृद्धि संकेत घटिका ।
प्रहर दिन पक्षा । मास वर्ष ॥१०१॥

तैसी वर्षे शतपर्यंत । संख्या असे निश्चित ।
असे स्थिती शाश्वत । तया सदाशिवाची ॥१०२॥

तये स्थितीआतु अनंत । ईश्वराचा अधिकार समाप्त ।
होऊनि पुन्हा अधिकारी उदितु । होत असती ॥१०३॥

तया सदाशिवाची स्थिती म्हणिजे। विंदोपाधीने मंत्रमूर्ति होऊनि विराजें।
मुमुक्षुवर्गासि ध्यानपूजार्थकाजें । रूप धरिलें ॥१०४॥

सकळ म्हणोनि । सकळ निष्कळ म्हणऊनी ।
निष्कळ म्हणोनी । घेत असें ॥१०५॥

महेश्वर सदाशिवमूर्ति । शिव म्हणिजे इति ।
याचा अधिकार समाप्ती । ते परशिवाली ॥१०६॥

येक तृटी मात्र । म्हणिजे तेही उत्तर ।
अरोपींत साचार । तितुलियांतु ॥१०७॥

अनंत सदाशिवागुनी । अधिकार समाप्ती होउनी ।
पुन्हा अधिकारी विशेष गुणीं । उदीत होऊनि असती ॥१०८॥

अणीक हिया । प्रकारे जालियां ।
संव्हारलिया । क्रमाचे ठाईं ॥१०९॥

स्वर्ग मृत्यु पाताळ । म्हणिजे लोकत्रय सकळ ।
संव्हार होय तो केवळ । अधमप्रळयो म्हणवी ॥११०॥

त्याचे ठाई विशेष । ऊर्ध्व महालोक ।
आदि स्थितिपूर्वक । उरोनि असें ॥१११॥

आणि पृथ्वी प्रथम । प्रकृतीआंत तत्वस्थोम ।
संहारत होय तो मध्यम । प्रळयो म्हणवी ॥११२॥

तया प्रळयाभीतरीं । ऊर्ध्वरागादी तत्व परी ।
भुवन स्थिती उरी । उरोनि असे ॥११३॥

आणि पृथ्वी प्रथम । प्रकृती आंत तत्व स्थोम ।
संहारत होय तो मध्यम । प्रळयो म्हणवी ॥११४॥

तया प्रळयाभीतरीं । ऊर्ध्वरागादी तत्व परी ।
भुवनस्थिती उरी । उरोनि असे ॥११५॥

धरणी आदि म्हणउनी । शिवतत्वाते करुनी ।
सकळ संव्हार निदानी । होय तेथें ॥११६॥

सकळ तत्वाची आदि षडध्व । गर्भी करुनी अवस्थेने बिंद ।
मात्रा उरोनि असे तो प्रसिद्ध । महाप्रळयो म्हणवी ॥११७॥

तो महाप्रळयो वर्ततां । त्याचे ठाई निरुतां ।
परशिव सर्वथां । अपण स्वयें ॥११८॥

मळविशिष्ट परिपाक । तार्तम्यापेक्षेनें विशेष ।
बोधावयासी मुख्य । योग्य जाले असती ॥११९॥

तया ऐक्य रसिकशक्तिमात्रें करुनी । बोधावया उपयोग्य म्हणोनी ।
अनुग्रहेकरुनी । अपणाऐसे करीं ॥१२०॥

निबिड तरूमूळ परिपाकें । अवरोधासी योग्य जाले विशेखें ।
तयासी रोधशक्तिमात्रें निकें । रोधीत असें ॥१२१॥

कर्मी मंदतर मळ । परिपाक समंधी सकळ ।
तयासी कर्म ते केवळ । उरली स्थिती ॥१२२॥

काळभावी जाले आपण । भोग निमित्यकारण ।
तयांसी क्रियाशक्तीने पचन । करीत शुद्ध करी ॥१२३॥

शुद्धाशुद्ध होउनी । मायाशक्तीचेनि ।
श्रृष्टिसंधी निदानीं । तरणविषई ॥१२४॥

अभिव्यक्तीसी स्वतंत्रे । योग्य होऊनि परि अंतरे ।
अखिल कार्य साचारें । करीत असें ॥१२५॥

अणीक तो बिंदु अति । क्रमूनि असे निष्कळ चित्‌शक्ती ।
तया अग्री प्रकाशत असे स्वयंज्योती । श्रीशंभूनीळकंठ ॥१२६॥

त्याचे ठाई कांही येक । काळदेशादिक ।
कल्पनामात्र निःशेख । नाही म्हणोनी ॥१२७॥

तो श्रीगुरू शंभूनीळकंठ नित्य निर्मळ । निरावर्ण निर्भय निश्चळ ।
निर्गुण निष्कर्म निर्मळ । निष्प्रपंच ॥१२८॥

निरागम निर्लेप । निरामय निर्दीप ।
निर्वेद्य निष्कंप । निःसंग निर्द्वंद्व ॥१२९॥

निराकुळ निरांतक । निस्तत्व निष्कळंक ।
निराश्रय निर्विशेख । निरावधी निरोपम ॥१३०॥

निरांतिशय नित्यमुक्त । चिन्मयस्वरूप सत्य ।
आनंदरूपे संततोदित । विराजत असे ॥१३१॥

ऐसे प्रकारिचे लिंग आठवण । केलिया आयुरारोग्य रूप यौवन ।
लावण्यलक्षण । सकळकळा सहजभरित ॥१३२॥

वनितादी सकळ पुत्रपौत्रजन । बंधुबांधव धनधान्य ।
बळपराक्रम विद्यावितरण । नयनविनयादि ॥१३३॥

सकळ सौभाग्यादी सामग्रीसहित । सप्तसमुद्र मुदित ।
वसुंधाअधिपत्य । होऊनियां ॥१३४॥

संतोष संजनित । सुखस्वरूपे अत्यंत ।
सूक्ष्मे इहीलोकांत । अनुभव होय ॥१३५॥

वरि सर्वोत्कर्ष । सर्वाधारीं अशेष ।
श्रीगुरू शंभूनीळकंठास । तद्युक्त होय ॥१३६॥

सर्वज्ञत्वसहित । सर्वकर्तृत्वेसी सत्य ।
आनंदस्वरूपवंत । होऊनि असे ॥१३७॥

भोगमोक्षादि अनेक सुखशांती । जे येकाग्र ऐकोनी जाणती ।
तयासी सर्वथां होय प्राप्ती । म्हणोनी अशिर्वाद ॥१३८॥

लक्षणमंगळाचरणेकरुनी । विवेकचिंतामणी ।
म्हणिजे प्रकरण सिद्धवचनीं । संपूर्ण जालें ॥१३९॥

श्रीमद्यनेक सुरवरादिक । सन्मत्तानें शोभे विवेक ।
चिंतामणी म्हणिजे तारक । संस्कृतशास्त्र ॥१४०॥

ऐकतियांसी लभ्य होऊनी । सर्व संशयो निरसुनी ।
भिन्न बहुशास्त्राभ्यास आठणी । बाधा निरसें ॥१४१॥

तत्प्रेमातु लीन होऊनि इष्ट । सिद्धर्थ पुरेल यथेष्ट ।
सिद्ध होय सर्वोत्कृष्ट । श्रीशंभूनीळकंठी ॥१४२॥

हे शास्त्र विचारपूर्वक । जाणीतल्या भोगमोक्षादि अनेक ।
सुखसिद्धि संतान प्रत्यक्ष । प्राप्ति होय ॥१४३॥

स्वस्ति संमत सुरगणीं । विसुर मुगुटमणी ।
गणकिरणीं । प्रचुर प्रवाह तरंगी ॥१४४॥

तटविराजित पादराजित । युग्म श्रीशंभूसत्कृपाकटाक्ष ।
सांद्रचंद्रिका शक्रांतु निरस्त । निखिल संसार ॥१४५॥

अश्रमविस्फूर्जित । निजानंदस्वानंदशक्त ।
चित्तोपित शांतलिंगशिवयोगीविरचित । विवेकचिंतामणी॥१४६॥

इति विवेकचिंतामणी ग्रंथ । नामप्रकरण समाप्त ।
मंगळ माहेश्वरी प्रसाद प्राप्त । शुभं भवतु ॥१४७॥

इति विवेकचिंतामणौ सकळवेदांतसिद्धांतशास्त्रविवरणं ।
नाम दशम परिच्छेदः समाप्ति ॥१०॥

श्रीशंभूसच्चिदात्मने नीळकंठार्पणमस्तु ॥ श्रीसांबायनमोस्तु ॥
क्रोधीनाम संवत्सरे अश्वीन वद्य १३ त्रयोदशी गुरुवारी
विवेकचिंतामणी ग्रंथसमाप्ति ॥

---

# पाठभेद

## प्रथम परिच्छेद

| ओवी व चरण | प्रत १ | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|
| १-१ | शंभूश्रीनीलकंठा | श्रीनीलकंठा | |
| १-३ | प्रणवरिष्टा | प्रणवविशिष्टा | |
| १-४ | नित्यस्वरूपा | नित्यरूपा | |
| २ | | | कर्तृ, भर्तृ, मातृ, पितृ हीं प्रत १ मधील रूपें प्रत २ मध्यें कर्ता, भर्ता, माता, पिता अशीं 'आ'कारान्त लिहिलेलीं आढळतात. ४ था चरण दोन्ही प्रतींत वेगवेगळ्या तऱ्हेनें तोडला गेलेला असला तरी तो ' सकळैकगुरुदेवा ' असा पाहिजे. |
| ३-४ | विश्वात्मया | विश्वमया | |
| ५-१ | नन्नाअन्यास्ति शिवपरू | अनन्य असा शिवपर | प्रत १ मधील शिवपरू, निर्धारू, श्रीहरू ही 'ऊ'कारान्त रूपें प्रत २ मध्यें 'अ'कारान्त आहेत. |
| ५-२ | ऐसा वेदअगमासि निर्धारु | असा वेदागमासि निर्धार | ' ऐसा ' हा पाठ अधिक योग्य वाटतो. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५-४ | सकळारंभी | सकलारंभा | |
| ६-१ | दैवविशा | देवेशा | 'देवेशा' हा पाठ अर्थपूर्ण आहे. |
| ७-१ | जैसी त्रिंदुसंख्या येकल्याविण | जैसी वी सख्या येकड्याविण | प्रत २ मध्यें लेखनप्रमाद आहे. |
| ७-२ | सकळशून्य निर्वाण | सकळ शून्यत्व निर्वचन | |
| ७-४ | अनंत ब्रह्मगोळा | अनंत ब्रह्मगोल | प्रत २ मधील पाठ ग्राह्य. |
| ९-२ | हातवसे | होत वशे | 'हातवसे' हा योग्य पाठ होय. |
| १०-१ | वरि लोका लभ्यांशु निजार्थेसिद्धी | वीरलोक परार्थसिद्धि | प्रत २ मध्येंहि 'वरि' हा शब्द 'वीर' असा छापला गेलेला दिसतो. |
| १३-३ | तो तूं परमानंदा ऐके क्रम | तें तूं परमानंदें ऐके क्रम | प्रत २ मधील पाठ स्वीकारार्ह. |
| १४-४ | निराभासी देशिकोत्तमा | निराभारिदेशिकोत्तमा | 'निराभारि' हाच पाठ बरोबर.—नि. लिं. |
| १७-२ | कलत्रया | फलत्रय अपसया | 'फलत्रयं निर्धार्य' या शब्दांवरून प्रत २ मधील 'फलत्रय' |
| १७-४ | निर्धारावें | अवधारावें | व प्रत १ मधील 'निर्धारावें' हे पाठ योग्य ठरतात. 'फलत्रयं सिद्धं यंदु निर्धरिसि'—नि. |
| १८-२ | सर्वोत्कर्ष | सर्वोत्कृष्ट रूप | 'सर्वोत्कृष्ट' हा पाठ बरोबर. |
| १९-२ | परिणाम | प्रमाण | प्रत २ मधील पाठ बरोबर. |
| २३-१ | स्तंभजमणी | स्थितमणि | |
| २३-३ | माळा वोविजेल | माळ ओविजेल | 'वोविजेल' हा पाठ भाषेचें जुनें वळण दाखवितो. |
| २५-२ | सारांतर | सारतर | |
| २६-२ | होआवे | व्हावें | |

| ओवी व चरण | प्रत १ | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|
| २६-३ | पूर्वाचारसिद्धवचनीं | पूर्वाचार्येवचनीं | |
| २७-३ | सांगिजेल म्हणे शांतेश्वर | सांगितलें म्हणोनि शांतेश्वर | पहिला पाठ बरोबर. |
| २८-३ | पृथक्‌बुद्‌बुदाकार | पृथुबुध्नोदराकार | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| २९-१ | वटवत | घटवत | ‘ घट्वत् ’ बरोबर. ‘ घटदंते ’ – नि. |
| ३२-१ | वेव्हारभेदेकरून | व्यवहारभेदेंकरून | |
| ३४-१ | म्हणती | म्हणसी | |
| ३७-३ | अनैश्वर्यत्व | अनीश्वरत्व | ‘ अनीश्वरत्व ’ हा पाठ शुद्ध आहे. |
| ३९-१ | पराशिष्यन्यायें | पारिशेषन्यायें | प्रत १ मधील पाठ अग्राह्य. ‘ पारिशेष्यप्रमाणेन ’ – लिं. ‘ पारिशेषन्यायदिं ’ – नि. |
| ४०-३ | सत्यानुसारे | श्रुत्यनुसारें | |
| ४७-३ | काळवंत मूर्तिमंत स्वइच्छेसी | काळवत् अमूर्तिमंत स्वेच्छेसि | ‘अमूर्तिमंत’ बरोबर. ‘काल अमूर्तः सन्’ – लिं. ‘ अमूर्तवागि ’ – नि. |
| ४८-१ | पल्लवकूष्मादि | पल्लवकुसुमादि | प्रत २ मधील पाठ योग्य. – नि. |
| ४९-१ | निष्कळंत्वे वेढून | निष्फलत्वें वंदून | प्रत १ मधील पाठ बरोबर. – नि. ‘ निष्कलंकत्वेन ’ – लिं. |
| ४९-४ | नेमक | नियामक | दुसरा पाठ मुळास धरून. नि. ‘ नेमक ’ हें ‘ नियामक ’ चें रूप सर्वत्र आढळतें. |
| ५०-४ | मातु प्रसिद्ध | आगमांत प्रसिद्धि | ‘ आगमांत ’ या पाठास लिंगराजीयाचाहि आधार मिळत नाहीं. |
| ५४-२ | नित्यनिग्रहो | नित्यविग्रह | |
| ५८-१ | ईश्वरादी | ईश्वरासि | दुसरा पाठ चांगला. ‘ ईश्वरंगे ’ – नि. |

| | | | |
|---|---|---|---|
| ६४-३ | शाऍंशी भेद यजुर्वेद | एकादशभेद यजुर्वेद | प्रत २ मधील पाठ बरोबर आहे. ' यजुर्वेद एकादशभेदभिन्नः ' – लिं. ' हन्नोंदु ' – नि. |
| ६६-२ | नामध्येय | नामधेय | ' नामधेय ' बरोबर. पहिल्या पाठांत लिहिण्याची विशिष्ट लकब आहे. |
| ६८-१ | वेदकांसी | वंदिकासि | दुसरा पाठ योग्य. ' वंदिगळंते '–नि. ' वंदिन इव दिव्यार्थस्थापकोऽर्थवादः '– लिं. |
| ७५-३ | अकारण | व्याकरण | ' व्याकरण ' हा पाठ ग्राह्य. ' व्याकरणवे वैदिकशब्दसिद्धियं समर्थिसुवदु ' – नि. |
| ८१-१ | व्याधिनिंदा | व्याधिनिदान | दुसरा पाठ बरोबर. |
| ८१-२ | मंत्राषधी | मंत्रऔषध | पहिल्यांत लेखनप्रमाद आहे. |
| ९२-४ | भेद | अष्टादशभेद | ' अष्टादशव्यावहारभेदान् ' – लिं. |
| ९४-१ | काम्यकानड | कंमकन्नड | ' कंमद्रविडकर्नाटकांध्रभेदेन जातयः ' – लिं. ' कम्मे कन्नडिग आंध्र द्राविड ' – नि. |
| ९६-२ | श्रीमंत उन्नयन | सीमंतोन्नयन | दुसरा पाठ चांगला. |
| ९६-४ | उपनिष्क्रामना | उपाकर्मोत्सर्जन | ' उपनिष्क्रमणं ' – लिं. |
| ९८-१ | महाव्रत उपोष्तिु । | स्नातक स्मार्ताग्निहोत्र । | |
| ९८-२ | शोभन उदह मृत्यु । | आणिक उद्वाह मृत्यु । | |
| १००-१ | शिवव्रती | शिवरति | |
| १०१-२ | दुर्जय | दुर्जन | दुसरा पाठ चांगला. – नि. |
| १०७-१ | बावन्न द्वादद द्वितीय | बैंव्यन्न द्वौ द्वंद्व | ' बैंबेन्निति प्राकृतभाषायां द्विसंज्ञानामानि ' – लिं. प्रत २ मधील पाठ बरोबर आहे. |

| ओवी व चरण | प्रत १ | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|
| १०८-२ | वररत्न | वर्ग | 'वर्गगुण'—नि. 'वर्ग' हाच पाठ योग्य होय. लिंगराजीयांत 'वर्ग' हाच शब्द आहे. प्रत १ मध्यें 'गुण' शब्द नाहीं. |
| १०९-१ | कसाया | कषाय | दुसरा पाठ चांगला. 'गती' हा शब्द प्रत २ मध्यें नाहीं. |
| १११-१ | द्रव्य | — | } प्रत २ मध्यें 'द्रव्य' आणि 'वर्ण' हे शब्द नाहींत. |
| १११-२ | वर्ण | — | |
| ११२-१ | राजांग | राज्यांग | दुसरा पाठ बरोबर. |
| ११६-१ | शमविशम | समअसम | लेखनवैशिष्ट्याचा फरक. |
| १२३-२ | ऋषेश्वरप्रोक्त | व्यासर्षिप्रोक्त | 'व्यासऋषीश्वरोक्तमाद'—नि. |
| १२३-३ | नष्टसंख्यार्थ | नष्टशाखार्थ | दुसरा पाठ योग्य. 'वेदस्य नष्टशाखार्थप्रतिपादनतां गतम्'—लिं. 'वेदद नष्टशाखार्थप्रतिकादकमप्प'—नि. |
| १३८-२ | आरोहत | अर्हत | 'अर्हत' हाच योग्य पाठ. |
| १४३-१ | मोक्षवासना | मोक्षावसान | निजगुणशिवयोगी हा शब्द वापरत नाहींत. |
| १४३-२ | अन्ना | आन | 'अन्ना' हें 'अन्य' चें रूप. |
| १४४-२ | सिद्धबद्धनर्कइति | सिद्धबद्धनारकि इति | दुसरा पाठ योग्य. मुळांतहि असेंच आहे. 'शुद्धबुद्धनारकीरूपजिनत्रयलक्षणानि'—लिं. नि. |
| १४५-१ | वडीसवडीमेलेस्वकल्प | वड्डीशड्डावमरेश्वरकल्प | दुसरा पाठ योग्य. 'वड्डीशवड्डामरेश्वर'—लिं. 'ओड्डीश ओड्डामरेश्वरकल्प'—नि. |
| १४५-३ | कूटकल्प | कुकुटनाथादिकल्प | दुसरा पाठ अन्वर्थक आहे. —नि. |
| १४६-१ | ते परमसिद्ध निकर। | ते परमसिद्धवर। | प्रत २ मधील पाठ अधिक शुद्ध व योग्य आहेत. |

| | | | |
|---|---|---|---|
| १४६-२ | लुतिनीसदिगंबर । | लूनकेश दिगंबर । | ‘ परमसिद्धान् । लूनकेशदिगंबर पाणिपात्र मयूरपिच्छ ’ –लिं. नि. |
| १४६-३. | मयोरपर पाणीपात्र । | मयुरपंखपाणिपात्र । | |
| १४७-४ | पंचानुवृत्तयुक्त | पंचाणुव्रतयुक्त | दुसरा पाठ बरोबर. ‘ पंचाणुव्रतंगळं ’ – नि. |
| १४८-१ | मधुपल्लववडादि | मधुपलांड्वादि | पहिला अग्राह्य. पलांडु = कांदे. ‘ मधुपलांडुमोदलाद ’ – नि. |
| १४८-२ | सौनवस्ती | शयनादि | दुसरा स्वीकारार्ह. ‘ –तप्तशिलाशयनादि ’ – नि. |
| १५०-२ | बद्ध | बंध | ‘ बंध ’ ग्राह्य. ‘ आश्रम बंध मोक्ष ’ – नि. |
| १५१-४ | प्रपंचसंमोह | प्रपंचसमूह | ‘ संमोह ’ हें ‘ समूह ’ शब्दाचें रूप प्रत १ मध्यें सर्वत्र आढळतें. |
| १५३-१ | शौर्यतांत्रिक | सौत्रांतिक | दुसरा पाठ बरोबर. – नि. |
| १५४-२ | संतोघ्रनाथ | सलोकनाथ | प्रत २ मधील योग्य. – नि. |
| १५४-३ | अकुळीनाथ | अकुळीतनाथ | ‘ अकुलितनाथ ’ – लिं. दुसरा पाठ ग्राह्य. – नि. |
| १५५-२ | गयनीनाथ | नवनाथ | ‘ गयनीनाथ ’ हें नांव लिंगराज व निजगुण देत नाहींत. |
| १६२-२ | स्त्रीवैश्यादि | स्त्रीवश्यादि | येथें वैश्यांचा संबंध नाहीं. म्हणून दुसराच पाठ योग्य. ‘ स्त्रीवश्यंगळं ’ – नि. |
| १६३-३ | आयुष्यसिद्धि | — | हा शब्द प्रत २ मध्यें नाहीं. तर याच ओवींतील प्रत २ मधील ‘मूलिकासिद्धि घुटिकासिद्धि’ हा चरण प्रत १ मध्यें नाहीं. |
| १६४-१ | यासि | शक्तितत्वासि | ‘ यासि ’ या शब्दामुळें कांहीं अर्थबोध होत नाहीं. म्हणून दुसरा पाठ ग्राह्य. |
| १६९-२ | रोहिणी या वाराज | रोहिणीया म्हणोनि वीराज | दुसरा पाठ बरोबर. रौहिणेय = बलराम. |
| १७०-३ | मातृकादि | मांत्रिकादि | ...‘ मांत्रात्मिक ’ – लिं. ‘ मांत्रिकगळेंब ’ – नि. |
| १७२-२ | कण्वादि | कणाद | ‘ कणाद ’ हा पाठ योग्य. – नि. |

| ओवी व चरण | प्रत १ | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|
| १७६-२ | प्रमय | प्रमेय | प्रत २ मधील पाठ ग्राह्य. |
| १७९-३ | समवायु | समयाभाव | ' समवाय अभाव ' – नि. |
| १८०-१ | षट्पदार्थ | सतपदार्थ | ' पदार्थसतकमं ' – नि. |
| १८१-१ | — | कपिल | ' कपिल ' हें नांव प्रत १ मध्यें नाहीं. मुळांत आहे. |
| १९१-२ | वस्य जाले संतत | कालतत्वइति त्रिविधयुक्त | दुसरा पाठ योग्य. |
| १९७-१ | क्रिया अचरिया | क्रियाचर्या | ' क्रियेच्चर्या ' – नि. दुसरा पाठ ग्राह्य. |
| २०१-१ | प्रणवचि | प्राणचि | ' प्राण एव आत्मेति ' – लिं. ' प्राणवे ' – नि. |
| २०७-१ | देहपात्रादी | देहपुत्रादि | दुसरा पाठ ग्राह्य. ' देहपुत्रादिरूपनेंवरू ' – नि. |
| २११-१ | असंख्य | असंग | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| २१७-१ | तया लौकीकशास्त्रांतु संचरण | तया अलौकिक आकाशांत संचरण | दुसरा पाठ योग्य. – नि. ' अलौकिकाशमध्यें ' – लिं. ' अलौकिक आकाशमध्यदोळु ' – नि. |
| २२४-२ | नासोनी | सोसोनि | पहिला पाठ बरोबर.... ' दुःखध्वंसवत्वेन पाषाणवत् ' – लिं. ' अत्यंत नाशदिं ' – नि. |
| २२८-२ | परवाहे ईश्वरत्व | प्रवाहेश्वरत्वें | दुसरा पाठ बरोबर. ' प्रवाहेश्वरेत्वेनेश्वरत्वमन्यत्र निक्षिप्य ' – लिं. ' प्रवाहेश्वरत्वदिंद ' – नि. |
| २३१-२ | — | बौद्ध | हें नांव प्रत १ मध्यें नाहीं. |
| २४७-३ | बळिभद्रापासूनि | बलभद्रापासून | ' बलभद्रामेण प्रतिपादिता ' – लिं. ' बलभद्रामनिंद – नि. |
| २५२-२ | वस्तुनिर्दोष | वस्तुनिर्देश | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| २५७-४ | समंध | संबंध | ' संबंध ' हा शब्द प्रत १ मध्यें ' समंध ' असा लिहिला गेलेला दिसतो. हेंहि भाषावैशिष्ट्यच होय. |

| | | | |
|---|---|---|---|
| २६०-३ | सास्यादिषट्क | शमादिपट्क | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| २८४-३ | अरूढी | आरूढ | दुसरा पाठ योग्य – नि. |
| २८९-१ | वेव्हार अपेक्षा | व्यवहार उपेक्षा | ' अपेक्षा ' बरोबर. ' व्यवहारव्यलुवनुपेक्षिसि ' – नि. ' व्यवहारमपेक्ष्य ' – लिं. |
| ३०४-१ | साम्यादि | शमादि | ' शमादि ' बरोबर. |
| ३१४-२ | भयमत्त अनुमत्तें | भयभक्ति अभिमत | ' भयभक्ति ' हा पाठ योग्य. ' भक्तिभावदिं ' – नि. |
| ३२६-१ | गळेयुक्त | गळगंचयुक्त | ' गंगेदोगलु ' – नि. |
| ३३६-१ | महानुसंन्याये | महानसान्यायें | पहिला पाठ योग्य नाहीं. ' महानसदंते ' – नि. |
| ३४३-३ | सद्भावप्रमाण | संभवप्रमाण | दुसरा पाठ ग्राह्य. – नि. |
| ३४५-३ | °वैसिकालागून | °वैशेषिकालागून | दुसरा पाठ ग्राह्य. – नि. |
| ३५१-२ | छंद | छेद | दुसरा पाठ ग्राह्य. – नि. |
| ३६७-२ | मुक्तिकाकार | शुक्तिकार | दुसरा पाठ ग्राह्य. – नि. |
| ३८८-२,४ | अस्पृष्टत्व | स्पष्टत्व | ' स्पष्टते अल्लदे ' – नि. |
| ४१०-३,४ | अनन्यभाव । अत्यंभाव | अन्योन्याभाव । अत्यंताभाव | दुसरा पाठ योग्य. |
| ४२४-४ | पराव्यागात्मा | परमात्मा | दुसरा पाठ योग्य. |
| ४४०-१ | समाति अभिमानी | समष्ट्यभिमानी | दुसरा पाठ योग्य. |
| ४४३-४ | सबळब्रह्म | शबलब्रह्म | दुसरा पाठ योग्य. |
| ४४६-१ | अश्चित्त | कश्चित् | पहिला पाठ अर्थशून्य. |
| ४५२-१ | वरी वक्तृ जळे पंचीकृत | वरिअव्यक्त झालें अपंचीकृत | प्रत २ मधील पाठ बरोबर आहे. 'उपर्यव्यक्तापंचीकृत'–लिं. |
| ४५९-३ | परिसतां तत्वादि | परिशीतादि | दुसरा पाठ योग्य. |
| ४७७-१ | बुद्ध्यादीककार्य त्यजुनी | बुध्यादिकार्य सजूनि | दुसरा पाठ योग्य. ' बुध्यादिकार्यं सृष्ट्वा ' – लिं. नि. |

| ओवी व चरण | प्रत १ | ओवी व चरण | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|---|
| ५०७-१ | स्फटिकादि | | स्फोटकादि | दुसरा पाठ बरोबर.—नि. |
| ५०८-१ | वेदादी | | वियदादि | दुसरा पाठ बरोबर—नि. |
| ५४५-३ | अमोहकरणी | | मोहकारिणी | दुसरा पाठ योग्य. |
| ५४६-२ | पशुपदा | | पशुपदार्थ | 'र्थ' राहून गेला आहे. पाठभेद नाहीं. |
| ५५०-१ | क्षणमात्रे विकारोनि | | वीक्षणमात्रे विकासोनि | पहिला पाठ योग्य. 'वी' गळला आहे. 'दर्शनमात्रेण विकृत्य'—लिं. 'विकृतियिं'—नि. |
| ५५५-४ | सविकल्प | | निर्विकल्प | दुसरा पाठ बरोबर.—नि. |
| ५५८-१ | राजस | ५५९-१ | तैजस | दुसरा पाठ बरोबर.—नि. |
| ५७०-४ | शब्दघ्राण | | शब्दग्रहण | 'ग्रहण' हा शब्द 'घ्राण' असा प्रत १ मध्यें लिहिला गेला आहे. |
| ५८६-३ | लिंगी | | गिळी | 'उदानवायुः कंठस्थानस्थ उद्गारं कुर्वन् वर्तते'—लिं. 'उद्गारमं माडुत्तिहुदु'—नि. |
| ५८९-१ | कृकवायू | ५९०-१ | कृकर | 'र' गळला आहे.—नि. |
| ६१४-३ | सप्तविंशतितत्वथार्थ | | तो षड्विंशति तत्वयथार्थ | दुसरा पाठ बरोबर आहे. 'अिप्पत्तारने'—नि. |
| ६४१-१ | देवदत्तालागुनी | | देवतालागूनी | देवदत्ताचा येथें कांहींच संबंध नाहीं. 'आतंगे'—नि. |
| ६४७-२ | वृष्टि | | वृत्ति | दुसरा पाठ योग्य. 'वृत्तिकल्पित'—नि. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६६९-२ | — | | मंद | प्रत १ मध्यें हा शब्द गळला आहे. |
| ६९२-१ | इच्छा काम्य अहं | | इच्छम्यहं | दुसरा पाठ बरोबर. |
| ६९४-१ | कुटुंब बाल्य अहं | | कुटुंबवानहं | दुसरा पाठ बरोबर. |
| ७२९-१ | चरयोगीजन | | वरयोगी | दुसरा पाठ बरोबर. |
| ७६०-३, ४ | लोहकुंतन । न्याये | | लोहकांतांतरकुंतन । न्यायें | दुसरा पाठ योग्य. – नि. 'लोहान्तकुंतोपम' – लिं. |
| ७६२-२ | अगिव्यासंयोगें | | अविद्यासंयोगें | पाठभेद नाहीं. – नि. लेखनप्रमाद आहे. |
| ७७९-३ | गुहांबरवटक | | गृहद्वार उंबरवटिका | दुसरा पाठ बरोबर. 'देहल्युपरि' – लिं. 'देहळियमेलिर्द' – नि. |
| ७९२-१ | देहाची छाया | | देहच्चिच्छाया | 'अहंकारस्यदेहचिच्छाय' – लिं. |
| ८०७-२ | विवर्तके | | निर्वर्तक | 'निवर्तकीभूत' – लिं. 'निवर्तकमाद' – नि. |
| ८९७-४ | गोही | ८९८-४ | अंगी | दुसरा पाठ बरोबर. – नि. |
| ९०३-४ | उपरती | ९०४-४ | उपपत्ति | दुसरा पाठ बरोबर. – नि. |
| ९२६-१ | सर्वशांकार्य | ९२७-१ | सर्वसांकर्य | दुसरा पाठ बरोबर. |
| ९३१-१ | कंपकळुआदिक | ९३२-१ | कंपकळुषादिक | दुसरा पाठ बरोबर. लेखनप्रमाद आहे. |
| ९३८-२ | मुग्धी | ९३९-२ | मूर्ध्नि | लेखनप्रमाद आहे. |
| ९५१-१ | विद्य | ९५४-१ | विघ्न | लेखनप्रमाद आहे. |
| ९८२-१ | शुभइच्छा | ९८५-१ | सुखेच्छा | दुसरा पाठ योग्य. 'अनंतरं सुखेच्छाविचारणयोर्बलेन विषयासक्तिपरित्याग एव तनुमानसीत्यच्युते' – लिं. नि. |

| ओवी व चरण | प्रत १ | ओवी व चरण | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|---|
| ९९५-४ | ध्यान(!)णेजें | ९९८-४ | ध्यानयोजी | |
| १०३०-३ | कृशादिक | १०३४-३ | कृत्यादिक | पहिला पाठ योग्य. लेखन अशुद्ध. 'कृषि मुख्यगः' —लिं. 'कृषिवाणिज्यादि'—नि. |
| १०४१-२ | शीतळार्थी | १०४५-१ | शिथिल्ती | दुसरा पाठ बरोबर. |
| १०४२-४ | भोगसाक्षा | १०४६-४ | भोगसाक्षात्कार | पाठभेद नाहीं. शब्द पूर्ण नाहीं. |
| १०४८-३ | भुविकंप | १०५२-३ | भयकंप | दुसरा पाठ बरोबर. |
| १०६३-१ | कणवट | १०६८-१ | चणवट | दुसरा पाठ बरोबर. 'भर्जितचणकादि'—लिं. |
| १०६३-२ | मंत्रासीच | १०६८-२ | मात्रासिचि | दुसरा पाठ योग्य. लेखनप्रमादामुळें बदल. |
| १०६७-१ | तिलोधन | १०७२-१ | तिरोधान | दुसरा पाठ बरोबर. |
| १०८७-२, ३ | मैत्रीकरून । उदित | १०९२-२ | मैत्रीकरुणामुदित | दुसरा पाठ बरोबर. |
| १०९४-१ | मनोवास | १०९९-१ | मनोनाश | दुसरा पाठ बरोबर.—नि. |
| ११००-४ | मुखाविर्भाव | ११०५-४ | सुखाविर्भाव | दुसरा पाठ बरोबर.—नि. |
| ११२४-१ | रज्जू | ११२९-१ | ऋजु | दुसरा पाठ बरोबर. |
| ११२८-१ | अपत्य- | ११३३-१ | अपथ्य | दुसरा पाठ बरोबर. |
| ११३७-१ | ज्ञात्या- | ११४२-१ | त्राता | दुसरा पाठ बरोबर.—नि. |
| ११४४-१ | करमरियादि | ११४९-१ | महापथि | पहिला अर्थशून्य. |
| ११४७-२ | पाशानुग्रह | ११५२-२ | शापानुग्रह | दुसरा पाठ बरोबर.—नि. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११६१-१ | श्रुतअश्रुतमारुतवशें | ११६६-१ | श्रिताश्रितमरुतवशें | दुसरा पाठ बरोबर. – नि. |
| ११६३-३ | वधूसी | ११६८-३ | पुश्चलीसि | 'पुंश्चलीसि' हा पाठ योग्य. 'निजभर्तरि सुरत प्राप्त पुंश्चलीवत् पराभिलाषयुक्त एव भवति'– लिं. 'पुंश्चलियंते' – नि. |
| ११६७-१ | परस्तुती | ११७२-१ | प्रस्तुत | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ११७१-१ | गगनमणीऐसे | ११७६-१ | मगगगनींऐसें | 'गगनवाणीवत्' – लिं. 'गगनवाणियंते' – नि. |
| ११७३-४ | अनाभि विषयतो | ११७९-४ | अनुभवी विषयातें | लेखनप्रमाद. |
| ११८०-४ | प्रयास | ११८६-४ | प्रहास्य | 'परिहासो' – लिं. 'परिहासमक्कुं' – नि. |
| ११९८-२ | वांछिती | १२०४-२ | विच्छित्ति | दुसरा पाठ बरोबर. |

## द्वितीय परिच्छेद

| ओवी व चरण | प्रत १ | ओवी व चरण | प्रत २ | टीप |
|---|---|---|---|---|
| २-१ | आतां परांतपरतर अति। | | आतां परात्परतर अति। | पाठभेद नाहीं. प्रत १ मध्यें हस्तदोष आहे. |
| २-२ | उत्कर्षशि (व) सिद्धांन्तपद्धती। | | उक्तरूप शिवसिद्धान्त-पद्धति। | 'परतर शिवसिद्धांतव' – नि. |
| १३-२ | वासुदेवमुखी | | वामदेवमुखीं | दुसरा पाठ योग्य. |
| १९-१ | शुद्धस्थ | | सुधारव्य | दुसरा पाठ योग्य – नि. |
| १९-२ | बहूनेत्र | | बाहुनें | 'अवनिं बाहु' – नि. |
| १९-४ | विभुवे | | विभुनें | दुसरा पाठ ग्राह्य. |
| २१-२ | योगव्हत | २०-२ | योगाव्हया | दुसरा पाठ ग्राह्य. |
| २८-२ | अशेख | | दशेशें | दुसरा पाठ ग्राह्य. 'दशेशनु' – नि. |
| २८-४ | शेषाने | | शशीनें | दुसरा पाठ ग्राह्य. 'शशि' – नि. |
| २९-४ | परमेश्वरा | | नंदीश्वरा | दुसरा पाठ ग्राह्य. 'परम नंदीश्वरनु' – नि. |
| ३५-१ | मुगुटगम्य तोमुखे | | मकुटागम तो मुख्य | दुसरा पाठ ग्राह्य. लेखनप्रमाद. – नि. |
| ३९-२ | शिवलीने | | शूलीनें | दुसरा पाठ ग्राह्य. 'शूलि' – नि. |
| ४०-२ | लय | | यम | दुसरा पाठ ग्राह्य. 'यमनु' – नि. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४२-४ | सौपायने | वैशंपायनें | दुसरा पाठ ग्राह्य. ' शशपायनु ' – नि. लेखनप्रमाद. |
| ४५-४ | सर्वार्थके | संवर्तकें | दुसरा पाठ योग्य. ' संवर्तकनु ' – नि. |
| ५१-१ | सौत्यागम | सांख्यागम | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ५१-२ | संतानागम | शान्त्यागम | दुसरा पाठ योग्य. |
| ५२-१ | सुभगागम | शुभागम | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ५३-२ | यात्रजतंत्र | पावनतंत्र | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ५३-३ | दौर्घ्यतंत्र | दौर्ह्यतंत्र | ' दैर्घ्यतंत्र ' ' प्राज्ञतंत्र ' – नि. |
| ५४-२ | भेदांत कारणतंत्र | — | प्रत १ मधील हे शब्द अनावश्यक आहेत. नि. देत नाहींत. |
| ५५-१ | परोद्भूतागम | वीरोद्भुतागम | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ५६ | अहीअगम अप्रमत्तागम। आशागम आख्यागम। अप्रीतौजसागम। आनंदागम तो ॥ | अमेयागम अप्रतिमागम। आप्यागम असंख्यागम। अमितौजसागम। आनंदागम ॥ | ' अमियागम अप्रतिआगम ' – नि. |
| ५९-१ | जितागम | अतीतागम | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ५९-३ | जातिमानागम | ज्योतिर्भानव | दुसरा पाठ योग्य. ' ज्योतिर्भावनागम ' – नि. |
| ६५-२ | उत्ताराजिज्ञास | उत्तरनिश्वास | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ६६-२ | सुसौख्य | सुसांख्य | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ६७-२ | प्रज्ञाप्रतिमंत | प्रजापतिमत | दुसरा पाठ योग्य. – नि. |
| ६९-१ | ईश्वरतंत्र | प्रस्तरतंत्र | दुसरा पाठ योग्य. – नि. |

